## तरंग ५४ वा

किती चौघडे आणि नगारे । डुम डुम डुम डुम वाजुं लागती ! ।
निनदति भेरी कंबु घनध्वनि । हयगज हर्षे सुस्वर गर्जति ॥
मृदंग झांजा वाजति, सनया । रागदारिने मंजुळ नदती ।
ऐसा थाट गर्जत येते । स्वपुरातें ती रामवरातीं ! ॥ १ ॥

येते अंबे परिसुनी स्वपुरा वरात । सारे प्रहृष्ट पुलकावलियुक्त होत ॥
आपापलीं सजविलीं सदनें तयांनीं । ते हाट, वाट, पुरिं चोहट शोभवोनी ॥
मार्गावरी सकल सिंचुनि अर्गजातें । केले तयीं रुचिर चौक मनोज्ञ कीं ते ॥
बाजार पण्यरचना अति शोभणारी । जी तोरणध्वजपताकि विराजणारी ! ॥३॥

रंभा रसाल फलयुक्त, सुपारि झाडें । वेलीवले बकुलवृक्ष मुळीं न थोडे ॥
तैसे कदंबतरु सुंदरसे तमाल । रत्नें हिरेजडित उज्ज्वल आलवाल ! ॥४॥
घरोघरीं मंगल कुंभ लावुनी । अत्यंत रम्या रचना विनिर्मिली ॥
ब्रह्मादिकांनीं स्तविली प्रहर्षे । श्रीराघवाची नगरी धरातळीं ! ॥५॥

नृपभवन असे तें शोभलीळे अतीव । बघुनि सुरचना ती मोहिला कामदेव ! ॥
शुभकर शकुनांनीं शोभल्या ऋद्धिसिद्धी । मकरध्वनि उफाळे हर्षवीना सुखाब्धि ॥
दशरथगृहशोभा मूर्त सर्वेश्वरांनीं । ...भग तनु धरोनी वाढवीली ...नी ॥
हृदिं धरिलि तयानीं लालसा दर्शनाची । जगुं रघुवरसीआमूर्ति पाहू स्वतानि !

यूथीं यूथि विशालिनी मिळुनियां तें चालल्या कामिनी ।
सौंदर्यें रतिलाहि लाजविति ज्या, माधुर्यपूर्णानना ॥
हस्ती घेउनि आरत्या रघुवरा ओंवाळण्या हर्षला ।
गाती मंगल गानि, मूर्त जणु त्या श्रीभाग्यी भासल्या ! ! ॥८॥

ज्याचा जो कीं सूतनिधनो लोकसर्वदीप ।
त्याच्या हर्षा कवण कवनीं वर्णनाला विधीप ? ॥
कौसल्यादि प्रमुदितमना वेधला राममाता ।
प्रेमोद्रेकें जणु विसरल्या देहभाना समस्ता ! ॥ ९ ॥

दानें दिली विपुल विप्रगणा तयांनीं । पूर्णानंदे भिकमंगस ... ...वोनी ॥
वाटे जसौ अति दरिद्रि कुणी निजानीधनोत्तम मिळुनी पुरुषार्थ ...ी ! ॥१०॥

प्रेमप्रहर्षि विवशा सगळ्याच माता । त्या चालवे न जणु देह गळून जातां ! ।
हो रामदर्शनिं अतीव रती तयांची । त्या आरती करिति सिद्ध समग्र साची ॥ ११ ॥

तदा नाना वाद्यें गजर करिती मोदभरित ।
सुमिला मागल्यें सकलपरिं तीं सिद्ध करित ॥
फुलें दूर्वा पर्णें दधि हळद शाल्यंकुर भले ।
तशी पूगी पानें, सुभग तुलसी मंजरि-दलें ॥ १२ ॥
लाजा रोचन, मंगलें वितरल्या तैशाच त्या अक्षता ।
सान्या मेळविल्या मनोहर तिनें सद्वस्तु सत्समता ॥
स्वर्णी कुंभ सकुंकुमाकित तिथें मांगल्यशोभी जणू ।
तीं कीं कामविहंगमेंचि रचिलीं नीडें लपाया म्हणू ! ॥ १३ ॥
आमोदा निथल्या शुभाढ्य शकुना केशापरी वानणें ? ।
राज्ञी सर्वहि तूर्ण पूर्ण करिती तीं मंगलें शोभनें ॥
केल्या सिद्ध तयीं तदा शुभवहा नानापरी आरत्या ।
राज्ञी मंगल गायि सुस्वर'किती आनंदुनी गाति त्या ? ॥ १४ ॥

श्रीमंगलें कनकताटिं भरोनि राज्ञी । हस्तांबुजीं धरुनि तीं मुदितीं मनानीं ॥
गेमाचपल्लवितदेहलता निघाल्या । ओवाळण्यास्तव सुतासि अधीर झाल्या !! ॥
हो धूपधूम भरुनी नभ कृष्णकांति । कीं आवणानिलचि तीं घनराजपंक्ति ! ॥
त्या कल्पवृक्षसुमनावलि देवि वृष्टा । माला बलाकि जणु त्या भुलवीति दृष्टा ! ॥
ती रत्नकांतिधर तोरणपंक्तिशोभा । जी इंद्रचापसम लोचनि निर्मि लोभा ! ॥
हर्म्यांग्रिं चंचलगती पुरभामिनींची । लोके दिस चपळता जणु दामिनींची !॥ १७ ॥
तें दुंदुभिध्वनि घनावलिगर्जित कीं ! त्या याचकासि तुद चातक-बर्हि-भेकीं ! ॥
सौभाग्यवारि सजिती सुर वर्षधारा ! । नारीनरा कुणित सस्यचि मानु पीग !! ॥

मुहूर्ता पाहोनी गुरुवदनि आदेश मिळुनी ।
अयोध्येमध्यें तो रघुकुलमणी ये प्रविशुनी ॥
स्मरोनी चित्ताब्जीं शिव-गिरिसुता-विघ्नरिपुन्ना ।
मुदें सर्वां लोकांसहित सकला अति गुरा ॥ १९ ॥

शकुन सुभग होती वर्दती देव पुरं । निनदति पटहानें मानसी हर्षरूपें ॥
मुदित त्रिभुवनाला दाविती स्वर्गलीला । अमरनगरनारी रगल्या हर्षलीला ! ॥
पंचेवपवंश बघु सुंदर यव्रवारें । तें वदि गुण नट मागध गाति वानें ॥

झाले जयध्वनि अथापद्द वेदघोष। दाही दिशां भरति मंगलपुष्पघोष ! ॥२१॥
तेव्हां अनंतपरि वाद्यनिनाद चाले। पौरां पुरीं, नभि सुरां किति सौख्य झालें!
ना ती वदति कवणासहि वर्णु यावी । तो हर्षसौख्यभर राहि मनींच केवीं ! ! ॥
दशरथनृपतीतें वंदितो सर्व लोक। नयनिं बघुनि रामा, त्यांस होई सुतोख ॥
मणिगणवरवस्त्रें टाकिलीं त्यांवरुनी। पुलक भरत गात्रीं, नेत्रिं संपूर्ण पाणी ! ॥
पौरांगना करिति आरति हर्षपूरीं। सौख्यें पहाति नृपपुत्र मनोज्ञ चारी ॥
आम्योत्तमा उघडुनी शिबिका पहाती !। देखोनि चारिहि वधूंसि सुतुष्ट होती ! ॥

ऐशा रीतीं सकळहि जना देत सौख्यें अपार।
राजद्वाराप्रति नववधूयुक्त आले कुमार ॥
ओवाळीती मुदित हृदयीं प्रेमला त्यांस माता।
ओवाळीतां फिरुनि फिरुनी हर्ष त्यां कोण चित्ता ! ॥२५॥
रत्नें नाना अमित वसनें उत्तमें त्यां वरोनी।
ओवाळूनी त्यजियलिं किती भूषणेंही तयानीं ॥
देखोनी ते नव वरवधू चारिही विश्वकांत।
अत्यानंदीं सकलजननी सौख्य घेती अनंत ! ॥२६॥
सीतारामच्छवि निरखिती आदरें त्या कितीदा !।
वाटे त्यांना अजि मिळविलें जीवनानन्दकंदा ॥
सीतावक्त्रा बघति कितिदा हृष्ट राज्ञीसख्याही।
गानीं गाती सुभग सुकृतें वानुनी आपुलीं हीं ! ॥२७॥

देव क्षणोक्षणिंहि वर्षति पुष्पराशि। ते नृत्यगानिं करिती प्रभुसेवनासी ॥
सेवा समर्पिति जणों प्रभुपादपद्मीं। जें चाल्ले प्रभु सजानकि आत्मसद्मीं ! ॥

पाहोनी त्यां रुचिर सुभगां चारही दंपतीतें।
वाग्देवीही उपमिनि तयां धुंडु लागे स्वचित्तें ॥
नेकाही जें तिज मनिं रुचे, वाटुनी गौण भारी।
लाजोनी ती टकनि नुसती रंगली रूपधारी ! ! ॥२९॥

तें शास्त्रधर्म कुलरीति करून पूर्ण। देऊनि अर्घ्य, तळिं पायघड्या करून ॥
काढूनि दृष्ट बरवी तनय-स्नुषांतें। घेऊनि, हृष्ट जननी गृहिं येति कीं तें ॥
सिंहासनें सहजसुंदर चारुकांति। चारी विनिर्मिलिं जमें मदनें स्वहस्तीं ! ॥
त्यांचेवरी बसवुनी नवदंपती ते ! तत्पुण्यपाद धुतले अति भक्तिचित्तें ! ॥३१॥

त्या धूपदीप करुनी विधि वेदमार्गे । नैवेद्यपूजनि वधूवर तुष्ट सांग ॥
ते मंगलायतन आदरिलें तयांनीं । ओंवाळुनी व्यजनिं ढाळुनि चामरांनीं ! ॥
माता समस्त अति मोदिं हृदीं भरोनी । ओंवाळुनी किंतिक वस्तु दिल्या तयांनीं॥
वाटे जणों परमतत्त्वचि योगि पावे । कीं दीर्घरोगिकरिं येत सुधा स्वभावें ! ॥
कीं लाभला परिस तो जणु जन्मरंका ? जन्मांधही मिळवि लोचनलाभ तो कां!
कीं, मूकवक्त्र करि भूषित शारदाच! । कीं, पावला विजय शूर रणांत साच !
हें होय सौख्य शतकोटिपटीं समृद्ध । झालें तसेंच सुख त्या जननींस शुद्ध ! ॥
भ्रात्यांसमेतचि विवाहित जो जहाला । तो राम राघवकुलेंदु गृहासि आला ॥३५॥
राज्ञी यदा करिति लौकिक सर्व रीती । लज्जेसि ते मनिं वधूवर कीं वरीती !
ते मोद आणिक विनोद बघून त्यांचे । श्रीरामचित्तिं अभिराम सुहास्य नाचे!

❀ ॥ इति वरव्रातस्यायोध्याप्राप्तिवर्णनं नाम चतुःपंचाशत्तमस्तरङ्गः॥ ❀

## तरंग ५५ वा

तें होय देवपितृपूजन सर्वरीतीं । आनंद दृष्टफल पाउनि त्या वरीतीं ॥
वंदोनि मागति तदा वरदान रामा । हो कीं सदैव सुख बंधुसमेत रामा ॥१॥
अंतर्हितीं अमरिं अर्पियल्या वराशीं । राज्ञी प्रसन्नमनि अंचलि घेति ज्यांसी !
घेवोनिकें दशरथें मग ते वराती । त्यां दे मुदीं वसनभूषणरत्नपूर्ती! ॥ २ ॥
भूपें निरोपित, सदर्प मनें स्वधामीं । केलें तयीं गमन ठेवुनि चित्त रामीं ॥
देई अहेर नृपती सगळ्याच पौरां । नारीनरा गणति नाहिं सुखा अपारा ! ॥३॥
जे जे तदा म्हणति याचकवृंद तें ते । देई प्रसन्न हृदये नरनाथ त्यातें ॥
सन्मानिले सकलसेवक दानमानें । जे वादकादिकहि ते नृपसत्तमानें ॥४॥
भूपासि वंदुनि विचिंतुनि त्या अभीष्ट । ते जाति गात गुणराशि तदीय तुष्ट ॥
तेव्हां वसिष्ठ मुनिभूसुर यांसमेत । राजा प्रवेश करि आपुलिया गृहांत ॥५॥
त्या त्या वसिष्ठ वितरी अनुशासनातें । दर्ग्युक्त पुण्यविधिनें करि भूप ते तें ॥
राज्ञीहि थोर बघुनी द्विजवृंद तेथें । आनंद त्या उठति वाढुनि भाग्य मोठें ॥६॥
तत्पादाब्जां धुति करविती स्नान अभ्यंग त्यास ।
पूजोनी त्यां दशरथनृपें भोजनीलें सहर्ष ॥

मानें दानें नृप अति तयां तोषवी भक्तिमूर्ति ।
आशीर्वादां अगणित मुदा देउनी विप्र जाती ॥ ७ ॥

विश्वामित्रा वहुपरि नृपें पूजुनी प्रार्थियेलें ।
" नाहीं माझासम कुणि दुजा धन्य ! " हें राय बोले ॥
त्याचें भवना सदन करि तो तत्पदांभोजधूळी ।
येई राणीसहित नृपती लावुनी आत्मभाळीं ॥ ८ ॥

त्यातें देई क्षितिप अपुल्या मंदिरीं सन्निवास ।
राणी राजा वहुपरि तया सेविती भव्यदास ॥
तैसें पूजी अतिशयमुदें तो वसिष्ठा सभक्ति ।
प्रेमें प्रार्थी, चरणकमलें वंदुनी नम्रचित्तीं ॥ ९ ॥

ते राजपुत्र स-वधू, नृपती सराणी । वंदीति सद्गुरुवसिष्ठपदां स्तवोनी ॥
सारेच वंदिति गुरुंसि पुनःपुन्हां ते । आशीर्वचें मुनिवरें दिधलीं तयांतें ॥
प्रार्थीत त्या नृप अतीव भक्तिपूर्ण । तो पुत्रवित्त मुनिच्या पुढतीं करून ॥
त्यांतून घेत मुनिनायक दक्षिणेतें । आशीर्वचें वितरि, हर्षवि भक्तचित्तें ॥११॥

सप्रेम ठेवुनि हृदीं प्रभुरामसीता । तो हृष्ट जाय मुनि आपुलिया निकेता॥
आमंत्रुनी द्विजवधू मग लोककान्तें । त्यां भूषणें सुवसनें दिलिं मूल्यवन्तें ॥
बोलावि तो मग समग्र सुवासिनींसी । दे त्यां यथेष्ट वसनें बहुमूल्य तैसीं ॥
बोलावि सर्व मग वृत्तिपरां जनांना । दे त्यांस भूप अनुरूप धना, स-माना ॥
जे पाहुणे दयित, पूज्य असे नृपाचे । सन्मान त्यांसि नृप देइ अतीव साचे॥
पाहूनि देव रघुवर्यविवाहहर्षे । वानूनि त्या सजिति हर्षुनि, पुष्पवर्षे !॥१४॥
होऊनि हृष्ट सुर जाति निजालयांतें । वाद्यें प्रहर्षभरिं वाजविती किती ते ! ॥
ते एकमेकिं वदतां प्रभुरामकीर्ति । गाऊनि होति हृदिं भक्तिरसार्द्रमूर्ति ॥१५॥
सर्वांस सर्वपरिं भूप समानमानें । तो बोलवीत हृदयें अति आदरानें ॥
तेणें तदंतरिंहि मोद भरून दाटे । झाला कृतार्थ नरनाथ, उणें न कोठें ! ॥
अंतःपुरांत नृप जों मग ठेवि पाय । तों पाहि तो सुत वधूंसह तेथ राय ॥
अत्यंत हृष्टमनिं घेत तयांस अंकीं । तें तत्सुखें कवण वर्णुं शकेल लोकीं !॥
राया सुनांसि लडिवाळ निजांकिं घेत । गोंजारुनी करित त्यां किति हृष्टचित्त!
राणी तसे सकल लोकहि हर्षमग्न । वान्याचिया हृदयिं नांदत सौख्य पूर्ण ! !

याया तयां कथित सर्व विवाहवृत्त । ऐकोनि तें, सकल हृष्ट अतीव होत ॥
वाखाणि भूप गुणशील महत्त्वरीति । प्रीती विचार धनिता जनकांतरीं ती ॥
तत्संपदा अतुल वानिलि भूपरायें । भाटांसही नच तसें जणु,वर्णिता ये ॥
ऐकोनि तें जनकवर्णन हर्षकारी । राणी अतीव सुखल्या जणु सौख्यपूरीं ! !

राजा पुत्रसमेत न्हाउनि, गुरू विप्रादि आप्तादिक ।
बोलावूनि तयांसवें करित तो सद्भोजनातें निक ॥
ऐशा रीति अतीत पंचघटिका रम्या तदा यामिनी ।
गाणीं सत्कुलकामिनी वरतनू गाती रसार्द्रा मनीं ! ॥२१॥

होता भोजन आंचवून सकलीं तांबूल सेवीयले ।
सद्गन्धादिकिं भूषवूनि सगळे अत्यंत आनंदले ॥
नेत्रीं पाहुनि रामरूप हृदयीं घेऊनि, राजाज्ञया ।
सारे लागति वंदुनी जन गृहा आपापल्या जावया ॥२२॥

नांदे प्रेम, विनोद, मोद, गुरुता, सौंदर्य त्या लोकिं जें ।
यांचें केविं कथावयास मजला औचित्यवाक्यें निजे ? ॥
येना जें शत शारदाहिनिधरां वेदां गणेशा हरा ।
येव्या, तें मज केविं ? काय किरडूं माथां धरी हे धरा ! ॥२३॥

बोलावि भूप मग गौरवुनी स्वराणी । बोले मृदूक्ति वचनीं, सकला परींनीं ॥
"आल्या वधू सगृहाहुनि लेकि माना !! डोळ्यांस पांपणि तशा तुम्हि व्हा तयाना!
झाली मुलें श्रमित या निजवा निवातां निद्रा दिसे चिलगली जणुं डोळियात!'
सांगोनि हे शयनमंदिरिं जाय भूप । चित्तात सांठवुनि रामपदस्वरूप ! ॥
ऐकोनि ती सहजरम्य नृपालवाणी । रत्नाढ्य मंचक करीति सुसज्ज राणी ॥
गोक्षीरफेनसम शुभ्र मनोज्ञ शय्या ।त्याचेवरी मृदुलशा गिरद्या उशा या ॥२६॥
सर्वांस रम्यवर आस्तरणें मृदूशीं । ज्यांची यथार्थ रुचि वर्णुनी येइ कशी ? ॥
माला सुगंध मणिमंदिरिं रत्नदीपा।शोभा अशी विरचिली सकलीं अमूप ॥२७॥
अत्यंत शोभन मनोहर चादवा तो । जो पाहिल्याविण न वर्णनशक्य होतो! ॥
रामासि ऊरवुनि न्हाविति त्या निजाया । प्रेमेंचि सौख्यशयनावरि भूपजाया॥
श्रीराम बंधुंहि सांगि पुनःपुन्हा कीं।आपापल्या शयनिं तें निजती पलंकीं ॥
त्या श्याम मंजु सुकुमार बघोनि रामा।रामा विचारिति सकौतुकहर्षधामा ॥२९॥

"जातां पथीं अतिभयंकर ताटका रे! । बाळा! कशी वधिलि तूं, वद वृत्त सारें! ॥
जे घोर राक्षस, न जे रणि जेय, तेवीं । मारीच मंथिलि सुबाहु समित्र केवीं ?
बाळा! प्रसाद मुनिच्या पदपंकजांचा । त्यावांचुनी कठिनि मार्ग तुम्हांस कैंचा ?
बंधुद्वयें मुनिमला तुम्हि रक्षियेलें । विद्यादिकां गुरुकृपें तुम्हि मेळवीलें ॥३१॥
उद्धारिलें मुनिकलत्र पदाब्जधूलीं । ही कीर्ति सर्व भुवनांत भरूनि ठेली ! ॥
जे कच्छपृष्ठसम, वज्र तसें कठोर । तें तोडिशी शिवधनू नृपसंधि थोर ! ॥३२॥
लब्धा जगद्विजयकीर्तिसरूर सीता । येशी गृहा सकलबन्धुविवाहकर्ता ॥
कर्मे अमानुष तुझीं गमतात सारीं । ही सिद्धि कौशिककृपें सकलप्रकारीं ! ॥३३॥
आम्हां सुधन्य अजि जन्म गमेचि लोकीं । वत्सा! तुझ्या शशिमुखा अवलोकितों कीं!
गेले अदर्शनिं तुझ्या दिन आमुचे जे । त्यांचा विरिंचिकरिंही नच पार की जे!"
प्रेमार्द्र नम्र वच बोलुनि तोषवीतो । श्रीराम सर्व जननीहृदयांस कीं तो ॥
चित्तीं स्मरोनि हरसद्गुरुविप्रपादां । संकोचि निद्रित विभू नयनारविंदां ॥३५॥
निद्रेंतही प्रभुमुखाबुज तेवि साजे । सायंतनीं कमलभा जणुं मीलिता जे ! ॥
पौरांगना गृहिं गृहीं जणुं जागणान्या । देती परस्पर उखाणि, शुभाढ्य सान्या ॥
राज्ञी विनोदिं वदती 'रजनी विराजे । तैशी गडे ! नगरिही अतिरम्य साजे!' ॥
वेती सुनांसि निज त्या निजतां पुढ्यांत । कीं नाग शीर्षमणि ते उरिं झांकतात!
झाले प्रभातिं जन जागृत पुण्यकालीं । जैं कुक्कुट ध्वनति ते मधुरारवाली ॥
ते बंदि मागध करीति गुणानुवाद । द्वारांत येति जन वंदु पदारविंद ॥३८॥
ते बंधु सर्व नमिती गुरुविप्रदेवा । मातापित्यां मिळविती शुभ आशि सर्वा ॥
माता पहाति सुखितें तनयाननांतें । जाती समेत सगळेच पित्यासवें ते ॥३९॥
सहजशुचितनू ते चारही बंधु जाती । शुभजलशरयूतें, स्नान तेथें करीती ॥
नियमितविधि सारे आचरूनि प्रभातीं । दशरथनिकटीं ते बुद्धिमान् पुत्र येती॥
निरखुनि तनयांतें, भूप घे त्यां उरासीं । चकति सकल तातें सागतां चित्तहर्षी॥
बघुनि रुचिर रामा हो सभा सुप्रसन्ना । निरवधि गमला तो लाभ तल्लोचनांना॥
आले वसिष्ठमुनि कौशिकही तदा ते । श्रेष्ठासनीं नृप तयां बसवी सुचित्तें ॥
पुत्रांसमेत मुनिवर्यपदाब्ज पूजी । दोनी मुनी रमति राघवमूर्ति-तेजीं ! ॥४२॥
धर्मेतिहास कथि उत्तम तें वसिष्ठ । राज्ञींसमेत नृपती परिसे सुतुष्ट ॥
सांगे वसिष्ठ मुनिनाहि अगम्यलील । हर्षेचि गाधिजकथाद्भुति पुण्यशील ॥

त्या वामदेवमुनि तें वदती 'यथार्थ । त्रैलोक्यिं गाधिजमुकीर्तिनदी वहात!' ॥
सर्वांसि मोद जरि ऐकुनि त्या वचातें । श्रीरामलक्ष्मण अतीवचि हृष्ट चित्तें ॥
आनंदमंगलमहोत्सवि या प्रकारें । जाती अनेक दिन हर्षभरें विहारें ॥
साकेतवासिजनता मुदि पोहणारी । झाली निमग्न अधिकाधिक सौख्यपूरीं ! ॥
हो स्वर्ककंकणविसर्जन सन्मुहूर्ती । आनंदमंगलविनोदनिं चित्तपूर्ति ॥
साकेतिं नित्य नव सौख्यभरा पहाते । घाल्यासि मागति पुन्हां सुर जन्म तेथें!
प्रार्थीति नित्य मुनि कौशिक जावयातें । प्रेमाग्रहेंचि रघुनाथ न सोडि त्यांतें ॥
पाहूनि नित्य नृपभक्ति विवर्धणारी । तो त्या प्रशंसि नृपतीस मुनीश भारी ॥
तें मागतां फिरुनियां गमना निरोप । राहोनि त्यापुढति पुत्रसमेत भूप ॥
सप्रेम बोलत "विभो! तुमचीच सारी । संपत्ति सेवकयुता, ससुता, स-नारी ! ॥

राहो हे मुनिवर्य ! नित्य तुमची मत्पुत्रिं साधो ! दया ।
वारंवार घडो जि ! दर्शन अम्हां जें देइ भग्योदया " ॥
प्रार्थोनी स-कलत्र-पुत्र मुनिच्या पायीं पडे भूपती ।
प्रेमोद्रेकभरें भरे गहिंवरें; राहे मुकी भारती ! ॥ ४९ ॥

आशीर्वादा वितरि सकलां त्यास हर्षे मुनीश ।
तत्प्रीतीचें कथन न असे शक्य केव्हाहि लेश ॥
जाई जेव्हां मुनिवर तदा पोचवी राम त्यासी ।
भ्रात्यांसंगें; मग परतती ते मुनीच्या निदेशीं ॥ ५० ॥

मार्गी जातां मुनिवर मनीं चिंति रामस्वरूपा ।
भक्तीही ती नृपहृदयिंची, त्या विवाहा अमूपा ॥
त्या वाखाणी प्रमुदितमनीं गाधिज प्रीतिभावें ।
प्रेमाधिक्यें भरुनि भरुनी चित्त त्याचें डुलावें ! ॥५१॥

ज्ञानी वसिष्ठमुनि, त्यापरि वामदेव । ते गाति कौशिककथा सहभक्तिभाव ॥
ऐकोनि गाधिजयशा नृप आत्मचित्तीं । वाखाणि पुण्य अपुलें किति तो सभक्ति !
तेव्हां विसर्जुनि सभा नृप ये गृहातें । पुत्रांसमेत विलसे अतिहृष्ट चित्तें ॥
जेथें तिथें नगरिं रामविवाह गाती । व्यापी त्रिलोकिहि मनोरम रामकीर्ति ॥५३॥
करुनि निजविवाहा ये अयोध्येस राम । तिथुन खचित झाली ती पुरी हर्षधाम!
शकति न कधिं वर्णू तद्विवाहोत्सवातें । अहिपति अथवा श्रीशारदा केधवां ते ॥

गणुनि कविकुलांचें जीवनस्थान पुण्य, । मतिमल हरणारें रामसीता शरण्य ॥
धवलयश तयांचें मंगलांचीच खाणी । कथिलि लव इथें मी उद्धराया स्ववाणी ॥
करावया पावन आत्मवाणी । श्रीरामकीर्ती तुलसीहि वर्णी ॥
अपार अब्धी रघुवीरगाथा । पलीकडे कोण कवींद्र जाता ? ॥ ॥५६॥
उपनयन-विवाह राघवाचे । परिसति सादर गाति जे स्ववाचें ॥
रघुवरजनकामजाप्रसादें । सततसुखीं रमणें तयांस साधे ॥ ॥५७॥
सीतारघूत्तमविवाह सभक्ति जे कीं । गातील ऐकतिल वा रसपूर्ण लोकीं ॥
लाभेल हर्षभर त्यांस सदा समस्त । कीं मंगलायतन रामयशेंचि मूर्त ! ॥५८॥

॥ इति श्रीमदयोध्याविश्रामपरमानन्दत्रैलोक्यवर्णनं नाम
पञ्चपञ्चाशत्तमस्तरङ्गः ॥

॥ इति श्रीमद्रामचरितमानसे सकलकलिकलुषविध्वंसने महाराष्ट्रभाषानुवादकाव्ये
'विमलसन्तोष-सम्पादनो' नाम प्रथमसोपानः समाप्तः ॥

—० ❀ ❀ इति बालकाण्डः समाप्तः ❀ ❀ ०—

श्रीतुलसीदासांच्या अमृतमया 'मानसा'स या श्लोकीं ॥
मी अनुवादुनि साधीं रामकृपेनेंचि धन्यता लोकीं ! ॥ १ ॥
श्रीखण्डेकुलजन्मा चिन्तामणि-जानकीतनय 'राम' ॥
गाई आत्मच्छंदें 'रामायण' मानसाख्य रसधाम ॥ २ ॥
श्रीसीतारामयशें गाउनि हीं 'राम' वर्णि 'सीते'तें ॥
श्रीतुलसीदासकृपें मानवि या सौख्य लाभतें तें नें ॥ ३ ॥
श्रीयादव-मुकुलादिक सज्जन मर्मज्ञ 'मानस'मराळ ॥
त्यांच्या कृपें विहरलों रामचरित्राब्धि सहज मी बाळ ॥ ४ ॥
हा वाग्विहार माझा देवो संतोष सज्जना रसिकां ॥
त्यांच्या आशीर्वादें पुढतिंहि कृति रम्य व्हावि ना असे कां ? ॥५॥

॥ श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तु ॥

॥ शुभमस्तु ॥

# — महत्त्वाचें शुद्धिपत्रक व अल्प टीपा —

| तरंग | श्लोक | शुद्धशब्द |
|---|---|---|
| १ | १० | ० रात्रिनम |
| २ | २ | मनिं बुद्धिवाणीं |
| ३ टीप | | सुरानीक–मयसमूह |
| ४ | २३ | कीं एक....दिव्यधाम |
| ७ | ५ | माहात्म्य |
| १२ | १७ | श्रीरामकीर्तिशरयू |
| १४ | २६ | अनुमान |
| १५ | १७ | अधिकाधिक |
| १५ | ७१ | तरि सुरसरिता |
| १७ | ३३ | स्मर फार अंतरीं |
| १७ | ३५ | भंगुनी |
| १८ | १ | न्याया लयासि |
| १८ | ५ | सुराचिया हें |
| १८ | २३ | हस्तीं डमरूहि |
| २० | १ | हें विश्व गमे |
| २० | ८ | जे कान |
| २१ | १ | देई उडवुनि दुरीं |
| २१ | ६ | मनोमुकुरिं |
| २४ | ५ | जालंधर |
| २४ | २४ | क्रीडा एतजीं लीला याचाचें |
| २७ | २६ | निजराजधानिसी |
| २८ | १६ | हो तीच माझी |
| २९ | ६६ | स्वकीयजनसहित |
| २९ | ८३ | अंक ८३ हवा |
| २९ | ८४ | जप व तर हे शब्द नकोत |
| २९ | ८८ | भीतिव्याकुला |
| ३० | १ | वसोसि |
| ३१ | २३ | गुणसागर ( अनुस्वार नको ) |

| | | |
|---|---|---|
| ३५ | २ | आचरी तें...भूरि इष्ट । |
| ३५ | १२ | क्रीडा |
| ३६ | १९ | सुज्ञां मुनींच्या |
| ३७ | २० | निजकरांबुजें लीन जोडि ती वाचावें |
| ३७ | २३ | ज्ञानदर्शका ! हवें |
| ३७ | ३१ | कीर्ति |
| ३८ | २ | करीति ते ० |
| ३८ | २० | बोले सगद्गद नरेंद्र ० |
| ३९ | १६ | पथि गौतमपत्नी |
| ३९ | १९ | नाहींच संशय ० |
| ३९ | २२ | करि सौख्यपोष |
| ४२ | २२ | अपचिति म्हणजे पूजा |
| ४५ | ३ | चौथा चरण, ' नासिका, भ्रुकुटि रम्य-किर्तते ती ! ' असा वाचावा |
| ४६ | ३४ | आज्ञा मिळेल |
| ४७ | २६ | नेत्रांबुही राहत |
| ४८ | ९ | चकोरशिशू |
| ४९ | ४२ | 'वाटे, तुम्हांस कधिं आज वरी न होता' वाचावें |
| ४९ | ५१ | ० बोलवुनि जोडुं ० |
| ४९ | ६२ | 'जेंवि झडे कुसुमवर्षचि रम्य उक्ति !' वाचावें |
| ४९ | ८९ | स्वनें गभीरें |
| ५० | १४ | ० नीलमणि ० |
| ५० | ५० | दूतांसि बोलवुनि ० |
| ५२ | ४ | ० निवेदति तो यथार्थ |
| ५२ | १३ | चित्तांत सारे सुरही ० |



तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहम् ।
श्रवणमङ्गलं श्रीमदाततं भुवि गृणन्ति ते भूरिदा जनाः ॥
श्रीमद्भागवत १०—३१—९

— श्री —




गोस्वामी श्रीतुलसीदासजी यांच्या श्रीरामचरितमानसाचा
मराठी सुरस श्लोकानुवाद

## भाग दुसरा

द्वितीय सोपान-अयोध्याकांड, तृतीय सोपान-अरण्यकांड
व चतुर्थ सोपान-किष्किन्धाकांड.

—: रचयिता :—

कै. डॉ. रामचंद्र चिन्तामण श्रीखंडे, एम्. बी.; बी. एस्.
'वाङ्मय-श्री-खण्ड' 'सुश्लोक-गोविन्द' 'कुन्दमाला'
'सुश्लोककुमार' 'सुश्लोकमेघ' 'सुश्लोकमानस'
इ. चे संपादक, प्रकाशक व रचनाकार.

प्रथमावृत्ति
श्रीहनुमज्जयन्ती, शक १८७५
ता. ३० मार्च १९५३

मूल्य ५ रुपये





ल्येची थोरवी (पृ.२४ तरंग ४श्लो.२३) गुरूंस वंदन (पृ.३५तरंग१०श्लो९)





दाची भेट (पृ.३८तरंग११श्लो.१२) गुहाचें भाग्य (पृ.४४तरंग१२श्लो.४१)

गंगापार जाणें (पृ.४४तरंग१२श्लो.४२) रामाचें पार्थिवपूजन (पृ.४४तरंग१३









वनवासी स्त्रियांचे आश्चर्योद्गार! पथिकांचें प्रेम (पृ.५८तरंग२१श्लो.
(पृ.३५तरंग११श्लो.१६;पृ.४७तरंग१४श्लो.९)

रैचय-प्रदान(पृ.५०तरंग१५श्लो.२९) जातांना मर्यादा (पृ.५२तरंग१६श्लो.१३)









मवाल्मीकिसंवाद(पृ.५४तरंग१७श्लो.६)भरतभरद्वाजमीलन(पृ८८तरंग१श्लो१)

राम-भरतमीलन(पृ.१०२तरंग१५श्लो.२०) मारीचाकडे रावण येतो(तरंग१









कांचनमृगामागें श्रीराम(पृ१५२,तरंग११श्लो७) सीताविलाप(पृ.१११तरंग११श्लो.१

॥ श्री ॥

'सुश्लोकमानसा'चा हा, अयोध्या-अरण्य-किष्किन्धा-
कांडात्मक द्वितीय भाग

— ज्यांत श्रीराम-भरतादींचा अत्यंत हृदयंगम असा
भक्तिप्रेमभाव वर्णिला आहे, तो —

माझ्या प्रेमळ सत्त्वशील वडील भगिनी

**ती. श्री. सौ. पार्वतीबाई** (ती. सौ. कृष्णाक्का)

व

सद्भावसंपन्न उत्साहमूर्ति

**ती. श्री. शंकरराव** (ती. शंकर नरहर सरदेसाई)

**या दंपतींस त्यांची उज्ज्वल**

श्रीसीतारामचन्द्रनिष्ठा पाहून व त्यांनीं अनेकपरींनीं आम्हास
निरंतर दिलेलें रसिक प्रोत्साहन लक्षांत आणून मोठ्या

**प्रेमादरानें अर्पण करीत आहें.**

सुश्लोकमानसा या श्रीशंकरपार्वतींस अर्पावें ॥
मानससरसारविंदें सच्छन्दें साधुवृंद तर्पावें ॥१॥

— सदाशीर्वादाभिलाषी —

रामचंद्र चिंतामण श्रीखंडे

श्रीहनुमज्जयन्ती, शके १८७५,
३० मार्च १९५३, कोल्हापूर.

# भरतास श्रीरामपादुकाप्रदान



सक्रोध की गुरुजनादिक पौर तेथ । स्नेहार्द्र बंधु भरती तरि सर्व चित्त ॥
श्रीराम दे सकृप त्या निज पादुकांत । शीर्षी धरी भरत त्यांप्रति भक्तिचिन्हें । ॥२०॥
तें पुण्यराशि पदपीठ दयानिधीचें । की पौरजीवपरिरक्षक तु न साचें ! ॥
की रत्नपेटि भरतांतरभक्तिभावा । मन्त्राक्षरें उभय रक्षणकारि जीवा ! ॥२१॥
कीं तें कपाट परिपालक सूर्यवंशा । कीं पाणियुग्म करि उत्तमकर्मयोगा ॥
की युग्म तें विमल सेवनधर्मनेत्र । श्रीरामभक्तियुगलीपंचि तें पवित्र ! ॥२२॥
आधार तो भरत घेत पुढें भयेनी । सीतारघूत्तम वसो हृदि स्वप मानी ! ॥

द्वितीयसोपान—अयोध्याकांड, उत्तरार्ध तरंग २८ पृ. ११६

मुक्तेकमानस

# प्रास्ताविक विचार

तुलसी रामचन्द्रस्य प्रेयसीति किमु ब्रुवे ।
यदस्याः पश्य दासोऽपि प्राणप्रियतमोऽभवत् ॥

पत विठोबाअण्णा, सुश्लोकलाघव श्लोक १८५

तुलसी रामचन्द्राची प्रयसी न म्हणू कशी ? ॥
की जीचा दासही झाला प्रभूला प्रिय मानसीं ॥

श्रीसीतारामचंद्रकृपेनें आज 'सुश्लोकमानस' ग्रंथाचा द्वितीय भाग परिपूर्ण होऊन भाविक रसिकांचें हातीं देतां येत आहे याचा अत्यानंद होतो. या विभागात पुढील ३ कांड आहेत.

| | | |
|---|---|---|
| अयोध्याकांड | पद्यसंख्या | १८०२ |
| अरण्यकांड | ,, | ३७८ |
| किष्किंधाकांड | ,, | २०२ |
| उपसंहार | ,, | ८ |
| इतर अधिक | ,, | ५ |
| | | २३९५ |

असे एकूण सुमारें २४०० श्लोक या भागात आले आहेत. ते रसिकानन्ददायी होतील यात मला संशय वाटत नाहीं. अयोध्याकांडात सोयीसाठीं पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग पाडले आहेत. व त्यांपैकीं पूर्वार्धात २२ तरंग व उत्तरार्धात २९ असे एकूण ५१ तरंग आहेत. तरंगाची मोजणी सलग केली तरी चालण्यासारखें आहे. अरण्यकांड लहान असून त्याचे तरंग १७ आहेत. तर किष्किंधाकांड हें सर्वांतच लहान असें कांड आहे व त्याचे ६ च तरंग आहेत. एकूण या विभागांत ७४ तरंग आले आहेत. प्रथम भागातील बालकांडाचे ५५ तरंग विचारात घेतले तर १२९ तरंग सुश्लोकमानसाचे या दोनी भागांत मिळून झाले व एकूण ४

कांडांची पद्यसंख्या सुमारें ४५४० पूर्ण झाली. व बाकीचीं तीन कांडें सुंदरकांड, लंकाकांड व उत्तरकांड हीं सुमारें २१६० श्लोकांत तिसऱ्या विभागांत श्रीरामकृपेनें लवकरच पूर्ण होऊन रसिक वाचकांना देऊं शकेन असा मरंवसा धरतों. तो सुदिन लवकर येवो !

बालकांड हें 'विमलसंतोषसंपादन' नामानें उल्लेखिलें जातें. तर भरतचरित्रानें अत्यंत उज्ज्वल भक्तिवैराग्यसंपन्न असें हें अयोध्याकांड भक्ति-वैराग्य व उत्कृष्ट काव्यसंपदा याचा अत्यंत सौंदर्यपूर्ण सन्निधि आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं ! यांतील विविध कारुण्यपूर्ण घटनांची, भक्तिभावनाची व स्वभावचित्रणाची रम्यता केवळ अलौकिकच आहे. व तिचें थोडक्यांत समालोचन करणें अशक्यच होय. तथापि कांहीं उत्कृष्ट स्थळांचे निर्देश केल्यावांचून रहावत नाहीं.

भरतचरित आहे पुण्यराशी अनन्त । मधुर सुखद मोदा मंगला नित्य देत ॥
कलिकलुष निवारी तीमही क्लेश नाशी। दिनकर जणुं शोषी मोहरूपी निशेशी॥
अघततितगज यांचा सिंह जें भासणारें । अहह सकलतापा वारि जें सद्यकारें
रमवुनि मनचित्तां भंजि संसारभार। शशि जणुं रघुनाथप्रीति जो तीत सार

[ अयोध्याकांड उत्तरार्ध तरंग २९ ]

तसेंच,

भरतवर्तन—सत्कृति—सद्गुण । कवण हें कवनीं करि गायन ? ॥
सकल सत्कवि लाजति वर्णितां । थकति शेष, गणेशहि नरवता ! ॥२०॥

अयोध्याकांडास 'प्रेमकांड' हें नांवहि अधिक शोभलें असतें असें कै. श्रीमंत जामदार म्हणतात. तुलसीरामायणाच्या सर्व कांडांमध्यें हें कांड अप्रतिम आहे ! अयोध्याकांड वाचून कोणाहि भाविकास सहज वाटेल कीं गुरुप्रसादाखेरीज यांतील इतका प्रसाद स्वाभ्रीनें यावयाचा नाहीं. अशाहि 'मानसहंस'कार श्रीमंत जामदार यांनीं म्हटलें आहे.

"हें कांड नवरस, दृष्टांत, रूपक, व्यवहार, स्वभावोक्ति, रामभक्ति, रनिरीक्षण इ. गुणांनीं पूर्ण भरलेलें आहे. या कांडाचा मननीय विशेष

हा की लोकशिक्षणाच्या भागांची यांत चांगलीच गर्दी दिसून येते. तुलसीदासाची अष्टपैलु विद्वत्ता, व्यवहारज्ञता, अलोट प्रेम, लोकशिक्षणचातुर्य इ. गुणांची साक्ष पटविण्यास हें एकच काड पुरें आहे. हे काड, तुलसीरामायणाचा खरोखर आत्माच होय." (‘मानस-हंस’ पृ. ३२)

अयोध्याकाडात वर्णिलेले एकेक प्रसंग इतके हृदयस्पर्शी, भक्तिभावनेनें, सौंदर्यानें, काव्यकल्पनांनी व प्रतिभेनें ओतप्रोत भरलेले आहेत की त्यांना तोड नाहीं! हें काड अवीट आहे. कितीदाहि त्याचीं पारायणें केलीं तरी भाविकांना तृप्तीच होणें शक्य नाहीं. काय तो रामयौवराज्याभिषेकाच्या कल्पनेचा आनंदोत्सव! व काय तो हृदयभेदक वनवासगमनप्रसंग! काय तो शोक! काय तें कारुण्य! काय तो सर्वांचा श्रीरामचंद्रावरील भक्तिभाव! सर्वच वर्णनातीत होय! मंथरा, कैकेयी, दशरथ, कौसल्या, राम, सीता, लक्ष्मण, सुमित्रा, सुमन्त, गुह, वसिष्ठ, वाल्मीकि, भरद्वाज, त्याचे शिष्य, कोळी किरातादि वन्यजन यांचीं स्वभाववर्णनें, वनवासाला रामलक्ष्मणसीता चालले असताना इतर ग्रामवासीयांचें उद्गार, निरनिराळे संवाद, निरनिराळीं नितान्त-काव्यमय रूपकें, उपमा, उत्प्रेक्षा, भाषणें, स्वभावदिग्दर्शन, नीत्युपदेशकथनें इ. या काडातील सर्व वर्णनें अलौकिक रससंपदांनीं नटलेली आहेत.

श्रीरामसीता विवाह होऊन अयोध्येंत आल्यानंतर संपत्ति, ऋद्धि, सिद्धि, यांच्या त्रिपथगाच अयोध्यानगररूपी सागरांत धाव घेऊन अखंडित येत होत्या अशा मोठ्या सौख्याच्या पार्श्वभूमीवर श्रीरामवनवासाचा दुःखद प्रसंग विधिघटनेनें आलेला तुलसीदासांनीं वर्णन केलेला आहे. तें सर्व वर्णन समग्रच वाचलें पाहिजे. रामसीता यांचेंहि भरतावर अलोट प्रेम. कवि वर्णितात,

आलोचती शकुन उत्तम रामसीता। तन्मंगलार्थ दिसती स्फुरितें समस्ता॥
सप्रेम ते पुलकितांग परस्परातें। तें सांगती भरत-आगम सूचवी तें॥ २-६७
" झाला असे बहुतकाल तया अभेटीं। भेटेल तो प्रिय अम्हा, शकुनें स्वदृष्टीं॥
त्याच्यापरी प्रिय तरी पर कोण आम्हां? नोहेचि अन्य शकुना फल सौख्यधामा!"

सर्वत्र राज्याभिषेकाची तयारी होत आहे. देवानीं सरस्वतीमार्फत मंथरेची बुद्धि कलुषित करवून तिच्याकरवी कैकेयीस पूर्वी राजानें दिलेले

दोन वर भरतास राज्य व रामास चौदा वर्षे वनवास हे मागावयास लावले. हा सर्व प्रसंग इतक्या अलौकिक पद्धतीनें तुलसीदासांनीं वर्णिला, आहे कीं त्याला तोड नाहीं.

केकेयीमान्यता ऐशी कुब्जा घेइ परोपरी ।
राज्ञीच्या उरिं ती घाली सहाणीं कपटी सुरी ! ॥
स्वताच्या लव ना राज्ञी विप्रा निकट देखत ।
चरं यज्ञपशू जैसा हिरव्या तृणिं हर्षित ! ॥
आयके गोष्टि ती गोड कठोरान्त परी तशा ।
कीं मधामधि घोळोनी पीत ती घोरशा विषा ! ॥
कैकेयीस वदे कुब्जा "अहो ! आठवतें न कीं ! ।
तुम्हींच कथिली मागें मजला गोष्ट ही निकी– ॥
वर दोन तुम्हां भूपें दिले; होति तथासवें ।
घ्या ते मागोनियां आज जेणें हृच्छान्ति संभवे ! ॥
भरता राज्य द्या तैसें रामातें वनवास द्या ।
सवतींच्या महानन्दा लोपवा संकला उद्यां ! ॥
घेईल तें शपथ भूपति रामनामें । मागा तदांच वर हे निज-भव्यकामें ॥
मोडील ना वचन भूप तुम्हा दिलेलें। बोला कुणां वचन हें, मग कार्य झालें !॥
क्रोधागारीं जाउनीयां बसा हो ! । कार्यार्थाचा सर्वथा नाश ना हो !॥
भूपोक्तीतें ना वळा" हें वदोनी । केली क्रूरा घातकीनें स्वराज्ञी !॥
. पृ. १०-श्लो. ११८ते१२५

मंथरेनें कैकेयीची बुद्धि भवितव्यताबलेंकरून पुरी फिरविली. तुलसीदासाचें स्वभावदिग्दर्शन अप्रतिम आहे. त्यांची रूपकें, उत्प्रेक्षा, उपमा इ. पाहिल्या म्हणजे त्याच्या काव्यप्रतिभेची कल्पना आल्यावाचून रहात नाहीं. क्रोधागारांत असलेल्या कैकेयीस भेटण्यास दशरथ आला—

कैकयीगेहीं ये सायंकाळीं प्रहृष्ट नृपराय ।
वाटे 'निष्ठुरते'तें भेटो ये 'स्नेह' देहधर काय ! पृ. ११६ श्लो. ११

दशरथास ती पेंचांत पकडून दोन दुष्ट वर मागते ती जणों काय तिची धिकारच !

गौंवोनि वाक्यि दृढ यापरि ती नृपातें ।
अत्यंत दुष्टमति हासुनि बोलली ते ॥
जे तद्विचार, गमले जणु ते सशाणें ।
तत्रेव ती जणु करी उघडे कराने ! ॥ १६१ ॥
जणों भूपाचें तें मन गमतसे सुंदर वन ।
जिथें नांदे मोदें सुखखग असंख्यात रसुन ! ॥
तिथें ही कैकेयी गमलि जणु भिल्लीण अदया ।
स्ववाक्याच्या श्येना सवळवुनि सोडू बधि तया ! ॥१६२॥

राजास ते अकल्पित वज्रकठोर वर ऐकून धक्काच बसला. कैकेयी टोंचून बोलते—

वाखाणुनी प्रथम आपुलि सत्यसंधा । 'देईन, दोन वर' हें वदला किती दा ॥
'मागेल ही जणु' तुम्हा गमलें 'कपाळ ! । देईन केविं नच मी नृप सत्यपाळ !' ॥

पृ. १४ त. २–३

असो, सर्व वर्णनें इतकी मार्मिक व हृदयस्पर्शी आहेत कीं त्याचें वर्णन शक्य नाहीं. वरद कैकेयीचें वर्णन, राजाची करुणस्थिति तथापि प्रतिज्ञापालन, रामाबरोबर वनात जाण्यासाठीं लक्ष्मणाची उत्कंठा, सीतेची समजूत काढण्याचा रामाचा निष्फळ प्रयत्न व अखेरीस तिनें वनवासास यावें अशी त्याची अनुमति, वनात जाणें, सुमंतानें त्यांना रथांतून नेणें, सर्व नागरिकांना न कळतां पुढें निघून जाणें, वनप्रवासातील निरनिराळीं वर्णनें, त्यांना पाहणाऱ्यांच्या मनाची स्थिति, रामभरद्वाज, व रामवाल्मीकि यांचे संवाद व चित्रकूटावर निवास, सुमंतानें अयोध्येस परत येणें व दशरथमृत्यु. पुढें भरतशत्रुघ्नानें अयोध्येंत येणें, त्यांचा शोक व चित्रकूटास सर्वांनीं जाणें व तेथें रामचंद्रानीं भरतास पादुका देणें इत्यादि अकल्प्य घटना अयोध्याकांडांत वाचतांना वारंवार हृदय भरून आल्यावांचून रहात नाहीं. या वर्णनांत अनेक ठिकाणीं सुंदर तत्त्वसारकथन, नीतिकथन, विवेक-ज्ञान-कथन, सुंदर सृष्टिवर्णन, उत्कृष्ट उपमा, दृष्टांत, रूपकें, अर्थान्तरन्यास, उत्प्रेक्षा इत्यादींनी सर्वच ताग ओतप्रोत भरलेले आहेत. भरद्वाजमुनि रामास म्हणतात—

धर्म, वाञ्छन अकृत्रिम भावें । जोंवरि स्थिर सुज्ञान न व्हावें ॥
स्वहित पुढुनि सोडुनि सर्वें । मन अन्य कल्पीहि त्यास ! ॥४६—

सुमंतानें दशरथास तत्त्वबोध करायाचा प्रयत्न केला, त्यांत सांगितलें—

जे जन्ममृत्यु सगळे सुखदुःखभोग । वा लाभहानि, सुखमीलन वा वियोग ॥
हे कालकर्मवश होति सदैव नाथा । जैसे निशादिवस येति अखंडसत्ता ॥

तसेंच वसिष्ठ भरतास सांगतात पृ. ७३—श्लोक २६, २७.

अत्यार्त बोलत मुनी "भरता ! पहा हें । अत्यंत रे ! प्रबळसें भवितव्य आहे ॥
आहे विधातृकरिं सर्वहि लाभहानि । हे प्राण वा मरण कीर्ति अकीर्ति दोनी ॥
ऐसा विचारिं मग दोष कुणांस द्यावा । कां व्यर्थ रोष दुसऱ्यावरती करावा !" ॥

भरतप्रभाव सांगतांना एके ठिकाणीं तुलसीदास म्हणतातः—पृ. ९२—७

जो रामनाम जगिं आठवि एक वार । संसारिं तो तरुनि विश्वहि तारणार ॥

गुहाचा भक्तिभाव वर्णितांना व त्यावर पुष्पवृष्टि करतांना देव उद्गार काढतात—
'श्रीरामभक्ति जगिं मंगलमूल सारी' । ऐसें स्तवोनि सुर वर्षिति पुष्पसारीं ॥
पृ. १०३, श्लोक ३६

श्रीरामभक्त निर्मोह असतात हें तत्त्वसार गुंसाइजी सांगतात—पृ. ३७—३३

श्रीरामपादकमलीं रमल्या मनाची । नाकांक्षिती विषयभोग कधीं स्वपाचीं ॥

श्रीरामचरिताविषयींचें माहात्म्य पुढीलप्रमाणें सांगितलें आहे—

श्रीसच्चिदानन्द विशुद्ध राघव । जो सूर्यवंशामणि पुण्यसंभव ॥
त्याचीं चरित्रें नरजन्मिचीं भवीं । तरावया सेतुपरी अम्हां हवीं ॥ पृ. ३८, श्लो. १०

तसेंच वसिष्ठोपदेशांतील पुढील तत्त्व पहा—

जे पाळिती पितृनिदेश अयोग्ययोग्य । शंका त्यजून, यश सौख्य तयास भोग्य ॥
त्यांनाच वास अमरेन्द्रनिवासि लाभे । सत्पुत्र तातवचनां करुनीच शोभे ! ॥
पृ. ७४—४२

खरें भक्तिप्रेम, मेघचातकन्यायाचें वर्णन करून भरतानें प्रयागराज प्रार्थनेंत पुढीलप्रमाणें गाइलें आहे—

अंमोद जन्मभरि कां विसरून जाय । वज्रादि हाणि जरि याचियशाहि तोय ! ॥
सारे विषत्र सामले जरि चातकाचे । प्रेमा परी सतत वाढुनि चित्ति साचे ! ॥
सौवर्ण वर्णगुण वाढव अग्नि दाहें । मानेंनिह्रो प्रभुपदाश्रमीं वेरि हो हें ॥
पृ. ८७ श्लो. १२, १३

भरद्वाजाश्रमांत भरताला व त्याच्यासह आलेल्या सर्वांना सर्व प्रकारचे सुखभोग मुनिप्रभावानें मिळाले, परंतु भरत त्यांतहि अलिप्त कसा राहिला ?—

संपत्ति ती निर्मुनि चक्रवाकी । त्या चक्रवाका भरता मुनी कीं ॥
तो गारुडी आश्रमपंजरांत । ठेवी जणों जोंवरि हो प्रभात ॥ पृ. ११ श्लो. १६

तुळसीदासांचा विनोदहि मोठा मार्मिक असतो. चित्रकूटावरील वन्यलोक भरतावरोबरच्या मंडळींना गोड कंदफळें देत व मूल्य घेण्याचें नाकारीत व सांगत—

देणार काय अम्हि दीन तुम्हां महंतां ? । श्री काउपल्लवचि हो अमुची अनन्ता ! ॥
सेवा अम्हांकरि तुम्ही प्रभु हीच माना । ना चोरितों तुमचिया वसनादिकांना ॥
आम्ही अजाण, खल, घातक जीवजातां । दुर्बुद्धि योजित दुराचरणांत हातां ! ॥
रात्रंदिवीं करितसूं जरि पापराशि । पोटीं न अन्न पटवास न वा कटीशी ! ॥
इ. इ. पृ. १०६–७५–७६

वनवासांत ग्रामस्त्रिया सीतेला 'लक्ष्मण व राम हे तुझे कोण ?' असें विचारतात व त्यास सीता ज्याप्रकारें उत्तर देते तें अप्रतिम आहे—

सप्रेम सीता मृगशावलोचना । सलज्ज बोले मधु कोकिलस्वना ॥
" ते गौरकाती मधुर स्वभावतां । हो धाकटे देवर लक्ष्मण स्वतां " ॥
वस्त्रांचलें आननचंद्र झांकुनी । प्रियाकडे पाहत वक्रलोचनीं ॥
चकम्ब ती खंजनमंजु सूचवी । 'स्वकांत हे' त्यां निज नेत्रपल्लवीं ! ॥
इ. पृ. ४१ श्लो. २४ ते ३०

कैकेयीची समजूत काढण्याचा कांहीं विप्रस्त्रिया प्रयत्न करतात पण ती ऐकत नाहीं, त्यावेळचें वर्णन पहा—

न उत्तरें ती मुळि त्यांसि देउनी । वरुदा बघे त्यां क्षुधिताच वाघिणी ! ॥
व्याधी असाध्या अदि थाणुनी तिची । त्या तें तिचा सोडुनि देति नादचि ! ॥
पृ. २२ श्लो. ११ व आधींचे १२ श्लोक

अशीं अनेक हृद्य उदाहरणें देणें शक्य आहे व या ग्रंथांत अन्यत्र अशीं असंख्य आहेत. राजनीतीचेंहि तत्त्वसार तुळसीदासांनीं अनेक स्थळीं सुंदरपणें व्यक्त केलेलें आहे. [ पहा:—पृ ७६ श्लोक १७·

मी सांगतों मनिं धरा अजि सत्य जाणा। कीं धर्मशीलचि हवा जगिं लोकराणा ॥
हें राज्यदान जर याल हठेंचि मातें । जाईल तत्क्षणिं रसातळिंच क्षमा ते । ॥

श्रीरामभक्तिविषयीं भरत सांगतो:—पृ. ७१ श्लोक १०

तीं हो जळोत धन वैभव सौख्य, आप्त। माता, पिता, स्वजन, बंधु जगीं समस्त ॥
जीं रामचंद्रपदलाभ महावयातें। होतीं न साह्यकर उत्सवयुक्तचित्तें । ॥

कैकेयीरूपी खवळलेल्या रुद्ध वारिसरितेचें रोमांचकारी वर्णन (पृ. १५ श्लोक २४–२६), प्रयागराजाच्या राज्याचें रूपक (पृ. ४५ श्लोक १७ ते २२), भरताच्या यशोरूपी चंद्रानें रूपक (अद्भुत चंद्रवर्णन, पृ. ८९ श्लोक १७ते२१), चित्रकूटावर राम असतांना वनश्रीला अतिशय हर्ष होऊन तेथें विवेकाचें कसें सुंदर साम्राज्य होतें त्याचें भव्योदात्त रूपक (पृ. ९१ श्लोक ८० ते ८८), रामचंद्राश्रमाकडे वाहून येणाऱ्या लोकरूप करुणानदीचें करुणोदात्तरूपक (पृ. ११७ श्लोक २१–२३), रामचंद्रानें भरतास दिलेल्या पादुकांवर उत्प्रेक्षापुष्पमाला (पृ. १३६ श्लोक २०–२२), भरतहृदयरूपी विमल आकाशाचें वर्णन (पृ. १४१ श्लोक २८–२९), इत्यादि मनोहर वेंचक उज्ज्वल स्थलें अद्भुतरम्य उदाहरणादाखल निर्दिष्ट करतां येतील.

'अरण्यकांड' या तृतीय सोपानास 'विमलवैराग्यसंपादन' हेंहि नामाभिधान आहे व यातील शेवटचा म्हणजे १७ वा तरंग विमल-वैराग्यभक्तिसंपादन नांवाचा आहे. या कांडांतील अत्रिमुनींनीं केलेली श्रीरामस्तुति, ईश्वर–जीव–भेदवर्णन, भक्तियोगवर्णन इ. भक्तियुक्त वर्णनें, खरदूषणाशीं रामांनीं केलेलें युद्ध व त्यांतील भीषण युद्धवर्णन, मारीचप्रसंग, सुवर्णमृगवर्णन व सीताहरण, श्रीरामविरहवर्णन, जटायुभेट, शबरीरामसंवाद, नवविधाभक्तिवर्णन, पंपासरोवरवर्णन, कामसैन्यवर्णन, व नारदराम–संवाद इ. विभाग फारच सुंदर आहेत.

'किष्किन्धाकांड' अत्यंत लहान असून त्यांत अत्युत्कृष्ट सृष्टिवर्णन आहे. विशेषतः वर्षावर्णन व शरद्वर्णन हीं वर्णनें अत्यंत मनोहर आहेत. श्रीमद्भागवत दशमस्कंध पूर्वार्ध अध्याय २० यामधील वर्णनांचा मार्मिकपणा, तत्त्वसिद्धान्तभाग व चमत्कृतिपूर्ण कल्पनाविलास तुलसीदासांनीं या ऋतु-वर्णनांत उत्तमपणें व नाजूकपणानें अनुसारिला आहे.

श्रीराम भरतास पादुकादान करण्यापूर्वी सांगतात ( पृ. २३६ ) त्यात केवढें आश्वासन आहे पहा.—

आज्ञा करीत पितृमातृगुरुप्रभूंची। गेला कुमार्गिहि तरी कधि ना पडेचि॥
ऐसा विचार करुनी त्यज दु:ख सारें। साकेत रक्षि, सरतो वनवास तों रे!॥

असो. एकूण रामचरितमानसाच्या कोणत्याहि विभागाचें कितीहि वर्णन केलें तरी तें अपुरेंच पडणार! सौंदर्यांत, भक्तिभावात, कविकल्पनेंत व रसाविष्कारात या मानसाचा प्रत्येक भाग इतर उर्वरित भागाशीं जणु स्पर्धा करीत आहे असें रसिकभक्तास वाटल्यावाचून राहणार नाहीं व ग्रंथ वाचून निरतिशय आनंद व समाधान कोणासहि झाल्यावाचून राहणार नाहीं.

मोरोपंतानीं श्रीतुलसीदासावर अनेक स्तुतिसुमनें वाहिलीं आहेत. तीं पाहण्यासारखीं आहेत—

तुलसी विषया येणें उलसील महासुखें॥
कुलसीलमदत्यागीं तुलसीदास गा मुखें॥१॥

तसेंच,

श्रीतुलसीदासस्तव

श्रीमद्रामपदाब्जीं अलि तुलसीदास हा सदा गावा॥
मागावा वर 'हरिजन भक्त भवपथीं कधीं न भागावा'॥१॥
श्रीवाल्मीकिच झाला श्रीतुलसीदास रामयश गाया॥
तरिच प्रेमरसाची खाणी वाणी तशीच वश गाया॥ २॥
तुलसीदासें रचिलें श्रीमद्रामायणें स्वयें सत॥
ज्याच्या श्रवणें निवतो संसारी जीव जो सदा तप्त॥ ३॥
सेविनि तुलसीदासें रचिल्या रामायणाख्य सुरसा जे॥
पुण्यपरें कोणीही स्वर्गांत तयांपुढें न सुर साजे॥ ४॥
तुलसीदासाची मुख देती ओंयासि नित्य नव दोहा॥
सेवितया हे म्हणते चैंची श्रीरामकीर्ति न वदो हा॥ ५॥
यांचें सुप्रेमभवन कवन निववितें सदा बुधा सरसें॥
हें जो जो सेवावें तो तो सेव्यचि गमे सुधासरसें॥ ६॥
राम प्रसन्न झाला तुलसीतें, जरि पवनतनयातें॥
साक्षात्कार असा ज्या, होइल जन कोण अवनत न यातें?॥७॥
यवनपति म्हणे 'तुलसीदासा! दावीच राम तो, वाहे'॥
कपि जाचिती म्हणाया त्या, ज्यापुनि नगर नाम 'दोबा' हें॥८॥

ते दाशरथी तुलसीदासमठद्वारपाल चोरांनीं ॥
अवलोकिलें; बहु तपुनि वपु नियमुनि, कृश करूनि, थोरांनीं ॥९॥
बापा तुलसीदासा ! तुलसी दासामरद्रुरामाशीं ॥
तैसेंचि तुझें नाम प्रभुच्या झालें समान नामाशीं ॥ १० ॥
हा पुण्यकीर्ति सन्मत, म्हणविल कवि कोण रामसम याला ॥
जो ज्यास पूज्य तो त्या ईश म्हणे जेविं तामस मयाला ॥११॥
कवि म्हणति 'आपणावें राम तसे भक्त वर्ण्य कुलशील '।
तुलसी लक्ष्मजनस्तुत याशीं, या स्तवुनि, तूंहि तुलसील ' ॥१२॥
वंद्य स्तुत्य सदा हा श्रीरामसमान वासवा तुळसी ॥
पथ्या उक्ति हरिजना हे, तामस मानवास वातुळसी ॥ १३ ॥
श्रीकृष्णमूर्ति जेणें केली श्रीराममूर्ति सज्जन हो ! ॥
रामसुत मयूर म्हणे 'त्याच्या सुयशोऽमृतात मज्जन हो ' ॥१४॥

असो. गेल्या श्रीरामनवमीस 'सुश्लोक-मानस ' प्रथम भाग महामहोपाध्याय श्री. दत्तो वामन पोतदार यांचे शुभहस्ते पुणें साहित्यपरिषदेच्या मंदिरांत मोठ्या समारंभानें प्रकाशित झाला. महाराष्ट्रांतील अनेक नामांकित विद्वान् ग्रंथकार, कवि व रसिक जन या समारंभास उपस्थित होते. समारंभास हार्दिक शुभचिंतन करणारे संदेशहि अनेक दूरस्थ जनाकडून आलेले होते. पं. महादेवशास्त्री जोशी यांनीं सर्व समारंभाचें अध्वर्युत्व उत्साहानें व प्रेमानें घेतलें होतें. प्रा. मंगरूळकर यांनीं 'सुश्लोकमानस' मधीलच श्रीसीतारामवंदनाचें श्लोकद्वय म्हणून व गायक श्री. जोशी यांनीं सुरेलपणें—

आनंदवीचि हृदिं उल्लसल्या अनन्त । प्रेमौघ हर्षहि उचंबळले मनांत ॥
तोच प्रवाह कवितासरिदोघ झाला । श्रीराम–निर्मलयशोजलिं पूर आला ॥
तरंग ११–२८

हा श्लोक अखावरीन गाऊन मंगलाचरण केलें. पंडित महादेवशास्त्री जोशी यांनीं स्वागतभाषण करून महामहोपाध्यायांना पुष्पहार अर्पण केला व ग्रंथप्रकाशन उद्घोषित करण्यास विनंती केली. व त्याप्रमाणें श्री. पोतदार यांनीं सुश्लोकमानस प्रकाशित झाल्याचें अत्यंत गौरवयुक्त शब्दांत सांगून ग्रंथकर्त्यांस पुष्पहार वाहिला. ग्रंथगौरवपर अनेक भाषणें झालीं. त्यांत श्री. बळशास्त्री हरदास, आचार्य भागवत, राजकवि यशवंत, डॉ. वाळ्वे, प्रा. मंगरूळकर

श्री. नी दां. नवरे, कवि बोरकर, कवि वि. गो. साठये प्रभृतींनीं अतिशय गौरवपूर्वक भाषणें केलीं. म. म. पोतदार यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणात पुढील स्वरचित मार्मिक श्लोकांनीं सुश्लोकमानसाविषयीं आदर व्यक्त केला

श्रीखण्डं नूतनं दिव्यं तुलसीदलवेष्टितम् ॥
अनेन प्रीयतां रामो लोकरूपो जनार्दनः ॥ १ ॥
पीठं तत्करवीराख्यं पञ्चगङ्गातयान्वितम् ॥
पुण्यं तु पत्तनं ह्येतत्संगमेनोज्ज्वलं खलु ॥ २ ॥
संगमेऽस्मिन्समायाता स्वर्गंगाद्य विश्रुता ॥
सुश्लोकरत्नगर्भाढ्या त्रिवेणीफलदायिनी ॥ ३ ॥

सकाळीं ८॥ ला आरंभ झालेला हा अनेक उत्साहपूर्ण वक्त्यांनीं भूषित केलेला समारंभ दुपारीं श्रीरामजन्मानंतरपर्यंत चालला! माझ्या भाषणात मीं सुश्लोकमानस ग्रंथास आशीर्वाद देण्यास वसिष्ठमुनितुल्य विद्वद्वर्य व रसिक पंडित लाभल्याबद्दल महामहोपाध्यायांचे, सर्व विद्वानांचे आभार मानले त्याचप्रमाणें ज्या ज्या व्यक्तींनीं या ग्रंथाच्या प्रकाशनास मोठ्या प्रेमानें हातभार लावला त्यांचेहि हार्दिक आभार मानले. समारंभास शुभचिंतन करणाऱ्यात डॉ. जयकर, रँ. प्रो. नारळीकर, मे. जनरल थोरात, कर्नल वसंतराव देशपांडे, ना. बाळासाहेब खेर, मेजर डॉ. घारपुरे, प्रा. फडके, प्रा. कुलकर्णी, श्री. माडखोलकर, डॉ. कोलते इत्यादींचे सुंदर संदेश होते.

प्रथम विभागाचें स्वागत रसिक भक्त विद्वानांनीं अत्यंत आवडीनें चालविलें आहे. संगीतप्रवचनकार भक्तिभूषण श्री. कल्याण श्रीपाद उर्फ अण्णासाहेब कुलकर्णी यांनीं त्यातील कित्येक श्लोक उत्कृष्ट भक्तिभरानें गाऊन श्रोत्यांस अमूर आनंद देण्याचें मनच घेतलें आहे! इचलकरंजी येथील श्रीमंत पुण्यशील गंगामाता आईसाहेब यांनीं मोठ्या भक्तिभावानें हा ग्रंथ वाचून फार चांगला वाटल्याने उद्गार काढले व ग्रंथास आशीर्वादपूर्वक साहाय्यहि केलें. श्रीमंत रमाबाईसाहेब पटवर्धन, डॉवेजर राणीसाहेब जमखिंडी यांनीही ग्रंथ अगत्यानें व सद्भावानें परिशीलन करून ग्रंथकारास गौरवपूर्वक प्रोत्साहन दिलें. श्रीमंत वामनरावजी कुंडईकर गोवा यांनीहि थोर भक्तिभावानें ग्रंथाचें कौतुक केलें. श्री. वासुदेवराव व डॉ. सौ. काळे, मडगाव, कऱ्हाडचे

श्रीमंत शिराळकर, सातारचे संस्थक श्रीयुत काशीकर, मुंबईचे डॉ. शिरोडकर, डॉ. करंदे, डॉ. साठे, न्या. श्री. पु. म. लाड, शेठ श्रीमान् सातारामपंत वालावलकर, शेठ श्रीमान् मदनमोहन लोहिया, सांगलीचे डॉ. परांजपे, गुरसाळेचे राजे श्री लक्ष्मणरावजी खेर, श्रीशंकराचार्य पीठ करवीर, न्या. मू. टवळे, न्या. मू. भिडे, श्रीशारदिकल्याबाईसाहेब पंडित, बावडा, डॉ. पुरंदरे, डॉ. श्रीखंडे, पंढरपूर, श्री. गाडगीळ, डॉ. घायगुडे, डॉ. बालिगा प्रभृति असंख्य मंडळींनीं मला ऋणी केलें आहे.

आहिताग्नि वे. शा. सं. हरिशास्त्री वासुदेव होशिंगे, भोर.
यांचा संस्कृत अभिप्राय

सुश्लोकमानसं नाम काव्यं काव्यगुणैर्युतम् ॥
प्रसन्नं सहजं रम्यं माधुर्यगुणमण्डितम् ॥ १ ॥
महाराष्ट्रीयभाषाया भवतां ह्यनुवादितम् ॥
यच्छ्रीमत्तुलसीदासप्रणीतं व्रजभाषया ॥ २ ॥
मूलकर्तुरभिप्रायो लालित्येन स्फुटीकृतः ॥
भवता तत्तु कौशल्यं मन्येऽहं कौतुकावहम् ॥ ३ ॥
यमुना तुलसीवाणी कथा रामस्य जाह्नवी ॥
भवतो ललिता भाषा शोभते नु सरस्वती ॥ ४ ॥
महाराष्ट्रजनायेदं प्रयागं खलु नूतनम् ॥
सत्काव्यकमलाधारं तापसतापहारकम् ॥ ५ ॥
निर्मितं भवता तस्माद्भवतामभिनन्दनम् ।
सादरं सप्रणामं वै करोति हरिदीक्षितः ॥ ६ ॥

भोर, ता १०।२।१९५३ हरि अपरनाम बाबा दीक्षित

श्रीसीतारामचंद्रकृपेनें येथपर्यंत आलों त्याचीच कृपा पुढील राहिलेलें ग्रंथकार्यहि लवकरच सिद्धीस नेईल. सज्जनानीं महोदारपणें हाच आशीर्वाद मला द्यावा ही प्रार्थना नम्रपणें करून तूर्त विश्रांति घेतों.

श्रीरामनवमी शके १८७५
२३ मार्च १९५३
' श्रीतुलसी-मंजरी '
केळबाग वसाहत, कोल्हापूर.

रामचंद्र चिंतामण श्रीखंडे

# सुश्लोकमानस अयोध्या-अरण्य-किष्किंधाकांडांची

## अनुक्रमणिका

## 'सुश्लोकमानसा'स लाभलेल्या कांहीं प्रशंसा

कविवर्य वे. शा. सं. श्रीयुत विश्वनाथशास्त्री कात्रे- यांच्या पत्रांत पुढील श्लोक व मजकूर आहे.

"रघुवरयश भार्म्ये गाइ मद्दन्धु राम। वितरि रसिकवृन्दा दत्त तें पुण्यधाम।।
उठति किति हृदीं या सुप्रसंगें सुखोर्मि। जय जय जयशब्दें येथुनी गर्जतों मी।।१।।
पुस्तक अंतर्बाह्य मनोहर झाले आहे आज तें साधुशील श्री. द. वा. पोतदार या योग्य सत्पुरुषाच्या हस्तें प्रसिद्ध पुण्यधामीं श्रीरामजन्मदिनीं प्रसिद्ध होत आहे! आपल्या आयुष्यातला आजचा हा सुदिवस होय! सहृदयरसिकवर्यांच्या योग्य प्रशसनानें आज आपलें रामप्रेमरसमय विमल हृदय सत्त्वभरानें अनेकवार भरून ओथंबेल व अनुपम समाधानानन्दात पोहू लागेल! आपला हा सात्त्विक उत्कर्ष पाहून माझीहि स्थिति खरोखर आपल्याप्रमाणेच होत आहे! श्रीरामकृपेनें असे सुप्रसंग आपल्या प्रदीर्घ आयुष्यात सतत येवोत. आपल्या स्वर्गस्थ मातृपितृदेवांच्या आजच्या आनदाची कल्पना कोण करू शकेल! खरोखर ' सर्वे धन्यास्ते च यूयं वयं च ' !! घरीं एकाकी असल्यानें समारंभास हजर राहता येत नाहीं. पण मन तिकडेच आहे पुस्तक व पत्रिका श्रीपदीं सभक्ति समर्पण केली. " (पत्र १-४-५२ शैलाली.)

या द्वितीय भागाचें वाचन करून श्री. कात्रेशास्त्री यांनीं पुढील उद्गार २-३-५३ चे पत्रानें कळविले आहेत. तेहि वाचून मला अत्यानंद होत आहे:—" आपलें काव्य वाचतांना आनदाचें भरतें सारखें येत होतें. श्रीरामकथेनें रंगलेला आपल्या वाणीचा प्रवाह प्रसन्न गंभीर गंगौघाप्रमाणें वाटला. हें कळविण्यास मोठा आनद होत आहे. सर्वच गोड व रम्य! वाचून डोळे दुखले तरी पुस्तक खालीं ठेववत नव्हतें."

पं. हनुमानप्रसाद पोद्दार, संपादक 'कल्याण' गोरखपूर यांनीं 'मानसा'चीं चित्रें घेण्यास संमति देण्याची कृपा केली व ता. १८।५।५२ चे पत्रीं पुढील प्रशंसोद्गार ' सुश्लोकमानस ' बालकांड पाहून काढले आहेतः—

Dear Sir,

Your letter of the 6th inst. and the very kind present of the first book of your Marathi rendering of Ramayan are to hand.

In spite of my little knowledge of Marathi, I could see that you have really made a great achievement. By this lovable translation you have led in your land a very wide and swollen canal from the big stream of Bhakti with which Goswami Tulsidasji so inundated the whole of the Gangetic plain that it knows no drought.

Yours Sincerely
Hanumanprasad Poddar.

श्रीमंत राजे विद्वद्रसिक श्री. लक्ष्मण सीताराम ऊर्फ रावजी भैय्यासाहेब खेर, गुरसराई जि. झाशी, उत्तरप्रदेश २४।११।५२च्या पत्रीं लिहितात:—

"......Your last letter bears date the 1st may 1952. It gave me great pleasure to feel that I was able to contribute my mite to what is definitely going to be the crowning achievement of your life's mission — the Marathi incarnation of the great epic "RamaCharita-Manas" It seems you have come equipped in so rich a measure to convey the eternal message of the first poet ("कवेराद्यस्य शासनात्") to the perpetually changing world. That message will endure to the end of time ("यावचन्द्रदिवाकरौ").

I have read सुश्लोकमानस of yours, not less than half a dozen times in the meanwhile & with every reading it has given me evernew pleasure — not describable in words ("अनिर्वाच्य"), only susceptible of being felt. It grips one's interest and keeps it bound to the end. All the other works of yours and they are none too few, strike one as the prepartion for this "Magnum Opus" of yours.

I hope the remaining chapters will soon be ready to see the light of the literary world......"



सकोच की गुरुजनादिक धीर तेथ । स्नेहार्द्र बधु भरती तरि सर्व चित्त ॥
श्रीराम द सद्रूप त्या निज पादकांतें । शीर्षी धरी भरत त्याप्रति भाकिचित्तें ! ॥२०॥

सुश्लोकमानस द्वितीयसोपान
अयोध्याकांड, उत्तरार्ध तरंग २८

श्रीगणेशाय नमः ।

श्रीभवानीकमलेश्वराभ्यां नमः । श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ।

श्रीसरस्वत्यै नमः ।

तुलसीरूपिणे श्रीमद्वाल्मीकिमुनये नमः ।

यस्य प्रसादात्सुलभं स्वर्गीयममृतं भुवि ॥ १ ॥

# ❀ सुश्लोकमानस ❀

## श्रीरामचरितमानस अर्थात् श्रीतुलसीरामायण

या महाकाव्याचा अनुवाद

## द्वितीय सोपान

# अयोध्याकांड

## पूर्वार्ध

### तरंग १ ला

### मंगलाचरण

गौरी वामांकिं ज्याच्या दिसत सुरधुनी मस्तकीं शोभमाना ।
बालेन्दू भालदेशीं, गरळ गळिं दिसे, वक्षि नागाधिराणा ॥
भस्मानें भूषिलेला सुरवर सकलाधीश चंद्राभ शर्व ।
रक्षो श्रीशंभु मातें अनुदिन शिव तो व्यापि जो विश्व सर्व ॥ १॥
राज्याभिषेकें नच जी प्रसन्नली । अरण्यवासें नच वा विषण्णली ॥
ती रामवक्त्राम्बुजकांति कोमला । देवो सदा सुंदर मंगलें मला ! ॥२॥

इंदीवराभ सुकुमार मनोज्ञ नील। वामांगि शोभलि जया दयिता सुशील ॥
हस्तीं महाशरधनुष्य असाय साजे। त्या जानकीपतिरघूत्तमि चित्त माझें ॥ ३ ॥
श्रीसद्गुरुप्रभुपदाब्जरजःकणांनीं। स्वच्छत्व चित्तमुकुरीं झणिं आणवूनी ॥
श्रीरामनिर्मलयशें वदुं सद्विचारीं। जीं देत साधुनि जगीं पुरुषार्थ चारी ॥४॥
श्रीराम होउनि विवाह घरासि येत। तेथून नित्य नवमंगल हर्ष होत ॥
चौदाहि त्या भुवनपर्वतिं पुण्यमेघ। वर्षीत सौख्यजल व्यांत्र अखंड ओघ ॥५॥
तें संपदा निरुपमोत्तम ऋद्धिसिद्धी। या रुचिरी त्रिपथगा सरिता त्रिशुद्धी ॥
साकेतपूरजलधीमधिं धाव घेती। ते सौख्यपूर कधिं वर्णुनि काय येती ! ॥६॥
तेथील पौर अतिसद्गुणरत्न की ते। योगी, तपी, विमल, मूल्य जयां न होतें ॥
नारी नर प्रकट उत्तमजाति सारे। वाटे विधातृकृति तेरिं दुजी न सारें ! ॥७॥
रामस्वभावगुणशील मनोज्ञरूप। पाहोनि होत अतिहर्षित चित्तिं भूप ॥
सर्वांमनीं मुदितभाव असाच होता। रामा करोचि युवराज, नृपाळ आतां ॥८॥
प्रार्थीति लोक निज चित्तिं शिवास भावें। कीं राज्य अक्षत नृपें रघुनाथिं द्यावें।
एका दिनावसरिं लोकसमेत राजा। होता सभेंत अपुल्या यवरा महोजा ॥९॥
तो लोकनाथ सकला सुकृता निधान। श्रीरामकीर्तिगुणगायनि पूर्ण मग्न ॥
ज्याच्या कृपेसि अभिलाषिति सर्व राजे। यद्राज्यलोभ जपती मनिं दिक्पती जे ॥
त्रैलोक्यिंही दशरथासम नाहिं झाला। कोणीहि भूपति दुजा कवणाहि काला ॥
श्रीराम मंगलनिदान तनूज ज्याचा। तद्दर्शनस्तव अमूपहि अल्प साचा ! ११
घेई करीं मुकुर तो सहजीच भूप। तो सावरी मुकुट, पाहत आत्मरूप ॥
कर्णासमीप बघतां धवलाभ केश। वार्धक्य वाटत तथा करि सूरदेश— ॥१२॥
कीं यौवराज्यि अभिषेचुनि तूर्ण रामा। कां ऐविशी न निजजीवन सौख्यधामा ॥
येतां विचार मनिं हो नृप हृष्टचित्त। पाहूनि योग्य शुभवेळ गुरूसि जात ॥१३॥
सांगावयासि मनिचा सुविचार त्यातें। हृत्प्रेम भूपतनुनं पुल्कीं भरी तें ॥
बोले नृपाळ "परिसा जि मुनीश ! आतां। श्रीराम सर्वपरि योग्यचि कर्मज्ञाता ॥
तो सेवकासि, सचिवासि, पुरवासियांसी। लोकां मदीय अरिमित्र उदासि यांसी ॥
आहे अतीव हृदयप्रिय सर्व लोकीं। जैसा मला, जणु शरीरिश्वर जीव तो कीं ! १५
साकारल्या जणुं तवीं तुमच्या सदाशी। ज्या अर्पिल्या मज तुम्हीं प्रभुंनीं महर्षीं ॥
सारेच विप्र परिवारसमेत चित्तीं। श्रीरामिं प्रेम तुमच्याच परीं करीती १६
ज्यांनीं शिरीं धरियले गुरुपादरेणू। ते वैभवें वश किती करितात नेणूं ॥

माझ्यासमान अनुभूति अशी न कोणा । या पुण्यपादरजिं सन्मति सर्व पूर्णा १७
आता असेचि अभिलाष मनात एक । तोही फळेल तुमच्याच कृपें सुरेख"॥
पाहोनि चित्त मुनिचें अतिहृष्ट भावें । सांगे 'विचार परिसोनि सुखी करावें' १८
बोले वसिष्ठ ' नृपते ! तव नाम-कीर्ति । हीं होत सर्व करितीं अभिलाषपूर्ति ॥
हे राजवर्य ! तव मानसकाम होती । ज्यातें फळें अनुसरोनिच पूर्ण येती !' १९
जाणोनियां गुरुसि अंतरिं सुप्रसन्न । राजा वदे मृदुल वाक्य हळूंच लीन ॥
'नाथा ! करूं जि ! युवराज मदीय रामा । सांगा समग्र परिषद् भरवूं स्वधामा २०
माझ्या समक्षचि महोत्सव हा घडावा । साफल्यलाभ नयनां सगळ्यांस व्हावा ॥
श्रीशंकरें सकल काम मदीय केले । ही एक आस मम चित्तिं विशेष आले २१
ही लालसा मम पुरो! म्हणजे न चिंता । राहो न कांहिं मजला हुरहूर चित्ता !' ॥
ऐकोनि तें नृपतिवाक्य शुभाढ्य मुग्ध । आनंदकारि मुनि उत्तर दे प्रसन्न २२
'ऐकें नृपा ! विमुखता धरता जयासि । येतीच कीं अनुभवा अति दुःखराशि॥
यद्भक्तिवांचुनि न शांति मिळेचि जीवा । तो राम पुत्र तव, जो भजका विसांवा ॥
वेगीं समारंभ करीं नृपाला ! । होवो न कांहींहि विलंब त्याला ॥
जैं राम होई युवराज साच । तो मंगलाचा दिन रे ! खराच !' २४
हर्षें स्वमंदिरिं नराधिप तूर्ण आला । तो बोलवी स्वसचिवादिक सेवकांला ॥
ते येउनी नमिति त्या 'जय जीव' ऐसें राय सुमंगल तया कथिलेंहि तैसें २५
"आज्ञापिलें प्रमुदितें गुरुनेंचि आज । कीं यौवराज्य बसवीं सुत रामराज ॥
त्यांकाषही जर असेल अभीष्ट हेंचि । रामा करूं जि ! अभिषेक सदुत्सवेंचि" २६
ऐकोनि त्या प्रियवचा, सचिवासि हर्ष । कीं अंकुरावरि पडे उचितानुवर्ष ! ॥
बोलेहि तें सचिव जोडुनि हस्त दोनी । 'दीर्घायु व्हा नृपवरा ! बहु योग्य वाणी २७
जेणें घडेल अतिमंगल सर्व लोका । ऐसा अभीष्टतम मानस हा विलोका ॥
आतां त्वरेंचि शुभमंगल हें करावें । यातें विलंब करणें न कधींच रावें "२८
राजा सुमंत्र सचिवोक्ति सहर्ष ऐके । कीं वाढतां तरु सविस्तर होय शाखे ॥
बोले नृपाळ ' कथितील मुनीश जें जें । तें तें करा रघुवरा अभिषेककाजें ' २९
हर्षें वसिष्ठ कथिती मृदु गोड वाणी । "आणा समग्र शुभतीर्थजलें त्वरांनीं ॥
शुद्धौषधी फलकुसुमें दलमूलयुक्त " । नाना शुभा इतर वस्तु गुरू कथीत ३०
वस्त्रें अनेकपरिं सुंदर चामरें हीं । चर्में असंख्य मणिसंघ सुदीप्तिवाही ॥
कार्पास रेशमि तशीं वसनें अनेक । जेणें सशास्त्र शुभ होय नृपाभिषेक ३१

अयुक्त रीतिरचना मुनिवर्य देत । " मांडा अनेकविध मंडप हो ! पुरांत ॥
आंबे, तसे पनस वृक्ष, सुपारि, केळी । रोवूनि वीथि सजवा तुम्हि सर्व मेळीं ३२
योजूनि रत्नमणि चौक करा अनेक । बाजारहाट सजवा सगळे सुरेख ॥
पूजा गुरू गणपती कुलदेव भावें । विप्रादिकांसि अति आदरिं तोषवावें ।।३३।
आणा पताकाध्वजतोरणांनीं । सर्वत्र शोभा नगरा भरोनी ॥
रथाश्वदन्ती कलशादि सिद्ध । करा झणीं मंगल शास्त्रशुद्ध " ॥३४॥
चित्तीं धरोनि मुनिचे सगळे निदेश । आपापलें निघति कार्य करावयास ॥
आज्ञा दिली मुनिवरें करण्यास जें जें । तें तें जणों गमत आधिंच पूर्ण साजे !
तो विप्र, साधु, नृप यांस समर्पि भूप । रामास हो सकल जीवन सौख्यरूप ॥
होणार ऐकुनि भला अभिषेक रामीं । साकेतिं वाद्यतति वाजति धामि धामीं !
आलोचती शकुन उत्तम रामसीता । तन्मंगलार्थि दिसली स्फुरितें समस्तां ॥
सप्रेम ते पुलकितांग परस्परांतें । तें सांगती भरतसंगम सूचवी तें ! ॥३७॥
" झाला असे बहुत काल तया अभेटीं । भेटेल तो प्रिय अम्हां, शकुनें स्वदृष्टीं
त्याच्यापरी प्रिय तरी पर कोण आम्हां । नोहेचि अन्य शकुनां फल सौख्यधामा ! "
रामाचिया हृदिं सदा भरतस्मृती हो । कीं कच्छपीमनिं वसे निज अंडिं लाहो !
सीतारघूत्तमिं वसे भरतानुराग । ज्यातें नसेचि उपमा तुलनेसि सांग ॥३९॥
परिसुनि घडताहे रामचंद्राभिषेक । प्रमुदित अति झाल्या राजपत्नी विशेख ॥
वर वर नभिं येतां वाढुनी पूर्ण इंदू । खळखळ लहरींनीं दर्शवी हर्ष सिंधू । ४०
प्रथम कळवि जी हे वृत्त अन्त:पुरांत । मिळवि सकल भूपा मूल्य वस्त्रें किती ते !
पुलकिततनु राणी प्रेम हर्षे भरोनी । शुभ कलश करीती सिद्ध मांगल्यखाणी ॥
स्वस्तिकें भरित चारु सुमित्रा । रत्नपूर्ण रचना अतिचित्रा ॥
हर्षमग्न रघुनायकमाता । देइ ती द्विजवरां किति वित्ता ! ॥४२॥
ग्रामदेव सुरनाग अशेही । पूजि, त्यांस बलिभागहि देई ॥
" ज्यापरी सुखित होइल राम । द्या जि ! तेचि वरदान निकाम ! " ॥४३॥
प्रार्थि रामजननी किति ऐसें । गाइलें मधुर मंगल तैसें ॥
कोकिलास्वर मनोहरवाणी । इंदुसुंदरमुखी ललनांनीं ! ॥ ४४ ॥
राज्याभिषेक परिसूनि रघूत्तमाचा । नारीनरां हृदयिं हर्ष अतीव साचा ॥
त्या मंगलोत्सव करीति समग्र सिद्ध । सारे यथामति यथास्थिति कार्य शुद्ध ! ॥
राजा तदा सदनिं बोलवुनी गुरूतें । सांगे ' रघूत्तमि करा उपदेश ते ते ! ' ॥

रामाकडे गुरु वशिष्ठ ग्रहासि येत । श्रीराम जाउनि पुढें पदिं त्या नमीत ॥४६॥
श्रीराम सादर मुनींप्रति अर्घ्य देत सर्वोपचारिं करि पूजन त्यांसि युक्त ॥
सीतेसमेत धरि तत्पदपद्म माथां । प्रार्थीत त्यां जुडुनि नम्रपणें स्वहस्ता ॥४७॥

" सेवकाच्या गृहीं येणें स्वामींचें पुण्यकारक ॥
मंगला मूळ हें साऱ्यां, अमंगलनिवारक ॥ ४८ ॥
प्रेमें बोलावुनी मातें कार्यी आज्ञापितां जरी ॥
तरीहि योग्य तें होतें, वाटतें न्याय्य अंतरीं ॥ ४९ ॥
टाकूनि प्रभुता केली दासावरति हे दया ॥
पावित्र्य आणिलें आजीं आमुच्या मंदिरास या ॥ ५० ॥
आज्ञा कराल जे मातें तें मी करिन आदरें ।
भर्तृसेवाच हा लाभ वाटे मजसि हें खरें ! " ॥ ५१ ॥

ऐकोनि ती प्रणयपूर्ण विनीत उक्ति । बोले मुनी रघुवरा स्तवुनि स्वचित्तीं ॥
"हे हंसवंशि अवतंसविशेष रामा ! । जें बोलशी, उचित तें तुज सौख्यधामा" ॥
शील स्वभाव गुण वर्णित राघवाचे । बोले मुनी पुलकितांग भरूनि साचें ॥
"योजीयला नृपवरें अभिषेक तुम्हां । तो यौवराज्यिं बसवील तुम्हांचि रामा !॥
हा सर्व उत्सव यथाविधि पूर्ण व्हावा । यासाठिं संयम अजीं तुम्हिं आचरावा !॥"
ऐसें कथूनि मुनि जाय पुन्हां नृपातें । श्रीराम होत परि विस्मित आत्मचित्तें ॥
चिंती "समस्त अम्हि बंधु समानहेतु । ना भोजनीं शयनिं खेळनिं भेद किंतु॥
तें कर्णवेध, शिशुता, मतबंध लग्न । सारें समान अमुचें जगतीं अभिन्न ! ५५
या आमुच्या विमल वंशिं अयोग्य एक । बंधूसि सोडुनि वरिष्ठ कृताभिषेक!"॥
ही प्रेममूल उचिता रघुनाथचिंता । वारीत भक्तहृदिंची कटुता समस्ता ॥५६॥
ये त्याच वेळीं मुदितात्म लक्ष्मण । प्रेमार्द्रहृन्मंदिर चारुलक्षण ॥
सन्मानि त्यातें प्रिय वाक्य बोलुनी । श्रीराम जो राघववंशसन्मणि ॥५७॥
वाद्यें मनोहर रवें किति वाजतात । पौरप्रमोद नच वर्णुहि ये नितान्त ॥
सारे प्रतीक्षिति जसें भरतेंचि यावें । त्याला स्वनेत्रफल सत्वर ते मिळावें ॥
सारे घरोघरिं पथीं लघु वाटिं हाटीं । नारी नर प्रचुर बोलति हेंचि दाटीं ॥
' आहे मुहूर्त उदिया परि केंवि वेळ । जाईल तोंवरिहि, हा विधिचाच खेळ !॥
हे आमुचे कर विधे ! अभिलाष पूर्ण । सिंहासनीं बसुत राम सपत्नि तूर्ण !॥
पाहूं तरा नयनि जें कनकासनी हो ! तेव्हांच जीव अमुचा कृतकृत्य कीं हो ! '
सारेच बोलति " 'उद्या' उजडे कधीं ती । देवा ! करा जि ! अमुची अभिलाषपूर्ती ॥

प्राणाहुनीहि मजला प्रिय एक राम । कोरेन कां ? नृपति तो, मम हाच काम!
कौसल्यसम सर्व त्यास जननी पूज्या अति प्रेमला ।
माझ्या ठायिं तरी विशेषचि असे तत्स्नेह, ज्या ना तुला ॥
त्यानें पारखिलें असे हृदय मीं; वाटे विधाता निकीं ।
देई जन्म तरी मिळो सुत-वधू हे रामसीताच कीं ! ॥ ८५ ॥
भरतशपथ तूतें घालित्यें, सत्य बोल । कपट कुटिलतादि त्यागुनी चित्त खोल !
सुखमय असतां, ही कां तुला खंत वाटे ? सकल मज कथीं तूं सत्य जें चित्तिं दाटे!"
दासी म्हणे " वदुनि आधिंच तृप्ति माझी । सांगों पुन्हां तर हवी मज जीभ दूजी॥
माझें कपाळचि अभागि, फुटोनि जावें । राज्ञीहितें वदत, तेंहि न कां खपावें !
जें बोलती सवक सत्य असत्य पाहीं । व्हावेत ते प्रिय तुम्हां; कटु मात्र मी ही॥
मीही वदेन इथुनी 'जय देवि !' ऐसें । वा मौन सेविन सदा दिनरातिं खासें॥
मातें कुरूप करुनी विधि दास्य देत; । जें पेरिं तेंच भरिं; देत तसेंचि घेत !॥
कोणीहि होउ नृपती मज काय हानि ? दासीपणा सुटुनि व्हायचि मी न राणी!
मेला स्वभावचि असा मम हा दुवाड ! केंशी हिता तुमचिया करूं दृष्टिआड !
मी बोललें सहजि गोष्ट मनांत आली; देवि! क्षमा मज कराजि ! चुकी जहाली!"
तें ऐकुनी कपटभाषण मंथरेचें । जात्याच नीच स्त्रनामन मूढ साचें ॥
विश्वास टेवि निज वैरिणिच्याहि टायीं । मायावशें मनिं गणोनि सखी जणों ही
त्या लाघवीं प्रियवचीं अति लुब्ध राज्ञी । कीं ती फसे जणुं मृगी शबरीस्वरानीं॥
राज्ञीमती तशि फिरे नियती जशी ती । दासी निवांतपणिं योजित घातयुक्ति !
' मातें तुम्ही पुसतसां, परि येत शंका ।, कीं मानितां सदन दारित नित्य मी कां'
ऐसें अनेकपरिं साधुनि गोवि मोहीं । बोले पुन्हा अवदसा हंसुनीहि कांहीं ॥
" अहो ! तुम्हांतें प्रिय रामसीता । तुम्हीहि त्यांना प्रिय, सत्य वार्ता ।
परी न आतां दिन ते रहाती । काळें, जुने मित्रहि शत्रु होती ! ॥९४॥
आहे रवी जरिहि पोषण पद्मजातां । जातां सुकोनि जल, तो करि तद्विघाता ॥
वाहे तुम्हां सवत ती उखडावयातें । रोधावया तिज करा सदुपाय कीं ते ॥
वाटे स्वभावें न तुम्हांस शंका । गमे तुम्हा भूपति आपला का ? ॥
खोटा मनें, भूप मुखें चखोटा । भोळेपणा मात्र तुम्हात मोटा ! ॥ ९६ ॥
श्रीराममाता चतुरा गभीरा । स्वहेतु ती साधुनि घेत सारा ॥
मामाकडे जें भरतासि धाडी । राजा, परी त्यात तिचीच खोडी ! ॥९७॥

मातेंच वेचितिल त्या सवती समग्र । ऐसा गमे तिज अतीवचि गर्व उग्र ॥
जें एक शल्य तिज वाटत अंतरीं तें । कीं, ' एकली भरतमाय पुसे न मातें!'
वाटे तिला नृपति अंकित आपला हो । प्रौढी अशी हृदयिं ती मिरवी न का हो ?
ना दर्शवी प्रकट अंतर राममाता । जात्याच ती सुचतुरा कपटात्मचित्ता ॥९९
राजा तुम्हांवरि धरीत अतीव भाव । ना हें रुचे तिजसि हा सवतीस्वभाव ! ॥
तेव्हां तिनें नृपतितें भुलवूनि नेटें । रामाभिषेक विनियुक्त उद्यांच, वाटे १००
हें या कुलीं उचित, कीं नृप रामा व्हावा । सर्वांस हेंचि मत; संमत मत्स्वभावा॥
चिंतूनियां पुढिल मात परी भितें मी ! देवोचि योग्य फल दैव फिरोनि रामीं" १०१
ऐशापरी कुटिल कोटि कथा वदून । राज्ञीमनीं कपट ती करि रूढ पूर्ण ॥
नाना तऱ्हा कथुनियां सवतींवरून । राज्ञी–विरोध दिधला झणि वाढवून १०२
राणी पुसे फिरफिरूनि तियेस सारें । होणार त्यापरिच, चित्त भरे विकारें ॥
दासी म्हणे, ' अजि विचारितसां किती तें । नाहीं अजूनहि कसें कळलें तुम्हांतें।
जाणे हिताहित पशूहि भलें स्वकीय । ही सिद्धता करिति पौर समग्र काय ? ॥
सप्ताह दोन् अजि मग्न समस्त त्यात । हा कीं कळे मजकडूनि तुम्हासि हेत ? ॥
ध्या सौख्य लूप अजि राज्य तुम्हां करीं हें । बोलेन सत्य मम दोष मुळींच नोहे ॥
खोटें वदेन जर मी, मम होय दोष । भोगेन पाप, मज देव करील रोष॥ १०५॥
उद्यां घडेल जर कां अभिषेक रामा । जाणा विधीच जणुं देरि विपत्ति वामा ॥
मी सांगतें उचित ओळखुनि रेघ लेखी । माझीच दुर्गति तशि होय तुम्हां दशा कीं ।
सेवाल कां सवतिला तनयासमेत । राहाल तोंवरिच हो ! तुम्हि या गृहात ! ॥
कद्रूसि जेवि विनता छळि तेवि आतां । तुम्हां छळील किति निष्ठुर राममाता !
येईल मालि भरताप्रति वंदिवास । रामास सौख्यभर आणिक लक्ष्मणास ! " ॥
तें ऐकुनी कटुक वाक्य तशें तियेचें । कैकेयिचें वदन हो सुकलेंच सारें॥ १०८॥
ती कांपुं लागलि जणों कदलीच जैसी । आलेहि घर्मजलबिंदु क्षणीं ननूसी ॥
पाहूनि तत्स्थिति तशी निज जीभ चाटे । ती मंथरा कुटिल जी कुटिल स्वभावें॥
सांगे असंख्य कपटें जुळवूनि गोष्टी । राज्ञीस ती समजवी ' धरि धैर्य पोटीं ! ' ।
झाली तदें कठिनवृत्ति अतीव राणी । काष्ठीच शुष्क जशि दांस्त ना फिरली ॥
सारी वदेल्वि जणुं कर्मगती तिची ती । चित्तीं तशीच रुचली तिचिया कुनीति ॥
सांप्र जणों स्वचित्तें वगळीस हंसी । कुर्ब्जेसि कैकयसुता किति त प्रशंसी ! ।
" हे मंथरे ! वदसि तूं मज सत्य भाव । माझा रुचे नयन गे ! उघडा हृदय ।

सिंहासनावरि अधिष्ठित रामसीता । पाहूं, तदांच समजूं अमुच्या कृतार्था '
सारेच काळिति 'कदां उजडे उद्यां ती?' तों देव वक्र मनिं चिंतिति विघ्नमूर्ति
साकेतदेव चढतें वघवे न त्यांतें। घोरांसि चांदणि निशा न रुचेचि चित्तें !।
प्रार्थीति सारे सुर शारदेप्रति । पुनःपुन्हां पायि पडूनि ते क्रिती ! ॥
"पाहोनि माते ! अमुची अवस्थिति । तूं आचरीं जें सुरभव्य संप्रति ॥६३
तूं तें करीं जें सुखदायि होइल । राज्य त्यजोनी वनि राम जाइल ! ॥
ऐसेंच तूं आचरिं देवि ! शारदे । आम्हांसि हें तूं वरदान एक दे !"॥६४
ऐकोनि देववचना करुणार्द्र तैशा । श्रीशारदा हळहळे हृदयीं विशेषा ॥
"हा ! हाय ! देव करती हिमरात्रि मातें । केंवं सरोजविपिनांवरि आज कीं तें !!"
पाहोनि तीस बहु खिन्न, पुन्हांहि देव । ते प्रार्थिती तिजसि हेंचि सभक्तिभाव ॥
" माते ! न यांत तुजला लवमात्र दोष । श्रीरामराथिंहि नसेचि विषादहर्ष !
रामप्रभाव तुजल्यांहि सर्व ठावा । कर्मेंचि येत सुखदुःख समग्र जीवा ॥
तूं जाच देवहितकारण वाणि ! देवि ! साकेतिं" हें विनविलें तिज सर्व देवीं ॥
पुनःपुन्हां जैं सुर तत्पदांबुजें । धरोनियां प्रार्थिति गौरवें निजें ॥
सकोचुनी तैं हृदयीं सरस्वती । निघालि जाया, मनिं हेंचि चिंति ती ६८
"विबुधमति किती ही पोंचली नीचतेसी ?। जरि निवसति उंचीं, तत्कृती नैव तैसी!
शकति न निरखाया हे विभूती पराची । परि नच कवि मातें चूक ठेवील साची !
करितिल मनिं कीं ते भाविकार्थी विचार। म्हणुनि न कवि मातें सर्वथा निंदिणार!"
दुशरथनगरीतें पातली दुष्टचित्त । जणुं असह अशी ती दुर्दशा एक मूर्त ! ॥
कैकेयीची मंथरा नाम दासी । दुर्बुद्धीची जी म्हणों पूर्ण राशि ।
वाग्देवीनें भ्रंशुनी तन्मतीतें । केलें तीतें दुर्यशःपेटिका तें ! ॥ ७१ ॥
पाहोनि तें नगरिंचा बहु थाटमाट । तैसेंच वाद्यरव मंगलपूर्ण दाट ॥
लोका विचारि क्षणि कारण मंथरा ती । रामाभिषेक कळतां तिज होत आर्ति!
चित्तीं विचार करि ती कुमती कुजाति । नासेल केविं महदुत्सव त्याच रातीं॥
जैशी चवोनि मधपोवळिं कीं किराती । चिंती सुदुष्ट 'मज लाभति कोण रीतीं?'
भरतजननीपाशीं आली मनांत उदास ती ।
प्रमुदित पुसे राज्ञी " का गे ! मनीं कुढसी अती ? " ॥
परि न वदली कांहीं दासी, उसासत राहिली ।
रुदन करि ती, स्त्रीचारित्र्यें अशीं जगतीतलीं ! ॥ ७४ ॥

वदलि तिजला कैकेयी तैं हंसोनि " अगे ! तुला !
निपट बहुधा वाचाळीतें, न लक्ष्मण बोलला ? ॥
तव मुजविलें तेणें गाला ? " तरी न वदेचि ती।
बहु मुसकरी नामी काळी जणों कुटिला अती ॥ ७५ ॥
दचकुनि म्हणे राज्ञी तेव्हां " अगे ! वदसी न कां ? ।
कुशल किं असे रामा, भूपा, तसें भरतादिकां ? ॥
रिपुदमन तो क्षेमी ? तो कीं असे सुखि लक्ष्मण ? " ।
परिसुनि अशीं नामें, कुब्जाहृदीं कळ दारुण ! ॥ ७६ ॥
तैं ती वदे " कवण हो ! मज बोलुं जाणे ? वां जीमही लवलवे उसन्या बळानें ?
भूपाळ ज्यास युवराज करीत आहे । त्या रामचंद्रविण सौख्य तरी कुणा हें ?॥
कौसल्येचें दैव वाटे फळलें । कोणाचे ना गर्व तेणें गळाले ? ॥
शोभा तुम्ही देखिली केवि नाहीं ? क्षोभे माझें चित्त, जी पाहतांही ! ७८
कळेना हो ! तुम्हां निजसुतचि जाईल विलया ।
गमे तुम्हा हें कीं नरपति असे नित्य करि या ॥
रुचे निद्रा तुम्हां सुख मृदुल शय्या स्वहृदयीं ।
कळेना भूपाचें कपट तुमच्या धीस लवही ! " ॥ ७९ ॥
कैकेयी परिसे प्रियोक्त परि ती जाणोनि तद्हृद्गत
बोले कोपुनि मंथरेस " सटवे ! तूं गेह का पोळित ? ॥
तूं जैसें वदतीस, त्यापरि पुन्हा तूं बोलतां चावटे ! ।
जिह्वा मी तव काढवीन घरुनी, वाचाच जेणें तुटे ! ॥ ८० ॥
लंगडे, कुबडे, काणे, स्वभावें दुष्ट दुर्जन ।
त्यांत स्त्री, त्यात बटकी ! " हांसे कैकेयि बोलुन ॥ ८१ ॥
तदां ती कैकेयी फिरुनि निज दासीस वदली ।
" प्रियोक्ति प्रीतीच्या वदत तव गे ! गोड जिभली ! ॥
तुला रोषें जें मी परुष वदलें तें नच खरें ! ।
मम स्वप्नींही मी तुजवरि कशी कोपिन बरें ? ॥ ८२ ॥
तो होय मंगल खरा दिन पुण्य मातें । जें सत्य पाहिन, मला वदलीस जें तें ॥
कीं ज्येष्ठ भाउ नृप, सेवक धाकुटा, हे । रीती भली रविकुलीं पहिलीच आहे॥
रामाभिषेक जरि होइल गे ! उद्यांच । देईन माग़शिल ते तुजलागि साच ॥

स्वप्नींहि येत पडती मज दुष्ट सारीं। मीं बोललें न तुज मूढपणीं विचारी ११२
माझा स्वभाव सरळा अति भाबडा गे!। कांहीं कळे न मज वाइट वा न चांगें॥
कोणास मी कधिंहि वाइट नाहिं केलें। मत्ताप काय बघुनी छळि दैव मेलें!॥
माहेरिं जन्मभरि राहिन जाउनी मी। सेवीन मी न सवतीप्रति रामस्वामी!॥
जे राहणें विवश होउनि कीं अरीस। वाटे भलें, मरणही मज त्या परीस!"।
राज्ञी अशापरि वदे बहु दीनवाणी। कुब्जा तिला कथि पुन्हां मृदु भाषणानीं॥
"ऐसें कसें वदतसां तुम्हि दीनभावें। सौभाग्य सौख्य तुमचें बहु वृद्ध व्हावें!।
जो कीं तुम्हांस करुं पाहिल काहिं हानि। पावेल तो स्वकृतिचें फल पूर्ण राजि!॥
तो दुष्ट वेत पडला मम कर्णि मात्र। ना भूक लेश दिनिं, जागत सर्व रात्र!"॥
राज्ञी म्हणे "वचनिं गे! तव मी त्यजीन। कूपींहि देह पतिपुत्रविहीन जाण!॥
पाहूनि दुःख मम घोर सशोक होशी। माझें हिता कथिसि तें न करीन कैसी!!"

*कैकेयीमान्यता ऐशी कुब्जा घेइ परोपरी॥*
*राज्ञीच्या उरिं ती घाशी सहाणीं कपटी सुरी!॥ ११८॥*
स्वताच्या लव ना राज्ञी विप्ना निकट देखत॥
चरे यज्ञपशू जैसा हिरव्या तृणि हर्षित!॥ ११९॥
आयके गोष्टि ती गोड कठोरान्त परी तशा॥
कीं मधाग्रचि घोळोनी पीत ती घोरशा विषा!॥१२०॥
*कैकेयीसि वदे कुब्जा "अहो! आठवतें न कीं!॥*
तुम्हींच कथिली मागें मजला गोष्ट ही निकी—॥१२१॥
वर दोन तुम्हा भूपें दिले; होति तयास्वें॥
घ्या ते मागोनियां आज जेणें इच्छांति संभवे॥१२२॥
भरता राज्य द्या, तैंच रामातें वनवास द्या!॥
*सवतींच्या महानदा लोपवा सकला उद्यां!॥१२३॥*

घेईल जैं शपथ भूपति रामनामें। प्रार्था तदाच वर हे निज-भव्यकामें॥
मोडील ना वचन भूप तुम्हा दिलेले। बोला कुणा वच न हें, मग कार्य झालें!!"
क्रोधागारीं जाउनीयां वसा हो! कार्यार्थाचा सर्वथा नाश ना हो!॥
भूपोक्तीतें ना वळा!" हें वदोनी। केली क्रूरा घातकीनें स्वराज्ञी!
प्राणाऐसी मानि राज्ञी स्वदासी। चालाजी ती सन्मतीतेंहि तैसी॥
सांगे "कोणी मद्धिता त्वत्समा न। जात्यें पूरी ना तरी मी बुडून!॥

होशी मातें तूं तरी आश्रयाची । उद्यां माझें कार्य साधो विरिंचि ! ॥
मन्थेराची बाहुली तूंच होशी । त्वत्कल्याणा मी स्मरें गे ! न कैशी ?" ॥
बहुपरि यापरि बदकी देई आदरभर, तैं कैकेयी ।
जाउनि बैसे क्रोधागारीं कोण आवरी तत्समयीं ? ! ॥
विपत्तिबीजा, वर्षा दासी, कैकेयीची मति धरणी, ।
कपटवारिनें अंकुर आले वर द्विदल, फल दुःखगणीं ! ॥१२८॥
क्रोधाचा संच साधोनी कैकेयी यापरी निजे ॥
कुधीने निज ती राज्यापासोनी च्युतता भजे ॥१२९॥
अयोध्या नगरी सारी उत्साह भरली अति ॥
कैकेयीच्या कुबुद्धीची ना कोणा कल्पनाहि ती ! ॥१३०॥
साकेतवासी नर आणि नारी । प्रहृष्ट चित्तीं सजलीत सारीं ॥
नृपालयीं चाललि थोर जा-ये । अनंत संमर्द तिथें न माये ! ॥१३१॥
श्रीरामशैशवसखे अति हर्षभारें । येती अनेक गग रामसमीप सारे; ॥
तत्प्रेमभाव समजूनि विशेष राम । तत्क्षेम त्यां पुसत पूरितभक्तकाम ! ॥
घेतां निरोप निजगेहिं फिरोनि येती । ते मित्र रामगुणगान किती करीती ॥
अन्योन्य बोलति 'जगीं रघुवीरसा न । कोणी सुशील, करुणाब्धि शरण्य आन ॥
आम्ही कुठेंहि निजकर्मवशें असों कां । देवो जगत्प्रभु अम्हाप्रति पूर्ति एका ।
होवो सदैव रघुनाथ अम्हास नाथ । यावाचुनी नच दुजा हृदयांत हेत !' ॥
इच्छा अशी सकल नागरिकांत नांदे । कैकेयिच्या हृदि परी अति ताप कोंदे !
दुःसंगतिस्तव विनाश न कोण पावे ?। चातुर्यही खलमती कुटुनी रहावें ? ! ॥
कैकेयीगेहीं ये सायंकाळीं प्रहृष्ट नृपराय ॥
वाटे निष्ठुरतेतें भेटों ये ' स्नेह ' देहधर काय ? ॥१३६॥
तो अंतरांत चरके, नामहि तें ' क्रोधभवन ' हें कळुन ॥
रायाचें पाउलही पुढें पडेनाचि भीतिनें गळुन ! ॥१३७॥
ज्याच्या बाहुबलावरि इंद्रहि विश्वास ठेउनि रहात ॥
सारे नृपालगणही मिळतां या पराक्रमालय पहात ॥ १३८ ॥
ऐसा तो दशरथनृप कलहकोपें मुकोनियां जाय ॥
कामवतार खरतर अवलोका, सकल वर्णवे काय ! ॥ १३९ ॥
खड्ग, त्रिशूल, चक्रहि यांचे नुर जो प्रहार सहज सहे ॥

त्यातें निष्फळ किती करि रतिपति निज सुमशरीं, पहा यश हें ! ॥
चाई प्रिंयजवळ तो नृप भीत भीत । देखोनिया स्थिति तिची मन आर्त होत॥
राशी दिसे क्षितिवरी पडली सुगात्री । अंगावरी मलिन अंबर, अश्रु नेत्रीं ॥
चोहींकडे तनुवरील अलंकृतींना । फेंकीयलें कुमतिनें निज भाग्यचिह्नां ! ॥
भासे कुवेष तसला वपतां तिचा तो । वैधव्य दारुण भविष्यचि सूचवीतो ! ॥
येऊनि भूप तिजसन्निध गोड वाणी । तीतें विचारि, " दयिता मम तूं शहाणी ॥
प्राणेश्वरि ! प्रणयिनी रुसलीस कां गे !" ऐसें पुन्हनि तिज तो धरुं जात अंगें ॥
तों ती पतीस झिडकारित उग्र रोषें । कीं नागिणीच जणुं ती अति दुष्ट भासे ! ॥
तें वासनाढ्य तिच्या रसनाग्र दोन । वदन्त तेच वर दोन विचारि पूर्ण ! ॥
ती भूपमर्मस्थल भेदुं पाहे । वदे विचित्रा ' तुळसी ' कथा हे ॥
आकृष्ट राजा भवितव्यतेनें । केलें करें कौतुक पंचबाणें ! ॥ १४५ ॥
*बहुपरि विज राजा आर्जवी हें वदोनी । "सुमुखि! वचिरनेत्रे ! कोकिलाकंठि राज्ञि!*
*कळविं तरि मला गे ! का तुझा होय रोष । गजगतिललने ! तो मी न ठेवीन लेश*
*कोणी प्रिये ! अनय गे तव काय केला ? कोणा द्विजास शिर ! मृत्यु कुणा भुकेला?*
*राज्यावरी चढवुं मी कवणा उदीना ? । राज्यावरूनि निवटू वद काय कोणा ?* ॥
शत्रू तुझा अमरही तरि मी वधीन । नारीनरें मग कशीं मज कीटकीं न ? ॥
रंभोरु ! भाव तव ठायिं मदीय थोर । मच्चित्त हें तव मुखेंदुसि हो चकोर ॥
मी प्राण, पुत्र, मम राज्यहि, दासदासी । सारी प्रजा, धन समर्पि तुझ्या पदासी
वांटेल कीं तुजसि मी करयाम सार्गे । मी घेत रामशपथा शतदां प्रिये गे ! ॥
तू हास सुंदरि! विलासिनि ! भामिनी गे! तूं इच्छिसी हृदयिं तें मज मागुनी घे
हीं भूषणें चतुर कामिनि ! लेइं अंगीं । टाकीं कुवेष, धरिं मंगल या प्रसंगीं" ॥
ऐकोनि तें, शपथही अतिमूल्य तैशी । हासोनियां उठलि ती कुमती विशेषीं ॥
वाटे किरातिच जणू बघुनी मृगातें । फांसा करी तशि वरी निज ती नगातें ! ॥
आणोनियां सुहृदया जणुं त्या प्रियेसी । प्रेमार्द्र हृष्टवपु भूप वदे प्रहर्षी ॥
" झालें प्रिये ! तव मनोरथ जेविं होता ! । ओह पयोधर पुरीमधिं हर्ष मोठा ॥
होईल रूढ युवराज्यिं उद्यांचि राम । हो सिद्ध त्यास्तव सुलोचनि! तूं निकाम "
तें ऐकतांचि उठली झणि ती कठोरा । कीं टोंचली सुद जणों करय उदग्रा ! ॥
ती तीव्र आर्ति परि लोपवि ती हंसोनी । 'हूं नूं' जशी नच करि कुलटाच कोणी !
जाणे न तें कपटकौशल भूप तीचें । धिप्पत्व कोटिकुटिला गुरुचेंच सार्चे ! १५४

होता जरी निपुण तो नृप नीतिशास्त्रीं। त्यातें अगाध चरिताब्धि निदर्शवी स्त्री।
प्रेमें स्वकीय कपटात्मक दावि राणी। मोटोनि नेत्र मुरकोनि वदे स्ववाणी।॥
"हो! माग माग म्हणतां दयिता! परी तें। ना देत वा कुणिहि घेत खरेंचि हातें।
वाचा दिलेत अवघे वर दोन कीं जे। संदेह तेहि मजला मिळण्यास माजे! ॥
राजा हंसोनि वदला "कळलें मला हें। वाटे तुम्हांस रुसण्यांतचि सौख्य वाहे॥
ते ठेवसेचि मजपाशिं तुवां दिलेसी। ना मागसी फिरुनि नूंच तयांस कैसी?॥
भोळाच मी प्रथमचा, विसराळु त्यांत। मी सर्वथा विसरलों सगळीच मात! ॥
शाबास ना मजसि दोष तुवां प्रिये! गे! कां दोन मात्र? वर चारहि आज गे! घे
ही रीति राघवकुळीं रुळली सदाची। जावोहि जीव परि भाक न ती फिरेचि!
नाहीं असत्यसम पुंजहि पातकांचा। हो गुंजकोटि तरि पर्वतसाच कैचा? ॥
वेदीं पुराणिं मुनि सर्वहि हेंचि गाती। कीं सत्यमूळ सुकृतें नर त्यांसि काति। ॥
मी त्यावरी शपथही दिलि रामनामें। मत्प्रीतिपुण्यचि सुमूर्त अनन्त रामें।" ॥
गोंवोनि वाक्य दृढ यापरि ती नृपातें। अत्यंत दुष्टमति हांसुनि बोलली ते ॥
जे तद्विचार, गमले जणु ते ससाणे। तद्नेत्र ती जणुं करी उघडे कराणें? ॥

जणों भूपाचें तें मन गमतसे सुंदर वन।
जिथें नांदे मोदें सुखखग असंख्यात रमुन। ॥
तिथें ही कैकेयी गमलि जणु भिल्लीण अदया।
स्ववाक्यांच्या श्येनां उधळुनि सोडूं वधि तयां। ॥ १६२ ॥

पत्नी वदे " प्रियतमा! परिसा मदुक्त। जें आवडे मम मना, वदतें सुयुक्त
एकें वरें नृप करा भरतासि नाथा!। जोडोनि हस्त करितें वर अन्य आतां
माझा मनोरथ तुम्ही अवि पूरवाना। कीं राम तापस मनोनि उदास व्हावा॥
जावें तयें वनिं चतुर्दशवर्षकाल। त्याचा असा वर तुझा मज, हो नृपाल!"
मृदुवचन परी तें भूपचित्तासि दाही। शशिकर शिवतां हो कोक चेतःप्रवाही।
वचन वदुं शकेना धैर्य लोपोनि गेलें। जणुं धरि धनि त्याच्या चोंच मुख त्याचें
नृपतिवदन झालें भीतिनें नष्टकांति। पडलिच तडताडीं भाळिं वीज का
करयुग धरि भाळीं मूर झांकोनि नेत्र। जणुं तनुभर तेव्हां तो गमे 'शोक'
म्हणत मनिं जणों तो "देव जो का मदीय। सुरतरुसम होता
उपटुनि करिणीनें नाशिला तो समूळीं। अजि सकल अयोध्या प्राणिनें
कैकेयीनें उवं आपचि आला। बोलानूनी आणिल्या कीं अनर्था।

हा ! हा ! देवा ! काय ही वेळ आली ! स्त्रीविश्वासे वंचना पूर्ण झाली !
संन्यास्यातें योगसिद्धी मिळाया । जों लागावी तों करी विघ्न माया । "
ऐशा रीतीं राव उद्विग्न झाला । तों कैकेयी बोलली उग्र बोलां ॥ १६१ ॥
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकालिकलुषविध्वंसने अयोध्याकाण्डे

पूर्वार्धे कैकेयीवरयाचनं नाम प्रथमस्तरङ्गः ॥

## तरंग २ रा

"सांगा, नसे भरत का तुमचाच पुत्र ?।विकत्याच मोलकरि मी ? नच का कलत्र?
ही वाणशीच जर होय तुम्हांस वाणी । कां बोलला न पहिलेंचि तुम्ही जपोनी ?॥
द्या नीट उत्तर, वदा अथवा ' न देत ' । सत्यप्रतिज्ञ तुम्हि ना रघुवंशजात ?
' देतों ' म्हणूनी अजुनीहि भरा नकार । सत्य त्यजून जगिं घ्या कुयशें अपार! २
वाखाणुनी प्रथम आपुलि सत्यसंधा । ' देईन दोन वर ' हें वदला कितीदा
' मागेल ही जणु ' तुम्हां गमलें 'फराळ ! देईन केविं नच मी नृप सत्यपाळ!'
पुण्यात्म जे शिबि, दधीचि, बळी तयांनीं । त्यागून देहधन रक्षियली स्ववाणी"
कैकेयिचें वचन ते अति मर्मभेदी । दग्धाग्नि दे लवणंच नृपतीसि आधि !

तेव्हां धार्मिक धीर वीर नृप तो धैर्या धरोनी मनीं ।
नेत्रातें उघडी विकंपितशिरा याकी उसासे क्षणीं ॥
बोले " मारिसि गे ! असी खुपसुनी मर्मस्थळीं माझिया ! " ।
क्रोधाची तरवार नूर्त गमली ती केकयी राजया ! ॥ ५ ॥

कुबुद्धि ती मूठ जणों असीची । नैष्ठुर्य ही धार सुतीक्ष्ण साची ॥
हो मंथरा हीच सहाण तीतें । करालतेला नृप भी किती तें ? ॥ ६ ॥
' येगार ती प्राणचि ' भूप मानी । धैर्ये परी बोलत नम्रवाणीं ॥
" प्रिये ! असें का वदसी अभद्र ? । कोठें तुझी प्रीति सुभाव सान्द्र !
मी सांगतों शंकरशपथ जाण । श्रीराम माझा भरतासमान ।
हे दोन मद्लोचनसेच होत । प्रभाति त्या पाठविलोचि दूत ॥ ८ ॥
दोघेहि येतील क्षणींच बंधू । निरोप माझा कळताच साधु ॥
शोधोनियां योग्य मुहूर्त काल । करूं समारंभ महाविशाल ॥ ९ ॥
करीन हर्षे भरतासि राजा । श्रीरामही होइल तुष्ट माझा ! ॥
श्रीरामही राज्यि नसे भुकेला । तद्भ्रात मोठा भरतीच ठेला ! ॥ १० ॥

लहानमोठा विवरूनि चित्तीं । ही निश्चिता ऱ्यांच नृपालनीति ॥
रामासही राज्य नसेचि हाव । तूं जाणसी निर्मल तत्स्वभाव ॥ ११ ॥
घेऊनि रामशपथा शत मी कथीं गे । यामाजि रामजननी नच कांहि सांगे ॥
केलें तुला न पुसतां सगळेंहि मींच । याकारणें मम मनोरथ नासतीच ॥ १२
आता त्यजूनि निज रोष, रचीं स्वभूषा । थोड्या दिनीं भरत राज्य चढेल खासा॥
ही एक गोष्ट मज केवळ, दुःख देते । मागीतलास दुसरा वर अज्ञ चित्तें ॥
अद्यापिही जळतसे मम ऊर तेणें । हा रोष ? कीं तव विनोद ? खरेंचि नेणें !
रामापराध वद टाकुनि राग सारा । सारे प्रशंसिति तदीय गुणप्रकारा ॥१४॥
त्वद्भीति राम किति?तूं स्वचिशी न त्या का! आताच ऐकुनि तुझें वच येइ शंका!
सद्भाव पाहुनि जयीं अरिही सुतुष्ट । तो राम काय जननीप्रति देइ कष्ट ? ॥
टाकून रोष, परिहास, धरीं विवेक । तूं दूर दृष्टि धरुनी वर माग एक ॥
खेंणकरून भरता अभिषेक होतां । डोळे भरून तरि मी निरखीन आता ॥
पाण्याविनाहि कधि काळि जगेल मीन । किंवा मणीविण फणी जगतील दीन ॥
मी मात्र हें कथितसे तुज सत्यभावें । रामाविना मजसि जीवन नाहिं ठावें !
तूं जाणशील चतुरे ! दयिते! मदीये । रामाविना मजसि ना जगतां कधीं ये! ॥
श्रीरामचंद्रमुखदर्शनिं जे अधीन । मत्प्राण हे असति जाणसि तू प्रवीण ! ” ॥
ऐकोनि भूपवचनें मृदुलें अतीव । राज्ञी मनात बहु तापलि कुस्वभाव ॥
जाणों पडे अनलि आहुति ती घृताची । ती क्रुद्ध आणखि वदे नृपतीस हेचि ॥
“ कांहीं वदा, किति करा सदुपायकोटी । चालेल ना मजपुढें अजि गोष्ट खोटी
घा दोन ते वर,न वा अयशा धनी व्हा। बोला न अन्य बहु वा, दमवा न जिह्वा
श्रीराम साधु, परि साधु तुम्ही शहाणे । तैसीच रामजननी, तिज मीच जाणें ॥
सर्वां तुम्हां वळखितें पहिलेंचि ना मी । हें जाहलें खचित सर्वविचारि नामी
कौसल्येनें माझिया जे हितातें । चिंतीयेलें जाणतें सर्वथा तें ॥
त्याची तीतें मी फळें चाखवीन । माझी इच्छा मीच साधीन पूर्ण ! २२
होतां प्रभात जर राम वना न वेदी । लेवोनियां तनुवरी मुनिवेष वेदी ।
जाणा घडेल मम मृत्यु सुनिश्चयें हो। राजन् ! तुम्हांसहि घडेल अकीर्तिलाहो ”
ऐसें वदोनि कुटिला उठलीच राणी । कीं रोषवारिभरिता सरितांच कोणी ! ॥
जीचा असे उगम पापगिरीवरून । क्रोधांबुनें भरलि जी निरखीत कोण ! ॥
जे दोन ते वर, तिचे जणुं तीर घोर । जो हट्ट दारुण तिची जणु धार थोर।

रामा पधून लर सिम्रमुसशुनीतें । लोकींहि खेदलहरी भरल्या किती तें ।५४
जावोनि पाहि रघुवंशमणी पित्यातें । निस्तेज तों नृप दिसे अतिमात्र त्यातें॥
भासे जणों पतित तो भयभीत साच । सिंहीणिच्या निकट वृद्ध गजेन्द्रसाच!!
सर्वांगि लाहिच जया, मुकलेत ओठ । कीं दीन तो भुजग यन्मणि होय नष्ट
संरुद्ध केकयसुता जवळींच होती । भूपाल्पमृत्युघडि मोजति काळशी ती !
श्रीराम, जो करुणचित्त मृदुस्वभावें ।तें दुःख पाहत, न जे श्रुति त्यासि ठावें
तेणें तथापि हृदिं धीर धरूनि युक्त । मातेप्रती पुसियेलं मृदुमंजुलोक्त ! ५७
"माते! कथीं मज, कशास्तव दुःखि तात? यातीन मी करुन यत्न तया अनंत"
माता वदे "परिस कारण हेंचि रामा! प्रेमा तुझ्यावरि करी नृप, ज्या न सीमा
भूपें मला वितरिले वर दोन होते । जे मानिले मजसि, मागितले तथा ते ॥
'जे ऐकतांच नृपचित्त सशोक होय । स्वप्रीति नावरुं शके तुज ठायिं राय!
पुत्रप्रीती कीं वरांची प्रपूर्ति । याचे योगें भूपचित्तासि आर्ति ॥
आदेशातें मानुनी वंद्य माथां । भूपक्लेशा तू निवारीं समर्था ! " ६०
केकेयीनें बैसल्यावैसल्या ती । निर्भीतीनें बोलियेली कटूक्ति ॥
जी ऐकोनी पूर्ण काठिन्यवाणी । व्हावें मूर्त क्रूरतेचेंहि पाणी !! ६१
वाटे तेव्हां मूर्तिमान् क्रौर्य साच । जिह्वाचापें शब्द ते बाणसेच ॥
मोठी विद्या बाणविद्येंत या श । भूपा लक्ष्या कोमला वेधि का या ! ! ६२
सारें रामा सांगुनी स्तब्ध राहे । वाटे मूर्ता क्रूरता वैसली हे ॥
चित्तीं हासे भानुवंशाब्जभानू । स्वानंदाचा ठाय जो एक मानू ! ॥६३॥
तो राम बोले वच वाग्विभूषण । मृदू तसें मंजुळ ज्या न दूषण ॥
" तो पुत्र वाटे मज माय गे ! भला । पाळावया जो जनकोक्त सजला ! ६४
आनंदवी जो पितरां असा सुत । संसारि गे! दुर्लभसाच भासत ॥
वनींच जाणे मज हो हिताप्रती । लाभेल मातें मुनिवृंदसंगति ! ॥६५॥
आदेश त्यामाजि तसा करी पिता । तुलाहि आज्ञा अधि आइ ! संमता
प्राणप्रिया भद्ररताहि राज्य हो । लाभेल, हें भाग्य मदीय भव्य हो ! ६६
धाता मला सन्मुख सर्वदा गमे । गुरूक्तिच्या पालनिं चित्त हें रमे ॥
मी याहि काया जर जाय ना वनीं । मूर्खी मला घेइन मीच गोंवुनी!
त्यजुनि सुरतरूतें जो किं एरंड सेवी । अमृत परिहरोनी जो विषाळागिं तेवीं
दवडिल न असाही मूर्ख या पर्वणीतें । जननि ! निज हृदीं तूं घेइं गे ! जाणुनी तें

परि अतिशय मातें एक हें दुःख वाटे। नरपतिहृदयीं कीं शोकवैक्लव्य दाटे!॥
अति लघुकृतिसाठीं कां असें दुःख ताता?। मजसि न समजे हें आद! चित्तीं पहातां
हे धीरवीर गुणसागर भूपराय। झाला असेल अपराध महान् मदीय॥
माझ्यासवें म्हणुनि हें वदती न कांहीं। माझी तुला शपथ, सांग खरेंचि आई!"७०
सहज सरल होती ती जरी रामवाणी। तरि कुटिल तियेतें मानि दुर्बुद्ध राणी॥
सलिल सम असो कां, त्यावरी चालणार। कुटिलगति जळूं ती जातसे नित्य वक्र!
ती स्नेह दावि वर, जाणुनि राममाया। बोले "मलाहि दुसरा नच हेतु ठावा!
देत्यें तुझी शपथ, या भरतावरूनी। बाळा! नसेचि अपराध तुझ्या ठिकाणीं ७२
तूं बंधु-तात-जननींप्रति सौख्य देशी। तूं बोलशी सकल तें वच सत्यपोषी॥
तूं तातमातृ-वचनीं रत नित्य भावें। ओवाळिजे तुजसि मीहि मदीय जीवें!
तूं नाथचित्त समजावि निजप्रभावें। जेणें न वृद्धपणिं लाञ्छन त्यासि यावें॥
वरा पुण्यसंपदि अशी तव लाभ झाला। ना ती अनादर करूनि गमो लयाला!"
ती दुष्ट वक्रवचनें शुभ त्यापरीचीं। तीर्थें गयादिक जशीं मगधांतरींचीं॥
रामासि मातृवच पावुनि शोभलेंच। गंगेसि ओहळ मिळूनि मळेंचि साच!॥७५॥
मूर्च्छाहि जाय तितुक्यांतचि राजयाची। तो 'राम! राम!' करि घोष सशोकवाची
तेव्हां सुमंत्र नमुनी समजावि त्यातें। "आला असे जवळ राम" असें सदुक्तें
जो राम तातचरणां धरि नम्रशीर्ष। तो भूपही उघडि लोचनपद्मकोष॥
भूपा सुमंत्र वसवी मग सावरूनी। रामा पदाब्ज धरत्या नृप घे करांनीं!७७
हृदयिं धरित रामा स्नेहनिःशङ्क राय। गत मणि गवसे तो त्या फणीलागिं काय
नृप वचतचि राहे प्रीतिनें रामराया। नयनयुगल लागे अश्रुपूरीं वहाया! ७८
बोलूं शके नृपति शोकभरें न कांहीं। रामा फिरूनि फिरुनी हृदिं घे कराहीं
प्रार्थी शिवातृपदिं राय किती स्वचित्तीं। "ना केधवांच रघुनाथ रिघो वनान्तीं!"
प्रार्थी शिवासहि मनिं स्मरुनी सुनाथें। "शंभो! सदाशिव! मद्भक्तिसि आयकावें
हे आशुतोष भगवन्! नमि सर्वदात्या!। दीनार्ति जाणुनि करा झणि नष्ट कीं त्या
हो! प्रेरणा करितसां तुम्हि सर्वचित्तीं। त्या प्रेरणा रघुवरा तुम्हि त्याच रीतीं॥
जेणें त्यजूनि मम भक्ति निदेश शील। श्रीराम नित्य मम गेहिंच कीं वसेल! ८१
हो कीं अकीर्ति जगिं, सुयश नाश पावे। स्वर्गा मुकून नरकीं मम पात होवो।
साहेन मी सकल दुर्धर दुःखराशि। रामा वियोग न करा मम लोचनांशीं!!"
ऐसाविचारिं रत भूप न कांहिं बोले। अश्वत्थपर्णसम चित्त तदीय डोले!॥

कुब्जोपदेश गमले जणुं काय भोरे। उन्मूलि भूपवरलागिं निजप्रपूरें ! ॥२५॥
ही रोपशिधु मिळु दुःखसमुद्रि पाही । भूपा कळे न परिहास, कथा खरी ही!॥
"हा स्त्रीमिषें मम शिरीं करि मृत्यु नाच"। भूपासि हा समजला परिपाक साचा॥
तो नम्र, पाय धरुनी तिज वैसवीत । बोले " न हो रविकुलासि कुन्हाड मूर्त
माथाहि माग मम, देइन तो तुला मी। पाहूं नको मज वियोग मदीय रामीं २७
वाटेल तें कर परी गहिं ठेविं रामा । नाहीं तरी सकल जन्मि न दुःखसीमा!"॥
*नाथी अशाध्य गणुनी पडला धरगाळ । क्षोणीतळीं, म्हणत 'राम' असंख्यवेळ !!*
'हे राम! राम! रघुनाथ!' अशा अनेका। हांका नृपालमणि मारितसे सशोका॥
तो व्याकुलांग गळला! करिणी जणों ती। ओढोनि कल्पतरु पाडित मत्तमूर्ति! ॥
तैं कंठ जाय सुकुनी, उमडे न वाणी। कीं मीन दीन गमला नच ज्यास पाणी!॥
बोले पुन्हां अति कठोर कटूक्ति राणी। कीं ते अगीं भरितसे विष वाक्यबाणीं! ॥
'कर्तव्य सर्व तुमचें जर हेंचि होतें। 'तू माग माग' वदलां कवण्या बळें तें?!॥
होतील दोन नृप का कधि एक काळीं?। थट्टा करुनि हंसलां मज फुल्लगालीं!॥
दातृत्व गर्जवुनि, कां कृपणत्व ऐसें?। शौर्यासि गाजवुनि शौर्यहि होय कैसें?॥
धैर्या धरा, स्ववचिं वा हरताळ फांसा!। नारीपरी रडुनि पेंच सुटेल कैसा? ॥
सत्यप्रतिज्ञ नर मानि तृणप्रकारीं। स्त्रीपुत्रदेहगृहराज्यधनादि सारीं" ॥
ऐकोनि मर्मवच भूप वदे " न दोष। येथें तुझा, वद सुखें वचलें विशेष! ॥३३॥
बोलाविती तव मिषें मज काळ मूर्त। तेणेंचि तूं मकसि जेंवि पिशाच मत्त ! ॥
व्हावेंचि भूप अशि ना भरतींहि हात। ही दुष्ट आस तव दर्शवि वक्र दैव ! ॥
माझाच हा गमत पापविपाक सारा। होता कुदैव न कुठेंचि सुखासि थारा ! ॥
साकेतिं येइल पुन्हां अनिमाल सौख्य। होईल राम गुणधाम अधीश मुख्य !३५.
सारेहि बंधु भजतील तयासि त्याचे। त्रैलोक्यिं रामयशही भरणार साचें ! ॥
पस्ताव मात्र मम, हाहि तुझा कलंक। मेल्यावरीहि न निमेल कधींच देख ! ॥
आतां वचेल तुज तें कर! चाल वाटे। राहूं नको मजपुढें पळही करंटे!।
आहे कुडींत मम जीव न तोंवरी गे!। कांहींहि बोल, नमुनी तुज हेंचि मागें॥
पस्ताव पावशिल अंतरिं अंतिं तूंहि। तूं तातिसाठिं चिरिशी कशि गादतें ही?!"
भूमीं पडे कथुनि हें बहुवार राय। बोलोनि 'अंत बघसी अधमे! मदीय!'३८
*राहे उगाच कपटाग्र तशीच राणी। ती जागवीत जणुं कीं रजनी स्मशानीं!।*
'श्रीराम! राम!' नृप यापरि आर्त हांका। मारीतसे विकलपक्ष विहंग तो का!॥

चित्तीं म्हणे 'नच सकाळ पुन्हां उजाडो । रामाचिया श्रवणिं हें न कुणीच पाडो
आकाशिं सूर्य नुगवो ! रघुवंशकांत । साकेत पाहुनिहि होइल तोहि आर्त !' ॥
भूपप्रीती स्मरारी दिव्यमूर्ती । कैकेयीची क्रूरता दुःसहा ती— ॥
हीं दोनींही निर्मिण्यातें विधाता । योजी वाटे आत्मकौशल्यजाता ४१
ऐसा करीत नृपशोक, तदा प्रभात । झाली, समग्रनगरीं शुभनाद होत ।
वीणा मृदंग मुरलीरव कंबुनाद । राजाचिया सदनिं वाजति सप्रमोद ॥४२॥
गातात भाट बिरुदें, तशिं गायकांनीं । आळापिलीं मधुर मंजुळ रम्य गाणीं ।
राजाप्रती न रुचले शुभही ध्वनी ते । जैसें न भूषण रुचे सहगामिनीतें ! ॥
ना त्या निशीं लवहि लाभलि झोप कोणा । श्रीराम पाहुं कधि यापरि आस त्यांना।
द्वारीं असंख्य जन सेवक आणि मंत्री । होते प्रहर्षि जमले सरतांच रात्री ४४
ते चिंतिती, म्हणति 'कां अजुनीहि राय । आलेत ना उठुनि ? कारण होय काय?
ब्राह्मीं मुहूर्तिं नृप नित्य असेचि जागा । ना आज कां? बहुत ही नवलास जागा!॥
जा हो सुमंत्र ! करण्या नृपनीस जागे । आदेश घ्या नृपतिचा करुं कार्य वेगें!'।
गेला सुमंत्र नृपमंदिरिं तों गमे या । सारें भयंकर जणों उठलेंचि खाया ! ॥४६॥
भ्याला मनीं, गमत त्यास विपत्ति शोक । पृच्छा करी, कुणिच उत्तर दे न लोक।
गेला शिरोनि मग जेथ नृपाल-पाशी । केला प्रणाम 'जय जीव' असें म्हणोनी॥
ऐसें जरा तंवर पाहि दशा नृपाची । जेणें मनीं विकलता झणिं त्याचि जाची ।
देखे नृपाळ धरणीं पडला विवर्ण । कीं तें समूळ कुणि अंबुज दे त्यजून ! ४८
तो भीतचित्त न पुसोंहि शके सुमंत । राणी वदे अशुभपूर्ण अपुण्यवंत—
" निद्रा नसे निशिं नृपाप्रति अल्पही ती॥जाणे न कारण, विना परमेशमूर्ति
'हे राम राम!' म्हणुनी रडती किती ते।झाली सकाळ, न नृपाळ कथीच मोते
रामासि येथ उनि तांतडिं आणवा जा ! । पृच्छा करा मगचि सर्व विशेष काजा"
पाहोनि भूपतिमनींहि तसेंच होत । गेला सुमंत अति होउनि चित्ति आर्त ॥
चिंतीत ही करि कुकृत्य कुबुद्धि राणी । त्याचा न पाय उचले, मुख दीनवाणी॥
रामासि आणुनि नृपाळ वदेल काय ? । चिंतीत यापरि सुमंत निघोन जाय ॥
खिन्नासि त्या पुसति दारिं बघूनि लोक।सान्यां कथूनि धृतिनें करि तो अशोक५२
ये तो जिथें रघुकुलांबुधिचंद्र राम । येतां तया बघित राघव मोदधाम ॥
तो आदरी बहु तया पितृतुल्य लेखी । पाहात राममुखिं भूपनिदेश देखी !
घेऊनि संगतिं तया रघुवंशहीरा । येतां तया निरखि लोकसमूह सारा ॥

त्या प्रीतिमग्न निरखुनि पित्या निकाम । मातेकडेहि निरखी शुचिकाम राम
तों ती वदेल वच काहिं असें गणोनी । तैसेंच देशसमयावसर स्मरोनि ॥
श्रीराम बोलत वचें विनयानुसारी । जीं हृद्य उत्तम अहा भरलीं विचारीं८४
"ताता ! वदेन तर धाष्टर्यचि हो मदीय । कीजे क्षमा गणुनि निति शिशूच होय !
का या अतीव लघु कारणिं शोक ऐसा ?। आधींच कां कळविली न मना मनीषा ?
टाकोनि शोक, मज हर्षिं निदेश द्याहो !" हें बोलता पुलकशोभित राम तो हो
बोले पुढें "जगतिं धन्यचि ते, जयांनीं । केलें प्रहृष्ट पितया, सुकृतें करोनी'
त्यातें सुलभ्य जगतीं पुरुषार्थ चारी। प्राणांपरीच निज जो पितरां विचारी ॥
आदेश पाळुनि करीन कृतार्थ जन्मा । आज्ञा करा, त्वरित मी परतेन धामा ८७
मातेसि मी पुसुनि घेइन तन्निदेश । तैसे पुन्हा नमुनि तातपदांबुजांस ॥
आताच मी निघतसें विपिनास जाया"। श्रीराम जायचि असें वच बोलुनीयां
तेव्हा नृपाळ अति दुःखि न उत्तरा दे । व्यापून दुःखभर तो नगरात कोंदे॥
तें दुःखवृत्त पसरे क्षणिं सर्व लोकीं । व्यापीन सर्व तनु वृश्चिकदंश दुःखीं८९
येताचि तें श्रवणिं वृत्त बुडालि शोकिं । न रीनरें, तरुलता वणव्यामधें कीं ॥
ज्या जेथ तें कळत, तेथ पिटोनि माथा । तो होतसे विकळ ! धैर्यचि जाय अस्ता !
वदन सुकुनि गेलें, लोचनीं लोट आले । जनहृदय भरूनी शोकपूरीं बुडालें !!
मनिं गमत अयोध्येमाजि सैन्येंचि आलीं । जणुं कदनरथांचीं दोल-कल्लोळ-मेळीं!!
म्हणति जन "अहा! हें कैसि धाता विनाशी।घडि शुभ घटनेची पातलेली उपाशी!'
चहुं दिशि जन सारे निंदिती कैकयीतें । अवचित कसले हे डोहळे होत होते !
काशि सदनहि जाळी नादतें अग्निनें ही । नयन निज करांनी काढुनी देगुं पाही?
दवडुनि अरुनातें, चाखुं पाहे विषातें । कुटिलमति कठोरा पापिणी हीच ऐसी
विमल रघुकुलाच्या वैभुन्या ही वनातें । कशि अकठित जाळी ही अभागी स्वहस्त
तरुवर कशि कापूं इच्छि पैठोनि शाखीं ?मुळि। जणुं अनुतापें काळवी दे मुळी कीं!
सतत हिजवांस हो भी शमहो प्राण जवीं । कुटिलपण हिचें हें पा पेरे न्याचि शाली?
कवि म्हणति खरें तें, लोकिं नारीस्वभाव । अकळचि,न तयाचा कोणि जागिल ठाव!
गयंवल कधी पाळीं प्रतिनिर्वाह आपलें ॥
वदंतु लोक हो ! कोणी नारीचरित्र जाणलें ! ॥ १६ ॥
कोणास वही नच जाळनार ?। कोणास अन्धी न समारणार ? ॥
करील नारी प्रस्ता न कार ?। न काळ कोनाहि बगाव पार ? ॥ १७ ॥

पूर्वी विधाता किति मदर ऐकवी । हा ऐकवीतो आजि काय हें कवि ? ॥
आम्हांस सौख्यें किति दर्शवीतसे ! । आता परी हें कटु चाखवी कसें ?" ९८

कोणी बोलति " हाय ! हाय ! नृवरें केलें न कांहीं भलें ! ।
कैकेयीप्रति कांनि ते वर दिले ना चिंतिता निर्मळें ? ॥
इष्टें भूपतिनें स्वतांस दिधलें दुःखामधें लोटुन ।
कैसे स्त्रीवशबुद्धिनें दवडिले स्वज्ञानसद्गुण ! " ॥ ९९ ॥
कोणी धार्मिकनीतिविज्ञजन जे ते मात्र ना ठेविती ।
भूपीं दोष मुळींहि चिंतुनि मनीं शास्त्र पुराणादि तीं ॥
ज्यांना ज्ञात दधीचि, तो शिबि तसा, राजा हरिश्चन्द्रहि ।
ते वर्णीति कथा परस्पर अशा आदर्शभूता मही ॥ १०० ॥

कोणी म्हणे ' हें भरतासि संमत ' । तदा कुणी ऐकुनि मूक राहत ॥
वेती कुणी तें श्रवणांसि झाकुनी । जिह्वा रदें चावुनि बोलती कुणीः-१०१
" असें न आम्हां तरि सत्य वाटतें । सत्कीर्तिनें पुण्य टिकेल कोंवें तें ? ॥
प्राणाहुनीही अधिकाचि हो गति । रामावरी श्रीभरतांवरी किती ! ॥१०२॥
वर्षेल कीं चंद्रहि अग्निचे कण । विषापरी होय सुधाहि दारुण ! ॥
परी न केलें भरतें कधींच तें । श्रीरामचंद्रा प्रतिकूल कोणतें ! " १०३
॥ इति अयोध्यावासिविषादवर्णनं नाम द्वितीयस्तरङ्गः ॥

## तरंग ३ रा

कोणी विधात्याप्रति दोष देतसे । जेणें सुधा दावुनि ओपिलीं विषें ॥
सान्या अयोध्येमधिं शोक संचरे । दुःखें जळे अंतर; हर्ष तो विरे ! ॥१॥
तें कैकयीच्या कुणि वृद्ध मैत्रिणी । विप्रस्त्रिया आवडत्या तिला मनीं ॥
तच्छील वानूनि कथीति चांगलें । जे शब्द तीतें परि बाण लागले ! ॥२॥
त्या बोलती " तूं म्हटलेंस केवढें । कीं राममूर्ती तुज होय हृद्‌गदा ॥
त्वदुक्त वानी जगही घडोघडीं । तुझी न तैसी भरतांहि आवडी ! ॥ ३ ॥
प्रकृतिन स्नेह तुझा रघूत्तमीं । कां लोपला गे ! नच जाणतों आम्ही ॥
केला असे तो अपराध कोणता । रामें तुझा गे ! वनवासजोगता ? ॥ ४ ॥
न रोष तूझा सवतीवरी कधीं । सर्वत्र ही ख्याति असे जगामधीं ॥
श्रीराममाता करि काय गे ! तुझें ? । सान्या पुरा हाणिसि घोर वज्र जें ? ५

रामा मधून लव खिन्नमुखद्युतीतें । लोकींहि खेदलहरी भरल्या किती तें !५४.
जावोनि पाहि रघुवंशमणी पित्यातें । निस्तेज तों नृप दिसे अतिमात्र त्यातें॥
भासे जणों पतित तो भयभीत साच । सिंहीणिच्या निकट वृद्ध गजेन्द्रसाच!!
सर्वांगि लाहिच जया, सुकलेत ओठ । कीं दीन तो भुजग यन्मणि होय नष्ट
संक्रुद्ध केकयसुता जवळींच होती । भूपालमृत्युघडि मोजति काळरात्री ती !
श्रीराम, जो करुणचित्त मृदुस्वभावें ।तें दुःख पाहत, न जें श्रुति त्यासि ठावें
तेणें तथापि हृदिं धीर धरूनि युक्त । मातेप्रती पुसियलें मृदुमंजुलोक्त ! ५७
"माते! कथीं मज, कशास्तव दुःखि तात? वारीन मी करुन यत्न तया अनंत" .
माता वदे "परिस कारण हेंचि रामा! प्रेमा तुझ्यावरि करी नृप, ज्या न सीमा
भूपें मला वितरिले वर दोन होते । जे मागिले मजसि, मागितले तया ते ॥
'जे ऐकतांच नृपचित्त सशोक होय । स्वप्रीति नावरुं शके तुज ठायिं राय !
पुत्रप्रीती कीं वरांची प्रपूर्ति । यांचे योगें भूपचित्तासि आर्ति ॥
आदेशातें मानुनी वद्य माथां । भूपक्लेशां तूं निवारीं समर्था !" ६०
कैकेयीनें वैधव्यावैसल्या ती । निर्भीतीनें बोलियेली कटूक्ति ॥
जी ऐकोनी पूर्ण काठिन्यवाणी । व्हावें मूर्त क्रूरतेचेंहि पाणी !! ६१
वाटे तेव्हां मूर्तिमान् क्रौर्य साच । जिह्वाचापें शब्द ते बाणचेच ॥
मोठी विद्या बाणविद्येंत या गा । भूपा लक्ष्या कोमला वेधि का या ! !.६२
सारें रामा सागुनी स्तब्ध राहे । वाटे मूर्ता क्रूरता वैसली हे ॥
चित्तीं हासे भानुवंशाब्जभानू । स्वानंदाचा ठाय जो एक मानू ! ॥६३॥
तो राम बोले वच वाग्विभूषण । मृदू तसें मंजुळ ज्या न दूषण ॥
" तो पुत्र वाटे मज माय गे ! भला । पाळावया जो जनकोक्त सज्जला ! ६४
आनंदवी जो पितरां असा सुत । संसारिं गे ! दुर्लभसाच भासत ॥
वनींच जाणें मज हो हिताप्रती । लाभेल मातें मुनिवृंदसंगति ! ॥६५॥
आदेश त्यामाजि तसा करी पिता । तुझाहि आज्ञा असि आइ ! संमता
प्राणप्रिया भरतताहि राज्य हो । लाभेल, हें भाग्य मदीय भव्य हो ! ६६ .
धाता मला सन्मुख सर्वदा गमे । गुरूक्तिच्या पालनि चित्त हें रमे ॥
मी याहि कार्या जर जाय ना वनीं । मूर्खों मला घेइन मीच गोंवुनी !
त्यजुनि सुरतरूतें जो कि एरंड सेवी । अमृत परिहरोनी जो विषा घ्यागि तेवीं
दवडिल न असाही मूर्ख या पर्वणीतें । जननि ! निज हृदीं तूं घेइं गे ! जाणुनी तें

परि अतिशय मातें एक हें दुःख वाटे। नरपतिहृदयीं की शोकवैक्लव्य दाटे!॥
अति लघुकृतिपाठीं कां असें दुःख ताना? मजसि न समजे हें आद! चित्तीं पहातां
हे धीरवीर गुणसागर भूपराव। झाला असेल अपराध महान् मदीय॥
माझ्यासवें म्हणुनि हें वदती न कांहीं। माझी तुम्हा शपथ, सांग खरेंचि आई!"७०
सहज सरल होती ती जरी रामवाणी। तरि कुटिल तिचेतें मानि दुर्बुद्ध राणी॥
सलिल सम असो कां, त्यावरी चालणार। कुटिलगति जलूं ती जातसे नित्य वक्र!
ती स्नेह दावि वर, जाणुनि राममाया। बोले "मलाहि दुसरा नच हेतु ठावा!
देवें तुझी शपथ, या भरतावरूनी। बाळा! नसेचि अपराध तुझ्या ठिकाणीं ७२
तूं बंधु-तात-जननींप्रति सौख्य देशी। तूं बोलशी सकल तें वच सत्यपोषी॥
तूं तातमातृवचनीं रत नित्य भावें। ओवाळिते तुजसि मीहि मदीय जीवें!
तूं नाथचित्त समजावि निजप्रभावें। जेणें न वृद्धपणिं लाछन त्यासि यावें॥
ऐशा पुण्यसंपदि असे तव लाभ झाला। ना ती अनादर करूनि गमो लयाला!"
ती दुष्ट वक्रवचनें शुभ त्यापरीची। तीर्थें गयादिक जशीं मगधांतरींची॥
रामासि मातृवच पावुनि शोभलेंच। गंगेसि ओहळ मिळूनि सजेचि साच॥७५॥
मूर्छाहि जाय तितुक्यांतचि राजयाची। तो 'राम! राम!' करि घोष सशोकवाची
तेव्हां सुमंत्र नमुनी समजावि त्यातें। "आला असे जवळ राम" असें सदुक्त
जों राम तातचरणां धरि नम्रशीर्षें। तों भूपही उघडि लोचनपद्मकोर॥
भूपा सुमंत्र बसवी मग सावरूनी। रामा पदाब्ज धरत्या नृप घे करांनीं!७७
हृदयिं धरित रामा स्नेहविक्लव राय। गत मणि गवसे तो त्या फणीलागिं काय
नृप बघतचि राहे प्रीतिनें रामराया। नयनयुगल लागे अश्रुपूरीं वहाया! ७८
बोलूं शके नृपति शोकभरें न कांहीं। रामा फिरूनि फिरुनी हृदिं घे करांहीं
प्रार्थी विधातृपदिं राय किती स्वचित्तीं। "ना केधवाच रघुनाथ रिघो वनान्तीं!"
प्रार्थी शिवासहि मनिं स्मरुनी सुनाथें। "शंभो! सदाशिव! मदुक्तिसि आयकावें
हे आशुतोष भगवन्! मनि सर्वदात्या!। दीनार्ति जाणुनि करा क्षणि नष्ट कीं त्या
हो! प्रेरणा करितसा तुम्हि सर्वचित्तीं। त्या प्रेरणा रघुवरा तुम्हि त्याच रीतीं॥
जेणें त्यजूनि मम भक्ति निदेश शील। श्रीराम नित्य मम गेहिंच कीं बसेल! ८१
हो कीं अकीर्ति जगिं, सयश नाश पावो। स्वर्गा मुकून नरकीं मम पात होवो।
साहेन मी सकल दुर्धर दुःखराशि। रामा वियोग न करा मम लोचनांशीं!!"
ऐशा विचारिं रत भूप न काहिं बोले। अश्वत्थपर्णसम चित्त तदीय डोले!॥

सीता पतीच्या विरहासि साहिल ? । येथें कसा लक्ष्मणराय राहिल ?
भोगील का तो भरत स्वराज्य गे ! ? । रामाविना भूरतिही-कशा जगे ? ६
ऐशा विचारें इागि पोप तूं त्यज । शोका कलंकासि न हेतु हो निज ॥
अवश्य दे तूं भरतासि राज्य गे ! कां रामराया वनिं धाडिशी उगें ? ॥७॥
राज्या नको रामहि की भुकेजला । विरक्त तो धर्मधुरीण साजला ॥
त्यजोनि गेहा गुरुपार्शि राहिला । तूं प्रार्थि भूपा वर गे ! दुजा अशा॥८॥
रुचे न तूंतें जर आमचें वच । लागेल ना हानि तुझ्याहि काहिंच ! ॥
असेल कीं हा परिहास गे ! तुझा । तसें खरें सांग; सुखी असो प्रजा !॥९॥
श्रीरामसा नंदन आणि त्या वन !'। म्हणेल तूंतें जग काय ऐकुन ? ॥
वेगें उठीं काहिं करीं उपाय गे ! । जेणें तुझा शोक कलंकही निघे ! १०
शोक कलंकहि जयें न राही करिं तूं काहीं; कुल गर्ती ।
निघतां तो वनिं घेचि ठेवुनी हट्ट कर नच दुसरें कीं ! ॥
'रविविण दिन जणुं, असुविण जशि तनु, शशिविण ज्यापरि हो रजनी ।
त्यापरि तुलसीदासंप्रभुविण होय अयोध्या गे ! राज्ञि ! " ॥ ११ ॥
असे सख्यानीं उपदेशिलें तिला । वदोनि कल्याणनिधान सूक्तिला ॥
परंतु नं ऐकियलेंहि ना तिनें । त्या मंथरेच्या कुटिलोक्तिमूर्तिनें ! ॥१२॥
न उत्तरें ती मुळिं त्यासि देउनी । वरुद्धा जसे त्या क्षुधिताच वाघिणी !
व्याधी असाध्या अशि जाणुनी तिची । त्या तें तिचा सोडुनि देति नादचि ! १३
गेल्या तिथोनी मग त्याहि कामिनी । कीं ती अभागी मतिमंद जाणुनी ॥
'अत्युत्तमा राज्यसुखासि भोगितां । दुर्दैव कैसें हित घेरि सर्वथा?' ॥१४॥
ऐशा विलापीं नगरातले जन । कैकेयिला देति शिव्या निखंदुन ॥
संतप्त चित्तीं किति ते उदासती । रामाविना जीवनिं कोण आस ती ? १५
सारी प्रजा व्याकुल होउनी म्हणे । " कैसा महादुःख वियोग साहणें ? "
व्हावें तटाकीं जल आटता जसें । मीनादिका, त्यासहि तें अरुह्यसें ! १६
तें स्त्रीनरा घोर सशोकता वरी । मातेकडे रामहि येइ तोंवरी ॥
प्रसन्नता शोभलि तन्मुखावरी । उत्साहही नादत चौगुणा उरीं ! ॥१७॥
" चिंता मिटे; ठेवुनि नैव घेइल । नृपाळ आता मज शोकविह्वल "
ऐशा विचारें रघुवीर हर्षित । आनद त्या-या हृदयात वर्षत ॥ १८ ॥
श्रीरामचित्त जणु बालगजेन्द्रसेंच । त्या राज्य बाद्धत सरोवर शृंखलाच ।

ती ही तुझेनि वनिं जाइन केधवां मी ? । हो हा प्रहर्षभर राघवचित्तसद्मीं
इति पुरलोकप्रियकैकेय्युपेदशवर्णनं नाम तृतीयस्तरङ्गः ॥

### तरंग ४ था

रघुकुलतिलकानें जोडुनी दोनि हातां । पदयुग जननीचें वंदिलें नम्र माथां ॥
वदुनि सुभग आशीर्वाद माता तदा ती, । कवळुनि हृदिं घे ती त्या सती प्रेममूर्ति !
ओवाळुनी त्यजि तयावरुनी कितीक । ती वस्त्रभूषणतती जननी सुरेख ॥
चुंबी तरी कितिकदा मुख राघवाचें । रोमांच देह भरि, लोचनिं अश्रु साचे ! ॥२॥
आलिंगि त्यासि फिरुनी बसवूनि अंकीं । प्रेमें पयोधर तिचे स्रवती भरें कीं !
प्रेमप्रहर्ष कुणि पूर्ण तिचा वदावा ? । रंका कुबेरपदवी शुभलाभ तो, वा ! ॥३॥
ती आदरें निरखि सुंदर तन्मुखातें । माधुर्यपूर्ण वचनें वदली तदा ते ॥
" ओवाळितें तुजवरुनि मदीय जीवा । वत्सा ! कधीं मजसि उत्सव होय केव्हां ?
पुण्याइची सुखद शीव मदीय ऐशी । कीं जन्मलाभ परमावधिची घडीशी ! ॥
येणार मंगल मुहूर्त असा कधीं तो ? ज्याची समग्र जन वाट मनीं पहातो ॥५॥
सोत्कण्ठ जाहलि मनें सकला जनाचीं । त्वात्पट्टसुलाभि जशि चातकचातकींचीं ॥
तृष्णार्त होउनि हृदीं शरदीं प्रतीक्षा । ते वृष्टिची करिति, जाणसि सारसाक्षा ! ६
जा मंगलस्नान करावया शर्मी । ताता ! इथें तें मधु घेचि खाउनी ॥
पित्याकडे जाइ, उशीर होच न । मी तूज ओंवाळित आत्मजीवन " । ७

तें आईचें वचन, हृदया पूर्ण जें आवडावें ।
कीं स्नेहाच्या अमरतरुचें पुष्प जैसें पडावें ॥
ज्याच्यामध्यें सुखमय मधु श्रीच उद्देश ज्याची ।
श्रीरामाच्या हृदयमधुपा भूलवीना कदाचि ॥८॥

जाणोनि धर्मपथ धर्मधुरीण राम । मातेसि बोलत वचें मृदु धर्मकाम ॥
" तातें दिलें मजसि काननराज्य आई ! । तेथें अवश्य मम कार्यमहत्त्व होई ९
आज्ञा मला जननि ! दे अति हृष्ट चित्तें । जेणें मिळेल मज मंगल हर्ष तेथें ॥
स्नेहें स्वचित्तिं नच भीतिसि ठाव देई । आशीर्वचें तव मला सुखदें वनींही ! १०
वर्षें वसोनी चवदा वनांत सत्या प्रतिज्ञा करुनी पित्याची ।
येईन गे ! पाय तुझे पहाया आई ! पुन्हां, दुःख करूं नकोचि ! " ॥११॥
श्रीरामवाणी मधुरा विनीतही बाणापरी टोंचलि आइच्या उरीं ॥

. ती शीतलोकी नुकचीन ऐकतां शृष्टी जवाशा मुकवीत ज्यापरी ! ॥१२।
वर्णील कोण हृदिं हो तिज जो विषाद ? म्याली मृगीच जणुं ऐकुनि सिंहनाद ।।
डोळ्यांत अश्रु भरले, तनु कांपुं लागे, की आद्यवृष्टिजल-फेनिच मीन मागे
धैर्या धरोनि परि राममुखा बघे ती । बोले सगद्गदरवें तनयासि उक्ति ॥
" प्राणापरीस पितया तव ठायिं तोष ! बाळा ! तुझें चरित त्या सुख दे विशेष।.
त्यांचें मुहूर्त धरला तव राज्यदाना ! कांतारि पाठवि कशोनि कुण्यां गुन्हांना ?
आहे तरी कवण कारण सांग मातें या ! कोण सूर्यकुल जाळितसे स्वहस्तें ?"॥१५॥
जाणोनि राममन सांगत कारणातें । तीतें अमात्यसुत दुःखद जें जनां तें ॥
तें ऐकतांच जननी अति मूक होत। कीं तद्दशा करुण, ना वदवे यथार्थ १६
न कौसल्या रामा घजलि वदुं " बाळा ! गृहि रहा " ।
" वना जा " ऐसेंही न वदत; भिई रामविरहा ! " ॥
उरीं दोंहीं रीतीं तिज अनल जाळी भयद कीं, ।
लिखायाचा भाळीं शशि, परि विधी राहुचि लिखे !!॥ १७ ॥
विधात्याच्या लीला जगतिं सकला दुःखद अशा ।
तिला धर्मे स्नेहें मतिथि घालें भिन्नचि दिशां ? ॥
चिचुन्द्री-सर्पाची अशिच गति झाली जणुं तिची ।
कळेना कैसे या गतिंतुनि निघावें अचुकचि ? ॥ १८ ॥
घ्यावा जरी ठेवुनि राम तो घरीं । स्त्रीधर्म नासेल, दुही गृहीं भरी ॥
द्यावे वनीं लावुनि तों चुकीच ती । ऐशापरी सकटिं पिळवा सती ! ॥ १९ ॥
स्त्रीधर्म आणुनि मनीं परि ती शहाणी । रामा तसेचि भरता समसा गणोनी ॥
चारुस्वभाव सरला रघुनाथमाता । धैर्या धरूनि हृदि बोललि शांतचित्ता २०
" केलेंसि बाळ ! अति उत्तम तूं खरेंचि। ओवाळिते तुजवरूनि तनूच साची
हा धर्म उत्तम असा गणतात संत । आदेश तातमुखिंचा करणें यथार्थ २१
'देईन राज्य' वदुनी, वन भूप देई । याचें न दुःखलवही मज चित्तिं होई
वत्सा ! तुझ्याविण परी भरता नृकान्ता । लोकांसही अमित होइल दुःख चित्ता
आज्ञा करीत जर केवळ तात तूतें । जाऊं नको विपिनिं मानुनि जास्त मातें॥
मातापिता उभयहि जर ते कथीती । साकेतकोटि गण तू वसती वनान्तीं २३
होतील तात-जननी वनदेवदेवी । तेथें मृगें, खग तुझे पदपद्मसेवी ॥
ी नृपास वनवासचि योग्य होत । पाहोनिया वय तुझें मन होत आर्त ! २४

वाटे सुभाग्य वन, ही नगरी करंटी । कीं जी रघूत्तम अशा तुज दूर लोटी ॥
सांगेन मी जर " तुझ्यासह मीहि येतें, । संदेह होइल तयें तवही मनातें !२५
बाळा ! पवित्र परमप्रिय जो जगासी । सर्वस्व सर्वजनिं, जीवन जीवनासी ॥
तो तूं मला म्हणसि ' आइ ? वनांत जातों?' मी माल राहिन इथें हृदि शोक होतो !
ऐशा विचारिं नच आग्रह दाविं मीही । कीं स्नेह वाढवुनि ना फललाभ कांहीं !!
नातें मनिं स्मरुनि मी जननी त्वदीया । मातें नकोचि विसरूं मम रामराया ! २७
सारेच देव पितर प्रभु पुण्यशील । नेत्रासि पापणि असे तुज रक्षितील ॥
अब्धी अगाध, अवधी वनवास दीर्घ । मीनापरी तळमळे प्रिय आप्तवर्ग !! २८
धर्मज्ञ तूंच करुणाकर योजना ही । चित्तीं विचारुनि करीं सदुपाय कांहीं ॥
जेणें जिवंत असुं तोंवरि तूज भेटूं । ओवाळुनी तुजवरूनि असूहि लोटूं ! २९
जाई मुलें वनिं, करूनि अनाथ सारे । लोकादिकां निजपुरींहि अशा प्रकार
वाटे बुडालि सुकृतें सकलां जनांचीं । दावीत काल विपरीतचि रीति साची!"
ऐसा करीत बहु शोक, पदा धरीत । जाणोनि दैव अपुलें विपरीतरीत ॥
अत्यंत दारुण असह्य विलापताप । व्यापी तिचें उर, अवर्ण्यचि तो विलाप !!३१
जेव्हां उठोनि कवळी जननीसि राम । तीतें प्रियोक्ति समजावि मनोभिराम ॥
तो त्याच वेळि परिसोनि कुवृत्त, भीता । ये सानुपादिं उठुनी अतिखिन्न सीता !
कौसल्येच्या वंदि पादाब्जयुग्मा । बैसे खालीं घालुनी शीर्ष रामा ॥
आशीर्वादा देत ती मञ्जुलोक्तीं । दीनेतें त्या देखुनी आर्त होती ॥ ३३ ॥
अधोमुखी चिंतनशील जानकी । प्रेमें पतीच्या अति जी पुनीत कीं ॥
सौंदर्यराशी म्हणते " वनाप्रति । पुण्यें कशी जाइन कांतसंगतीं ? ॥ ३६॥
प्राणांसवें जाउं शकेल का तनू? । कीं केवल प्राणचि त्यासवें म्हणू? ॥
सदेह हा जीव कि, जीव एकला? । कळे न कोणा विधिहेतु झाकला !"१७
निजचरणनखाग्रीं भूमितें ती विलेखी । मधुररव करीती नूपुरें तें गमे कीं, ॥
जणु विनवणि केली प्रेममद्धांतरानीं । ' त्यज न कधिं अम्हा गे !' यापरी नूपुरानीं
रुचिरनयनमार्गी लोटले वारिबिन्दु । वदलि वचन माता राघवा प्रेमसिंधु ॥
" अतिशय सुकुमारी जानकी लाडकी हे । सकल वडिल लोकां प्राणशी वाटताहे !
जनक जनक जीचा भूपति श्रेष्ठ ऐसा । रविकुलरवि जीचा सासरा थोर तैसा
रविकुलकुमुदांचा चंद्रमा तूंचि रामा । गुणनिधि पति जीचा होसि सौंदर्यधामा !
प्रियतनयतनू ही रूपसौंदर्यराशि । विलसलि गुणशीलें जी अतुल्या परांशीं ॥

जपत तिजचि मी हे नेत्रिंच्या बाहुलीशी । उरविन अशुद्दी मी वद्ध सीतापदासी

केलें लालन हें जिचें बहुविधा ग्यां कल्पवल्लीपरी ।
स्नेहें रक्षियली निरंचुनि जलें हत्प्रीतिचीं जीवरी ॥
होते पुष्पफलांसि योग्य जंव ती तों वैरि होई विधि ।
अंतीं या परिणाम होइल कसा जाणूं शकेनाच धी ! ॥ ४० ॥

[ म्यां पाळिली जी जणु कल्पवल्लरी । सिंचोनियां स्नेहजलें तियेवरी
फुलाफलां ये तंव दैव हें रुसे ? । कळे न अंतीं परिणाम कायसे !! ॥ ४० ॥]
जी जायची पीठिं, पलंग सोडुनी । दोल्यावरी मांडिवरूनि नंदिनी ॥
कठोर भूला पदिंही न लागली । म्या वातही गारु तिला नसे दिली ! ॥ ४१ ॥
मी प्राणसंजीवनशी जपें तिला । 'जाते वनीं' ती म्हणते सुकोमला ॥
तुझ्याववें हे रघुवंशसत्तमा ! । आज्ञा तिला दे तव रे ! मनोरमा ! ॥ ४२ ॥
जी चंद्रिकेची रसिका चकोरिका । चंद्रांशुबिंबा स्युं ती शकेल का ।
वनांतरींची अतिघोर संकटें । कीं चितुनीही उर केविं ना फुटे ? ॥ ४३ ॥
शार्दूल, मत्तगज, राक्षस, दुष्टजीव । संचारती विपिनिं घोरतमीं अतीव ॥
संजीवनी मृदुल केविं मुळी जगे ती । जी त्यांविली प्रलयदा विपदाप्तिकान्तीं॥४४॥
निर्मी विरंचि वनिं योग्य रहावयाला । कोळी किरात युवती सुखि ज्या अलोला
ज्या वाटती कुभिशिलाकठिना स्वभावें । न क्लेश त्यांसि वनिं; त्यांहिवनीं रिघावें !
योग्या तपस्विमहिला विपिनीं निवासा । किंवा तपोऽर्थ सुखभोग जयां नकोसा ॥
रामा ! वनांत वसती कधि योग्य सीते । जी चित्रिल्यांहि वघ्मास भिते करीतें !४६
जी योग्य मानससरीं कमलीं रमाया । ती केविं राहि हवस्याम्बुधि हंसजाया ?॥
ऐसा विचार करनी म्हणशील तू जे । सीतेचि मी कथिन तें समया विराजे" ॥४७॥
माता म्हणे "जर घरीं मम राहि सीता । आधार थोर मम होइल तोच चित्ता"
तें आइचें वचन गोड सुधाच जैसी । स्नेहार्द्रशीलमय वाटलि राघवासी ॥ ४८ ॥
मातसही प्रिय वदे सुविवेकशाली । श्रीराम, जें परिसुनी मनिं तीहि धाली ॥
तो जानकीसि मग बोधुनिया निवेदी । जे काननांत गुणदोष; विशिष्ट आधि

॥ इति श्रीकौसल्याविरहवर्णनं नाम चतुर्थस्तरङ्गः ॥

## तरंग ५ वा

मातसमीप वदल्या दयितेसि, राम । लाजे परी वदत जाणुनि योग्य याम ॥

"गे! ऐक राजतनये। मम वाक्यसार। ना आण चित्ति दयिते! भलता विचार
तूं इच्छिसी निज मलें ममही जरी गे! राहीं घरींच; तुज मी हित तेंचि सांगें
सेवा कराविस तुवां निज सासवांची। आज्ञा तुला कथितसें मम हीच साची!
सर्वांच भामिनि! हितें सकलप्रकारीं! सद्धर्म हाच तुज होइल भव्यकारी ॥
श्वश्रू तसे श्वशुर यां भजणें सुभावीं। याहून धर्म न दुजा जगतांत देवि!॥३

जेव्हां जेव्हां स्मरुनि मजला आठवीतील माता।
मत्प्रेमानें हृदय भरुनी चित्ति होतील आर्ता ॥
तेव्हा तेव्हां कथन करुनी सत्कथा त्यां पुराणी।
त्यांच्या चित्ता समजवित जा बोलुनी गोड वाणी! ॥४॥
सांगें मीही शपथ शतदा घेउनी सत्यगोष्टी।
ठेवीतों हे तुजचि सदनीं मीहि आईचसाठीं ॥
सद्धर्मांचे स्मृतिगुरुमतें सार तें लीलया घे
हट्टें कान्तीं पतन नहुषा, गालवा ये प्रसंगें ॥५॥

करुनियां सार्थक तातवाणी। येईन गेहा क्षणि मी फिरुनी ॥
हें ध्यानि घे सुंदरि! तूं शहाणी। काला न लागे उशिर प्रयाणीं! ॥६॥
मी सांगतों तें मनि मान सीते!। न हट्ट कांहीं धर मानसीं ते ॥
प्रेमामुळे मद्धन नायकोनी। येशी वनीं; तो परिणामि हानि!! ॥७॥
अरण्य भारी कठिनात्म भीषण। अत्युष्णता, शैत्य, जलें, समीरण ॥
वाटेंत कांटे, गवतें, शिला, कडे,। तें चालणेंही अनवाणि गे! दडें! ॥८॥
तुझीं पदाब्जें सुकुमार साजरीं। अगम्य वाटा खडकाळ डोंगरी ॥
नाले, नद्या, ते नद, खोरि कंदर। अगाध; ना देखवती हि दुस्तर ॥९॥
ते व्याघ्रसिंहादिक, माल्लु, लांडगे। ज्यांचे ध्वनी ऐकुनि धैर्य ना तगे ॥
भूमीच शय्या, वसनास वल्कलें। खाणें पडे कंदमुळें, क्वचित् फलें ॥१०॥
न लाभ त्यांचाहि सदैव निश्चित। दैवानुकूल्यें वनि तेंहि लाभत ॥
संचारती राक्षस मानवाशन। अनेकवेषी, गणवेहि ज्यांधि न! ॥ ११ ॥
पाणी कुठे डोंगरि जीवघातक। अरण्यविघ्नें किति वर्णु आणिक? ॥
कराल ते व्याल, विहंग दारुण। नारीनरां चोरिते राक्षसीगण! ॥ १२ ॥
स्मृती तयांची करवीत भीरुता। मृगाक्षि! तूं भीरुच वीं स्वभावतां ॥
वनीं अयोग्या अशि हंसगामिनी। नेता तुला सदृश राहि कोठुनी? ॥१३॥

जी मानसींच्या सलिलामृतें जगे । हंसी अशी क्षारसमुद्रिं राहि गे ?
जी रंगली आम्रवनांत कोकिला । सोजेल ती कंटकिं काय कोमला ? १४
विचार ऐसा करुनी मनामधीं । सोडूनि दे काननकांक्षिणी सुधी ॥
*चंद्रानने ! सुंदरि ! जानकि ! प्रिये ! अरण्यदुःखांसि जाणतां न वे ! ॥१५॥*
घेवोनि सादर शिरीं उपदिष्ट साचें । जो नायके वच सुहृद्गुरुनाथ यांचें ॥
त्यातें पुढें कळुनि येइ चुकी स्वकीय । होवोनि हानि मग दुःख करी अमेय ।"
॥इति श्रीरामोत्तरं–श्रीजानकीप्रतिवर्णनं नाम पंचमस्तरङ्गः॥

## तरंग ६ वा

ऐकोनि मंजुवच सुंदर ते प्रियाचें । सीताविलोल नयनांबुजिं अश्रु साचे ! ।
त्या शीतलोक्ति परि दाह करीति सीते । कीं शारदेंदु निशि चक्रवांगनेतें १
झाली अतीव हृदिं दुःखित जानकी ती । कीं नाथ टाकिल मला प्रभु पुण्यमूर्ति
ना बोलवे तिज, पुसी निज अश्रुधारी । धैर्या धरी उरिं मनोज्ञ धराकुमारी २
अश्रूस्पर्शिं नमुनि जोडुनि हात बोले । *"देवि ! क्षमा; अविनयि क्षण चित्त झालें ॥*
केला मला सदुपदेश चि जीवितेशें । मांझें अतीव हित यांत वसे विशेषें ॥३॥
मी जों विचारुनि पुन्हां बघतें मनांत । वाटे वियोग पतिचा जगिं दुःख मूर्त ॥
नाहींच दुःख दुसरें जगिं त्यासमान । कारुण्यसागर ! करा विनतीस मान ॥४॥
हे प्राणनाथ ! करुणायतना ! सुजाणा । हे सुंदरा ! नुसकरा मनि हेंचि आणा ॥
हे भानुवंशकुमुदेन्दु निभा त्रिलोका । तुम्हांविना नरक मानिन इंद्रलोका ॥५॥
माता पिता बहिण भाउ सखे सुताचे । सारे असो दयित ते परिवार साचे ॥
श्वश्रू तसे श्वशुर साधु गुरु प्रसिद्ध । अत्यंत आवडि जरी गुन ते विशुद्ध ६
सारेच सौख्यद परी पतिच्या अभावीं । नारीहि विस्मरनि, रीति जगीं पहावी !
जीतें नसे पति अशा अबला स्त्रियेतें । हो सात तारक समस्त रवीचसे ते !! ७
जीतें नसे पति अशीम तनूधनादि । गेहें पुरें धरणि होति मनास आधि ॥
होतात रोगसम भोग, नगादि भार । संसार सर्व यमयातन दुःखपूर ! ॥८॥
प्राणप्रिया ! जगतिं सौख्य तुम्हांविना न । कोटींचि तें मजनि अल्पहि ज्या प्रमाण ॥
जीवाविना तनु, जलाविन की नदी ती । तैशीच नारि ! पतिवाचुनि दारमूर्ति ॥९॥
तुम्हांकडेनि सगळें मन ओढ घाय । त्वच्छारदेन्दुवदना बघतां उदास !
त्वत्संगतींत मृगराजि गणीन जात । कांतारहि नगरसेंचि म्हणेन तूं ॥१०॥

तीं वल्कलेंहि मज होतिल हो ! दुकूलें !। स्वर्गीय सौख्य जणुं पर्णकुटींत आलें !।
श्वशुर तेसे श्वशुर ते वनदेव-देवी । सानन्द सम्मति गणील तयांस तेवीं ।। ११।।
कोमल अंथरुण तें कुशपल्लवाचें । शय्येपरी मृदुल जेविं मनोभवाचें !
तें कंद मूल फल भोजन कीं सुधान्न । साकेतसौधशत सौख्यद अद्रि तेच्न !।।१२।।
मी हा क्षणोक्षणिं पदाब्जयुग बघोन । कीं चक्रवाकयुवती रविदीप्ति पूर्ण ।।
होईन मी मुदित अंतरिं दीननाथा ! । कां काननांतिल असौख्यभरा पहातां ? १३
जी वर्णिली विपिनिंची तुम्हि दुःखपंक्ति । निःत्रास शोक, परिताप अनन्त भीति ।।
तें सर्व दुःख गणुनीहि सुसह्य वाटे । तुम्हा विना क्षणहि जीवन, दुःख मोटें ! १४
सर्वज्ञ हे प्रभुवरा ! करुणाम्बुराशि जाणोनि हें मजसि घ्याचि सवें वनासी ।।
मी प्रार्थना कशि करावि तुम्हासि आतां ? जी जाणता सकलही हृदयाधिनाथा!१५
साकेतिं याल तंवरी जर मी जगेन । ऐसें गमे जर तुम्हां तर जा निघून !।।
हे सुंदरा ! प्रभुवरा ! प्रणतार्तबंधो ! हे सौख्यदायि दयिता ! गुणशीलसिंधो ! १६

क्षणक्षणिं पदाब्जें निरखुनी अशीं आपलीं ।
अरण्यि पथ चालतां कधि न होय मी तापली ।।
अनेकपरिं सेवुनि प्रियतमा ! तुम्हां भावतां ।
प्रवासि दवडीन मी शिणहि आपला सर्वथा ! ।। १७ ।।
बसोनि तरुच्या तळीं चरण आपुले क्षाळिन ।
अति प्रमुदितें मनें पवन आपणां ढाळिन ! ।।
सुनील तनु आपुली श्रमजलाङ्किता पाहतां ।
तुम्ही मजसि देखतां, मज शिवेल कैशी व्यथा ? ।। १८ ।।

करोनियां मी अवनीप्रती सम । तियेवरी अंथरुनी मृदूत्तम ।।
तृणादि वा पल्लव कोंवळे अती । चुरीन रात्रीं तुमच्या पदाप्रती ।।१९।।
घडोघडीं कोमलमूर्ति साजरी । न्याहेन मी सेवनिं आपली जरी ।।
दासीस लागेल न या कधीं उन । किंवा न वाराहि कदापि दारुण ! ।।२०।।
असेन मी जो प्रभुसंगतीमधीं । बघेल मातें न कुणीच दुष्टधी ।।
न सिंहिणीतें निरखूं शके जसा । वनामधे क्षुद्रशृगाल वा ससा ! ।।२१।।
मी कोंवळी, आपण कां वनोचित ? । मी सौख्यभोगा तुम्हि का तपःस्थित ? ।।
ऐकोनिही निष्ठुर बोल आपले । न ऊर माझें लवही दुभंगलें ! ।।२२।।
गमे तुम्हां कीं प्रभुच्या वियोगही । साहील माझी कुडि नीचशील ही !”

वदोनि ऐसें अति आर्त जाहली। 'वियोग' शब्दाहि न साहि मैथिली! २३
पाहोनि ती स्थिति तिची रघुराय चिंती। कीं ठेविता हिस न ठेविल जीवही ती ॥
बोले रघूत्तम "करीं नच शोक भार्ये! तूं येइं गे! मजसवें विपिनास आर्ये!२४
ना तूं विषादलवही हृदयांत ठेवीं। वाया वनासि झणि सजचि होइं देवि!"
बोलेनि या प्रियवचा समजावि कांते। वंदूनि मातृपदिं आशिस घे स्वतातें
माता वदे "त्वरित ये; जनदुःख नाशीं। ना आइतें विसरु तूं मज निष्ठुरेशी
माझी फिरेल कधि का कुदशा फिरूनी। ही रम्य जोडि निरखीन किं लोचनांनीं
ये लाडक्या! सुदिन सुक्षण तो कदा मी जेव्हा मुखेन्दु तव पाहिन याच जन्मीं?"
संबोधि आठवुनि ती वचनीं किती या। "हे वत्स! हे रघुपते! प्रिय रामराया!"
"तुम्हासि बोलावुनि सादर आत्मवक्षीं। प्रेमें धरून कवळून दृढ प्रहर्षी ॥
केव्हां वरं बघिन मी निज डोळियांनीं। या प्रेममूर्ति तुमच्या न्यतिरम्य दोनी!"
वचन सुलिं निघेना व्याकुला होय माता॥निरखुनि जननी ते त्यापरी खिन्नवार्ता
समजवि तिज तेव्हां राम नाना परींनीं।करुण हृदयपूरा त्यांचिया कोण वर्णी?
नमुनि जनकजा तैं सासुपायीं वदे हें। "जननि! खचित वाटे मी अभागीच आहे
जंवर समय देवीं येत सेवा कराया। तंवर विपिनिं जावें, होउनी हेतु वाया!
मजवरि न करावा रोष हो! त्याजसाठीं। सतत मजसि लाभो आपुली लोभदृष्टि
खचित कुटिल माझें कर्म जन्मान्तरींचें!। लवहि न मम येथें भासती दोष साचे"
सीतावचा ऐकुनि होइ आकुला। सासू, न ये वर्णनही तिचें मला!॥
घेऊनि सीतेसि पुनःपुन्हा उरीं। धरूनि धीरा शुभ आशि दे खरी॥३२॥
करी तिला ती उपदेश ही किती। आशीर्वचें हीं तिजलागि देत ती
"सौभाग्य नांदो तव गे! अनन्तसें। त्रैलोक्यिं गंगायमुनाप्रवाहसें॥" ३३
कौसल्या दे यापरी योग्य आशी। नाना रीतीं गौरवोनी निदेशी ॥
वारंवार प्रीतिभावें नमोनी। सासूतेंही; जाय सीता तिथोनी ॥ ३४ ॥
इति श्रीरामचरितमानसानुवादकाव्ये सकलकलिकलुषविध्वंसने अयोध्याकाण्डे श्वश्रूसकाशात्सीताया विसर्जनं नाम षष्ठस्तरङ्गः ॥

## तरंग ७ वा

घडकले श्रवणीं जंव वृत्त तें। विकळ होउनि लक्ष्मण ये तिथें ॥
हरपली क्षणि तद्वदनच्छवी। पुलकित स्थिति तत्तनु कापवी ॥ १ ॥

रघुनि धीर, विलोचनिं नीर ये । कवळि रामपदां भरता भयें ॥
नच तथा वदवे, नुसता बघे । सलिलमीनचि बाहिर तो निघे ! ॥ २ ॥
व्यथित दीन मनें भवितव्यता । हृदयिं चिंतित तो पथ कोणता !
सुकृत सौख्य मदीय समापसें । रघुपती मज सांगिल कायसें ? ॥ ३ ॥
मधुनि ठेवुनिया मज तो वनीं। निघुनि जाइल कीं मज घेउनी ? ॥
बघत राम.तशा दयिता अति । कर जुडुन उभ्या अनुजाप्रति ॥ ४ ॥
तृण तसें तनु गेहहि तोडल्या । वदत राम तशा अनुजास त्या ॥
रघुपती नयसागर नागर । सरलचित्त सुखाब्धि दयाकर ॥ ५ ॥
सकलशीलनिधान वदे वच । " हृदयिं लक्ष्मण रे ! मय घे नच ! ॥
उचित हो परिणाम सुखावह । गणुनि हें धृतिनें सगळें सह ॥ ६ ॥
माता पिता गुरु धनी इतुक्या जनांचें । जो मानितो वचन सादरचित्त साचें ॥
तेणेंचि धन्य जगतीं निजजन्म केला । नाहीं तरी जगिं निरर्थक तो जहाला ७
हें जाणुनी वचन तूं मम ऐक बंधो ! मातापित्यांसि सुखवीं गुणरत्नसिंधो !
गेहीं नसे भरत, ना रिपुनाशकारी । वार्द्धक्यिं तात, हृदिं दुःखहि त्यास भारी
नेईन मी जर सवें तुजही वनासी । साकेत होउनि अनाथ रिघेल नाशीं ॥
मातापिता गुरुजनादि समस्त लोकां । होईल लोटुनि दिले अति दुःखि ना कां ?
तूं राहुनी करिं सुखी निज सर्व लोक । नाहीं तरी अमित दोष घडेल देख ॥
ज्याची प्रजा तळमळे अति दुःखवेगें । त्या भूपतीस नरकीं पडणेंच लागे ! ॥
यासाठिं गेहिंच रहा करुनी विचार" । तें वाक्य लक्ष्मणमना दुखवी अपार ॥
त्या शीतलेंहि वचनें मन शुष्क केलें । स्पर्शेंहि जेविं हिम पद्म करी सुकेलें ११
तो प्रेमविह्वल वदूं न शकेचि उक्ति । श्रीरामपादयुगला कवळी सभक्ति ॥
उद्गारि " नाथ तुम्हि; मी तुमचाच दास । टाकाल हो ! तर कुठें वसुं वा वज्रास ?
जें सांगतां मजसि नाथ ! असे खरें तें । वाटे अशक्य करणें अधृतीस मातें
जे धैर्यशील अतिधर्मधुरीण मोठे । त्यांनाचि नीति कथिली तुम्हि, योग्य वाटे
मी लेंकरूं तुमचिया वळि पोशलेलें । मंदारमेरुसि कसें वहणें मराळें ? ॥
मी ओळखीं न मुळिंही गुरु-तात-माता । माझा स्वभावचि तुम्हां कथिला जि नाथा!
ज्यासाठिं लोकिं गणिली गणगोतनातीं । संसारिंचीं निगमिं वर्णित वा किती तीं
तीं सर्व होति मम एक तुम्हांत नाथा ! । हे दीनबंधु हृदयान्तरिंच्या वसन्ता । १५
ज्या आवडी सुगति-कीर्ति धनादिकांची । त्यां धर्मनीति कथणें अति योग्य होचि ॥

याकिंचत्तदेहिं न तुम्हांविण अन्य ज्यांसी।त्या त्यागणें उचित केविं दयांबुराशि!"
नम्रत्वशालि निजबंधुवचें मृदूर्शी। तीं आयकोनि कवळी उरिं राम त्यासी ॥
त्या सांगुनी समजवीत किती प्रकारीं। जाणोनि तद्हृदयींची गुरुभक्ति सारी१७
श्रीराम सांगति "गड्या! क्षणिं जाइं माते। घेउनि ये शुभ निरोप तिचा वनातें"॥
ऐकोनि ती रघुवरोक्ति अतीव तोषे। होतां सुलाभ, टळुनी अति हानि जेवें १८
तो हृष्टचित्त जननीजवळीच येत। अंधासि लाभलि जशी नयनें सुकांत! ॥
लावीत मस्तक क्षणीं जननीपदांसी। तद्देह येथ परि अंतर रामवासी!॥१९॥
त्या म्लानचित्त तनया बघुनी सुमित्रा। 'हे लक्ष्मणा! कथिं मला सगळें सुपुत्रा!'
ऐसें पुसे; वदत तो निज वृत्त सारें। जेवें दवावृत मृगी तशि ती थरारे!॥२०॥
तें लक्ष्मणास गमला नव तो अनर्थ!। गुंतून ठेविल मला ममता घरात!
रामासवें मजसि देइल नैव जाया। या भीतिनें धजत तो न निरोप घ्याया!

सीतारामगुण स्वरूपहृदयीं आणी सुमित्रा तदा।
त्यांचा सुंदर तो स्वभाव, नृपतिप्रीती महा संपदा॥
राज्ञी होउन शोकविह्वल निजा शीर्षासि ती हालवी।
बोले "पापिणि! साधिलास किं उभा दावा कसा गे! भवी!"२२

धरोनी धैर्यातें अवसरहि जाणोनि कठिन।
सुमित्रा तें बोले सरल मृदुल स्वादुवचन॥
"तुझी माता बाळा! समज मनिं सीता सहृदय।
तसे मानीं रामा सकलपरिनीं तात सदय!"॥२३॥
अयोध्या ती सत्या समज, जिकडे रामवसति।
दिनाची तें ख्याती तळपत जिथें की दिनपति॥
वनामध्यें आती जर खचित सीतारघुपती।
अयोध्येमध्यें या तर्हिं तव कार्येंचि नसती!॥ २४॥

तया रामा जे जे प्रिय परम ते ते तुजहि रे!।
जगीं रामाऐसें समज मनिं अत्यादरमरें॥
असा चित्तीं वत्सा! करुनि बरवा निग्रह, निघें।
वना तूं त्यासंगें, निजजननि कृतार्था करुनि घे!॥ २५॥

तव मनि जर रामप्रीति अव्याज ओहे। जर तव मति रामीं रंगली नित्य राहे

तर तुजवरुनी मी जीव ओवाळिते ही। तव ममहि सुभाग्या नाहिं सीमा कदाही।
इति श्रीरामवनगमनाय लक्ष्मणस्य मातरंप्रति आज्ञायाचनं नाम सप्तमस्तरङ्गः।।

तरंग ८ वा

हो तीच मात्र युवती जगिं पुत्रवंत। आला कुशीस जिचिया सुत रामभक्त।।
हो, ना तरी, मळिच वांझ; फुका विणें तें। हानीच रामविमुखें तनयें तियेतें
भाग्यें तुझ्याच गमतें वनिं जाइ राम। आहे तुजें कवण त्यास वनांत काम?
वाटे महत्फल असे सुकृतास हेंचि। प्रीती जडानि हृदिं राघवजानकींची।।२।।
तूं प्रीति रोष मद कामविमोह यांस। स्वप्नांतरींहि निज पाश करूं नयेस।।
सर्व प्रकारिं विकृति त्यजुनी करावी। सेवा तुवां रघुवरा तनुवाक्स्वभावीं ३
मातापित्यांपरि जयासह रामसीता। त्या तूंस हो वनिं परोपरिं सौख्य चित्ता।।
जेणेंकरून वनिं ताप न होय रामा। ऐसेंचि वाग, उपदेशिन सौख्यधामा! ४

शीक हेंचि तव गमनिं जानकीराम सुखी मनिं वनिं व्हावे।
मातापितयां प्रियपरिवारा, पुरा सुतस्मृति विसरावे" ।।
तुलसि कथी, ती सुताहि शिकवी आशी देई पुनःपुन्हां।
"आवडि वाढो नित्य नवी दृढ रामजानकीशुभचरणा" ।। ५ ।।
वंदोनी जननीपदांसि विनयें, तो ये झणीं मागुतीं।
आज्ञा की मज केविं सोडि जननी जाया अरण्याप्रती।।
वाटे दैवबळें भयंकर असें जाळें तुटोनी पळे।
एकादा मृगसाच तो! प्रभुपदा येवोनिया आकळे!।। ६ ।।

।। इति श्रीरामआज्ञासुमित्रादेश लक्ष्मणवनगमनसमीपवर्णनं नामाष्टमस्तरङ्गः।।

तरंग ९ वा

श्रीरामसंग मिळतां मन लक्ष्मणाचें। होवोनि हर्ष-परिपूर्ण सुखांत नाचे।।
सीतारघूत्तमपदा नमि लीनचित्तें। ये तो तयासहित भूपतिमंदिरातें ।। १ ।।
तेव्हां अयोध्येंतिल पौर सर्वही। परस्परातें घटना कथीति ही ।।
"कैसी विधीनें शुभमंगलक्षणीं। केली विचित्रा भयदा उभारणी ?" ।।२।।
तनू कृशा म्लानमुखें विषण्णलीं। पोळ्याहुनी हाकिलि मक्षिकावली!।।
पोळीति हात। पिटिती स्वमस्तकें। तुटोनि पंखें खग दीनसे निके!।। ३।।
असंख्य लोटे जन भूपमंदिरीं। आक्रोश त्यांचा नच वर्ण्य वैखरीं।।
सुमंत भूपा उठवूनि बैसवी! 'श्रीराम ये' हें हळु त्या निवेदवी।।४।।

सीतेसवें दोनहि पुत्र पाहुनी । अत्यंत दुःखाकुल भूप हो मनीं ॥
पुन्हां पुन्हां स्नेहभरें तयांप्रती । लावी उरीं त्यां कवळूनि भूपति ॥ ५ ॥
बोलूं शकेना नरनाथ विह्वल । जाळी तया शोक भयकरानल ॥
उठोनि तैं प्रीतिभरें नमूनियां । मागे तया राम निरोप जावया ॥ ६ ॥
"ताता ! मला या जि ! निरोप आवडीं । आशीर्वचांहीं सुखवोनि तांतडीं
हर्षक्षणीं केवि विलाप हा असा ? प्रमाद मोहो नच आजि मानसा ॥ ७ ॥
लोपोनियां सद्यश लोक ना हसो ! । जगांत सत्कीर्ति सदा अम्हां असो !
ऐकोनि तैं स्नेहभरें उठोनियां । धरोनि रामा नृप बैसवी तया ॥ ८ ॥
बोले "अहा राम ! मुनीश्वरीं तुला । चराचराचा अधिनाथ वानिला ॥
शुभाशुभा कर्मसमुच्चयाप्रति । योग्यें फलें देत असे जगत्पति ॥ ९ ॥
करीत जो कर्म, तयास तें फल । नीति स्मृती ही कथिली विनिर्मल ॥
एकापराधे दुसऱ्यास दंड हा । विचित्र हे ईशगती कशी पहा ! ॥ १० ॥
लीला प्रभूची कवणा कळूं शके ? " । असें किती बोलत राय तें निकें ॥
परोपरींनीं स्तवुनी बंधे तया । रामासि गेहांतचि राहवावया ॥ ११ ॥
श्रीराम सुज्ञवर, धर्मधुरीण धीर । त्याचा सुनिश्चय नृपा कळतां समग्र ॥
सीतेसि तैं उचलुनी कवळूनि पोटीं । सांगे परोपरिं तिला नृप वाक्यकोटी !
दुःखें तिला कथियलीं वनिचीं समस्त । माहेर-सासर-सुखें कथिलीं अनन्त !
सीतामना परि रघूत्तमपादलीना । गेहीं सुखासि, वनिं आर्तिहि वाटली ना !
सांगोनि पाहति तिला जन अन्यही ते । पाहूं पहाति समजूत तिची स्वचित्तें॥
आपत्ति सर्व कथिती वनिच्या तियेला । सान्या स्त्रिया सुमति, सद्गति धर्मशीला
आता वसिष्ठमहिला सचिवांगनादि । स्नेहें तियेसि कथिती किति गोड शब्दीं
"सीते ! नसे तुज दिला वनवास कोणीं । तूं ऐक जें कथियलें श्वशुरादिकांनीं"
ती शांत शीतल हितप्रद गोड वाणी । सीतेसि ना रुचलि बोललि त्या स्त्रियांनीं
ज्योत्स्ना शरच्छशिभवा मधुरा जरी की । तीमाजिही तळमळे कशि चक्रवाकी !

॥ इति श्रीराम० समष्टिविरहविषादवर्णन नामनवमस्तरङ्गः ॥

## तरंग १० वा

संकोचोनी मनिं लव कांहिं उत्तर न देत जो सीता ॥
कैकयी तों उठुनी आणित वनवासि वस्तु ज्या उचिता ! ॥ १ ॥

मुनियोग्य वल्कलांतें भस्मातें आणि ती कमंडलुतें ॥
ठेवुनि समोर त्यांच्या बोले केवल खेंचि मृदुलें तें ! ॥ २ ॥
" हे रघुवीरा ! तुम्ही प्राणप्रिय भूपतीस वास्तवसा ॥
यास्तव शीलस्नेहां तुमच्या त्यांना न शकवे सहसा ॥ ३ ॥
निजसुकृत सुयश, उत्तम लोक जरी जाइले सकलहष्ट ॥
तरि ' तुम्हीं वनिं जावें ' ऐसें कधि नृपमुखें न ये स्पष्ट ! ॥ ४ ॥
म्हणुनि तुम्ही निजमानसिं करुनि विचारासि योग्य तेंचि करा ! ",
जननीच्या या वचनें सुख झालें राघवा सुनीति-करा ॥ ५ ॥
परि हें कैकेयीवच शरसम भूपाचिया हृदीं शिरलें ॥
तो हो मूर्च्छित कीं हे दुर्भागी प्राण कां अजुनि उरले ! ॥ ६ ॥
जनता सर्व विकल हो झाला मूर्च्छित नराधिपति साच ॥
काय करावें हें त्यां कोणासहि कांहिही कळेनाच ! ॥ ७ ॥
त्वरितचि मुनिवेषातें लेई रघुराय योग्य वनवासा ।
नमुनी दशरथपाया जननींतेंही नमीत नतशीर्षा ॥ ८ ॥
केलं लक्ष्मणनेंथिलींसह तयें आरण्यदीक्षाविधि ।
वंदी तो गुरुविप्रपूज्यचरणा श्रीराम पुण्यावधि ॥
जाऊं लागत काननार्थ बघतां ऐशा प्रभूतें जन ॥
झालें दुःखित अंतरीं करपलें शोकाग्निनें तन्मन ॥ ९ ॥
तदा जातां थांबे रघुवर वसिष्ठांगणिं लव ! ।
बघे लोकां सार्‍यां निज विरह जाळी जणुं दव ! ॥
समस्तांना बोले प्रियवचन सांत्वी, समजवी
निमंत्री मित्रां दे गुरुकथित दानेंहि बरवीं ॥ १० ॥
चर्षासनें द्विजजनां दिधलीं किती तीं । अत्यंत सादरमनें विनयें तुरीतीं ॥
तो दानमानिं बहु तोषवि याचकांसी । प्रेमें स्वमित्रवर तो सुखवोनि पोषी ॥ ११ ॥
बोलावि सर्वहि पुन्हा निजदासदासी । बद्धांजली गुरुकरीं निरवी तयांसी ॥
बोले " विभो ! शरण या सकला तुम्हीच । मातापित्यापरि तुम्हीच तयासि साच ! "
जोडोनि पाणियुगपद्म पुनःपुन्हा ते । प्रार्थीत राम सकलासि विनीत चित्तें ॥
" होईल तोच मज श्रम सुखमंगलदाता । देईल जो दुख अतीव नृपालचित्ता ॥ १२ ॥
जेणें मदीयजननी विरहार्तिदीना । होतील नैव कधिंही अतिदुःखमग्ना ॥

ऐसा उपाय तुम्हि सज्जन हो ! करावा। जो होय अंतरिं तुम्हां चतुरांसि ठावा" १४
ऐशा प्रकारिं समजावुनि लोकचित्तां । त्यावोनि सद्गुरुपदांबुजिं नम्र माथा ॥
गौरीमहेश गणराज मनीं स्मरोनी । आशीसि घेत विभु जात वना निघोनी १५
श्रीराम जात असतां, अति शोक होय । लोकार्तिदीनरव ऐकवला न जाय ।।
साकेति हें; कुशकुनीं भयभीत लंका। आनंद शोकहि तसा भरि देवलोका। १६

सरोनी मूर्च्छा ये नृपदशरथा जाग इकडे ।
सुमंत्रा बोलावी, वदत वच त्यातें नृप पुढें ॥
" वना जातो राम प्रिय मम परि प्राण न निघे !
कशाच्या आशेचें सुख अजुनि जीवास विलगे !! ॥ १७ ॥
व्यथा याच्याहूनी कवण अधिका दुःखद अशी।
जिच्या योगें प्राण त्यजित तनुतें हे झटदिशीं ! "॥
परी तो धैर्यातें धरुनि हृदयीं भूप वदला ।
" सुमंता ! तूं जा रे ! रथसहित रामासह भला !! ॥ १८ ॥

माझे सुनाव, सुकुमार कुमार दोन । तैसीच ती जनकजा सुकुमार पूर्ण ॥
याना रथीं बसवुनी फिरवूनि आण । दावोनि चार दिनमात्र अरण्य रान !! १९
ते धीर वीरवर राघव सत्प्रतिज्ञ । दोघे गृहा जर न येतिल बंधुरत्न ॥
तू प्रार्थि त्यासि कर जोडुनि नम्र भावें । कीं ' जानकीस तरि लावुनि गेहिं यावें ! "
जें केधवा वन बघून भिईल सीता । तेव्हां निरोप मम सांग; वधीव चित्ता ।।
" सासू तसे श्वशुर हे तुज सागतात । बाळे ! घरीं परत; आर्ति वनीं अनंत !
राहीं कधीं पितृगृहीं, कधिं सासरीं तूं । वाटेल तेथ वस, जा न वनीं परतु !"
ऐशा अनेक परिनीं करुनी उपायां । येईल ती तरिच शंकर मला जगाया ! २२
हे ना तरी मरण निश्चित हो मदीय ! होतांच दैव उलटें, न चले उपाय ।
सीता तसे मजसि लक्ष्मण राम दाव " । ऐसें वदोनि क्षणि मूर्च्छित होय राव ।
होतांच तो नृपनिदेश लवूनि माथा । घेई सुमंत रथ जोडुनि शीघ्र जाता ॥
बाहेर ये नगरिच्या क्षणि जेथ होती । श्रीरामलक्ष्मणसवें जनकात्मजा ती २४
तेव्हां तया कथि सुमंत, नृपोक्त सारें । त्यां बैसवीत विनयें रथिं सत्प्रकारें ॥
सीतेसवें उभय ते बसतां रथांत । वंदीति आत्मनगरीसि मनीं विनीत ॥२५॥
जाताच राम दिसली नगरी अनाथा । सारी प्रजा निघन त्यासह आर्तचित्त॥
लोकांसि राम समजावि दयांबुराशि । जाति, भक्तिवश येति फिरोनि त्यासी ! २६

दिसे अयोध्या नगरी भयानका । ती काळरात्री अति कृष्ण मानुं का ?
पशू जसे दिसे तसेच घोर ते । परस्परां पाहुनि भीति धारिते ॥ २७ ॥
गेहें स्मशानपरि, लोक समस्त भूतें । आतेष्टमित्र सुत कीं यमदूतसे ते ।
कोमेजलीं तरुलतोपवनें पुरीचीं । वापी तडाग सरिदोघ जणूं नुरचि ! ॥२८॥
तेव्हा तुरग-गज, केलिकुरंग कोटी । पाळीव सर्व पशु, तेथिल पक्षिसृष्टि
ते चक्रवाक, पिक, सारस, हंस, मोर त्या सारिका शुकहि चातक ते चकोर ॥२९॥
निस्तब्ध दुःखवश रामवियोगिं झाले । जेथे तिथें जणु चितारुनि काढलेले ! ॥
साकेत सर्व घनदाट अरण्य भासे । तेथील लोक, मृगपक्षि असंख्य तैसे ! ३०
तैं कैकयी विधिनियोजित कीं किराती । दावानला दशदिशा करिते जिथें ती ! ॥
तैं लोक रामविरहानलिं पोळलेले । होवोनियां विकल सर्व दिशां पळाले ! ॥३१॥
सर्वांसि वाटत मनीं, जर नाहिं सीता-श्रीराम, लक्ष्मण, तरी सुख केविं चित्ता ?
हो राम तेथचि समस्त समाज राहे । साकेतिं रामविन, काहिंच कार्य नोहे !
या निश्चयें निघति ते रघुनाथसंगें । सोडोनि गेह सुरदुर्लभ सौख्य मागे ॥
श्रीरामपादकमलीं रमल्या मनासी । नाकर्षिती विषयभोग कधीं स्वपादीं ! ३३
आबालवृद्ध सगळे निघती त्यजोनी । गेहादिकां, रघुवरासह जाति रानीं ॥
केला निवास तमसेवरि जानकीशें । सर्वांसवें प्रथमच्या दिनिं भक्ततोषें ३४
रघुपति निजलोकप्रीति पाहोनि, थोर । हृदयिं गहिंवरोनी होय दुःखार्त फार
अमित करुणराशी तो प्रभू रामराय । कळवळि परदुःखें, त्याजला वेळ काय ?
प्रेमें रसाळ वचनें मृदुलें वदोनी । श्रीराम त्यांसि समजावि बहुप्रयत्नीं ॥
सांगे तयांसि उपदेशुनि धर्मनीति । सांगूनही परत जात नच प्रजा ती ! ३६
स्वस्नेह शील निज तोडुं शके न राम । झालाच पेच बहु राममना निकाम॥
शोकें श्रमें सकल निद्रित लोक होती । मायाहि मोहि त्व त्या सुरनिर्मिता ती !
तैं यामिनी प्रहर दोन निघूनि जाता । श्रीराम सांगि अति आर्जवुनी सुमंता
"ताता! कळेल न कुणां, रथ हाक ऐसा, त्याचीच हेतु अपुला जुळणार कैसा!"
सीता रघूत्तम सलक्ष्मण रूढ होती । तेव्हा रथीं नमुनि शंभुपदां सभक्ति ॥
वेगें सुमंत रथ युक्ति करोनि हाकी । जेणें कळेल गतिमार्ग कुणाहि ना कीं ! ३९
॥ इति श्रीराम० जनविरहश्रीरामवनगमनवर्णनं नाम दशमस्तरङ्गः ॥

## तरंग ११ वा

होतां प्रभात सकलांमति जाग आली । 'गेले रघूत्तम !' विरावति सर्व मेळीं

ना देखती लव खुणा रथमार्गदर्शी। आक्रोश 'राम' मुखिं; जाति चहूं दिशांशीं
बाटे तदा जणुं समुद्रिं बुडे जहाज!। झाला अथाह अति दीन वणिक्समाज!॥
ते बोलती विकळ होउनि एकमेकां। धायुनि जाय रघुनाथ अम्हांसि हा कां!
मीना प्रशंसिति निखंदुनि आपणांसी। हें धिक् जिणें रघुवराविण दुःखराशि
"आम्हां प्रियासह वियोग करीत धाता। ना मागतां मरण कां नच दे समस्तां!"
ऐसा विलाप करिती विरहार्त लोक। थाकेति येति भरुनी उरिं घोर शोक॥
*तें तीव्र दुःख कवणा कथवेल वाणी?। प्राणांसि ठेविति वनावधितें गणोनी!*
निजनयनिं मिळावी देखण्या राममूर्ति। व्रतनियम करीती लोक सारे तदर्थी॥
गमत तरणि जातां अस्तमाना दिनान्तीं। विरहिं कमल कोकी चक्रवाकादि कांतीं
श्रीरामलक्ष्मण सुमंत समेत सीता। ते शृंगवेरपुरिं पोंचति मार्गिं जातां॥
देखोनि देवसरिता उतरोनि राम। आनंदभक्तिभरिं तीस करी प्रणाम! ॥६॥
सीता तसे सचिव लक्ष्मण ही नमीती। सर्वांसवें मुदित राघव होइ चित्तीं॥
आनंद मंगल समग्र विनिर्मि गंगा। सर्वांसि सौख्यद, करी सत्कार्तिभंगा॥
सांगे रघूत्तम अनेक कथाप्रसंग। वीची विलोल बघुनी विमलांतरंग॥
वर्णोनि एकवि तिचा महिमा कवी तो। सीता-सुमंत सहलक्ष्मण हर्षवीतो॥८॥
ते मज्जनें करुनि घालविति श्रमांतें। प्राशूनि पुण्यजल तोषुनि जाति चित्तें
*ज्यातें स्मरोनि विगतश्रम होति लोक। तो श्रांत हो, कथन हें व्यवहार एक!*
श्रीसच्चिदानन्द विशुद्ध राघव। जो सूर्यवंशाग्रणि पुण्यसंभव॥
त्याचीं चरित्रें नरजन्मिचीं मवीं। तरावया सेतुपरी अम्हां हवीं॥ १०॥
जेव्हां कळे सकलवृत्त गुहा निषादा। बोलावि तो प्रिय निजास घरोनि मोदा
भेटीस घेउनि सवें फलमूलभार। अत्यंत हर्षभरिं ये; उरिं भक्तिपूर। ॥११॥
अर्पूनि भेट पुढतीं करि तो प्रणाम। सप्रेम राममुख पाहत सौख्यधाम॥
ती प्रेमभक्ति बघुनी रघुराय तोषे। क्षेमा पुसूनि बसवी जवळींच तैसें॥१२॥
"देवा!" वदे गुह,"पदांबुजदर्शनानें। आहेंच मी कुशल; भाग्य नसेचि सानें
सर्वस्व भूमि धनधाम तुम्हा निवेदीं। मी दास होय तुमचा सहबांधवादि १३
देवा! कृपा करुनि या नगरीं मदीयीं। माना स्वदास मजला निज सर्वकार्यी
बोले रघूत्तम "सख्या! वदसी खरें तें। आज्ञा असे मज दिली दुसरीच तातें
'वर्षे चतुर्दश वनामधिं घालवीणें। आहारवेषनियमादि मुनिप्रमाणें-'
न ग्रामधामिं वसती मज योग्य आहे!" अत्यंत दुःखितमना गुह ऐकुनी हें

सीतालक्ष्मणरामरूप बघुनी ग्रामीण नारीनरं।
जाती प्रेमभरें भरोनि, वदती उद्गार चेतोहर॥
"बायांनो! जगिं आइबाप कसले त्याना म्हणावें तरी ?।
ज्यांनीं ही पिटिलीं घरांतुनि दुरीं बाळें अशीं गोजिरीं !"॥ १६॥

कोणी म्हणों लागति त्यांत लोक। "केलें अहो! भूपतिनें सुरेखां!
देतो गमे लाभ अम्हां विधाता। करूनि नेत्रां अमुच्या कृतार्थां"॥ १७॥
तेव्हां निषदपति जाणुनियां मनात। कीं शिंशुपातरु मनोहर हो नितांत।
दावीत तें स्थल विभूत्तम राघवासी। होई बघूनि रघुरायहि तें सुतोषी॥ १८॥
तेव्हां निषादपति सुंदर दे रचोनी। शय्या तया मृदुलशां तृणपल्लवांनीं १९

फळें मूळें शुद्धें मृदु मधुर जाणोनि किंतिक।
भरोनी द्रोणातें गुह रघुवरा दे सुरसिक॥
तदा सीते भ्रात्यासहित सचिवातें वितरुनी।
तयां सेवी राम प्रभुवर सुतोषें निजमनीं॥ २०॥

श्रीराम सेवोनि फलादि शोरत। संवाहि तें लक्ष्मण, तत्पदांप्रत॥
बघोनियां राघव झोपला असे। उठोनि सांगे सचिवा हळूचसें! ॥२१॥
झोंपवया त्यासहि लावि लक्ष्मण। वसे दुरीं घेउनि चापमार्गण॥
वीरासना घालुनि वीर टाकला। करी पहारा प्रभुरक्षणा भला!॥ २२॥
गुहेंहि तें बोलवुनि स्वसैनिक। विश्वासयोग्य प्रतिमार्गि आणिक॥
स्थापीयले आपणही तसा वसे। तो लक्ष्मणासन्निध, शस्त्र घे तसें॥ २३॥
भाते शराचे कटिलागि बांधिले। हातामधें चाप सुसज्ज, ना दिलें॥
तें निद्रिता पाहुनि राघवाप्रति। निषादचित्तात विषाद ये अति।॥२४॥
हृदंतरीं प्रेमहि दाट संचलें। हृश तनू लोचनिं अश्रु शिंचले!॥
बोले तदा भक्तिभरेंचि लक्ष्मणा। वर्णावया येइल भाव तो कुणा?॥ २५॥
"दशरथभवनाची प्रेक्षणीयाच कांति। सुरपतिसदनाची प्रौढि ना त्यापुढें ती
मणिरचित सुरम्यें तीं गवाक्षें तयासी।जणुं रतिपति त्यातें निर्मि सौंदर्यराशि!
जेथें पलंक अतिरम्य सुवस्त्रशोभी। शय्यादि शुभ्रवसनावृत चित्तलोभी २७
त्या दुग्धफेनधवला मृदुला उशाही। ऐशी समृद्धि परिपूरित जेथ वाही॥
सोपीं अशा निशि रघूत्तम आणि सीता। जे शोधती रति मनोज गमोनि चित्ता

ते हे अशा शयनिं आजि बघून सुत। भ्रांतरिथर्तीत, मम हो मन दुःखतप्त॥
ना लोचनां विवशना बघवे दशा ही। संपन्नता तशि इथें लवमात्र नाहीं! २९
मातापिता परिजनादिक दासदासी। उत्कृष्ट मित्र परिवार जपेहि ज्यासी॥
प्राणांसमान सकलांहिं निषेविंयेला। तो राम विश्वविभु भूतलि झोंपि गेला! ३०
जीचा पिता जगतिं कीर्तित तत्त्वनिष्ठ। जीचा असे श्वशुर इंद्रसुहृद् वरिष्ठ
भर्ता जिचा रघुकुलांबुधिचंद्र राम। ती जानकी निजत भूवरि; दैव वाम!! ३१
योग्या असे का वनवाससेवना। सीता, तसे रामहि काय कानना?॥
खरेंचि जें कीं जगिं लोक सांगती। सर्वप्रभावी भवि कर्मसंगति!॥ ३२॥
कुटिलकृति गमे ती कैकयी मंदधीच। कठिनहृदय नारी हें करी कर्म नीच॥
सुखसमय जयां ये जानकीरामराया। अकलित वनिं लोटी दुःख त्यां भोगवाया।
दिनकरकुलवृक्षा जाहली जी कुन्हाड। कुमति सकलविश्वा देतसे दुःख-जोड!”
हृदयिं बहु निषादा वाटला हा विषाद। बघुनि अवनिशायी रामसीता सखेद
मृदु मधुर वचाहीं लक्ष्मणें बोलिलेलें। जयिं मधुरस भक्तिज्ञान वैराग्य ठेलें॥
“नच कुणि सुखदाता,ना कुणी दुःखदाता। सकलहि निजकर्में भोगवीतात ताता!
जगतिं भोग अनंत भले बुरे। मिळति योगवियोगहि जे खरे॥
मिळति आत्महिताहित मध्यम। हृदयिं जाण सख्या! सकल भ्रम! ३६
संसारींचें सर्व हें कूटजाल। कर्में, जन्में, मृत्यु, तैसाचि काल॥
भूमी, धामें, द्रव्य, आप्तादि लोक। स्वर्गास्वर्ग, आव्यइत्याद्यनेक ३७
जें जें स्मरें शेत संपद् विपत्ति। दरवार्थानें मोहमाया असे ती॥
नोहे नेंगे मोक्षसंपर्क साच। अज्ञानाचा भ्रांतिचा सर्व नाच!॥ ३८॥
स्वप्नांत कोणी नृप हो भिकारी। भिकारि वा इंद्रपदाधिकारी॥
जागेपणीं त्या नच लाभहानि। प्रपंच हा त्यापरि सर्व मानीं॥ ३९॥
ऐशा विचारें नच रोष पावणें। न निंदणें वा वदणें कुणा उणें॥
हें मोहनिद्रेमधि विश्व घोरतें। स्वप्नांतले त्या सगळे प्रकार ते॥ ४०॥
जगन्निशामाजि सदैव जागती। योगीच ते ज्यां परमार्थ-सन्मति॥
विरक्ति ज्यांच्या हृदयात नांदते। ते मात्र जागे जगतात जागते!॥४१॥
न ज्यांस कोठें विषयादि मोहती। विवेकयोगें भ्रम राहिना मती॥
तेव्हाच होई रति राघवाकडे। न मोह त्यांचें करतील वाकडें॥ ४२॥
सख्या गुहा! तू परमार्थ जाण हा। सर्वस्व रामीं तनुवाड्मनें वहा॥

श्रीराम सद्ब्रह्म अनादि नांदत । अलक्ष्य अज्ञेय अमेय शाश्वत ॥ ४३ ॥
अभेद तैसे अविकार सार तें । ज्या ' नेति नेति ' स्तुति नित्य वानिते ॥
त्या रामपादांबुजिं चित्त ठेवणें । तूं हेंचि मानीं परमार्थ पावणें ॥ ४४ ॥
भक्त, भूमि, अमर, द्विज, धेनू । यांचियास्तवचि ये जगिं विष्णु ॥
घेउनी नरतनू करि लीला । ऐकतां तुरविती भवजाला ! ॥ ४५ ॥
॥ इति श्रीराम० निषादमोहलक्ष्मणोपदेशवर्णनं नामैकादशस्तरङ्गः ॥

## तरंग १२ वा

जाणोनि हें हृदयिंचा त्यज मोह सारा । सीतारघूत्तमपदांबुजिं घेइं थारा " ॥
त्यां हो रघूत्तमगुण स्तविता प्रभात । तैं विश्वमंगलनिभूमहि जाग येत ॥ १ ॥
स्नानादि सारोनि विशुद्ध राघव । घेई वटक्षीर विचारुनी नव ॥
तेणें स्वबंधूसह मस्तकीं जटा । विनिर्मियेल्या अतिचारु उत्कटा ! ॥ २ ॥
तें देखतां होइ सुमंत दुःखित । शोकें जळे, म्लानमुखाब्ज शोचत ॥
जोडोनि हा अंजलि राघवा वदे । " हे नाथ ! ऐका नृप जो निदेश दे ३
नृपोक्त कीं, " ने रथ रामसंगतों दावीं वना, दाखविं जाह्नवीहि ती ! ।
नाहाउनी त्यां झणिं आण मागुतीं । करोनियां संशय दूर तन्मतीं ॥ ४ ॥
तूं आण सीतारघुनाथलक्ष्मणा" ।म्यां हे नृपाज्ञा कथियेलि आपणां ॥
प्रमाण आज्ञा तुमचीच यापरी । बोलें मला ती करणेंचि सत्वरी " ॥ ५ ॥
प्रार्थोनि हें करित रामपदीं प्रणामा । आक्रोश तोकपरि तो करि ज्या न सीमा
बोले "प्रभो ! सकृप होउनि नें कराहो।मोकेन जेविं न अनाथ सशोक तें हो !"
उठवुनि सचिवातें रामराया प्रबोधी । " सकलहि तुम्हि धर्मा जाणतां तात! आधीं
शिबिनृपति, दधीचि, श्रीहरिश्चन्द्रराय । जपुनिच निजधर्मा क्लेशनीति स्वकाय ॥
गुणखनि बलिराजा रंतिदेवादिकांनीं । अति कठिनहि कष्टीं केलि ना धर्महानि
विदित सकल तुम्हां तीं पवित्रे चरित्रें । स्मरुनि भरिं पहावीं अंतरीं चित्तनेत्रें ८
नाहींच सत्यसम अन्य उदात्त धर्म । वेदीं पुराणिं कथिती मुनि हेंचि वर्म ॥
तो थोर धर्म मजला सहजीं मिळोनी । त्या टाकितां अपयशा चुकवूं कुठोनी ? ९
संभावितास बर का अपकीर्ति येई । तें कोटिमृत्यपरि दुःसह त्यास होई ॥
मी आरणीं अधिक, काय वदेन ताता ! मी बोलतां अधिक, दोष घडेल आतां ॥
आर्या पितापदिं धरुन विनम्रभावें । कोटिप्रणाम मम साञ्जलि हे वदावें ॥

"ताता ! नका करुं मुळींच मदीय चिंता ।" आहां तुम्हीहि पितृतुल्य मला सुमंता!
ही प्रार्थना मम तुम्हांसहि बद्धपाणि । तें आचरा तुम्हिहि सतत सर्वयत्नीं ॥
जेणेंकरून पितया मम दुःख ना हो।ह्या आमुचा विरह अंतरिं त्यास साहो !"१२
संवाद रामसचिवांमधि चाललेला । ऐकोनि दुःखित गुहादि समूह झाला ॥
तेव्हां वदे कटुक लक्ष्मण कांहिं वाणी । ती ना बरी म्हणुनि थांबविला प्रभूनीं!
संकोचुनि रघुपती शपथें सुमंता । सांगे "नका वदुं तसें अनुजोक्त ताता !"
तेव्हा सुमंतहि निवेदि पुन्हां नृपोक्ति । "सीते अरण्यवसती सहणार का ती !
जेणें फिरोनि नगरा परतेल सीता । ते राधवा ! तुम्हिच येथ करा जि ! नाथा
मी, ना तरी, निरवलंब असा सुदीन । वांचेन नैव जणुं मीन जलाविहीन ! १५
माहेरिं सासरिं तुला सगळीं सुखेचि । जेथें रुचेल तुज राहिं मुली ! तिथेंचि ॥
होई विपत्तिलय तोंवरि याप्रकारें । सांगीतलें नृपवरें हृदयार्तिपूरें ॥ १६ ॥
ती आर्ति, तो कळवळा नच वानितां ये । लावीण हीं कथित मी वचनें तदीयें!"
ऐकोनि तो नृपनिदेश, कृपानिवास । श्रीरामही कथि कितीपरि जानकीस ॥१७॥
"श्वश्रूजन श्वशुर, आप्त गुरु स्वकीय । सान्यांहि दुःखलय होइल, वेळ कायी॥
सावें जि तूं परत माग !" असें वदोनी । सीतेसि सांगि, परि ती वदली स्ववाणी
"प्राणेश्वरा ! परमवल्लभ ! आयका कीं । आहात तुम्ह करुणायुत सद्विवेकी ॥
कैसी प्रभे ! तनुविना जगिं सावली हो ! कैसी प्रभा त्यजुनियां रविलागिं, राहो !
टाकोनियां शशिस जाइल चंद्रिका का ?" प्रेमें पतीस विनवी अशि निष्कलंका
बोलेहि सौम्यवचनीं सचिवा सुमता । "आहात हो ! श्वशुर, तातचि मद्धितार्था
देईन उत्तर तुम्हां तर योग्य कैसें ? । आपत्ति थोर म्हणुनीच वदें विशेषें ॥
तेणें विषाद न धरा; कथतें खरें तें । मी ना पतीविण गर्णी कशलेंच नातें !२१
मी तातवैभवविलास अनन्त पाहीं । भूपालरत्नमुकुटीं पदपीठ न्हाई ॥
ऐसें मदीय पितृसद्म सुखैकसार । मी तें पतीविण मनावहि नाणणार ! ॥२२॥
माझे तसे श्वशुर जे नृपचक्रवर्ती । विश्वांतरीं प्रथित कोसलरायमूर्ति ॥
ज्यातें सुरेन्द्र निज आसन देइ मानें । सांकेतवासिजनतारति मीच जाणें ! २३
मातेसमान ममता मज द्यारिं ज्यांची । त्या सासवांहि जपती सदया मलाचि ॥
हें सर्व सत्य, परि रामपदांबुजाचे- । वांचून जीवनिं मला सुख होय कैचें ? २४
वाघ सुदुर्गम, वनें गिरिकंदरें तीं । तेवा अपार सरिता, तळि, सिंह, हत्ती ॥
कोठी किरात मृगरक्षि सखे मला हे । देतील सौख्य, जर मी पतिसंग लाहें!२५

श्वशुरजनां मम तसें श्वशुरां नमोनी । माझी करा विदित त्यांसि विनम्र वाणी ।।
माझी नकाच करुं काळजि अल्पही ती । आहें सुखीच पतिसंगतिं मी वनांतीं
भावोजि तेविं मम वल्लभ जीवनाथ । वीराग्रणी शरनिषंगधनुष्यहस्त ।।
मत्संगतीस असतां भ्रम खेद चिंता । स्पर्शेल ना मजसि, काळजि का वहातां?''
परिसुनि मृदुला ती मैथिलीवाक्यमाला । अतिशयचि सुमंता शोक चित्तांत झाला।।
मणिविण अहि तैसा होत तो दीनवाणी । नयनिं न बघवे त्या ऐकवेनाहि कानीं
वचन मुळिं निघेना व्याकुळा त्या सुमंता। करि रघुवर वाक्यीं त्याचिया बोध चित्ता
तरिहि न हृदयींचा राहिला दाह त्याचा । बहुपरिं करि यत्ना रामसगार्थ साचा
परि उचित वचांनीं राम तद्वाक्य खोडी । सचिवहि मनिं जाणे कर्म कोणा न सोडी
नमुनि रघुपतीतें लक्ष्मणा-जानकीतें । निघत परत याया कीं वणिक् शून्य-चित्तें।
तैं हाकिता रथ बघोनि रघूत्तमातें । खिंकाळती हय किती अति आर्त चित्तें ।।
जैं पाहुनी बहुविषाद निषादलोकीं । होऊनि दुःखित शिरा बडवीति ते कीं ।
'ज्याच्या वियोगिं पशुचित्तिंहि आर्ति ऐशी।त्याची प्रजा,जनक,माय,जगेल कैशी'
हृद्गेंचि राम पुरिं पाठवि तैं सुमंता गंगातटाकिं रघुवीरहि होय येता ।। ३१ ।।
तो नाव मागवि परी गुह आणि ना ती । "आलें कळोन तुमचें मज वर्म हातीं
हें बोलती रघुपते! तुमच्या पदाब्जीं । आहे रजात किलि, मानुषकारिणी जी ३३
तें स्पर्शतां रज शिला बनली सुनारी। हें काष्ठ तों मृदु शिळेहुनि हीन भारी ।।
नौका मदीय जर हो गृहिणी मुनीची । मातें उरेल न तरी उपजीविकाचि ।।
ही नाव पोषि परिवार मदीय सारा । उद्योग ना हिजविना मजला बिचारा
जाणें असेल जर का प्रभुजी! पल्याड । धावें पदाबुज धुण्या, मग ये न आड!

घुइन पदाब्जें तरी बैसिंजे नाथ ! नको मज आतर तें ।।
अपुल्या शपथीं खरेंचि मी कथि, दशरथ नृपति स्मरुनि मतें ।।
मारो लक्ष्मण मज शरिं विंधुन परि मी, जंवर न चरण धुइं ।।
तंवर न, तुम्हसी म्हणत, नाथ हो! उतरुन तुम्हां पथि नेइं !!" ३६

ती ऐकोनी स्निग्धभक्ती गुहोक्ती । त्याही गोडी अद्वितीयाच कीं ती!
पाहोनीयां जानकीलक्ष्मणांतें । कारुण्याब्धी हासला राम चित्तें ।। ३७ ।।
बोले सुहास विभु त्या समयीं गुहास । "राहील नाव तव तेंचि करीं प्रयास।
वेगेंचि आण जल आणिक धू पदा या।आम्हां उशीर नच हो परतीरिं जाया!"
यन्नामहि स्मरुनियां हृदिं एकवार । जावें तरून भवसिंधुहि हा अपार ।।

केलें जंव जग जिंहें स्वपदप्रपाताते कौतुकें नुकविता गुहकाचि होता ॥३९॥
पदनख निरखोनी हर्षली चित्ति गंगा। प्रभुचच परिसोनी पावली मोहभंगा।
गुहहि रघुवराचा आयकोनी निदेश। जल भरुनि कठोरा आणि, मावे न तोष!
अतिशय अनुरागें तो धुवायासि लागे। रघुवरपदकंजे भारल्या अंतरंगें ॥
सुरवरि सुमवृष्टी त्या प्रसंगीनि केली। "जगति अतुल पुण्यें कीं गुहाचीच झाली।"
प्रभुपदकमलातें तो धुई घेइ तीर्थ। सहित 'निजजनांच्या होउनीयां कृतार्थ॥
गुह करि पितरातें आपुल्या पार आधीं। प्रभुहि मग उतारी पार, कल्याण साधी॥
❀ इतिश्रीराम० श्रीअयोध्याकाण्डे श्रीरामकृपानिषादानुरागवर्णनं नाम

द्वादशस्तरङ्गः ❀

## तरंग १३ वा

गंगा उतारुनि उभे प्रभु वाळवंटीं। सीतेसमेत गुहलक्ष्मण त्याजपाठीं॥
नावाडि रामपदिं दंडवतें नमीत। संकोचि राम न दिलें लव यास वित्त!१
सीता क्षणीं दयितहृद्गत जाणणारी। रत्नांगुलीय निज काढित हृष्ट भारी॥
लागे कृपाळु रघुवीर गुहास द्याया। तो राघवा पडत आकुलचित्त पायां! २
हे नाथ! आज मज काय न लब्ध लोकीं? गेलीं लयासि अघ,दुःख, दरिद्रिता कीं!
म्या आचरीत बहुकाल मदीय काम। दैवें दिलें फळ मला अजि पुण्यधाम!
तें नकोच लवही उतराइ आर्जी। राहो दया मजवरी हितमर्यदा जी!॥
हो! जेधवा परत याल तुम्हीच देवा!। तें याल तो मज कृपाकर थोर ठेवा"
सांगीतलें जरिहि लक्ष्मणजानकींनीं। अत्याग्रहें, तरि न घे गुह त्यांकडोनी॥
तेंव्हां दयानिधि तया वर देइ राम। जेणें विशुद्ध हृदयीं करि भक्तिधाम ५
मग निरोप गुहाप्रति देउन। करिति गाग जलामधि मज्जन॥
रघुवरादिक सर्वहि पावन। करित राघव पार्थिवपूजन॥ ६॥
जोडोनि अंजलि वदे विनयें सभक्ति। भागीरथीप्रति वचें जनकात्मजा ती॥
प्रार्थी, " मनोरथ करीं मम पूर्ण माते!। कल्याण तू कर पतिप्रति देवरातें७
येता अम्ही परतुनी सुखरूप गेहीं। पूजा करीन तव मी शुभगमवाहीं "॥
तें जानकीवचन ऐकुनि भक्तिपूर्ण। ये वाङ् मनोहर गभीर जलामधून! ८
"वैदेहि! रामदयिते! मम ऐक वाणी। जाणे प्रभाव तव कोण न लोकिं तीनी!
होतात लोकपतिही तव दृष्टिपातें। येतात सिद्धि सकला तव सेवकांतें॥९॥

तूं लीनता धरुनि जे विनवीसि मातें । मी मानितें मजवरील कृपाच कीं तें
आशीर्वचें परि तुला वदुनी करीन । वाद्विवतेस मम मी मुफलादय पूर्ण ! ॥११॥
तूं प्राणनाथयुत देवरयुक्त ऐशी । साकेति येशिल पुन्हा कुशल ग्रहासी ॥
जातील सर्व तव मानस सिद्धिला गे ! । त्रैलोक्य सदरा तुझें घवळील चांगें!"
गंगोक्त तें सकलमंगलमूल सान । सीतामना गमत हर्षकरी कृपाच ॥
तेव्हा गुहा प्रभु वदे "स्वगृहासि जा गा!"। ऐकोनि तें मुख सुके, मनि दाह जागा
जोडोनि अंजलि वदे गुह दीनवाणी। "ऐका प्रभो ! रघुवरा ! मम लीन वाणी
हे नाथ ! राहुनि सवें पथ दाखवीन । सेवीन चार दिन मी चरणाब्ज दीन
जेथें रिघाल रघुनाथ ! वनांत तेथें । देईन सुंदरकुटी रचुनी स्वहस्तें ॥
सांगाल तेच जगदीश ! करीन सारें । मी आपुल्या शपथ देत पदाब्जसारें "
देखोनि भाव सरळया गुहमानसाचे । त्या घेत संगति, गुहातरि मोद सांचे ॥
तैं घेतसे निजजनां गुह बोलवून । सर्वां दिलें रघुवरें मग बोळवून ॥१५॥
तदा गणाधीश महेश्वरांप्रति । स्मरोनि वंदोनि सुरापगादि ती ॥
वनीं रिघे राघव घेउनी सह । श्रीजानकी, लक्ष्मण, मित्रही गुह ॥१६॥
तो काढला दिवस वृक्षतळींच त्यांनीं । आराम देति गुहलक्ष्मण त्या करोनी ॥
होता प्रभात सगळे शुचि होउनीया । ते तीर्थराजमुपमा निघती बघाया १७
ज्या राजया सचिव सत्य विशुद्ध होय । श्रद्धाख्य ज्यास महिषी अभिनंदनीय
ज्याचा सखा अतुल माधव भव्यकारी । भांडार ज्या अमित ते पुरुषार्थ चारी १८
पुण्यप्रदेश अवघा अधिराज्य ज्याचें । ठाणें अगम्य गड गाद सुरम्य सत्वें ॥
स्वप्नींहि शत्रु न च ज्या कधि जिंकणारे । तीर्थें जया प्रबल सैनिक वीर सारे १९
जे नाशितात अघसैन्यसमूह मोठे । सिंहासनोत्तमचि संगम ज्यास, वाटे ॥
ज्या छत्र अक्षय वटें जणु निर्मिंयेलें । जेणें मनास मुनिच्याहि विमोहियेलें! २१
जे गांग यामुन तरंग शुभाग चौऱ्या । दारिद्र्य दुःख वधतां शमि भंगणाऱ्या
सेवूनि ज्यासि सुकृती शुचि साधु भक्त । साधूनि घेति निज काम समग्र पूत
बंदी जया स्तविति वेदपुराणसंघ । गाऊन पावन मनोहर यद्गुणौघ ॥
शक्य प्रयाग-गुणगान यथार्थ कोणा ? । जो तीर्थराज अघकुंजरसिंहराणा !२२
ऐसा बघोनि अति सुंदर तीर्थराय । होई सुखाब्धि रघुनायक हृष्टकाय ॥
तें तीर्थराजगुण वर्णुनि सांगि राम । सीतेसि लक्ष्मणगुहासि मनोऽभिराम
आराम सुंदर वनें बघुनी सभोंतीं । त्यांतें करी प्रणति राघव भक्तिमूर्ति ॥२३॥

ऐशा प्रकारें पथि येत रघूत्तमांनीं । ती पाहिली स्मृतहि मंगलदा त्रिवेणी ।२४
सानद तेथ शुभ मज्जन तीर्थि केलें । तीर्थादिदेव, गिरिशादिक पूजियेले ॥
ऐसें यथाविधि समर्चुनि तीर्थराजा । संतुष्ट होय रघुनायक तो महौजा ! २५

आले भरद्वाजमुनीकडे पुढें । श्रीराम साष्टांग पदीं तया पडे ॥
आलिंगिला राम ऋषीश्वरें उरीं । मरोनि गेला मुनि हर्षनिर्भरीं ॥ २६ ॥
ब्रह्मानन्दें पूर्णशी काय रास । वाटे त्यातें लाभली आपगास ॥
मूर्तीभूतें कीं तयाचीं फलेंच । धाता दावी लोचनां आज साच ! ॥२७॥
आशीर्वादां देइ रामा मुनीश । पावोनीयां अंतरीं थोर हर्ष ॥
क्षेमप्रश्नां त्या पुसे आसना दे । पूजूनी त्या तो भरे प्रीतिमोदें ॥ २८ ॥
कंदमूल फल, अंकुर साच । त्यांस जे गमति गोड सुधाच ॥
राम-लक्ष्मण-गुहांसह सीता । सर्व आवडुनि खाति, न चिंता ॥ २९ ॥
*खेद जाय, सुखित प्रभुराय । तें वदे मुनि वचें मृदु काय—* ॥
" त्याग, तीर्थ, तप आज फळालें ! । आज सकल विरक्तिस आलें ! ३०
*योग मंत्र जर सिद्धि मिळाली ! । साधनें शुभकरें अजि झालीं ॥*
राम ! लोचनिं तुम्हा बघताहें । लाभ सत्तम सुलोत्तम लाहें ! ॥ ३१ ॥
दर्शने पुरविल्या सकलाशा । हेतु एक पुरवा मम ऐसा ॥
या कृपा करुनि हें वरदान । त्वत्पदीं सहज हो मन लीन ! ॥ ३२ ॥
कर्म वाङ्मन अकृत्रिम भावें । जोंवरी स्थिर तुम्हांत न व्हावें ॥
स्वर्श्रिरी कुडुनि तोंवरि हर्ष । यत्न अन्य करुनीहि कुणास ? "

परिसुनि मुनिवाक्यें राम सकोच पावे । अतिशय मनिं धाला भक्तिभावें प्रभावें
सुयश मुनिवरांचें राघवें वानियेलें । श्रवण करुनि सारे अंतरीं तुष्ट झाले ३४
सकल गुणगणांचें सद्म तो श्रेष्ठ एक ।लवुनि मुनिवरानीं गौरवीला सुरेख ॥
रघुवर मुनि ऐसें वदिती एकमेकां । अनुपम सुखसारा सेविती निष्कलंका !
विदित सकळि होता, जे प्रयागाधिवासी । बटु, मुनि, तपणारे, सिद्ध तैसे उदासी
त्वरित मुनिवराच्या आश्रमामाजिं येती । दशरथतनयाच्या पाहण्या रम्यमूर्ती
सविनय करि सार्‍यां राम त्यांना प्रणाम । प्रमुदित नयनांना लाभले सौख्यधाम
परम सुखि तयांना देति आशीर्वचें ते । परत फिरति त्याच्या वानुनी रम्यतेतें
निवसुनि मग तेथें रात्र सारी सुखांत । सकळ शुभ सकाळीं ते प्रयागीं नहात

करुनि नमन राम श्रीभरद्वाजपायां । निघति सगुहसीता लक्ष्मणा घेउनीयां
इति श्रीराम० श्रीअयोध्या० श्रीरामस्य तीर्थराजप्राप्तिभरद्वाजमीलन–
वर्णन नाम त्रयोदशस्तरङ्गः

## तरंग १४ वा

सप्रेम राम वदती मुनितें "अह्मांस । सांगा सुयोग्य पथ यापुढतीं मुनीश!"॥
हांसोनि अंतरिं मुनी वदले प्रभूतें।"सोपेच मार्ग सुगम प्रभुजी! तुह्मां ते!"॥१॥
बोलावि शिष्य अपुले मुनि सोबतीस । येती तिथें मुदित ते क्षणि वीस तीस!
प्रीती रघूत्तमि तया सगळ्यां अपारा। सारेचि सांगति 'अह्मी पथ दाउं सारा!'
त्यांतूनि चार चतु देइ सवें मुनीश । ज्यां पूर्वजन्मकृत संचित पुण्य रास॥॥
वंदोनि देत मुनिवर्य निरोप त्यांना । आनंदला निघत तैं रघुवंशराणा ॥३॥
ते ग्रामखत्रिथ पथें जर जाति केव्हां । देखावया सकल धांवत येति तेव्हां ॥
नारीनरां गमत जन्मफलें मिळालीं । येतीं सुदुःखित; मंन सह पाठवीलीं!! ४
देती निरोप मग ते विनयें वटूंतें । तैं पूर्णकाम निज आश्रमि होति जाते ॥
श्रीराम मज्जन करी मग नीलरंगीं । सुश्याम आत्मसम त्या यमुनातरंगीं ५
तैं ऐकतां त्यजुनि कार्य, तटाधिवासी । सारे स्त्रिया पुरुष धांवति दर्शनासी॥
सौंदर्य लक्ष्मणरघूत्तम-जानकीचें । पाहोनि भाग्य निज मानिति धन्यवाचें ६
विख्यात लालस जरी सगळेच होते । त्या नाव गाव पुसण्या मनिं लाजती ते
जे त्यांत वृद्ध जन मुग्ध असे विशेष । ते युक्तिनें हमगती वरि राघवास! ७
सारी कथा कथिति तैं मग सर्व लोकां ।आले वनीं सकल तातनिदेशि है कां
तैं ऐकतां सकलचित्ति विषाद होय । 'राणी भले करि न, वा नच भूपराय
मातापिता वरि म्हणूं कसले अमांना। जे बालकांस असल्या दवडीति रानां!
तैं रूप लक्ष्मण रघूत्तम मैथिलीचें पाहोनि लोकहृदिं शोक भरे असह्य ॥ ९ ॥
बहुपरिं मग बोधुनी गुहातें । रघुवर त्यास निरोप दे किती तें ? ॥
फिरि घरुनि निदेश तो तदीय । निजभवना परते निषदराय ॥ १० ॥
इति श्रीराम० श्रीअयोध्या० तपस्विमीलन–निषादनिर्गमनवर्णनं
नाम चतुर्दशस्तरङ्गः ॥

## तरंग १५ वा

मग लक्ष्मणरामजानकीनीं । यमुना सादर वाकिलें नमूनी ॥

अति हर्षित दोहि बंधु होती । सहसीतें रविकन्यकेसी गाती ॥ १ ॥
तदा मार्गी जाता पथिकगण त्यां कैक मिळती ।
बघोनी हे बंधुद्वय कळवळा ये तयिं किती ! ॥
"अहो ! तुम्हा अंगीं दिसति नृपचिन्हें" म्हणति ते।
अशा तुझां, ऐसें वघुनि हृदयीं आर्ति खणते ! ॥ २ ॥
तुम्ही पायानीं हे अवनि अनवाणीच गमता ।
गमे आलें खोटेपण खचित कीं ज्योतिषमतां ॥
अगम्या त्या वाया विकट विपिनीं अद्रिकुहरीं ।
असे त्यांतूनी ही सुतनु सुकुमारी सहचरी ! ! ॥ ३ ॥
जिथें हत्ती, सिंह, प्रमुख वन तें कोवें बघवे ! ।
वना देखायाही नयनिं हृदयीं धैर्यचि हवें ! ॥
तुम्हां संगें येऊं जर कथितसां आह्मि सकळ; ।
जिथें जातां तुह्मी तिथवर तरी राहुं जवळ ! ॥ ४ ॥
नको होतां आह्मी परत फिरूं तुह्मास नमुनी ! " ।
असें आर्द्रे चित्तें किति कथियलें त्याप्रति जनीं ॥
जयां अश्रू नेत्रीं, पुलक तनुगात्रीं, गहिंवर ।
अशां सान्यां मागे फिरवि विनयोक्तीं रघुवर ॥ ५ ॥
पुरें, ग्रामें मार्गी प्रभुवर जिथें कांहि नवती ।
तया वाखाणीती अहि-सुर-पुरें शंसुनि किती ! ॥
कुणी पुण्यात्म्यांनीं वसविल अशीं ग्रामनगरें ।
किती पुण्ये त्यांचीं, रघुकुलमणी जेथ विचरे !! ॥ ६ ॥
रघुवरपदें जेथें जेथें महीवर चालतीं ।
गुणगणि तया स्थानांदेशी न हो अमरावती ॥
निकट वसते त्या मार्गाच्या सुपुण्यगिरीच कीं ।
जिहिं निरखिलें मेघश्यामा सलक्ष्मणजानकी ॥ ७ ॥

सुरनगनिवासी वानिती भाग्य त्यांचें । नयनकमलिं ज्यांच्या राघवी मूर्ति सांचे करि सरि सरितीं ज्या स्नान तो मेघनीळ।सुरसर, तरि गंगा कां न त्यां वानितील तरुतलिं बसती ज्या राम त्या पादपाला।स्तविति अमरशाली थोर त्यांच्या तपाल्या रघुवरपदपंक्ष लागतां अंगिं धूरी । अतिशय निजभाग्या वानुनी भूमि धाली !

गिरि, वन, मृगपक्षी मार्गि पाहात जातां । घन करि गगनीं त्यां सांवली शांत सीता
'जय जय ! रघुराया ! रामराया !!' ह्मणोनी । कीरति अमर वृष्टी कल्पवृक्षप्रसूनीं!
सीतारघूत्तम सलक्ष्मण आज येत । ग्रामाचिया निकट हें कळतां समस्त ॥
आबालवृद्ध जनता नर आणि नारी । कामें समग्र विसरूनचि येति सारी ! ॥
आलोचता अतुल सुंदर रूप त्यांचें । सौख्यें गमे नयनसार्थक होय साचें ॥
ये नीर लोचनिं, तनूवरि रोमहर्ष, । तें वीरयुग्म करि तन्मय तन्मनांस ॥१२॥
त्यांची मनःस्थिति कुणांहि न वर्णु यावी । दीना कुबेरधनिता जणुं लब्ध व्हावी!
एकास एक कथिती सुखवूनि 'प्या हो !। या सुष्णींच नयनां निजसौख्यलाहो'!
रामास कोणि बघुनी अनुरागभावें । संगें तयासहचि मागुनि चालु जावें ॥
कोणी स्वनेत्रपथिं तच्छवि वाढी आणी । होवोनियां शिथिल तें तनुआळनानीं !
कोणी नमोनि वदसांवलि दाट ऐसी । शय्या रचीति तृणपल्लविं चारु त्यांसी ॥
त्यां प्रार्थिती ' परिहरोनि निजश्रमातें । राहोनि येथ निघणें मग, वा प्रभातें '
आणोनि देति कलशें जल त्यांस कोणी । 'घ्यावें जि ! आचमन' हें विनयें कथोनी
तत्प्रेमभक्तिमय ऐकुनि तें प्रियोक्त । कारुण्यसिंधु रघुनायक आर्द्र होत ॥१६॥
आणोनि चिंति ' दमली अतिमात्र सीता' । छायेंत थांबत रघूत्तम सौख्य देता
नारीनरा हृदयिं हो परमप्रमोद । त्याचीं मनें स्वनयनें प्रभुरूपिं लुब्ध ॥१७॥
श्रीरामचंद्रमुखमा उपमानशून्या । पाहाति लोक निज लोचनिं जी अनन्या ॥
तें वाटलें जणुं चकोर मिळोनि भोंतीं । श्रीरामचंद्रमुखचंद्रविमा पहाती ! ॥१८॥
श्रीरामचंद्रतनुवर्ण तमालसार । सौंदर्य कोटिमदनांसहि मोहणार ॥
सौदामिनीद्युति अनुत्तम लक्ष्मणाभा । आपादमस्तक, विनिर्मि जिवास लोभा ॥
ती वल्कलावृततनू, कटिंतें निषंग । केला धनुष्यशर चारु करान्तसंग ॥
माथां जटामुकुट उत्तम बाहु वक्ष । शोभे सुरम्यसुषमा सरसीरुहाक्ष ॥ २० ॥
हो पौर्णिमेंदुवदनच्छवि शारदोंची । त्या घर्मबिंदु वरि निर्मिति चारुतांचि ॥
तें युग्म सुंदर यथार्थ न वर्णु येत । शोभा अनन्त, परि धी मम अल्प होत !
सीतारघूत्तमसलक्ष्मणचारुता ती । योजुनि चित्त, मन, बुद्धि जरी पहाती ॥
नारीनर प्रबल भक्तिभरें रमोनी । जाती थकोनि हरिणीमृग कीं दिपोनी ! ॥२२॥
ग्रामस्त्रिया मुकुतुकादरयुक्त येती । सीतेसमीप परि त्या पुसुं लाजताती ॥
पायां तिच्या पडति आदर भक्तिभावें । तीतें विचारिति मृदू कहु सुस्वभावें ॥
"आम्ही वुला नृपकुमारि ! विचारुं कांहीं । लज्जा परी पुसुं न दे सहसा पहा ही

धाडवे क्षमा कर अम्हां परि देवि! आज। आहोंत खेडवळ अज्ञ असा समाज!
हे राजपुत्र युग सुंदर जन्मजात। यांची छवी मरकता, कनकासि जात! ॥
हे श्याम, गौर, तनु कोर सुरम्यतेचे। वक्त्रेन्दुतेज जणुं शारदपौर्णिमेचें!॥
त्यांची विलोचनविभा शरदंबुजांची। कीं कामकोटिसहि लाजविणार हेचि!॥
आहेत कोण तव हे वद गे! अम्हाला" ऐशा विचारिति विनीत तियेसि माला॥
ती प्रीतिमंजुल वचें परिसोनि सीता। संकोचुनी मनिं, करि स्मित तुष्टचित्ता॥
पाहोनि त्यांसि फिरुनी अवनी विलोकी। संकोच दोहिं परि तीव्र विशेष येली
सप्रेम सीता मृगशावलोचना। सलज्ज बोले मधुकोकिलस्वना॥
"ते गौरकाती मधुर स्वभावतां। हो धाकटे देवर लक्ष्मण स्वतां!" ॥२८॥
वस्त्रांचलें आननचद्र झाकुनी। प्रियाकडे पाहत वक्रलोचनीं॥
वक्रभ्रु ती खंजनमंजु सूचवी। 'स्वकांत हे' त्यां निज नेत्रपल्लवीं!॥२९॥
ग्रामस्त्रिया सर्वहि हर्षल्या तदा। कीं लूटिल्या रंकिं नृपालसंपदा!॥
सीतापदां वंदित भक्तिनें किती। आशी दिल्या त्याहिं अशा तयांप्रती॥३०॥
"सौभाग्यिनी तूं वस येथ संतत। शेषावरि जोंवरि भूमि वर्तत!॥
तूं पार्वतीच्या सम हो पतिप्रिया। अम्हांवरी देवि! करा सदा दया" ॥३१॥
पुनः पुन्हां त्या विनवीति सांजलि। "येतां तुम्हां ही जर वाट लागली॥
दावींचि या द्या निज पुण्य दर्शन"। सीता गणी त्याप्रति भक्तिभाजन॥
बोलेनि त्यातें मधुवाक्यिं तोषवी। ज्योत्स्ना जणों ती कुमुदांसि पोषवी॥
तों रामचित्ता समजूनि लक्ष्मण। लोकां पुसे तो पथ मंजुभाषण॥३३॥
ऐकोनि नारीनर आर्त होउनी। रोमांचती, अश्रु भरे विलोचनीं॥
आनंद लोपे भरि खिन्नता मनीं। "देऊनि धाता निधि घेत काढुनी!॥३४॥
जाणोनि कर्मगति, धैर्य हृदीं धरूनी। शोधूनि वाट सुगमा कथिली तयांनीं
तेव्हां निरोप दिधला मग त्या जनांना। बोलून त्यां खुबरें मधुरोक्ति नाना
जाती रघूत्तम सलक्ष्मणजानकी ते। घेऊनि संगिं अपुल्या प्रिय लोकचित्त
माघारिं तें रिघति, निंदिति दैवजात। नारीनर व्यथित फारचि अंतरांत ३६
ते एकमेक कथिती अति दुःखि ऐसें। "धाता करीत विपरीतचि सर्व कैसें?
निःशंक, निष्ठुर, निरंकुश हा विधाता। केला सरोग, सकलंक शशी पहातां
कल्पद्रुमा करित वृक्ष, समुद्र खारा। तो पाठवीत वनिं भूपतिच्या कुमारां!
धाता अशांस जर का वनवास देतो। वायां करीत जगिं भोगविलास कीं तो!

जातात मार्गि जर हे अनवाणि ऐसे । याने अनेक विधि निर्मि उगाचि भासे ।
ह्यांचें महीशयनही तृणपर्णि हो या । धाता सृजीत तरि कां मृदु रम्य शय्या ? । ३९
धाता तयां तरुतळीं वसती अशी दे । कां हा रची स्फटिकधाम उगाच खेदें ?
हो कंद मूल फळ हें जर यांस खाद्य । विश्रांत निर्मि विधि कां अशनें नुखाद्य ?
हे वल्कलें जर निषेविति चारुगात्र । होवोनियां जटिल, यापरि राजपुत्र ॥
यांटे, अनेकविध वस्त्रविभूषणादि । यावांचि निर्मुनि जगीं विधि काय साधी?"
कोणी असें वदति, "हे सहजीं सुकांत । झाले स्वयें प्रकट, यां न विधी सृजीत
रुक्युक्त सृष्टि विधिनिर्मित होय लोकीं । नेत्र रुसती, मन अशांस सुगम्य हो कीं ४२
देखा चतुर्दश जरी भुवनेंहि सारीं । ऐसे कुठें नर कुठें अशि होय नारी ?
पाहूनि यांस, विधि तन्मय होय चित्तीं । ऐशाच तो घडवुं पाहि सुरम्यमूर्ति
केले बहु श्रम परी घडवूं शकेना । ईर्ष्येमुळें विपिनिं नें; दडवीत यांना ! । "
कोणी असें म्हणति " आम्हि विशेष नेणूं । आम्ही परी परमधन्य अम्हांस मानूं । ४४
ते पुण्यपुंज समजूं अम्हि मात्र चित्तीं । यां पाहिलें जिहिं, पहातिल जे पहाती"
ऐशा प्रियोक्ति वदतां वदतां अनेक । नेत्रें तदीय करिती किति अश्रुसेक ! ४५
उद्गारिती "कठिण मार्ग किती अगम्य ! यांच्या तनू तर किती सुकुमाररम्य ?"
प्रेमामुळें विकल होति समस्त नारी । कीं चक्रवाकललना निशि आर्त भारी ! ४६
इति श्रीराम० अयोध्या. ग्रामनिवासिनीप्रेमलक्षणाभक्तिवर्णनं नाम पञ्चदशस्तरङ्गः

## तरंग १६ वा

चिंतूनि चित्तिं मृदुसत्तम पादकंजें । रानांतले कठिण मार्ग अगम्य कीं जे ॥
त्यांचीं डरें गहिंवरें भरुनी वियोगें । त्या बोलती कळवळोनि निजांतरंगें ॥१॥
" हीं स्पर्शितीं मृदुमृदू चरणोत्पलांहीं । संकोचते क्षिति, डरें जशि आमुचीं हीं
जो यांसि देइ जगदीश वनाधिवास । तो मार्गि कां न पसरी मृदु पुष्परास ?
जें प्रार्थिलें जर करीत असेल धाता । नेत्रांत यांस अमुच्या सखि ! ठेवुं आतां !"
जे कोणि त्या समयिं आधिं न तेथ आले । सीतारघूत्तम न त्यां बघण्या मिळाले
त्यांचें सुरूप कळतां पुसतात सातें । "आतां अहो ! कुठवरी असतील जात ?"
तैं पाहण्या पळत जाति समर्थ त्यांत । लाभोनि जन्मफळ हृष्ट फिरोनि येत !
पस्तावती कर जुडूनि अतीव चित्तीं । म्हातारिं आणि अचला तशि बालकें तीं
श्रीराम जात सुखकारण जेथ जेथ । प्रेमास पूर जनिं ये अति तेथ तेथ । ५

प्रत्येक गावि अतिहर्ष असाव होय। पाहोनि भानुकुल-कैरव-चंद्रराय! ॥
तद्वृत्त ज्यां मिळतसे श्रवणास कर्णी । त्यांनी सदोष गणिले नृप आणि राणी
कोणी म्हणे "नरपती अति चांगला हो। आम्हां तयें वितरला नयनास लाहो!"
कोणी स्त्रियापुरुष बोलति एकमेकीं । सौहार्दयुक्त सरळें वचनें अशीं कीं– ७
" ते धन्य तात–जननी, सुत हे जयांचे!। तें धन्य हो नगर जेथुन येति साचे
तो देश, शैल, वन धन्य! सुधन्य गांव! ज्या जाणि जाति जगि ते अति धन्य ठाव
हे होति मित्र जगिं ज्यांप्रति, तेहि धान्य!! त्या निर्मिणार विधि धन्य तसा वदान्य"
श्रीरामलक्ष्मणकथा अति रम्यसारा। आच्छादुनी भरित तो वनमार्ग सारा! ९
रघुकुलकमलाचा भानु तो या सुरीतीं । सुख वितरित लोकां चालला राममूर्ति
निरखित विपिनातें संगि सौमित्रि सीता। अतिशय सकलांना अंतरीं तोषवीता
श्रीराम हो पुढति, लक्ष्मण मागुती हो। त्यां वेष तापसहि शोभत तो किती हो!
दोघांमधे कशि विराजत रामजाया? । ती ब्रह्म–जीवयुगलामधि काय माया!।११
सांगूं पुन्हा कशि दिसे छवि मन्मनासी । जाणों वसंत-मदनामधि ती रतीशी!
वाटे मना फिरुनियां, उपमा बरी हे । कीं रोहिणी विधु-बुधांमधि शोभताहे!
टाकीत रामपदचिह्नित ठायिं पाय । सीता सभीति धरणीवर मार्गिं जाय ॥
सीतारघूत्तमपदांकित वर्जुनी ते । सौमित्र चालत पथीं उजवें तवाते! ॥१३॥

सीता, लक्ष्मण, राम यांमधिल ती प्रीती अती उज्ज्वला ।
वाचाऽगोचर जी कदापि नच ये वर्णावया निर्मला ॥
त्यांच्या सुंदर मूर्ति पाहुनि मनीं तल्लीन पक्षी मृगें ।
जाणों राम वनामधे विचरता चित्तेंचि चोरूनि घे! ॥ १४ ॥

ज्यांनीं ज्यानीं देखिले ते प्रवाशी। दोघे बंधू जानकी संगि ज्यासी ॥
आनंदे ते अश्रमें संपवीती । संसारींची दुर्गमा मार्गपंक्ति! ॥ १५ ॥
स्वप्नींही ज्या आजही पुण्यचित्तां। राहो आले रामसौमित्रसीता ॥
त्यांना लाभे रामनामीं निवास । कष्टे केव्हां लभ्य जो योगियास ॥१६॥
जाणोनीयां जाहली श्रांत सीता । शीतच्छायाही वटाची नितान्ता ॥
पाणी तेथें स्वच्छ पाहूनि राही । घ्यायासाठीं तेथ विश्रांति कांहीं ॥१७॥
सेवोनीयां कंदमूलें फलें ते । जाती मार्गे स्नान होतां प्रभाते ॥
वाटे देखे तैं तळीं शैलरानें । रम्यें सारीं पाहती आदरानें ॥ १८ ॥
वाल्मीकींच्या आश्रमा राम येती । त्याची शोभा वर्णण्या केविं ये ती? ॥

पुण्यें तीर्थें काननें शैलराजि । रम्यें पद्में भूरवीती सरां जीं ॥ १९ ॥
पुष्पें शोभा देति वृक्षां वनांत । भृंगालीही दंग ज्या गुंजनांत ॥
आस्वादीती रम्यगंधा मरंदा । लोभोनीया लोमनीयारविंदा ॥ २० ॥
खगमृग अतिहर्षे आश्रमीं संचरीती । कलमधुररवांनीं त्या रंगवीती भगीती॥
मुदित मन तयाचें, वैर ना अंतरांत । रघुवर निरखी त्या आश्रमा हृष्टचित्त
पाहूनि त्या पावन रम्य आश्रमा । राजीवनेत्रा सुख हो रघूत्तमा ॥
ऐकोनि रामागमनासि ते मुनि । तत्स्वागता बाहिर येति हर्षुनी ॥ २२॥
साष्टांग रामे नमिलें मुनींप्रति । आशीर्वचें विप्रवरें दिलीं किती ! ॥
रामा बघूनी मुनिचीं विलोचनें । निवालि; त्यां मानुनि आश्रमात नेे २३
प्राणप्रियां त्या अतिथीस पावुनी । त्यां बैसवी आसन योग्य देउनी ॥
तो मागवी गोड फलांसवें मुनी । सीतेसवें सेविति रामलक्ष्मणीं ॥ २४ ॥
बघूनि ती मंगलमूर्ति लोचनीं । वाल्मीकिते हर्ष भरे अती मनीं ॥
श्रीराम जोडूनि करांबुजें वंदे । जी गोड वाणी श्रवणांस सौख्य दे:–२५
“ त्रिकालदर्शी मुनिवर्य सत्तमा ! । हें विश्व बोरापरि हातिंच तुम्हा ! ”
ऐसें वदोनी कथि सर्व राघव । राज्ञी कसें दे वन आपणास्तव ! ॥२६॥
“ आज्ञा पित्याची, जननीसही हित । राज्यासि बंधू भरतासमीं स्थित॥
मलाहि हा दर्शनलाभ आपला । पुण्यप्रभावा नच माझिया तुला ! २७
मुनिवर ! पदकंजें देखिलीं आपुलीं हीं । सुकृत सकल माझें पावलें सत्फलाही
प्रभु मज तुम्हि आज्ञा द्याल तेथें वसेन । मुळिंहि मुनिजनाना काहिं उद्वेग हो न
जे क्लेशवीति नृपती मुनितापसांतें । शापीविनाहि नृप नष्टचि व्हायचे ते ॥
आधार विप्रपरितोषचि मंगलाचा । विप्रप्रकोप कुलकोटिस जाळि साचा ! २९
आणोनि हें मनि कथा मज ठाव ऐसा । सौमित्रिजानकिसवें वसु तेथ वासा
तेथें रचूं रुचिर पर्णकुटी तृणांनीं । काढू तिथें समय कांहि तुम्हा स्मरोनी”३०
श्रीराघवोक्ति सरल सहजा रसाला । ती ‘साधु साधु’ म्हणुनी मुनि हर्षि झाला
बोले “ रघूत्तम ! कसें न असें वदाल ?। तुम्हाविना नच दुजा श्रुतिसेतुपाळ

श्रुतिसेतुप्रतिपालक राघव, माया प्रभुची जानकी, ।
निर्मी, पाळी, नाशी जग जी दयाघना ! तव मतें निकी ! ॥
सहस्रशीर्ष अहीश भूधर लक्ष्मण नायक नरवरा, ।
धृतनृपतनु सुरकार्या चल्ला खलदलौघदहाया ॥ ३२ ॥

रामा ! तुझें रूप वचा अगोचर । अगम्य धीतें, न कळे परात्पर ॥
अपार गातां स्तुति ' नेति नेति ' जें । द्रष्टा प्रभो ! तूं जग दृश्य हें तुझें !
इति श्रीरामचन्द्रवाल्मीकिमीलनपरस्परयथार्थवार्तावर्णनं नाम षोडशस्तरङ्गः

## तरंग १७ वा

तूं नाचवीशी विधि-विष्णु-शंभुतें । त्याही तुझें मर्म कळेहि ना च तें ! ॥
जाणेल तुम्हां मग कोण दूसरा !।-ते जाणती, प्रेरण ज्यां तुम्ही करां ! १
जाणोनि तुम्हां तुमच्यांत लीन ते । होती त्वदाकार तुम्हांच जाणते ॥
भक्तांचिया द्वनमिच्या निराकरा । त्वत्प्रेरणेनें तव भक्त हो खरा ! ॥२॥
चिदानंदमया रूपा अविकार्या अशा तुम्हा ॥
जाणती अधिकारीच भक्त ते पुरुषोत्तमा ! ॥ ३ ॥
घेतली नरता तुम्हीं देव–सज्जन पाळतां ॥
सामान्य नृपसे येथें चालतां आणि बोलतां ॥ ४ ॥
लीला बघून तुमच्या जडजीव मोहे । ज्ञाता परी हृदयिं सौख्य अतीव लाहे॥
उक्ती कृती जगिं खऱ्या तुमच्याच होती। सान्या क्रिया प्रभुवरा! तुमच्याच हातीं
' राहूं कुठें ?' पुसतसां मज रामराया ! । संकोचतों परि तुम्हाप्रति मी पुसाया॥
नाहीं कुठें ? तुम्हि वदा मज ठाव देसा । दावीन मी मग तुम्हां स्थल योग्य वासा।६
॥ इति श्रीरामचन्द्रवाल्मीकिसंवादवर्णनं नाम सप्तदशस्तरङ्गः ॥

## तरंग १८ वा

परिसुनि मुनिवाक्यें प्रेमपूर्णे रसार्द्रें । स्मित सविनय केले अंतरीं रामचंद्रें ॥
पुनरपि वदुं लागे उक्ति वाल्मीकि मोदें । अमृतमधुर गोडी जींत अत्यंत नांदे।
" रामा ! तुम्हां कथिन मी परिसा निकेत। राहाल लक्ष्मणसमेत, ससीत जेथ
तो आवडेलचि निवास तुम्हां सदैव । राहाल तेथ सुखसागर देवदेव ! ॥२॥
ज्यांचे शुचि श्रवण अब्धिसमान होत। ज्यातें नद्या,-शुभकथा तुमच्या अनंत
येती निरंतर परी, परिपूर्ण ना हो। त्यांचे हृदीं रघुवरा ! तुम्हि हे रहा हो! ३
ज्यांचे लोचन चातकांसम तुम्हां मेघास आकांक्षती ।
मानोनी सरिता, सरें जलधिही सारींच तुच्छें क्षितीं ॥
होती जे सुखमग्न लाभुनि विभो ! त्वद्रूपबिंदू, पहा,—
त्यांच्या सौख्यमयीं हृदीं जनकजासौमित्रिसंगीं रहा ! ॥ ४ ॥

तुमच्या यशःसरोवर-मानसिं जिह्वामरालिका ज्यांची ॥
वेची गुणगण-मुक्ता रामा ! तन्मनिं तुम्हीं रहावेंचि ! ॥ ५ ॥
आमोद सुंदर शुचि प्रभुचा प्रसाद । घ्राणासिका सतत सेवुनि घे प्रमोद ॥
ज्यां सेव्य भोजन निवेदुनि आधिं तुम्हां। त्यांच्या अहो मनिं निवास तुम्हांस रामा!
ज्यां वस्त्रभूषण असे प्रभुच्या प्रसादीं । यच्छीर्ष देव-गुरु-विप्र सभक्ति वंदी ॥
त्यांच्यांसि वर्तन जयां नित नम्रभावें । त्यांच्या हृदब्जि रघुनाथ ! तुम्हीं रहावें
ज्यांच्या करीं घडत रामपदाब्जपूजा । विश्वास रामचरणांबुजि अंतरीं ज्यां ॥
ज्यांची पदें चलति आवडिं रामतीर्थां। त्यांच्या मनीं वसति राम ! तुम्हां यथार्था
जे नाम राम ! जपती तुमचें अखंड । जाणोनि मंत्रवर तो शुभ दे उदंड ॥
जे पूजितीहि परिवारसमेत तुम्हा। त्यान्चा हृदीं वसति योग्य तुम्हास रामा! ९
नानाविधा करिति तर्पण–होम कर्में । विप्रादि भोजविति देउनि दान धर्में
तुम्हांहुनीहि ब्रहु मानिति जे गुरूतें । संमानिती, करिति सेवन भक्तिचित्तें
जे कर्मजात करिती, फल एक लाभो । कीं चित्त रामचरणांवरि नित्य लोभो!
त्यांच्या मनःसदनि लक्ष्मण आणि सीता। यांच्या समेत वसती प्रभुलागिं युक्ता
ना काम कोप मद मान, न मोहलोभ । न क्षोभराग नच मत्सर शाठ्यदंभ ॥
मायाहि ना लवहि वास करीत ज्यांत। त्यांच्या हृदीं वसति राम ! तुम्हास युक्त!
सर्वांस आवडति, सर्वहिता करीती । दुःखें सुखें सम जया, स्तुति-निंदनें तीं
ज्यांचीं प्रियोक्ति सुविचारयथार्थसारा। त्यांच्या मनीं प्रभु ! सुयोग्य तुम्हास थारा!
शोधेंत जागतिंतही नच अन्य कांहीं । तुम्हाविना शरण ज्याप्रति अन्य नाहीं
तुम्हाविना नच गतीहि जयास दूजी। त्यांच्या मनात करणें वसती तुम्ही जी!१४
मातेसमान गणती परकीयनारी । अन्यस्व मानिति विषाहुनि जे विचारी ॥
त्यांच्या विशुद्ध हृदयांतरिं रामराया ! आहे सुवास अपुल्यास सुखें रहावा १५
हो हर्ष ज्यांस बघुनी परसंपदेतें । ज्या तीव्रदुःख मनिं अन्यविपत्ति देते ॥
ज्या प्राणसे प्रिय, तुम्हींच अनन्य रामा !। त्यांचें अहो मन शुभंकरसद्म तुम्हां
स्वामी, सखा, गुरु, पिता जननी जयास। आहात एक तुम्हि राघव कीं अशेष
तच्चित्तमंदिरिं करा प्रभुजी ! निवास । सीतेसमेत तुम्हि बंधुयुग स्वतास १७
जे अन्यदोष वगळीति गुणांस घेती । जे विप्रधेनुहिति संकटही सहाती ॥
ज्यां नीतिधर्मचरिता जग साधु मानी । त्यांच्या मनीं तुम्हि रहा तुलसन्निधानीं
जे, दोष ते समजती अपुलेच सारे । जे जाणती गुण तसे तुमचे विचारें ॥

विश्वास सर्वपरिं ज्यां तुमचाच होय । त्यांच्या मनीं तुम्हि वसा प्रभु रामराया!
ज्यां जातपात, धन, केतन, धर्म, मान । तैसा प्रियातपरिवार सुख त्यजून॥
हो चित्तवृत्ति तुमच्यांत विलीन रामा ? । त्यांच्या करा जि! निजमंदिर चित्तसद्मा
जे स्वर्गमुक्ति नरका गणुनी समान । जेथें तिथें बघति रूप भवन्निधान ॥
जे कायवाङ्मनसिं सेवक होति तुम्हा । हो तन्मनीं सुखनिवास तुम्हांस रामा!
केव्हांच ज्यास नच आस अशी कदाची । तुम्हांवरी अति रती सहजाच ज्याची
ज्यां रामभक्त असती प्रिय सर्वभावें । सीतेसवें तुम्हि तदंतरिं हो! रहावें!"२२
इति श्रीराम.अयोध्याकाण्डे श्रीवाल्मीक्युक्तिविदसिद्धान्तवर्णनंनामाष्टादशस्तरङ्गः

## तरंग १९ वा

ऐशापरीं मुनिवरें कथिलें सुवास । त्या प्रेमलोक्ति रुचल्या अति राघवास ॥
बोले पुन्हां मुनि "विभो! रघुराय! ऐका । सांगेन आश्रम सुखात्मक आज जो कां
हो चित्रकूट गिरि, ज्यामधिं वास तुम्हां । होईल सर्व सुखकारि सुयोग्य रामा!॥१॥
अद्री मनोहर, अरण्य सुचारु ज्यांत । संचारती करि-हरी, मृग, पक्षिजात ॥२॥
अत्रिप्रियेनें अपुल्या तपोबळें । मंदाकिनीस्रोत जिथें विनिर्मिलें ॥
सुरापगा पातकपोतकाप्रति । जी डाकिनीचेपरि काय नाशिती! ॥ ३ ॥
मुनींद्र अत्र्यादिक भूरि ते तिथें । जपीं, तपीं, योगिं तनूसि वंचितें ॥
त्यांच्या श्रमा सार्थ करावया चला । तिथें प्रभो! गौरव द्या वराचला ॥४॥
चित्रकूटमहिमा ऋषिवर्यें । गाइला अमित तो न वदों ये ॥
येउनी मग तिथें सरितेंत । न्हात राघव स-लक्ष्मणसीत ॥ ५ ॥
श्रीराम सांगे "बघ घाट, लक्ष्मणा । येथें रहाया कर ठाय आपणां" ॥
तैं "पश्चिमे शैल दिसे कडा भला । समोंतिं चापाकृति ओघ लाभला ! ६
त्या चापाची हे नदी ज्या-समाना । बाणस्थानें शातिदाना दमाना ॥
अद्री वांटे पारधी चित्रकूट । ज्याच्या नेमा ये न केव्हांच तूट !" ॥७॥
बोलेनी हें लक्ष्मणें दाखवीला । स्थानें, होई राम संतुष्टचेता ॥
रामा झाला मोद जाणोनि तेथें । इंद्रादी ते जाहले देव येते ॥ ८ ॥
वेषें होती देव कोळीकिरात । बांधोनीयां पर्णशालादि देत ॥
त्यांची शोभा निर्मिती नेत्रलोभा । गाभा ज्याचा वास हो श्यामलाभा!॥९॥
अवर्ण्य त्या दोनहि पर्णशाला । लहान एका दुसरी विशाला ॥

किरातवेषीं सुर भक्तिभावें । रचूनि देती, प्रभु कीं वसावें ॥१०॥
रघूत्तमें लक्ष्मण-जानकीसवें । निवासिलीं तीं सदनें स्ववैभवें ॥
तदा गमे कीं मुनिवर्पि राहती । तें पुष्पधन्वा, मधु आणखी रति॥११॥
॥ इति श्रीराम० ब्रह्मादिदेवकैङ्कर्यवर्णनं नामैकोनविंशस्तरङ्गः ॥

## तरंग २० वा

दिक्पाल नाग सुर किन्नर चित्रकूटीं । आले तया समयिं राघवरायभेटी ॥
सर्वांसि त्यां नमन आचरि रामराय । हृष्टां सुरां गमत लोचन धन्य होय !॥१॥
तैं पुष्पवृष्टि करुनी म्हटलें सुरांनीं । "झालों सनाथ अजि नाथ ! तुम्हां बघोनी"॥
रामा कथोनि विनयें निजदुःखरादि । गेले स्वलोकि सुर अंतरिं पूर्ण हर्षी ॥२॥
ये चित्रकूटिं रघुराज रहावयातें । ऐकोनि येति मुनि त्या बघण्यास तेथ ॥
श्रीराम दंडवत त्या करि नम्र भावें । रामा उरीं मुनिजनीं अपुल्या धरावें ॥३॥
आशीर्वचें वितरती मुनि राघवातें । वाणी निजा सुफल कीं करु पाहती ते !॥
सौमित्रि राम सहजानकि यां बघोनी । ते मानिती सुफलता दिलि साधनांनीं! ४
सन्मानुनी मुनिगणां मग दे निरोप । त्यांतें रघूत्तम करूनि तयां अताप ॥
ते स्वाश्रमीं परतुनी जप, याग, योग, । पुण्यें तपें करिति सर्व मुदंतरंग ॥५॥
—+ इति सर्वमुनिकृपाप्रेमवर्णनं नाम विंशस्तरङ्गः +—

## तरंग २१ वा

कोळी-किरातां जंव वृत्त तें कळे । गमे निधींचा नवकोप त्यां मिळे ! ॥
येवोनियां चालत आपुल्या घरीं । प्रह्वष्टता सेवित त्या तयापरी ॥१॥
द्रोणात कंदफलमूल भरोनि त्यानीं । आणियलें रघुवराप्रति हर्षपूर्णी ॥
ते येति पास समुत्सुक रामराया । रंकें जणों कनककोप लुटून न्याया ! ॥२॥
आलोकिले प्रथम दोनहि बंधु ज्यांनीं । त्यांना दुजे पुसति त्यात पथीं मिळोनी ॥
वानीत सेवित कथामृत राघवाचें । सारेचि येति जन ते प्रभुपासि साचे !॥३॥
जोहार ते करित, भेटि पुढें धरीत । न्याहाळितां प्रभुसि भाक्तिभरें भरीत ॥
होती तटस्थ जणुं चित्रिन ते अनेक ।। रोमांच देहभरि, नेत्रिं मुदश्रुसेक!॥४॥
श्रीराम जाणत तया अति भक्तिपूर्ण । सन्मानि त्यां प्रिय सदुक्ति मुदें वदून ॥
ते लेकरीं अमित आदरिं त्या नमीती । जोडोनि अंजलि विनीत करीति उक्ति ॥

"हे नाथ! आज अम्हि धन्य सनाथ झालों। कीं देखुनी प्रभुपदांसि अतीव धालों।
हें आमुचें अतुल भाग्य विशेष होय। आलांत येथ रघुनायक रामराय! ॥६॥
ते धन्य भूमि, वन, पंथ, गिरि प्रदेश। जेथें जिथें प्रभुपदांबुज लग्न लेश।
ते धन्य काननविहंग, मृगादि वन्य। पाहूनियां प्रभुसि जन्म तदीय धन्य॥७॥
हे आम्हि सर्व परिवारसमेत धन्य। जे पाहतों नयनिं विश्वविभू अनन्य॥
केला निवास तुम्हि योग्य विचारिं येथ। सारे करूं प्रभुजि! येथ वसा सुखांत॥८॥
होऊं तुम्हास अम्हि सेवक सर्वरीतीं। त्यासाहि सिंह गज वारुनियां वनान्तीं॥
हीं उंचनीच गिरिकंदर, खोरि रानें। आम्हीच जाणत असूं सगळीं क्रमानें॥९॥
जेथें तिथें प्रभुवरा! मृगयाविहारा। नेऊनि दाऊं सर निर्झर भाग सारा॥
ऐवूं तुम्हांस परिवारसमेत आम्ही। संकोच सोडुनि नियुक्त करा जि! कामीं" १०
त्याचीं वचें निगम, जो करुणानिवास। जो नाकळे मुनिमनासहि अप्रयास
तो ध्यायके प्रभु किरातवचें सभक्ति। जैसा पिता परिसतो मृदुबालवोक्ति! ११
प्रीतीच केवळ रुचे प्रभुला विशुद्धा। जाणूं पहाति, हृदिं घेउत याच बोधा॥
श्रीराम त्या वनचराप्रति तोषवीत। बोलूनि गोड वचनें करुणार्द्रचित्त ॥१२॥
देतां निरोप, विभुतें नमुनी किरात। जाती गृहा प्रभुगुणां कथित अतीत॥
ते दोन बंधु सहजानकि या तुरीतीं। रानीं वसोनि सुख देव-मुनींसि देती १३
जेथून वास करि राघव त्या वनांत। तेथून सर्व वन मंगलदायि होत॥
पुष्पीं फलीं बहरले नव वैभवानें। वेष्टूनि वल्लरिगणीं वनलीं विताने ॥१४॥
त्यांची विभा बघुनि कल्पतरूसमान। ते तेथ येत जणुं नंदनही त्यजून! ॥
गुंजारवा करिति मंजुल भृंगपंक्ति। वायूहि मंद मधुगंधभरें वहाती ॥१५॥
तेथें मयूर कलकोकिल चक्रवाक। पक्षी चकोर शुक चातक हे अनेक॥
गाती मनोज्ञ मधुर श्रुतिरम्य नादीं। आधी सुरेचि; भरती हृदयें प्रमोदीं १६
सोडून वैर वनिं संचरती भुजंग। शार्दूल कुंजर वराह कपी कुरंग॥
श्रीरामराय मृगवेरतव जाय रानीं। सानंद होय मृगवृंद तया दचोनी! ॥१७॥
विद्वांत देवविपिनें जितुकीं तयांनीं। पाहूनि रामवन गाइयलें स्तवोनी॥
श्रीरामवास वितरी सुषमा वनास। ना नंदनासहि तशी मिळणार लेश! १८
सुरापगा, भानुसुता, सरस्वती, । गोदावरी, मेकलजा, शुभा अति॥
सारीं वनें, सिंधु नदीनदादि ते। मंदाकिनीं आम्यचि होति वानिते ॥१९॥
कैलास शैल उदयास्तगिरी महा जे। ते मेरु-मंदर जिथें सुरवास साजे॥

तैसे हिमाचल असे गिरिराज सारे । ते चित्रकूटयश गाति बहुप्रकारें ! ॥ २० ॥
हो विंध्य पर्वत अतीव सुखांत मग्न । त्याच्या उरीं अमित हर्ष समावला न !॥
त्याला श्रमाविण महत्त्व अनंत आलें । कीं चित्रकूटि रघुराय निवास झाले ! २१
'जे चित्रकूटि असते मृगपक्षिजात । वेली, तरू, तृण, रजःकणही अनन्त ॥
ते पुण्यपुंज, 'अति धन्य' अशी प्रशंसा । रात्रंदिनीं करिति देव मुदें तुषोपा २२
जे नेत्रवंत बघती रघुवंशनाथा । त्यां जन्म सार्थ गमला, नच दुःखवार्ता ॥
ज्या स्पर्शले चरणरेणु रघूत्तमाचे । त्यां स्थावरांहि पदसत्तम लभ्य साचें!॥२३॥
तें चित्रकूटवन रम्यचि जें विशेषीं । हो मंगलायतन पावन पापनाशी ॥
कैशापरी सकल तन्महिमा वदावा । जेथें सुखाब्धि रघुनाथनिवास व्हावा ! । २४
क्षीराब्धि याकुनि तसी त्यजुनी अयोध्या । श्रीराम लक्ष्मण ससीत वनात बुद्ध्या ॥
ज्या राहती, कशि तया वनिंची वदावी । शोभा सहस्रशत शेषिंहि सार्थ भावीं !२५
तेथें शकेन किति मी करुं वर्णनातें । कीं क्षुद्रकूर्म शकतें धरुं मंदरातें ? !
वाङ्मनचित्तकर्मि करि लक्ष्मण रामसेवा । तद्धेमशील महिमा कुणि सर्व गावा ?! २६

क्षणोक्षणिं विलोकुनी सदयरामसीतापदें ।
बघोनि अति आपुल्यावरिल भाव त्यांचा मुदें,— ॥
कधीं न निज मानसिं स्मरण लक्ष्मणा स्वप्निंही ।
स्वगेह, निजतात, वा स्वजननी असें हो मही ! ! ॥ २७ ॥

श्रीरामसंगिं सुखिता अतिमात्र सीता । गेहा, पुरा परिजना लव नाठवीतां;
आलोचता प्रियतमाननचंद्रमूर्ति । जाणों चकोरयुवती अति हर्षिता ती ! २८
प्रीति प्रियांतरिं वसे निज वृद्ध जी कीं । देखोनि हृष्ट दिवसां जशि चक्रवाकी ॥
सीतामनींहि रति रामपदाब्जिं ऐसी । साकेतकोटिपरि मानि मनीं वनासी ! २९
तीतें प्रिया दयितसंगतिं पर्णशाला । तैसा कुरंगमृग सत्परिवार झाला !
श्वशुरू मुनीन्द्रग्रहिणी, मुनि साखरेसे ! । तें कंदमूलफल तीस सुधाच भासे !३०
नाथासवें गमलि सुंदर पर्णशय्या । कीं कामकोटिशयनोपम सौख्य द्याया ! ॥
जीचा कृपानयन निर्मित लोकपाळां । मोहावया विषय शक्य न हो तियेला !
रामासचि स्मरुनि देति जन त्यजून । सान्यां विलासविषयांसि तृणांसमान !
सीताहि विश्वजननी दयिता प्रभूची । टाकी तयां, नवल यात मुळीं नसेचि!!
॥इति श्रीराम० सेवकसेव्यभाव-चित्रकूटयथार्थस्वल्पवर्णनं नामैकविंशस्तरङ्गः॥

## तरंग २२ वा

होतील हृष्ट जरि लक्ष्मण आणि सीता। तैसेंचि राम करि, बोलत त्याच वृत्ता॥
सांगे पुरातन कथा रघुनाथ त्यांना। सीता सलक्ष्मण सुलावत ऐकतांना॥ १
जेव्हां अयोध्यास्मृति होइ धर्मी। अश्रू भरे वन्नयनाब्जधामीं॥
मातापिता सानुज आप्तलोक। त्या आठवोनी हृदिं होत शोक!॥ २॥
स्मरे तवातें भरतातरींची। सद्वृत्ति सेवान्वित भक्ति साची॥
भरूनि येई जरि रावचोर। वेळा न ती चितुनि सेवि धीर!॥ ३॥
रामासि पाहोनि सशोकचित्ता। होती तसे लक्ष्मण आणि सीता॥
वैकल्य लागे हृदिं त्याहि याया। नरानुसारी जणुं काय छाया?॥ ४॥
सीतालक्ष्मणचित्तवृत्ति वघुनी श्रीराम त्याचें मन।
कारुण्यें भरलें, सदा निववि जे भक्तोर कीं चंदन॥
सांगे पुण्यकथा पुरातन, नव्या, ज्या आवडाव्या बुधा
सीतालक्ष्मण तोषती पिउनियां त्या श्रोत्रपेया सुधा!॥ ५॥
सीतालक्ष्मणरामचंद्रसहिता अत्यंत शोभा धरी।
पुण्या पर्णकुटी मनोहरतमा श्रीचित्रकूटावरी॥
स्वर्गीच्या अमरावतींत वसती ती नंदनासन्निध
जेथे राहि शची-जयंतसह कीं देवेन्द्र रामाभिध!॥ ६॥
सीतालक्ष्मणरक्षणीं जपतसे श्रीराम कैसा सदा!
जैसा लोचनगोलकांसि जपती त्या पापण्या सर्वदा॥
सेवी लक्ष्मण, जानकी-रघुवरा तैसेंचि, जैसा कुणी—
शुरूचा तनुची करी पुरुष, जो नोहे विविक्ती मनीं!॥ ७॥
ऐसा करीत सुखवास वनास राम। पक्ष्यां, मृगा, मुनिजना करि सौख्यधाम॥
जाणे वनात विभुचें शुभ गाठले हें। आता सुमंत परते पुरि जेरि पाहे!॥८॥
रामासि पोंचवुनि जो गुह येत मार्गे। तो त्या सुमंत्र दिसला, रथ त्यासवेंगे॥
पाहे निषाद सचिवा अतिशोकधामा। वाटे विषाद भरला नच त्यास सीमा!
'हे राम! राम! अयि लक्ष्मण! देवि सीते!'। हें बोलुनी सचिव लोळण घे क्षितीतें!
पाहोनि दक्षिणदिशीं, हय लिकळीती। पंचाविना विकळ कीं सगदीन चित्तीं।
घास न खाति, जलपानहि ना करीती। नेत्रांतुनी स्रवत अश्रुजलें किती तीं।

ऐसा हया वचुनियां प्रिय राघवीयां । वृत्ती निषादमनिं हो अनुकंपनीया ! ११

॥ इति श्रीराम० श्रीअयोध्याकांडे सत्यसेवकभाव श्रीअयोध्यावासि–
मार्गवासिविरहोत्पन्नश्रीरामवनवासपूर्वार्धसमाप्तिवर्णनं नाम द्वाविंशस्तरङ्गः॥

( अयोध्याकांड पूर्वार्ध समाप्त. )

## अयोध्याकांड उत्तरार्ध प्रारंभ

### तरंग १ ला

धैर्या धरुनि वदला मग तो निषाद । "आतां सुमंत सचिवा ! न करीं विषाद
आहात पंडित तुम्ही परमार्थवेत्ते । धैर्या धरावि हरि, दैवचि वाम हो तें!" १
त्यातें कथा विविध सांगुनि मंजुलोक्तीं । तो त्यास वैर्थवि रथात धरुनि दर्शी॥
शोकाकुला, रथहि त्याप्रति हाकवे न । चित्तास रामविरहार्ति करीत दीन ! २
घोडेहि ते परफडोनि न मार्गि जाती । कीं तुंबिलीं वनमृगेंचि नवीं रथा तीं !.
ते चालतां पडति, पाहतिही वळोनी । ना साहिला मुळिंहि रामवियोग त्यांनीं !
जो नाम 'लक्ष्मण' 'रघूत्तम' 'जानकी' घे । खिंकाळुनी हय तया वघती सुरागें
अश्वस्थिती प्रभुवियोगिं कशी वदावी ? । जैशी मणीविण फणिस्थिति दीन व्हावी
पाहोनि ते सचिवबाजि, निषादचित्त । होई विषादयुत जे नच वर्णु येत ॥.
बोलावि चार निजसेवक साह्यकर्ते । देऊनि सारथिहि सगतिं देत त्यातें ५
सर्वांसि पोंचवुनिया गुह येइ मागें । त्याचा विषादभर वर्णुनि कोण सांगे ?
गेले सुमंतसह जे सगळे निषाद । त्यांना क्षणोक्षणिं भरे हृदयीं विषाद ॥६॥
चित्ती सुमंत अतिदुःखित शोकदीन । "धिग् जीव हा रघुपतीविण सौख्यहीन।
हा नीच देह नच अंतिंहि राहणारा । का घे न कीर्ति ? त्यजतां रघुवीर यारा!
हे प्राणहो! तुम्हि न का करतां प्रयाण ?। कां व्हा अधास, अयशास धनी, अजाण?
धिग् धिङ् मना! चुकशि मंदपणें सुसंग ।। अद्यापि हे हृदय! होशि न कां दुभंग?
चोळी करा, बडवि शीर्ष, रडे सुमंत । वाटे गमाउनि बसे कृपण स्वचित्त ! ॥
कीं शूरवीर विरुदीं अति गाजलेला । माघार घेउनि रणातुनि काय आला !
कोणी विवेकयुत साधु, सुवंशजात । वेदज्ञ विप्रवर मद्य बळेंचि पीत ॥
त्यातें जसा हृदयिं शोक, तसा सुमंत । श्रीराघवादिक विना स्वपुरासि येत १०
जैसी कुलीन, ललना, बुध, साधुशीला । वाक्कर्मचित्तिं पति दैवत हो जियेला

दैवें तयें त्यजिलि राहि अवद्य शोकीं । तैसा सुमंत अति दुःखित होत तो कीं !
डोळ्यांत अश्रुभरिं अंधुक दृष्टि होई। ना ऐकवे श्रवणिं, हो मति मूद कायी?
हो शुष्क ओठ, मुखशक्ति पळेचि दूर। न प्राण जावि! अवघी हृदिं रोधि दार!
झाली विवर्ण मुख-मा, वचवे न त्यातें,। मातापिता जणुं तयें वधिलेचि घातें!
पापी अतीवचि तयामनिं हानि, शोक। पापी जसा यमपुरीपथि वाहि धाक !
त्या बोलवे न हृदिं पोळत यातनांनीं। चिंती मनीं, "नगरिं काय वघूं रिघूनी !
जो कोण रामविण हा रथ पाहणार। सारांक तो नविल कीं मजलाचि फार!
येवूनि पौर मज धांवत आर्तचित्त। नारीनर व्यथित जें पुसतील वृत्त ॥
वज्रापरी करुनि निष्ठुर मन्मनार्ते। देणें पडेल मज उत्तर त्यास कीं तें !१९
मातें विचारतिल सर्वहि राममाता। शोकार्त त्यासि वदुं काय जि ! मी नुवार्ता?
जेव्हां पुसेल जननी मज लक्ष्मणाची। हा दैव ! सांगुं सुखवृत्ति तिला कुणाची?
कौसल्या जें धांवुनी ये पुसावा। वत्सासाठीं गाय जैसी स्वकीया ॥
तीतें सांगूं काय मी "गे ! वनान्ता। गेले ! गेले ! राम सौमित्र सीता !!"? १७
जो जो पृच्छा तेथ मातें करील। त्यातें त्यातें मी वदूं हेचि बोल ? ॥
जावोनीयां त्या अयोध्येत आतां। कैचीं सौख्यें लाभणें या अनाथा ? ॥१८॥
शोकार्त जें मज पुसेल नृपाळ दीन। ज्याचे असू असति रामपदां अधीन ॥
सांगूं तयास कवण्या उघण्या मुखानें ?–'आलों कुमार वनिं पोंचवुनी सुखानें!'
ऐकेल जें नृपति सर्व निरोप सारे। सौमित्र-राम-मिथिलाधिपकन्यकांचे ॥
प्राणांस सोडिल तृणापरि भूपराय। हा हाय ! हाय ! करुं काय ! नसे उपाय!!
आतां मुकोनिहि जल प्रिय यमरूपी। ना पंकचें मदुर मंगतसे तथापि ॥
वाटे दिली मज तनू अशनिप्रमाणें। या यातनांधि सहण्यासचि घातयानें"२१
॥ इति श्रीरामचरितमानससानुवादकाव्ये कलिकलुषविध्वंसने श्रीअयोध्याकाण्डे उत्तरार्धे सुमन्तविरहवर्णनं नाम प्रथमस्तरङ्गः ॥

## तरंग २ रा

ऐसा करीत हृदिं शोक सवेनि पंथा। ये तो रथें त्वरित कीं तमसातटान्ता ॥
तेणें निरोप दिधले विनयें निषादां। गेले करूनि नमनें, धरुनी विषादां १
संकोच वाटत पुरीं शिरण्या सुमंता। कीं धेनुविप्र गुरु यापरि तो निहन्ता !!
बैसोनि वृक्षतळिं घालवि तो दिनातें। अंधारधी उंबर पातलि त्यास वेगें २

साकेतिं तो प्रविशला तिमिरांत मंत्री। द्वारींच ठेवुनि रथा, गृहि येत रात्रीं ॥
ज्यां येत तें कळुन वृत्त समग्र, येत। ते पाहण्यास रथ वेशिवरी क्षणांत ! ३
ते ओळखीति रथ, अश्व गळून गेले। तें लोकही विकळ घर्मजलें नहाले ! ॥
नारीनर व्यथित पौर समस्त तैसे। कीं मीन ते सलिल आटुनि होति जैसे !
'आला सुमंत' पडलें जंव वृत्त कानीं। अंतःपुरीं विकलता अति ये भरोनी !
तीं मंदिरें गमलि भीषण कीं स्मशानें। दुःखार्तिशोक विकलत्वभेर सुदीनें।।५॥
राज्ञी तयासि पुसती अतिदुःखदीन। विक्लिन्नवाक् सचिव उत्तर कांहिं दे न!
तत्कर्ण नायकति, नेत्रहि शून्यदृष्टि। त्या त्या पुसे 'नृप कुठें?' अतिमात्र कष्टीं
पाहोनी त्या दुःखिता तेवि, दासी। कौसल्येच्या मंदिरीं नेति त्यासी ॥
तेथें त्यानें पाहिला भूपराय। निष्प्रीभूप्री जो गमे, चंद्र काय?! ॥ ७ ॥
नोहे शय्या, नासनी, ना विभूषी। भूमीपृष्ठीं लोळतां म्लानवेषी ॥
जो सुस्फोरे टाकितो दुःखमूर्ति। स्वर्गाहूनी भ्रंशला की ययाति ! ॥ ८ ॥
दुःखावेगीं वक्ष गेलें भरून। कीं संपाती दग्ध पंखीं विकीर्ण।
आक्रंदी तो " राम, सप्रेम राम ! । हे वैदेही ! लक्ष्मणा ! राम ! राम ! " ॥९॥
भूपा बघोनि सचिवें ' जय जीव ' उक्तीं बोलोनि दंडवत्तिं त्या नमिलें सभक्ति
तेव्हां उठोनि नृप बोलत आर्तचेता। "रे सांग, राम मम होय कुठें? सुमंता!"
भूपें सुमंत्रा धरिलें तदा उरीं। आधार तो त्या बुडत्या कसा तरी-॥
वायोनि, त्या बैसवि आत्मसन्निधीं। प्रेमें पुसे भूप उदस्रु दीनधी ॥ ११ ॥
" आहे सखा राम मदीय कीं सुखीं?। कोठें वदें लक्ष्मण-राम-जानकी? ॥
त्वां आणिलें मागुति कीं वनीं गत?" । सुमंत तैं लोचनवारिपूरित ! ॥१२॥
पुन्हां पुसे भूप विलापनिर्भरें। " निरोप त्यांचे वद रे ! मला बरें ! ॥
• जे जानकी लक्ष्मण राम सांगती। उक्ती तदीया मज वेगिं सांग ती " ॥१३॥
श्रीरामरूपगुणशीलसुभाव सारे। चित्तीं स्मरे नृपतिसत्तम शोकभारें ॥
"सागून राज्य वनवास दिला" म्हणे तो। "ना हर्ष खेद मनिं राम परी करी तो
ऐसा मदीय तनया घडता वियोग। हे प्राण ना त्यजति केविं मदीय संग?
वाटे मला, बघुनि हें नच कोणि पापी। माझ्या समान दुसरा जगतीं कदापि!
जेथें सख्या! असति लक्ष्मण राम सीता। तेथेंच पोंचविं मला झणिं तूं सुमंता!
नाहीं तरी वदतसें तुज सत्यभावें। कीं प्राण हे म्हणति तूर्ण निघूनि जावें!"
पुनः पुन्हा राय विचारि आग्रहें। मंत्र्या सुमंताप्रति " सांग सांग हें—

जें बोलले मत्प्रियपुत्र काननीं । संदेश ते सांग सख्या ! मला झणीं ॥१७॥
करीं सख्या ! तेंच उपाय र ! तरी । वचेन जेणें मम नेत्रि सत्वरीं ॥
मदीय सीता, रघुनाथलक्ष्मणां–जाऊं पहाती असु हे क्षणक्षणां ! " ॥ १८ ॥
धैर्या धरूनि मृदुशब्दि वदे सुमंत । "ज्ञानी तुम्ही प्रभुजि ! जाणतसां समस्त ॥
आहां धुरंधर पराक्रमि वीर धीर । सत्संगनीं गमियलें तुम्हि जीवसार ॥१९॥
जे जन्ममृत्यु सगळे सुखदुःख भोग । वा लाभहानि, सुखमीलन वा वियोग,॥
हे कालकर्मवश होति सदैव नाथा ! । जैसे निशादिवस येति अखंडसत्तां ॥२०॥
ते अज्ञ हर्षति सुखें, खिजतात दुःखें । दोन्ही समान मनिं मानुनि धीर ठाके
धैर्या धरूनि सुविचारयुता विवेका । सर्वांप्रती हित करा; त्यजुनि स्वशोका २१
श्रीराम राहि तमसातटिं आद्यरात्रीं । गंगातटीं वसति हो दुसरी तयासी ॥
सीतेसमेत रघुनायक-लक्ष्मणानीं । गंगेत केलिं अपुलीं जलपान, न्हाणीं ! २२
सेवीतसे बहु निषादपती तयासी । ते शृंगवेरपुरसन्निध रात्रिवासी ॥
होतां प्रभात वटवृक्षज मागवोनी । घे क्षीर राम, शिर भूपवि तो जटांनीं २३
श्रीराममित्र मग मागवि आत्मनौका । सीतेसि तींत चढवी, प्रभुही वनौका
तोही बसे चढुनि लक्ष्मण सज्जचाप । ठाके उभा करित रक्षण सुप्रताप ॥२४॥
त्यातें निदेश मिळतां प्रभुचा, चढोनी, । नौकेत येत मग लक्ष्मण चापपाणि॥
दुःखार्त पाहुनि मला प्रभु धैर्यशील । हे बोलले मजसि मंजुल गोड बोलः–२५
" हे तात ! मत्प्रणति तातपदीं निवेदा । त्यांच्या धरूनि बहुवार पदारविंदां
अत्यंत नम्रपणि तत्पदिं मी पडोनी । हें प्रार्थितों नच करा मम दुःख कोणी !
'चिंता करा न हृदिं मद्विषयीं जराही । राहूं अम्हीहि वनिं हे कुशलप्रवाहीं ॥
होईल मंगल अम्हांस वनात सारें । पुण्यप्रसादिं तुमच्या करुणाविचारें २७
तात ! तुमच्या कृपें वनींही मिळतिल आम्हा सर्व सुखें ।
आज्ञा पाळुनि अपुली येऊं फिरुनि देखण्या चरण निकें '
' सुखवा माता पदीं नमूनी सकलां कळवा विनती ही— ।
तुलसि वदे विभु, ' तेंच करा हो ! जेणें भूपति सुखि राही " २८
संदेश सांगत रघूत्तम हा गुरूतें । तत्पादकंज नमुनी बहुवार चित्तें ॥
कीं ' तोच आपण करा उपदेश युक्त । जेणें न मोहवश होतिल लोकनाथ '
पौरादिकां परिजनां विनती मदीय । ही प्रार्थना करुनि तात ! वदाल काय ?
कीं ' तोच सर्वपरिं मी हितकारि मानीं । जेणें नराधिपति हर्षविला कृतीनीं'

सांगा निरोप मम हा भरतासि येतां । ‘ नीती नको त्यजुंस पावुनि राजसत्ता
तूं कर्मचित्तवचिं रक्षित जा प्रजेतें । माता समान गणुनी परिपेव चित्तें ३१
बंधो ! समृद्ध करिं तूं निजबंधुभक्ति । माता, पिता, सुजन सेवित जा सुरीतीं !
ताता ! पित्यांसि सुखि राख अशाप्रकारें । जेणें न मद्विपयिं शोक घडो तया रे !’
तें लक्ष्मणें वचन कांहिं कठोर केलें । तें राम खोडुनि, मला विनवीत बोले ॥
घालोनि नामशपथा अपुल्या कितीदा । ‘ताता ! न लक्ष्मणशिशूक्ति तुम्ही निवेदा !’
सीता प्रणाम कथि, आणखि बोलुं लागे । यत्नें, परी गहिंवरे हृदिं शोकवेगें
स्नेहें न शब्द उमटे, दृशिं अश्रु लोटे । रोमांचपल्लव उठे, तिज कंठ दाटे! ३४
जाणून त्या क्षणिंच राघवरायभाव । तो वल्कवीर गुह चालवि पार नाव ॥
ऐशापरी प्रभु रघूत्तम दूर जातां । मी राहिं पाहत, उरीं सहिं वज्रघाता! ३५
ते क्लेश आपणचि मी वदुं कासयास ! । मी हा जिवंत फिरतों अजुनी विशेष
संदेश राममुखिचा कथितों तुम्हांतें । दुःखी स्वतांस म्हणवूं तरि केविं चित्तें !”
बोलूनि हें वचन मौनिं पडे सुमंत । हो ग्लानिहानिवश, चित्त तदीय आर्त ॥
तें ऐकतांच सचिवोक्त, नराधिराय । शोकाग्निदग्ध धरणीस पडे असह्य ! ३७
तो होय आकुल मनामधिं मोहपूर्ण । कीं फेनपंकिं नववृष्टित मीन दीन ! ॥
राज्ञीहि सर्व बुडल्या करुणाविलापीं । आपत्ति घोर कथवेल न ती कदापि !
तो शोक आयकुनि दुःखहि दुःखि झालें ! प्रत्यक्ष धैर्यहि जणों गतधैर्य ठेलें !
आक्रांत तो पसरला सगळ्या पुरांत । शोकाचिया सकलही बुडले पुरात॥३९॥
तैं वाटलें घडवि कीं निशिं वज्रपात । पक्ष्यांचिया विपुलसंधिं महाकृतान्त ॥
साकेत सर्व भरलें जनशोकरावें । कोलाहला गगनही नच तें पुरावें ! ॥४०॥
दशरथनृपतीचा प्राण हो कंठिं गोळा । गलितमणि अहीसा भूप वैक्लव्य त्याला!
विकळ सकळ झालीं इंद्रियें शक्तिहीन । जल सरिं सरता कीं जाविं पद्मे सुकून
कौसल्या तें म्लान भूपा बघूनी । जातो अस्ता सूर्यवंशार्क मानी ॥
धैर्या धेई अंतरीं राममाता । बोले वाणी योग्य जी त्या क्षणान्ता ॥ ४२ ॥
“ हे नाथ ! अंतरिं करा जि ! जरा विवेक । अब्धी अपार रघुनाथवियोगशोक॥
साकेत हें गमत त्यांत महाजहाज । त्या कर्णधार तुम्हि होय नराधिराज !॥४३॥
आहे प्रजा सकल त्यां चढली प्रवासी । प्राणांहुनीहि अधिक प्रिय जी तुम्हांसी ॥
धैर्या धराल तर सर्व तराल पार । नाहीं तरी सपरिवार विनाशणार! ॥४४॥
ऐका जि ! ही विनवणी मम नम्रतेची । हे प्राणनाथ ! दयिताप्रति केलि साची

ही घ्याल की हृदिं मदुक्ति विनीत, कांता ! । होतील हो फिरुनि लक्ष्मणरामसीता!"
तें एकतांच दयितोक्त मृदू अतीव । भूपाळनेत्र उघडून येत सुजीव ॥
आसन्नमृत्यु जणुं मीन जलाविहीन । ये त्यावरी सलिलसिंचन कीं घडून ! ४६
धैर्या धरून बसला मग तो नृपाळ । बोले, "सुमंत ! मम राम कुठें दयाळ ?
श्रीरामभक्त मम लक्ष्मण होय कोठें ? । सीता प्रियात्मजवधू मम सांग कोठें !"
ऐसा विलाप करि भूप अनेकरीतीं । झाली युगासरिस रात, न जी सरे ती!॥
जो अंधतापस तयाप्रति देत शाप । तें आठवी सकळ मागिल वृत्त भूप ॥४८॥
कौसल्यतें तं कथी भूपराय । वर्णोनीया, वृत्त जें सर्व होय ॥
होई दुःखें भूर अत्यंत आर्त । चिंती 'रामावीण धिग् जीवनार्थ ! ॥४९॥
ती ही माझी राखुनी काय ? काया । मत्प्रेमाशा हो जिनें केलि वाया ! ॥
हे श्रीरामा ! प्राणशा लाडक्या रे ! । तूझ्या वीणें वाचलों फार कीं रे ! ५०
हे सीते ! हे लक्ष्मणा ! रामराया ! । मच्चित्ताच्या चातकांभोधरा ! या ॥
हे कल्याणा ! माझिया सौख्यधामा ! । हे श्रीरामा राघवा ! पूर्णकामा ! ५१
श्रीराम राम ! मम राम ! मदीय राम ! हे राम राम ! तुलसागर राम ! राम !"
ह्या श्वासवोरिं तनु टाकित भूपराय । रामाचिया विरहिं तो सुरधामिं जाय !
॥ इति श्रीराम० श्रीअयो० नृपस्वर्गगमनं नाम द्वितीयोऽध्यायः ॥

## तरंग ३ रा

सज्जन्ममृत्युफल पावत रामतात ! । ब्रह्माण्डि तद्यश विशुद्ध भरे अनन्त ॥
श्रीरामचन्द्रवदना बघि जोवमानीं । मृत्यूसि रामविरहें सुधमाच आणी ! ! ॥१॥
शोकाकुला रडति त्या सगळ्याच राजी । तद्रूप-शील बल तेज अति स्तवोनी ।
नाना प्रकारिं करुणायुत तद्विलाप । भूमीवरी पडति त्या कितिदा सकंप ! ॥२॥
झाले सशोक अति सर्वहि दास दासी । आक्रंदिती गृहिं गृहीं पुरिंचे निवासी ॥
"अस्तास जाय अजि भास्करवंशभानू । रूपीं गुणीं अतुल धर्मनिधान मानू !"
कैकेयितें सकलिही दिधल्या शिव्याच, । केलें जिनें सकल विश्वहि अभ्र साच !
ऐशापरीं विलपतां रजनी सरे ती । ज्ञानी महामुनि तिथें सगळेहि येती ॥४॥
तेव्हां वसिष्ठमुनिनीं सन्मानपूर्वक । पुण्येतिहास कथिले सकला अमूप ॥
शोकांधकार सगळ्या मनिंचा दुरन्त । विज्ञानदीपिं करिती मुनिवर्य शान्त ! ५
तैं ठेविती नृपतनू झणिं तैलनावे । दूताधि बोलवुनि सांगति जें करावें ॥

"जाऊनि वेगिं भरतासि तुम्ही मिळावें । ना भूपवृत्त कवणा तुम्हि तेथ यावें६
त्यांना तुम्ही भरत सन्निध एवढेंच । 'बंधुद्वया गुरु तुम्हांस निमंत्रि साच!'
तो ऐकतां मुनिनिदेश निघूनि जाती । ते दूत धांवत, हयां रथिं लाजवीती ७
साकेतिं ज्या क्षणिं अनर्थ सुरू जहाला । तेथेंनि होति भरतासि कुचिह्नमाला ॥
स्वप्नं बघे निशिं भयंकर दुष्टराशि । येताचि जाग अशुभाशय जाचि त्यासी
तो त्यास्तव द्विजहि भोजवि, देइ दानें । अर्चीत तो बहु हरा अभिषेचनानें ॥
प्रार्थी महेशपदिं चिंतुनि भक्तिभावें । 'माता, पिता, अनुज, आप्त, सुखी रहावे'
चिंतीत हें भरत, तोंवरि दूत येती । वेगेंचि धांवत निदेशहि सांगताती ॥
तो ऐकतां गुरुनिदेश गणेशपाद । चिंतोनियां भरत ही निघि तो अमंद॥१०॥
हाकीत तो पवनवेगिं तुरंग जाई । लंघीत दुर्गम नदी वनशैल, राई ॥
त्या शोक होय उरिं, काहि न गोड वाटेई मनीं, उडुनि संपवुं काय वाटे?! ११
वर्षापरी गमत त्यास निमेष एक । सोत्कंठ तो नगरसन्निध ये सशोक ॥
होती तया शकुन दुष्ट, पुरीप्रदेशीं । कुश्रेत्रि काक करिती अशुभ ध्वनींसी १२
आक्रंदती खर शृगाल मशाण सर्वें । ते शब्द कर्णि भरतां मनिं शूल व्हावें ॥
निःश्रीक वाटति नदी सर बाग रान । वाटे पुरी तर विशेषचि ती मशाण! १३
ना पाहवे खगमृगां, तुरगां, मतंगां । ना दुर्धरा सहति रामवियोगरोगा ॥
पौरस्त्रिया पुरुष भासति अत्युदास । संपत्ति हारवुनि सर्व गमे विनाश!!॥१४॥
त्या भेटले नगरिं पौर, परी न कोण । बोलेचि काहिं; रिवती नमना करून ॥
न क्षेम त्या भरतही शकला पुसाया । कीं तन्मनीं भयविषाद करीत छाया! १५
ते हाटवाट नच पाहवलेहि जाती । लागे पुरा दशदिशीं जणु आग कीं ती!
तें कैकयी, 'भरत ये' कळताचि, देखा । हर्षे मनीं, रविकुलाब्जचंद्रलेखा! १६
ती आरती करुनि सिद्ध उठून धांवे । भेटूनि दारिं भरतासह मोहि पावे ॥
तो पाहि तेथ परिवार समस्त शोकीं । जाणों तुषारहत पद्मसमूह तो कीं! १७
तें कैकयी गमलि हर्षित त्यापरी ती । कीं दृष्टली वनदवा खवुनी किराती!॥
चिंतात आर्त खवुनी ननता विचारी । "माहेरिंचीं असति ना कुशलांत सारीं?!"
"आहेत सर्व कुशली." भगं कथून । तोही पुसे "स्वकुलिं सर्व सुखांत का न?"
कोठें पिता? सकलही जननी कुठें? गे! । सीता कुठें? मम कुठें प्रियबंधु दोघे?
स्नेहार्द्र पुत्रवच ऐकुनि कैकयीनें । नेत्रें करूनि अपुलीं करुणाश्रुपूर्णे ॥
हे पापिणी वदनि जें भरतासि सांग । कीं विधिंउ कुणिं मनःश्रवणासि शूळ!

" मी सर्व गोष्ट अजि शानरलीच होती । झाली विचारि मज साह्यद मंथरा ती॥
बाळा ! परी विघडवी मधि काहिं घाता । घेती नरेन्द्र अमरेन्द्रपुरीय पन्था!"२१
तें ऐकताच भरतीं भरतो विषाद । भीतीहि, हस्तिमनि ऐकुनि सिंहनाद ॥
'हा! तात! तात!' म्हणुनी भुरिं फोडि टाहो।दुःखार्तिव्याप्रति हृदीं अति उत्कटा हो
शोकें पडे धरणि आर्त अतीव चित्तीं । बोले " न तात!' मज भेटे दिलीत अंतीं!
मार्ते हि रामकरिं सोंपविलें न तात!" । ऐसा करी भरत शोक जया न अंत २३
धैर्ये पुन्हा उठुनि सावरुनी निजांगें । बोले " कसें मरण ये पितयासि, सांगें "॥
तें आयकोनि कथिलें झणिं कैकयीनें । साद्यन्त वृत्त सगळें घडल्याप्रमाणें २४
ती पापिणी मुदितचित्त समस्त वर्णी । आर्द्रमना धुवुनि कीं भरि ती विरानी! ॥
तें ऐकता गमन काननिं राघवाचें । तो तातमृत्युसहि विसरलाच साचें! २५
मानोनि आपणचि कारण सर्व विघ्ना । तो स्तब्ध राहि अतिखिन्न, धरूनि मौना ॥
शोकार्त पाहुनि तया समजावि माय । कीं दग्ध अंगिं जणु लावित मीठ काय !! २६
" बाळा ! नृपास्तव तुझा नच योग्य शोक । सेवीयला नृपवरें निजपुण्यपाक ॥
केलें तये सुचरितीं निजजन्म सार्थ । अतीं गती मिळविली सुरमंदिरात ॥२७॥
मानूनि हें त्यज सख्या! निज शोक पूर्ण । साकेतराज्य परिपाळ सुखें करून!"॥
हें वाक्य राजतनया भय वेदना दे । पक्व क्षतीं जळन कोलित कोणि कोंदे! २८
निःश्वास टाकुनि सुदीर्घ धरूनि धीर । रागें वदे भरत " पापिणि! तू अघोर!
केला तुवा स्वकुलनाश अनेकरीतीं । ना वर्णवे तव रुची करिती अकीर्ति २९
का जन्मताच मज तू वधलेंस गे! न? । सिंचीसि पङ्क, करूनि मुखा विदीर्ण!
सपूर्ण पाणि उपसूनि कशीं पहासी । मीनासि जीवन सुरावह व्हावयासी!! ॥३०॥
रविसम कुल, दशरथसम तात, मला बधु रामलक्ष्मणसे ॥
आई! तूं जननी ही!! विधिवरि सत्ता कधींच चलत नसे! ॥३१॥
दुष्टे! तुझ्या हृदयिं ती कुमती उदेली । तेव्हाच का फुटुनि तच्छकलें न झाली!
ते मागता वर न काढलि जिव्हि खल? । जिह्वा झडून पडले न किडे मुखात? ३२
विश्वासुनी तुजवरी नृप शाहि केला? । तन्मृत्युकालिं घडवी जिचि बुद्धिनाशा!
नारीमना विधिहि आकळु तो शकेना । यास्त्रिया अवगुणां, कपटां, अघांना
राजा सुशील ऋजु धार्मिक सुस्वभाव । स्त्रीचा कसा उमगणार तयास डाव? ॥
हो जीव जनु तरि कोण असा जगात? । चित्तात ज्या प्रिय न राम असे यथार्थ?
श्रीराम, ज्या तुजसि वाटतसे असे गे! । ती तू असी अधमि तें तरि कोण, सांगें ॥
तू ऐस ऐश्वर्यिल ती, परि तोड काळें । येथूनि तू कपनि वेच दुरीं निराळें!! ॥३५॥

रामा विरोधिहृदया तुझिया कुशींचा । केलें असें विधिकरें हतभागि साचा ॥
त्या माझिया सम नसे नच अन्य पापी।आतां वदून उपयोग नसे, तथापि।" ३६
पाहोनीयां आइची शाठ्यवृत्ती । शत्रुघ्नातें रोष ये फार चित्तीं ॥
क्रोधाग्नीनें अंग संतप्त झालें । त्याचें तेथें मात्र कांहीं न चाले ! ॥३७॥
कुब्जा तयाक्षणिंच आलि तया समोरी। भूषा-सुवासि नटली विविध प्रकारीं
तें लक्ष्मणानुज अतीवचि रुष्ट झाला । लाभे घृताहुतिच काय हुताशनाला !
संरुद्ध हाणि तिज तो कुबडांत लाथ । ती आरडे पडत तोंडघशीं मयार्त॥
तीचें तुटे कुबड, खोक पडे कपाळीं। दन्तावली पडलि वाहत रक्त खालीं!३९
ती ओरडे रडत "हाय! नशीब माझें!।माझ्या भल्या कृतिस हें फल काय साजे!
या काय घात करिं मी ? मम चूक काय ?। राणीस सेवन रुजूं मम नित्य होय।"
शत्रुघ्न तें परिसुनी, शठ तीस मानी । ओढी तिला फरफरां कवळून वेणी। ॥
तैं सोडवी भरत दीनदयाळ तीतें । जाती पुढें उभय बंधुहि राममाते ४१
दिसे तैं कौशल्या मलिनवसना म्लानवदना ।
हृदीं जी दुःखार्ता अतिकृशतनू शोकसदना ॥
सुवर्णाची जाणों गमलि वनिं ती कल्पलतिका ।
तुषारांच्या वर्षें अतिशय भरें झोडियलि कां ! ॥४२॥
कौसल्या तैं बघुनि भरता त्याकडे धावुं लागे ।
तों मूर्च्छेनें पडलि अवनी घेरि येवोनि भागें ॥
तें पाहोनी भरतहि मनीं आर्त होऊनि भारी ।
लोळे तीच्या पदिं, विसरुनी देहमानादि सारीं ! ॥४३॥
बोले "कोठें मम जनक गे ? दाखवीं वेगिं माते ! ॥
कोठें सीता ? बंधु तरि कुठें राघवा लक्ष्मणातें ? ॥
कैकेयी ही उपजलि तरी कासया या जगांत ?
जन्मोनी ही कशि नच बरें जाहली वांझ येथ ? ॥४४॥
हा मी जन्में उदरिं जिचिया सूर्यवंशा कलंक ।
द्रोही झालों प्रिय मम जना दुर्यशा राशि एक ॥
माझ्या ऐसा त्रिभुवनिं दुजा कोण दुर्भागि आहे ? ॥
ज्याच्या योगें तव गति अशी जाहली माय गे ! हे ॥४५॥
स्वर्गा धाडीं, प्रिय मम पित्या, कानना रामरायां

सर्वानर्था सकलपरिनीं हेतु मी एकला या ॥
धिग् धिग्जातें ! दहन पडवीं वेणुच्या मी वनासी ।
दु खा, तापा, असह अयशा जाहलों पात्र दोषी ! " ॥ ४६ ॥
कौसल्येच्या श्रवणिं पडता दीनवाण्या मृदूक्ति ।
सभाळोनी उठुनि भरता घे उरीं प्रेममूर्ति ॥
आलिंगोनी करि शिरिं तया सेक ती आसवानीं ।
हृष्ट झाली, जणु वनिंहुनी राम आलाचि मानी ! ॥ ४७ ॥
कौसल्येतें सरलहृदयें स्निग्ध शत्रुघ्न भेटे ।
तेव्हा तीच्या हृदयिं अमित प्रीति शोकादि दाटे ॥
ती पाहोनी ऋजुमति तिची बोलिले सर्व लोकीं–
" श्रीरामाची सदय जननी उत्तमा व्हायची कीं ! " ॥ ४८ ॥
माता अर्शी तनय–भरता आपल्या वैखरीनी ।
डोळ त्याचे पुसुनि वदली कोमला चारुवाणी ॥
" वत्सा ! धैर्या हृदिं धर अर्जी, शोक टाकूनि देई ।
दुष्टा वळा समजुनि मनीं ना गणीं हानि काहीं ! ॥ ४९ ॥
ही कर्मकाळगति आकळली न जाय । दऊनि दोष दुसऱ्याप्रति होय काय ?
सर्वोपरीं मजवरी अतिरुष्ट धाता । ठेवी जिवत, न कळेचि भविष्य चित्ता !
पितृनिदेश तो ऐकताक्षणीं । वसनभूषणें सर्व टाकुनी ॥
त्यजुनि हर्ष वा शोक अतरीं । चीरवल्कलें राम पेहरी ॥ ५१ ॥
हृदयिं अल्प ना लोभ राग वा । मुखिं विराजला हर्ष राघवा ॥
सकल लोपवी सर्व रीतिनीं । समजवी जना गोड बोलनी ॥ ५२ ॥
विपिनि चालले नाथ जाणुनी । जनकजा चले संगिं काननीं ॥
प्रभुपदाब्जिंची रागिणी प्रिया । कवि रहावि ती सोडुनी तया ?॥५३॥
परिसताच तें लक्ष्मणें भलें । रघुवरासवें रान सेविलें ॥
समजवू बघे त्यासि राघव । परि न घेचि तो अतरीं लव ॥ ५४ ॥
नमुनिया पदीं सर्वही जनां । त्वरित चालले राम कानना ॥
सहित जानकी, बधुलक्ष्मण । प्रविशती मनीं सत्यभाषण ॥ ५५ ॥
बघुनिया वनोदेशिं जातया । रघुपजानकीलक्ष्मणां तया ॥
गमन त्यासवें मी न आचरीं । अजुहि राहती हे मदतरीं ! ॥ ५६ ॥

सकल देखिलें म्या विलोचनीं । परि जगेंचि ही मी अभागिनी ! ॥
मजसि खंत न, प्रीति ती कुठें ? । तनय रामसा, मी प्रसू कुठें ?
जनन तेविं तें प्राण टाकणें । नृपवरें वरें जाणलें गुणें ॥
मदुर मात्र हें शतगुणे दिसे । कठिणतेमधें इंद्रवज्रसें ! । " ५८

कौसल्योक्ती भरत परिसे, तेविं अंतःपुरीय ।
नारी साऱ्या परिसति, मनीं शोक त्यांचा अमेय ! ॥
नोहे त्यांच्या करुणरुदना व्याकुलत्वा तुळाही ।
शोका एका सदन गमला राजवाडा तयाही ! ॥ ५९ ॥

— इति श्रीराम० श्रीअयो० भरतशोकवर्णनं नाम तृतीयस्तरङ्गः —

## तरंग ४ था

तेव्हां विलाप करिती भ्राते ते विकल भरतशत्रुघ्न ॥
कौसल्येनें त्यांतें धरिलें कवळूनि हृदयसंलग्न ! ॥ १ ॥
समजवि अनेकपरिनीं भरता ती सगुनी विवेककथा ॥
इतरहि सांविति माता कथुनि कथा स्मृतिपुराणिंच्या अचिता ॥२॥

तैं बोलला भरत जोडुनि आत्मपाणि । वाक्यें मनोज्ञ ऋजु निष्कपटात्मवाणी ॥
" माते ! असेल जर यामधिं अंग माझें । माझ्या पडोचि शिरिं पातकपूर्ण ओझें ! ३
जें पाप तातजननीसुतघातक्यासी । जें धेनुगोत्र करि दग्ध अशा नरासी ॥
जें विप्रसद्मपुर जाळतया सुदुष्टा । स्त्रीबाल यांसि वधित्या अघ जे विनष्टा ४
जें मित्रभूप-परदाराप्रति पाप लागे । जीं पातकें लघुगुरू स्मृतिशास्त्र सांगे ॥
जीं देहवाक्कृति अशेष घडूनि येतीं।माझ्या पडोत अजि मस्तकिं पातकें तीं !
हरिहरचरणातें सोडुनी भूतखेतां । भजति जन तयां ये दुर्गती जी समस्तां ॥
मजसि जननि येवो ! दुर्गती ती अघोरा । जर मम कर कांहीं लागला या प्रकारा !

जे वेदां विकिती, स्वधर्म दुहिती, स्वार्थार्थ जे दुर्मति ।
लोकां सांगति अन्यपापकुकृती दुष्कीर्ति संचारिती ॥
क्रोधी वक्रगती, जगासि छळिती, ज्या अन्यदारा मतीं ।
त्यांची पापतती असो मजसि ती, माझी जरी हे कृति ! ॥७॥
वेदां दूषति लुब्ध लंपट अती पापां न ज्यांच्या मिति ।
ज्यांतें ना परमार्थि आवडि, रुचे ज्यांतें न सत्संगति ॥

सेवीती यश जे न शंभु-हरिचें मानव्य आलें तरी ।
त्याचें पाप मदीय मस्तकिं पडो मी दुष्टकार्यी जरी ! ॥८॥
दुरुत्युक्त सुपथा मति त्यजुनिया ज्या वाममार्गी रुचि ।
वेषानेंच जगास जे फसविती जे दुष्टधी फारचि ॥
ऐशांना गति जी मिळे, मजसिही देवोत ती शंकर ।
कैकेयीकृतिवृत्त संमत असे मातें जराही जर!" ॥९॥

ऐकें माता भरतवचनें प्राजलें सत्यसार ।
बोले "वत्सा ! तनुमनिं वचें रामि तू रंगशी रे ! " ॥
प्राणाचाही असत तुझिया प्राणसा रामराय ।
रामा प्राणाहुनि दयित कीं तूंचि अत्यंत होय ! ॥१०॥

वर्षेल चंद्रहि निंपं, हिम अग्निदाहा । पाण्यासि वारिचर मानिल शत्रुगेहा ॥
शानेंहि राहिल कधीं तरि मोह चित्तीं । रामासि तू कधि न होशिल शत्रुमूर्ति
आहे तुला कर कुकार्यि म्हणेल जो कीं। स्वप्नींहि त्यास सुख सद्गति नेव लोकीं"
बोलूनि हें धरि तया हृदयासि आई । पान्हा फुटे तिजसि, लोचनिं अश्रु वाही!
ऐसा अतीव करतां करतां विलाप । रात्री सरे तदिच बैसुनियां समीप ! ॥
आले तिथें मग वसिष्ठ सवामदेव । आमन्त्रिती सचिव थोर जनादि सर्व॥१३॥
तेव्हां ऋषी बहुपरीं भरता कथीती । योग्या मनोज्ञ परमार्थकथा सुरीती ॥
ते सांगती "धरिं हृदीं भरता ! सुधीर । जें योग्य आज करणें करतेंचि.धाम
आला प्रसंग अनिवार्य असाच धारा । सत्त्वाढ्य तू विसरशील न सद्विचार॥"
त्या ऐकतां मुनिवचा भरतें उठोनी । केलें यथाविधि समादिशलें गुरूनीं १५
दर्शविकथित विधींनीं न्हाणुनी भूपदेहा । अतिसुभगविमाना निर्मिलें देहवाहा॥
पदिं भरत नमूनी गहवी सर्व माता । रघुवर वधु ऐसा हेतु त्यां राहवीता !
आणीवले अगरुचंदनभार मोठे । वस्तू अनंत अतिसुंदर गंधदाठे ॥
केली चिता सरयुकांठि महाविशाला । सोपान की, सुरपुरासि चढावयाला !
ऐसी यथाशास्त्र करूनी दहनक्रिया ती । स्नाना करून निधियुक्त अतीवभक्ति॥
देती तिलांजलि, विलोकुनि वेदमार्ग । केलें विधान भरतें, दशगात्र सांग१८
जेव्हां जसे मुनिवरें कथिले निदेश । तेव्हां तसे करि सहस्तरीं विशेष!!
शय्या विशुद्ध वितरूनि अनंत दानें । धेनूसहस्रि वरवाहनसंविधानें १९
दान दिलीं भरतानें सिंहासन-रसन-भूषणादानें ॥

भूदानें गृहदानें विप्रांचीं पूर्णकाम केलिं मनें ! ॥ २० ॥
जनकहितास्तव भरतें केली जी अमित पुण्यकर करणी ॥
लक्षमुखांनींही ती वर्णायातें अशक्य हो धरणीं ॥ २१ ॥
याहूनि नंतर मुहूर्त वसिष्ठ येत । आमंत्रिती सुजन, मंत्रि समग्र तेथ ॥
एकत्र भव्यमति राजसभा मिळाली । आमंत्रिले भरत, बंधुहि एकमेळीं॥२२॥
वसिष्ठ भरताप्रती बसवि आपणांसन्निध ।
सुनीतिमय धार्मिकीं वचनिं बोलला तो बुध ॥
कथी प्रथम वर्णुनी कुटिल कैकयीची कृति ।
प्रशंसि अति सत्यता, नृपतिची सुधर्मी रति ॥ २३ ॥
तयांस्तव कसे असु त्यजियले नृपानें वदे - ।
प्रशंसि गुणधाम ता रघुवरस्वभावा मुदें ॥
भरे सलिल लोचनीं पुलकितांग हो तो मुनि ।
रघूत्तमगुणस्तवीं गहिंवरें भरे बालुनी ॥ २४ ॥
श्रीरामचंद्रपदिं लक्ष्मण आणि सीता । जे प्रीतिनें रमति ते मुनि वर्णु जातां—
ज्ञानी मुनीन्द्रहि वसिष्ठ निमग्न होई । हृत्प्रीतिभक्तिरसिं, शोकभरीं अमेयीं!२५
अत्यार्ते बोलत मुनी " भरता ! परा हे ! अत्यंत रे ! प्रबलसें भवितव्य आहे॥
आहे विधातृकरिं सर्वहि लाभहानि । हे प्राण वा मरण, कीर्ति अकीर्ति दोनी !!२६
ऐशाविचारिं मग दोष कुणास द्यावा ? । कां व्यर्थ रोष दुसऱ्यावरतीं करावा ? ॥
वत्सा ! विचार करुनी बघ तूं मनांत नोहेचि शोच्य नृपती तव पूज्य, तात !२७
हो शोच्य विप्र विषयामधि जो निमग्न । जो वेदशून्य निजधर्महि दे त्यजून, ॥
तो भूप शोच्य, न जया कळते सुनीति।नोहे प्रजा प्रिय जया निजजीवशी ती२८
श्रीमंतही कृपण शोच्यचि वैश्य तो कीं। जो यावकीं विमुल भक्ति न ज्या नृपांकीं
विप्रापमानकर शोच्यचि होय शूद्र । जो ज्ञानगर्वि अतिमानि, बदाईखोर २९
तो ब्रह्मचारि बहु शोच्यचि सर्वकाळीं। आत्ममतां, गुरुनिदेशहि जो न पाळी३०
अज्ञानमोहवश जो त्यजि कर्ममार्ग । तैसा गृहस्थहि गमे मज शोच्यवर्ग ॥
ना ज्या विरक्ति, न विवेक असा यतीही।जो हो प्रपंचिं रत तो अतिशोच्य पाहीं
तो शोच्य वैखानस जो तपातें । त्यजूनि भोगांत रमे स्वचित्तें ॥
तोही दुरात्मा अतिशोच्य वाटे । अकारण क्रोधि करीत तंटे । ॥३२॥
परपरकारीअति शोच्य तोही । जो द्रोहि मातापितराधि होई ॥

गुरूसि वधूसिहि जो विरोधी । तोही तसा शोच्यचि दुष्टबुद्धि ॥३३॥
स्वपिंडपोषी करुणाविहीन । अत्यंत तो शोच्य खलोपमान ॥
सर्वां परी शोच्यचि तोहि भारी । निर्दंभ जो भावितना मुरारी॥३४॥
अशोच्य तो कोसलराजमूर्ति । व्यापीत चौदा भुवनें स्वकीर्ती ॥
त्वत्तातशा ना भरता! क्षितीश । झाला, न होणार, नसेचि लेश!३५
ब्रह्मा महेश, हरि, इंद्र दिशाधिनाथ । सारेहि ते दशरथाप्रति श्लाघितात ॥
ते वर्णिती सुगुण कीर्ति तदीय भोंवें । वाटे तया दशरथोत्तमपुण्य गावें ३६
श्रीरामलक्ष्मण, तशापरि तू, अरिघ्न । हे ज्यास पुत्रवर सत्तम पुण्यमग्न ॥
भूपोत्तमा, दशरथाप्रति त्या विशेष । वर्णावया कवण शक्य असे कवीश? ॥
साऱ्या प्रकारिं नृपकौस्तुभ तो सुभागी । ना शोक याग्ये तुज होइल त्याजलागीं॥
मी सांगतों परिस तें त्यजुनी विषाद । आज्ञा नृपोक्त करुनी अर्जि पुण्य साध ३८
भूपें दिलें तुजसि राज्य वराप्रमाणें । तूं सत्य तो कर निदेश दिला पित्यानें ॥
राम! त्यजी वचन सार्थ करावयास । त्याच्या वियोगदहनीं करि देहनाश३९
प्राणाहुनीहि अधिक प्रिय ज्या स्ववाणी । त्याच्या प्रमाण भरता! सरलोकि मानीं
तू शीर्षरत्न समजें नृपसत्तमोक्ति । कल्याणकारि सगळ्यापरि हे सुयुक्ति ४०
आज्ञापिलें परशुराम करी पित्यानें । मातेसही वधित तो, जग साक्षि त्याचें ॥
दे आत्मयौवनहि पूरु ययातिपाया । ना पाप ना अयश तातनिदेशिं ये या॥
जे पाळिती पितृनिदेश अयोग्य योग्य।शंका त्यजून, यश सौख्य तयास भोग्य॥
त्यानाच वास अमरेन्द्रनिवासिं लाभे। सत्पुत्र तातवचना करुनीच शोभे ! ४२
भूपोक्त सर्व करणें तुज योग्य आता । पाळीं प्रजा सुखिं न लावुनि शोक चित्ता
स्वर्गात भूपतिहि होइल तुष्ट तेणें । तूंतेंहि पुण्ययश हो, नच दोष येणें । ४३
हे सर्व सभत तसें दशरिनाहि मान्य । कीं त्यास राज्य, नृप ज्याप्रति दे वदान्य
ग्लानि त्यजून भरता ! कर राज्य तून । आज्ञा मदीय गण ही हितकारि साच।
ऐकोनियां सुखित होतिल रामसीता । कोणी न पतितहि हो तुज दोषदाता
माताहि सर्व तुमच्या सुख पावतील । त्यातें प्रजासुखचि हो निजसौख्यमूल
प्रीती रघूत्तमिं तुझी सकलांस ठावी । त्यांनीहि सर्वपरिं तूज भलाइ चावी! ॥
येतांच राम, कर सादर राज्य त्यास । सेवीं तयास करुनी निजभक्तिशेष ! "
मंत्री वदा म्हणति जोडुनि अंजलीतें । " नाथा!अवश्य करणें गुरु सांगती तें॥

श्रीराम येतिल, तदा तुमच्या मना जें । येईल तें मग करा, समयास साजे ”
॥ इति श्रीराम० श्रीअयोध्या० श्रीवशिष्टोपदेशवर्णनं नाम चतुर्थस्तरङ्गः ॥

## तरंग ५ वा

कौसल्या तैं धर्मसंपन्न बोले । “ पथ्या आज्ञा श्रीगुरूंचीच मोलें ॥
मानोनीया आदरें ती हिताची । शोका टाकीं; जाण ही वेळ कैची !१
श्रीरामराय वनिं, भूपति जाय नाकीं,। वत्सा ! अशापरि तुझी तर भीरुता कीं
मंत्री, प्रजा, परिजनादि, समस्त माता। आधार त्यांस भरता ! तव एक आतां
जाणोनि दैव उलटे विकराल काल । ओवाळि मी असु तुझ्यावरुनी सलील ॥
घे धैर्य; आचारिं निदेशियलें गुरूंनीं । पाळीं प्रजा सकल पोर मुली करुनी ”
तैशी गुरूक्ति, सचिवोक्तिहि हर्षवाची । झाली जणों भरति कीं उटि चंदनाची
त्याहीवरी मृदुलवाग् जननीमुखींची । हृत्प्रीतिशील–करुणासरला सुखाची ॥
मातेची ती ऋजु करुणोक्ती ऐकुनि गहिंवरि भरत भरे ।
नयनपद्मिच्या बिंदुसिंचनें विरहांकुर उरिं नव स्फुरे ! ॥
पाहुनि भरतस्थिती तशी ती सकल विसरती निजभान ।
तुलसि म्हणे, ते वात्साणिति कीं, सप्रीतिस या उपमा न ! ॥५॥
धैर्या धरुनि हृदिं धर्मधुरंधरानें । जोडोनि युग्म करकंज निजांजलीनें ॥
सार्‍यांसि उत्तर सुयुक्तिक वाक्प्रवाहें । पीयूषभारभरितें भरतें दिलें हें ॥६॥
“ देती मला गुरुवसिष्ठ शुभोपदेश । जो मान्य सर्व सचिवा सगळ्याजनांस ॥
मातांहि दे उचित मानुनि तेच आज्ञा । मीही शिरीं धरित ती, न करीं अवज्ञा ॥
मातापिता गुरु मम प्रभु हे कथीती । सोत्साह हर्ष मज ती वितरी हितोक्ति ॥
तेथें धरून उचितानुचितत्व शंका । लोपेल धर्म; शिरिं येइल पापपंका ! ॥८॥
केला तुम्ही मजसि योग्यचि तो निदेश । तो आचरुनि मज उत्तम हो अशेष ॥
हें सर्व मी हृदयिं जाणतसें तरीही । अत्यंत तोष मज यामधि होत नाहीं ! ॥९॥
आतां तुम्ही विनवणी मम आयकावी । द्यावा मला मग निदेश तुम्हीं नुमावी ॥
कीजे क्षमा, विवरतो जरि उत्तरातें । ना आर्तदोष-गुण मानिति साधु कीं ते ! ॥
स्वर्गी पिता, वनिं रघूत्तम आणि सीता । हें राज्य तूं करिं असें मजही कथीतां ॥
हे मानतां मम हितास्तव यत्न सारे ! । कीं साधितां निजहिता तुम्ही सुप्रकारें ! ॥
श्रीरामचंद्रपदसेवन मद्धिताचें । तें अंतरे मजसि मातृघटत्वि साचें ! ॥

मी पाहतों बहुविचार करूनि चित्तीं। माझ्या हितास्तव दिसे मज नान्य युक्ति।

सीता-लक्ष्मण-रामपादकमलां आलोकिल्या वांचुनी।
शोकागार असें मला रुचतसे ना राज्य कांहीं मनीं ! ॥
वस्त्रावांचुनियां अलंकृतिमरें शोभा कशाची बरें !।
कैंचा ब्रह्मविचार तो ! जर नसे वैराग्य चित्तीं खरें! ॥१३॥
रोगाक्रांत तनूस केविं रुचणें भोगादिकांचें सुख !।
कैचें योगजपादि ! ना जर हृदीं भक्ती हरीची निक ! ॥
कैंचा देह मनोज्ञ चारु म्हणणें ! निष्प्राण झाल्यावर।
मातें व्यर्थचि सर्वही गमत हें श्रीराम नोहे जर ! ॥ १४ ॥
रामासन्निध जावयाचि मजला आज्ञा तुम्ही द्या भली।
कल्याणप्रद एक हेंचि मजला होईल या भूतलीं ॥
राज्यीं वैसविण्या मला वदतसां ते आपुलाल्या हिता।
नोहे यांत विवेक; मात्र दिसते स्नेहार्द्रता, अज्ञता ! ॥१५॥

निर्लज्ज दुष्टमति नंदन कैकयीचा। रामासि जो विमुख त्या मज हर्ष कैंचा ॥
आकांक्षिता रुचिरलाभ तुम्ही सुखाचा। देऊन राज्यपद हें मज या मुनीचा॥
मी सांगतों मनिं धरा अजि सत्य जाणा। कीं धर्मशीलचि हवा जगिं लोकराणा ! ॥
हें राज्यदान जर द्याल हठेंचि मातें। जाईल तत्क्षणिं रसातळिंच क्षमा ते ! ॥१७॥
माझ्या समान जगिं अन्य न पापकर्ता। जाती यदर्थ वनि लक्ष्मण रामसीता ॥
रायें जरी वितरला वनवास रामा। गेला असह्य विरहें नृप देवधामा ! ॥१८॥
मी मात्र हा सकल कारण या अनर्था। येथें जिवंत परिसें सकलहि वार्ता ! ॥
देखोनिही रघुपतीविण मंदिरा या। निंदा सहात जगतो जगिं या असह्या ! ॥१९॥
पुण्यात्म राम, विपर्यी सगळ्या विरागी। भोगास लोलुप नृपाळ विलाससंगी ॥
काठिन्य मद्हृदयिं हें मज वर्णवे न। जें वज्रगर्वहि हरील तया हसून ! ॥२०॥
हो कारणाहुनिहि कार्य कठोर साच। यामाजिं दोषहि मदीय असा नसेच ॥
अश्मीहुनी कुलिश होय कराल फार। तैसेंच लोह उपलाहुनि हो कठोर ! ॥२१॥
कैकयीनें जन्म ज्यातें दिलासे। त्या मत्प्राणां देह माझा विशेषें ॥
दुर्भागीही पामरां याकवेना। अल्पासक्ती एकमेकां समाना ॥ २२ ॥
श्रीरामाचा होउनीही वियोग। प्राणांदेहा वाटतो तो प्रियोग ॥
देव्हां वाटे आम्हं या दर्शनीय। या प्राणांचें फार अयारि होय ! ॥२३॥

सीताराघवलक्ष्मणां दवडिले कांतारिं भल्यांसही ।
स्वर्गातें हितकारणें, निज हितें वैधव्य केलें महीं ! ॥
दुष्कीर्ती मिळवूनि शोकदहनीं सारी प्रजा पोळुनी ।
कैकेयी मज राज्यसौख्य सुयशे देई सुधन्या जनीं ! ॥ २४ ॥
ऐसें हें मजसाठिं सर्व घडलें आहे भलें, त्यावरी ।
देतां राज्य मला तुम्ही, मज गमे ही मात हो साजरी ॥
कैकेयीजठरांतुनी निपजलों त्या हे नसे वाउगें ।
धाता साधत हें समस्त जन हो ! कां मल ? शहा उगे ! ! ॥२५॥
आधीं ग्रहग्रसित त्यावरि वात झाला । विंचू तयांत डसला असल्या जनाला ॥
त्यातें पुन्हा पिववली मदिरा विशेष । याहून काय उरला उपचारशेष ? २६
कैकेयीतें विशेषत्वें शोभावा मीच नंदन ॥
योजना चातुरीपूर्ण साधी ही चतुरानन ! ॥ २७ ॥
राजा दशरथाचा मी पुत्र ही थोरवी मला ॥
रामानुज अशीही तो द्यावया व्यर्थ शीणला ! ॥ २८ ॥
राज्याभिषेक मज मी करवून घ्यावा । आदेशही नृपतिचा हितकारि ठावा ॥
ऐसें यदा तुम्हि किती हि; तुम्हांस कैसें । मी देउं उत्तर परोपरिनें विशेष ? ॥२९॥
मी आणली खलमती जननी मदीया । यावांचुनी करिल कोण कृती 'भल्या' या ?॥
माझ्याविना जगिं चराचरिं कोण वर्ते ? सीतारघूत्तम न ज्या प्रियजीवसे ते ! ॥
हानी अती म्हणतसा तुम्हि लाभ साचा । माझा कुकाल ! न तुम्हाप्रति दोष याचा ॥
जें बोलतां उचित तें सगळें गणावें । हृत्प्रेम दृश्यहि, कारण त्या म्हणावें ! ३१
श्रीराममाता सरलस्वभाव । माझ्यावरी प्रीति तिची अतीव ॥
पथून माझी स्थिति दीनवाणी । असेल ती बोललि तेविं वाणी ! ३२
ज्ञानी जगद्विदित जाणति विश्व सारें । जे हातिंच्या बदरसें गुरु ते विचारें ॥
झालेत सिद्ध मम राज्यपदाभिषेकीं । होतीच सर्व उलटे ! विधि वाम जो कीं ! ३३
सीतारघूत्तमविना न दुजें कुणीही । बोलेल मात मम अंग मुळींच नाहीं ! ॥
ऐकून तद्रूप मुखें मग मी सहीन । पाणी तिथें चिखल हो; न तयाविहीन !
मातें न भीति जग नीच म्हणेल ऐसी । चिंचीदि मी न परलोकसुखाभिलाषी ॥
जाळीत दुःसह दयार्णविं हाच चिंता । माझ्यामुळें विपिनिं दुःखितरामसीता !
केलें कृतार्थ निजजीवन लक्ष्मणेंच । सर्व त्यजून धरि रामपदाब्ज साच ! ॥

मज्जन्म मात्र रघुनाथवनार्थ होता । दुर्भाग्य मी उगिच दर्शवि दुःखचिन्ता !!
सर्वांस मी विनतशीर्ष नमूनि बोलें । जें तीव्र दुःख मम आंतरभागिं पोळे ॥
श्रीरामचंद्रपद पाहियल्याविना न । जाणार दाह मम हा कधिंही शमून!॥३७॥
कांहींच ना सुचतसे दुसरा उपाय । जाण रघूत्तमाचि-मन्मन चिंति काय? ॥
ही एक आस मम अंतरिं वासकर्ती । जावें प्रभातिं बघण्या प्रभुराममूर्ती ३८
आहें जरी खचित मी अपराधि दुष्ट । माझ्यामुळें रघुवरा जरि सर्व कष्ट ॥
प्रत्यक्ष पाहुनि मला शरणागतासी । प्रेमें क्षमा करिल राघव दुःखनाशी !॥३९॥
सर्वोच्चशील ऋजुसुंदरभाव राम । सत्प्रीतिमूर्ति करुणावरुणैकधाम ॥
शत्रूसही अहितकारि न रामराय । मी बाळही तरि न सेवक बाल काय? ॥४०॥
हो श्रेष्ठ पत्र ! तुम्हिं मंडित जाणुनीया । आज्ञा अभीष्ट मज चिंतुनि द्या स्वकीया ॥
कीं ऐकुनी विनवणी मम, राम नेथ । यावेत या नगरितें सकला समेत !॥४१॥
दुष्टेचिया उदरिं यद्यपि जन्मजात । आहेंच मी शठ सदूषण, पापमूर्त ॥
मातं गणून अपुला, मज रामराय । त्यागील ना; भरवसा मज साच होय !" ४२
॥ इति भरतस्योत्तरवचनवर्णनं नाम पञ्चमस्तरङ्गः ॥

## तरंग ६ वा

सर्वांतें हीं भरतवचनें वाटलीं भक्तिशालीं ।
रामप्रेमामृतसुचिरस पूर्ण ओथंबलीं ॥
श्रीरामाच्या विरहविषम दुर्विषें दग्ध झाली ।
ती सन्मंत्रें ज्यु जिववली बोलसुकें जनाली !॥१॥
माता सान्या गुरुसचिव ते पौर नागरिकादि ।
सारे स्नेहें विकलहृदयीं जाहले त्या मुहूर्तीं ॥
त्यांनीं तेव्हा बहुत भरता वानिलें चोहुनीया ।
कीं, " तू मूर्ता अतुल भरता ! रामभक्ती अमया ! ॥२॥
तू एसें का न यशःशर ! प्राणसा राघवाचा? ।
होशी तूंचि प्रियतम तया सज्जनीं ठोप केंचा ? ॥
जो कैकेयीदुरित कलित दु ना वहल तूंतें ।
तो नीचाला दकलि नरकी पूर्वजांत रहतन ! ॥३॥
वेद वेही नरकघना कल्पर्यंत भोगी ।

निंदोनीयां तुजसि कुटिला कैकयीच्या प्रसंगीं ॥
ना सर्पाच्या अवगुणगणा घे मणी तच्छिरींचा ।
दुःखा दैन्या हरणि मणि तो तद्विषा नाशि साचा ! ॥४॥
श्रीरामातें सकलहि अम्ही जाउंया काननान्तीं ।
वाटे योग्या अतुल भरता ! त्वां दिली कल्पना ती ! ॥
जे हे आम्ही विकल बुडतों शोकसिंधूंत सारे ।
तारायां हे अनुपम दिली त्वांचि नौका तयां रे ! " ॥ ५ ॥

सर्वांस तें हृदयिं हर्ष अतीव झाला । कीं एकि मेघरव चातकबर्हिमाला ॥
'उद्यां प्रभाति निघु' या शुभनिश्चयानें । प्राणापरी भरत हो प्रिय त्यांसि तेणें ॥
वंदी मुनीशि भरतासहि नम्रशीर्ष । घेतां निरोप, जन जात गृहा अशेष ॥
'संसारिं हो भरतजीवन धन्य धन्य!'। वानीत ते भरतशीलरती अनन्य ॥७॥
अन्योन्य ते वदति थोरचि कार्य झालें । सारे सुसज्ज गमनास्तव होउं गेले !
जे गेहिं राहिवले गृहरक्षणार्थ । त्यांना गमे, चिरित कंठ कुणी कृतान्त ! ८
कोणी तदा म्हणत उत्सुक रामभेटीं। ' कां ठेवणें उगिच कोण गृहांत पाठीं ? ॥
कोणास वाटत नसे जगतीतलांत । व्हावें कृतार्थ निजजीवन पुण्यवंत ! ॥९॥
" हीं हो जळोत धन वैभव सौख्य आप्त।माता, पिता, स्वजन, बंधु जगीं समस्त ॥
जीं रामचंद्रपदलाभ घडावयातें । होतीं न साह्यकर उत्सवयुक्तचित्तें? ॥१०॥
सर्वांपरी करिति सज्ज अनेकयानें । अन्यां प्रहर्ष कि उद्याच सकाळि जाणें !
जाऊनि गेहिं भरता मनिं ये विचार। संपत्तिचा प्रभु रघूत्तम एक वीर ॥११॥
भांडार, सद्म, गज, वाजि-पुरादिकांसी । सभाळ योग्य करुनी निघणें प्रवासीं
ना रक्षितां जर निघूं, परिणाम वाम । पापिष्ठ मी प्रभुसि शल्य ठरेन अशीम !॥
जो स्वामिचें हित करी शुचि लोक दास । कोठीहि कोणि दिधले जरि दोष त्यास ॥
ऐसा विचारि गुणि सेवक बोलवी तो। स्वर्गींहि ज्या न निजधर्म अलेख्य होतो ॥
त्यांना कथी सकलकार्यमहत्त्व साच । जो ज्या सुयोग्य कथि त्याप्रति कार्य तेंच ॥
संरक्षणार्थ विनियोजुनि लोक ते ते । भेटावया भरत ये झणि राममातें ॥१४॥

कौसल्यादी सकलजननी क्षीण दुःखार्ततेनें ।
आणोनीयां चतुरभरतें उत्तमें केंडि यानें ॥
बोलूनें त्यांना गमन करण्या पालख्या सांगवी तो ;
स्नेहाचा तो भर भरतिंचा वर्णण्या केविं येतो ? ॥ १५ ॥

पौरांगना आणिक पौर लोक । की चक्राकी खगचक्रवाक !
पहाट केव्हा उजडेल वेगे । सोत्कंठ ते वाट पहात जागे ! ॥ १६ ॥
प्रभात होता भरत स्वमंत्री । सुजाण सारे जण तो निमंत्री ॥
आज्ञा करी त्याप्रति वस्तु घ्याया । राज्याभिषेकास्तव योजनीया ॥ १७ ॥
" वसिष्ठ रामा अभिषेचतील । वनींच राज्यावरि पुण्यशील " ॥
मंत्री तदा वेगिं नमस्करोनी । सुसज्जले अश्वगजीं रथानीं ! ॥१८॥
अरुन्धती आणिक अग्निहोत्र तें । वसिष्ठ घेती पहिल्याच सद्रथें ॥
तैं घेतले विप्र अनेक वाहनीं । तपोद्युतीनें भरले तनूमनीं ॥१९॥
समग्र ते वाहनिं पौर बैसुनी । श्रीचित्रकूटाप्रति चालले वनीं ॥
राखी निघाल्या त्रिविक्रमधूनी । ज्या दर्शनीया नयनासि तोषणी ॥२०॥
तें सोपवोनी नगरा सुसेवकीं । घालोनि सारीं अपुल्यापुढें निकीं ॥
स्मरोनि सीतारघुनाथ सयुत । शत्रुघ्नसंगे भरत क्रमी पथ ! ॥२१॥
ते सर्व नारीनर रामदर्शना । जाती समुत्कंठितचित्त कानना ॥
वाटे जणों कीं करिणी करीच ते । जळाशयातें निरखूनि चालते ! ! ॥२२॥
श्रीराम सीता वनिं पायिं चालते । वायेनिया अंतरिं भावलेल ते ॥
शत्रुघ्न तैसे भरत स्वमार्गं ही । पायींच ते आक्रमु लागले मही ! ॥२३॥
भक्ती तशी ती अवलोकुनी जन । गेले मनीं ते अनुरक्त होउन ॥
ते चालती त्यागुनि आत्मवाहनें । रथादिकें वाजिगजादि भक्तिनें ! ॥२४॥
कौसल्या तैं भरतजवळीं पालखी थांबवोनी ।
त्यातें सांगे निकट रिघुनी बोलुनी मंजुवाणी ॥
" ओवाळीं मी तनु तुजवरीं; बैस वत्सा ! रथात ।
होती दुःखी प्रियजन तुझे चालताना पथांत ! ॥ २५ ॥
पाहूनि तूतें निजपायिं चालतां । हे लोकही चालति तेंवि गा ! पथा ।
परंतु ते शोकभर कृशांगसे । चालावया शक्त न होति साहसें " २६
आज्ञा शिरीं धरि तदा नमुनी पदातें । मातेचिया भरत सानुज भाविकेंसें ॥
ते दोन बंधु चढुनी बसती रथात । पैशापरी सकल तो पथ आक्रमीत ! २७
केला नियास पहिला तमसातटासी । होती दुजा दिवसिं गोमतितीरवासी ॥
श्रीरामकारणिं कुणीं मन नेम केले । त्यागोनि भोग, निजभूषणजात त्यांलें २८
आहार घेति पय या फलमात्र कोणी । रात्रींच केवळ कुणी नियमव्रतांनीं ॥

तेथून ते शरयुच्या तटिं येति वासा । राहोनि रात्र निघती पुढतीं प्रवासा॥२९॥
ते शृंगवेरपुरसन्निध सर्व आले । येतांच ते, सकलवृत्त गुहा कळालें ॥
तेव्हां निषादहृदयीं भरला विषाद । झाला सचिंत मनिं तो गुह गूढबोध ! ३०
"हा कासया भरत येत असे वनासी ? । व्हावेंच कांहिं कपटात्मक चित्तवासी
होतें न कांहिं कुटिलत्व तयांत लेश । कां पाहिजे कटक संगतिं हें वधास ! ?
त्या वाटतें वधुन लक्ष्मणराम याना । निष्कंटकें मिळवुं राज्यसुखादि नाना ॥
ध्यानीं न घे भरत जाणुनि राजनीति । तेव्हां कलंक, अजि जीवनहानि होती !
सारे सुरासुर मिळूनहि झुंझ यावा । रामासि येति तरि शक्य नसे जिणाया ॥
आश्चर्य ना भरत हें करि, यात कांहीं । पीयूषपूर्ण फल दे विषवल्लि कायी ? "
ऐसें म्हणून गुह सांगत आप्तलोकां। "व्हा सज्ज सर्वजण हो! अजि शस्त्र घेउनी ,
बस्त्रासचेंचि बुडवा सगळ्याहि नौका। घाटांवरी उतरुं द्या न कुणाच, देखा! .
व्हा सावधान झणि रोधुनि सर्व घाट । व्हा सिद्ध नीट मरण्या रणरंगिं धीट!
घ्या शस्त्र ! या न भरता उतरूंच गंगा । आम्हीं जिवंत तंवरी करुं शस्त्रभंगा
मृत्यू रणीं, सुरसरित्तटिं त्यावरी हा । श्रीरामकार्यिं विलय क्षणभंगि देहा ! ॥
श्रीरामबंधु भरत प्रभु, नीच मी तों । ऐसा सुयोग शुभदैविंच पाविजेतो ! ३६
जें स्वामिकार्य करण्यास्तव युद्ध घोर । चौदाहि त्या भुवनिं सदयश फांकणार !
श्रीराघवास्तव मम त्यजुनी असूनें । आनंदमोदक करद्वयिं माझिया ते ! ॥३७॥
ज्यालें नसे रुचिरसाधुसमाजि मान । श्रीरामभक्त अदिही महती जया न ॥
तो हो निवंशपणिं माराचि कीं क्षितीचा । तो मातृयौवनतरूसि कुठार साचा ! "
यश्री विषाद मग सर्व निषादराय । उत्साह वाढवि जनांतरिंचा अमेय ! ॥
चित्तामधें स्मरुनि रामपदांबुजातें । तो वर्म मागवि तसे शरचापभातें ॥३९॥
सांगे सुसज्ज झणि व्हा ! न फिराचि मागें । आज्ञा तुम्हां करित मी हृदिं घ्या जि वेगें
तेव्हां समस्त म्हणती 'जय नाथ!' हर्षे । उत्साह वृद्ध करिती सगळ्यांत घोषें४०
ते शूर वीर निघडे रणरंगिं होती । वंदोनियां गुरुपदां निघती प्रहर्षी ॥
चित्तीं रघूत्तमपदांबुजपादुकातें । ध्याऊन घेति तनुवर्म सुबद्ध भातें ॥ ४१॥
कोदंड बाण करिं मस्तकिं टोप त्याले । घेती सुतीक्ष्ण परशू किनिदक भाले ! ॥
कोणी अतीव पटु घे करिं खड्गढाल । उद्यानशौंड नमि कीं त्यजि भूनिगेल!
आपापले करुनि सैनिक संघ येती । सेनानितें करिति सादर वंदना ती ॥
देखोनि ते निपुण वीर गुहा सुतोष । नामें पुकारुनि तया करि हर्षघोष ! ॥

वदे "करा नच अशी तुम्हि कारवार । हे बंधुनो ! सकल व्हा दृढ एकचित्त
तें ऐकतांच वदती भट शौर्यशाली । "वीरा ! अधीर नच हो ! इतुका स्वचित्ती
रामप्रतापि अर्जुना नरि आजि टीक । ना शल्यसेनि उभें भट अश्व एक ॥
जीवात जों तवरि पाय न मागें । ही रुंडमुंडमय भू करु लागवेगें ! ॥४५॥
आज्ञापि तें गुह तया करुणा सुघोष । भेरी तुतारि रणवाद्यमयी विशेष ॥
तो येत वामदिशि त्यास कुणास शिंक ! तो वानिती शकुनलक्षण 'शुभें अनेक !'
तेव्हा वदे शकुनजाणक एक वृद्ध । "होईल मैत्र भरता, न कुठीच युद्ध !
तो ज तेथ रघुवरा वनजायिभीउ । हें दर्शवी शकुन युद्ध न होचि लेश ! ॥
ऐकोनि तें गुह म्हणे "बुध वृद्ध जाणे । कां मूर्खसे करुन साहस, दुःखि जाणें !
केल्याविना भरत भावपरीक्षणातें । हो युद्ध जें, अहितकारिच आपणा तें ४८
" हे वीर हो ! तुम्हि असा निक एक ठायीं । रक्षून घाट, भरता जंव भेटि जाई
जाणेन मित्र, अरि, मध्यम वा तयासी । हो ! आजरूप मग जशी स्थिति होय तैशी !
जाणेन मी भरतरीत्यनुभाव सारा । न प्रीति ये लपविता, नच तेंवि वैरा" ॥
बोलोनि हे गुह करी बहु वस्तु गोळा । भेटीस कंद फळमूळ सवें मृणाला ५०
मोठे मोठे मत्स्य वा रुचकरुमीन । कोळ्यासाठीं कावड्या ने भरून ॥
ऐशापरी घेउनी सर्व भेटी । जाता त्यातें मगले येति दृष्टी ! ॥ ५१ ॥
दूरुनि देखुनि कथी गुह आत्मनाम । केला वसिष्ठपदिं दंडसमप्रणाम ॥
आशी मुनी वितरि जाणुनि रामभक्त । दावोनिया भरत, ओळख त्या करीत !
तो राममित्र कळता भरत स्वयान । सोडूनि चालत पदीं, अति भक्तिपूर्ण ॥
त्यातें नमीत गुह लावुनि भूमि शीर्ष । तो नाव गाव कथि जातहि जे विशेष
त्या घालता नमुनि दंडवता गुहासी । घेई तदा भरत आकळुनी उरासीं ॥
त्या वाटलें हृदयिं लक्ष्मण भेटला तो । आनंदनिर्भर हृदीं नच मावेजेतो !!

—: इति निषादभरतमीलनवर्णन नाम षष्ठस्तरङ्गः :—

## तरंग ७ वा

त्या भेटता भरत तें अति भक्तिपूर्वीं । ती प्रीतिरीति किति वानिति लोक सारी !
तें 'धन्य धन्य' अशि मंगलसूचक वाणी । घोषूनि त्या अमर वर्षति सत्प्रसूनीं
लोकांत वेदिंहि जयाप्रति नीचमान । छायाहि तत्तनुगता अपवित्र, हीन ॥
त्या या गुहासि लघुबंधु रघूत्तमाचा । आलिंगुनी पुलकपूरित होत साचा ॥२॥

जे देति जांभईहि बोलत राम ! राम ! । तत्पापर्यंतहि पाविजती विराम ॥
यातें स्वतां उरिं धरी, परि राम, देवा । तो हा करी कुलसमेत पवित्र लोकां ॥
गंगाजलांतरिं मिळे जर कर्मनाशा । तें त्याजला कवण घे नच आत्मशीर्षा ? ॥
वाल्मीकिही जपुनियां उलटेंहि नाम । ब्रह्मासमान बनले जगिं पुण्यधाम ॥

चांडाल, शबर, कोळी, यवन, कसाई, किरात नीच जन ॥
श्रीरामनाम घेतां झाले पावन यशें भरति भुवन ! ॥ ५ ॥
आश्चर्य हें न; युगिं युगिं चालत आलें असेंचि आजवरीं ॥
श्रीरामचंद्र रघुवर भजकां कवणां महत्त्व ना वितरी ? ॥ ६ ॥
श्रीरामनाममहिमा वानिति सुर एकमेक सादर ते ॥
ऐकोनि तें मुखाचें येइ अयोध्यानिवासिया भरतें ! ॥ ७ ॥
श्रीरामसख म्हणोनी भरत गुहा कवळुनी निववि हृदय ॥
क्षेम कुशल मंगल त्या पुसता झाला अनेकपरि सदय ॥ ८ ॥

त्या स्नेहपूर्ण भरतीं शुचिता बघोनी । झाला निषाद जणु लुप्तचि देहभानीं !
संकोच मोद अति भक्ति मनांत वाहे । पाहात एक टक तो भरतास राहे ॥
प्रेमें तया विनवि अंजलिपल्लवेंची । धैर्या धरूनि बहुवार तयासि वंदी ॥
"देखें पदाब्ज तुमचें अति पुण्यकारी । कल्याण शाश्वत गमे मज बाजु चारीं ॥
देवा ! कृपा परम ही तुमची अनन्य । हो आज कोटि कुल हें मम धन्य धन्य
याती, मदीय कुल, कार्य कुठें सुदीन ? । कोठें अगाध महिमा तुमचा प्रपूर्ण ?
श्रीरामचंद्रपदपंकज जो न सेवी, । तो या गमे मज जगांत खरा अदेवी ॥
माझ्यासमान कपटी कुमती कुजाती । जो वेदबाह्य गमला सगळ्याच रीतीं ॥
श्रीराम त्या मज म्हणे अपुला जिथून । मी विश्वभूषण यशा मिळवीं तिथून ॥
श्रीरामपादकमलीं रमल्या गुहाला । वानोनि हर्षभर सन्मतिनें जहाला ! ॥
पाहूनि भक्तिविनयादि गुहांतरींचें । शत्रुघ्नही हृदयिं भेटत त्यास साचें ॥
सांगे विषाद निजनाम मनोज्ञवाणी । राणीचिया पदिं नमी विनयें लवोनी ॥
त्यांनीहि त्या लक्ष्मणसेंच मानुनी । आशीर्वचें त्या दिधलीं सुतोषणीं ॥
"हो तूं चिरंजीव गुहा ! सुखी रहा" । निदेश त्यांहीं दिधला अभीष्ट हा ॥
तें सर्व पौर जनता, बघुनी निषादा । त्या मानि लक्ष्मणचि भेटुनि दे प्रमोदा
उद्गारती 'गुहचि, जन्मुनि धन्य झाला ! । कीं राघवें कवळिलें हृदयीं तयाला!'
एकेक स्वभाग्यवरवर्णन चाललें तें । अत्यंत हृष्ट गुह जाइ जनांसमेतें ॥

तें सूनवी गुह जना अपुल्या घुणेंचि । तेही तदा करिति उत्तम सोय त्याची
गेह्यों वनीं, उपवनीं, घरिं, वृक्षगारीं । केलें निवास तर्वि सत्वर त्याजसाठीं
ये शृंगबेर पुर जें भरता दिसोन । स्नेहार्द्र तो शिथिलितागचि होत पूर्ण ! ॥
तें शोभला भरत टेकुनिया निषादिं । प्रेमा तथा विनय हे धृतदेहबंधी ॥
ऐशापरीं भरत सैन्यसमेत जात । देखानया सुरधुनी जगिं पुण्यजात ॥१९॥
पाहोनि तेथ तटिनीतटिं रामघाट । तल्लीन हो भरत मानुनि राममेट ।
त्या ब्रम्हरूपनुभगा बघुनी प्रवाहा । सारीच थोर जनता नमि नम्रदेहा ॥२०॥
स्नानें करूनि विनवीति जुडून पाणी । कीं रामचंद्रपदिं भक्ति असो न सानी
भागीरथीस भरतें म्हटलें "तुझे गे ! आहेत रेणु सुखदायक चारु गगे ! ॥२१॥
भक्ताथि होत सुरधेनुपरी अभीष्टा" । बोद्धूनि अजलि म्हणे ' वर देसि तुष्टा ॥
मी प्रार्थितों तव पदीं नत हेंचि एक । सीतारघूत्तमपदीं रति हो सुरेख !' ॥
ऐसें करी भरत मज्जन शुद्ध चित्तीं । मातांहि सर्व अति पूतजलीं नहाती ॥
तेव्हा निदेश मिळता गुरुचा तिथूनी । जाती पुढें सकळही तळ हालवोनी ॥
ते जेथ जेथ वसती जन तेथ तेथ । जाऊनिया भरत तत्कुशला पहात ॥
अर्चूनि देवगुरु पाउनि सम्मतातें । तें बंधुयुग्म मग ये प्रिय राममातें ॥ २४
संवाहती मृदु वदोनि पदा तदीया । सन्मानि त्या भरत सतत वदनीया ॥
शत्रुघ्नि सोंपवित तो मग मातृसेवा । घेई गुहा भरत बोल्वुनी सुभावा ॥ २५
चाले करीं कर धरूनि तदा गुहाचा । स्नेहार्द्र तो भरत कीं शिथिलाग साचा ॥
यातें पुसे "मज सख्या ! क्षणि दाव जेथ । सीतारघूत्तम सलक्ष्मण रात्रिं सुप्त ॥
पाहूनि त स्थल मदीय निवेल चित्त । डोळेहि होतिल सुखी मम हे नितान्त ॥"
हें त्या गुहा विनविता मन भावि न्हालें । प्रेमाश्रुनीं भरतनेत्र भरोनि गेले ! । २७
ऐकोनि तें भरतवाक्य सशोक होत । नेई निषाद भरता क्षणि त्या स्थलात ॥
ज्या शिंशपातरुतळीं प्रभु सुप्त होते । प्रेमें अतीव भरतें नमिलें तयातें ॥२८॥
पाहूनि ती तृणमयी मृदुचारुशय्या । जाई प्रदक्षिण तिला नमि तो अभेया ॥
तेथील भूमिरज रामपदांकितें तो । लावी स्वनेत्रिं, नच भाव सुवर्ण्य हो तो ! २९
तो प्रीतिपूर कवणें परि हो वदावा ? । सौवर्ण कांहिं कण पाहुनि तेथ तेव्हा ॥
सीतेसमान अति मानुनि पूज्य त्यातें । तो घे शिरीं निज नमस्करुनी स्वहस्तें
डोळे भरून हृदयींहि गहींवरून । तो बोल्ला वच गुहाप्रति भक्तिपूर्ण ॥
" हे देख हेमकण रे ! द्युतिहीन जैसे । सीतावियोग जणुं त्याप्रति नेत्र सोसे !

साकेतवासिजनता जरि शोकखिन्न । सीतावियोग करि त्यां सुषमाविहीन ।।
जीचा पिता जनक उत्तम योगि भोगी । ज्यातें अलभ्य नच काहिंच सौख्यसंगीं ३२
जीचा महाश्वशुर भानुकुलैकभानु । ज्याचा प्रताप सुरनाथहि पाहि वानूं ।
भर्ता जिचा प्रभु रघूत्तम राम होय । ज्याच्या कृपेंचि जगिं थोरवि होय लभ्य ।३३
शय्या तिची चवुनियां पतिदेवतेची । स्त्रीरत्न जी निखिलवंद्य जगांत साची
होशी न भग्न मम या हृदया ! कसें रे ! ! । यावें तुला शरण कीं कठिनें हि वज्रें ।३४
लावण्यधाम लवुलक्ष्मण लालनीय । झाला न बंधु अडला, न असे, न होय ।।
पौरां अति प्रिय तसा प्रिय मायबापां । सीतारघूत्तममना प्रिय सानुकंपा ३५
जो कोंवळा मृदुलगात्र ऋजू मनोज्ञ । ज्यालागिं आजवरि वायु हि लागला न ।।
तो सेवि आज विपिनांत विपत्ति सर्व । नाशील कीं मदुर वज्रसमूहगर्व ! ३६
कौसल्येनें ज्यास देऊनि जन्म । विश्वा केलें एकलें पुण्यसद्म ।।
रूपा झाला सर्व सौख्या गुणांना । जो शोभावा एक सांठा; दुजा ना ! ३७
रामस्वभाव सकलांसहि सौख्यदायी । वैरीहि ज्या गुणिवरा स्तवणार होई ।।
पौरादिकां परिजनां जननी-पित्यासी । सौख्यें गुरूंसि वितरी प्रभु हर्षवर्षी ३८
मैत्रींत, मापणि मनोरम, नम्र राम । त्याचें गुणस्तवन शक्य न हो निकाम ।।
त्याच्या गुणाब्धिसि जरि स्तविती विशेषा कोटीहि शेष, तरि सर्व अशक्य त्यांस ३९
जो सौख्यरूप जगिं मंगल सौख्यसद्म । सद्रत्न राघवकुलोत्तम शक्तिधाम ।।
तो राम हा निजत भूतलि आज ऐसा । हा ठाव कर्मगतिचा कळणार कैसा ?४०
ज्या 'दुःख' शब्दहि कधीं पडला न कानीं । ज्यातें स्वजीवतरसें नृप रक्षि, मानी
डोळ्यास पापणि, मणीप्रति नागिणीशा । माता जया जपति रात्रदिनीं स्वतोषा ४१
ते आज पायिं फिरती अनवाणि रानीं । आहार कंद फल फूल मुळें करूनी ।।
प्राणाहुनी प्रियतमा प्रतिकूल रामा । धिक् कैकयी अशि अमंगलमूल सीमा ४२
धिग् धिग् मलाहि अघसागर भाग्यहीना । सारे अनर्थ मजकारणिं ज्या प्रभूंना
घाता मला कुलकलंक असा सुजीत । ही स्वामिशत्रु मज माय कुधी करीत । "४३
ऐकोनि तें समजवी गुह त्या सुमार्वे । "नाथा ! न दुःख तुम्हि हें हृदयीं करावें
श्रीराम हो प्रिय तुम्हां, तुम्हि त्याहि तैसें । नोहेचि दोष तुमचा, विधि दुष्ट भासे
वामविधीची कठिण करणि ही सन्मति बिघडवि जननीची ।
त्या रात्रीं प्रभु फिरुनि फिरुनिही प्रशंसि तुम्हां किति सुवचीं ! " ।।
तुम्हसि वदे, गुह शपथपुरस्सर भरता सांगे राममन ।

" रामप्रिय तुम्हि एक, धैर्य घ्या ! हो परिणामीं कल्याण ! ॥ ४५ ॥
अंतर्यामीं राय सुप्रेममूर्ती । लज्जाशाली जो कृपापूर्ण चित्तीं ॥
जाणोनी हें थोर विश्वासभावें । विश्रामार्ते आपुल्या हो ! चलावें ! "॥४६॥
ऐकोनी तें वाक्य धैर्या धरोनी । जाई वाळा, चित्ति रामा स्मरोनी ॥
पौरांना हें वृत्त येतांचि कानीं । औत्सुक्यें तें पाहिलें स्थान त्यांनीं ॥४७॥
प्रदक्षिणा घालुनि त्या नमीती । कैकेयितें दोषहि देति उक्तीं ॥
अश्रू तयांच्या नयनांत वाहे । देती विधात्याप्रति दोष मोहें ! ॥४८॥
कोणी प्रशंसिति रती भरतांतरींची । कोणी वदे दशरथांतरि भक्ति साची !
निंदी स्वतांस कुणि वानुनिया निषादा। वर्णू शके कवण त्या हृदया, विषादा ४९
ऐशापरी सरत जागुनि रात्र सारी । होतां प्रभात निघुं लागति पैलतीरीं ॥
ते वैसवीति गुरुतें अतिचारु नावे । मातांसही नव तरींमधि सर्व भावें ५०
ते सर्व पैल रिघती घटकांत चार। तेव्हा पुढे भरत त्या कुशलोत्तिसार ॥
प्रातःक्रिया करुनि वंदुनियां गुरूतें । मातांसही स्तवुनि वंदिति भक्तिचित्तें ५१
केले निषादादि पुढें समग्र । मागोनि चाले सहसैन्य वीर ॥
त्यांच्यांपुढें ठेवि निषादनाथा । तें चालत्या पालखितूनि माता ५२

— इति श्रीराम० भरतनिषादमीलनवर्णनं नाम सप्तमस्तरङ्गः —

## तरंग ८ वा

शत्रघ्न दे त्यासह सोबतीतें । गुरूसि विप्रांसह पाठवी तें ॥
चाले स्वतां वंदुनि जाह्नवीला । स्मरोनि सीतेसह राघवाला ॥१॥
पायींच चाले भरत स्वता पथीं। इया करीं चालवि दास सगतीं ॥
अनेक तें सेवक योग्य सांगती। तयीं बसाया भरतास ते किती ! ॥२॥
परी तयांतें भरतें निवेदिलें। "श्रीराम कीं काननिं पायिं चालले॥
माझ्याचसाठीं रथ वाजिकुंजर ! । हो योग्य मातें शिरिं चालणें तर ॥ ३
सर्वांहुनी 'सेवकधर्म' थोर हा"। आकर्णिली ही भरतोक्ति पावहा ॥
सुकोमला प्रेमल भक्ति बंधुरा । ये सेवकां पूर उरीं गहींवरा ॥४॥
वेई तिज्या प्रहरिं तो भरत प्रयागीं । अत्यंत होत पथि तैं भजनानुरागी ॥
ते प्रेमपूरिं म्हणती 'प्रभु राम सीता । सीता रघूत्तम, विभूत्तम राम ! नाथा !' ५
तैं शोभले चमकुनी पदिं फोड तैसे । कीं बिंदु ते दंव सरोरुहकोषिं जैसे ! ॥

पार्थीच आज भरतें पथ आक्रमीला। ऐकोनि हें सकल लोक विषण्ण झाला। ६
स्नानें समाचरिलि सर्व जनीं कळोनी। येवोनियां भरत वंदितसे त्रिवेणी॥
तो स्नान आचरि सितासित सम्रवाहीं। दानें दिलीं सुविधि पूजुनियां द्विजांहीं ७
त्या श्यामशुभ्रलहरी बघुनी जलौघा। वंदीत त्या भरत हृष्टतनू प्रयागा;॥
बद्धांजली विनवि "कामद तीर्थराया!। आहे प्रभाव जगिं वेदहि छुब्ध गाया।८
धर्मे स्वजन निज मी विनवीत भीक। दुःखार्तता उरविते कवणीं विवेक?॥
जाणोनि हें जगति मुज उदार दाते। संप्रार्थिलें पुरविती जगिं याचकांतें॥९॥
प्रार्थी न अर्थ, नच धर्म, न कामि काम। मागें न मोक्षपदही मजला निकाम॥
माझी असो रति सदोदित रामपायीं। दे जन्मि जन्मि वरपूर्ति, न अन्य कांहीं॥१०
श्रीराम हे मजसि दुष्टहि कीं म्हणोत। द्रोही प्रभूसि, गुरुद्रोही जनही गणोत।॥
सीता रघूत्तमपदांबुजि भक्ति माझी। वाढो दिसंदिस कृपा तव ऐसि हो जी! ११
अंभोद जन्म भरि कां विसरून जाव। वज्रादम हाणि जरि याचियलाहि तोय।॥
खोरें विराव शमलें जरि चातकाचे। प्रेमा परी सतत वाढुनि चित्ति साचे! १२
सौवर्णवर्णगुण वाढत अग्निदाहें। मत्प्रेमही प्रभुपदांवरि तेविं हो हें॥"
ऐकोनि आर्त भरतोक्ति तदा, सुवाणी। झाली त्रिवेणितुनि उद्गत पुण्यखाणी! १३
"तूं साधु होसि भरता! अजि विश्वधन्या!। त्वद्भक्ति रामचरणांबुजिं हो अनन्या॥
वत्सा! विषाद न धरीं शुभशीलधामा!। नाहींच कीं प्रिय तुझ्यासम अन्य रामा!॥"
परिसुनि रुचिरोक्ती, बोलली जी त्रिवेणी। भरतहृदयवृत्ती गेलि हर्षे भरोनी॥
मरति पुलकितांगीं वर्षल्या पुष्पराशि।अमरिं "भरत! होशी धन्य रे! धन्य!"घोषीं

— इति श्रीराम० श्रीअयोध्याकांडोत्तरार्धे भरतस्य प्रयागप्रवेशत्रिवेणी-
वरदानं नामाष्टमस्तरङ्गः —

## तरंग ९ वा

प्रमुदित जन झाले तैं प्रयागाधिवासी। मुनिवटु गृहिवानप्रस्थ वैराग्यराशि॥
मिळुनि मिळुनि मेळीं ते दहा पांच ऐसे। विमल भरतशीलप्रीति वानीति हर्षे। १
आला भरद्वाजमुनीश्वराश्रमा। ऐकोनियां रामगुणां मनोरमां॥
दंडप्रणामें भरतें नमीयलें। मानी मुनी त्या निज भाग्य मूर्तलें!॥ २॥
घालोनी, उठवोनि, आघुनि-उरीं आलिंगुनी सादर।
आशीर्वाद वदोनि चारु भरता केलें कृतार्थांतर॥

त्यातें आसन अर्पिलें मुनिवरें, तेव्हां लवोनी बसे ।
भासे, पाहतसे शिरू, भरत तो सकोचगेहींनसे ! ॥ ३ ॥
चिंता वरास 'मुनि' काहिं विचारतील ! । बोले मुनी बघुनि त्यासि सलज्जशील ॥
"ऐकें, अम्हां समजलें भरता ! समग्र । नाहीं उपाय, विधि जें करि वाम उग्र ॥
काहींच तू करु नकोस विषाद ताता ! । मानूनि सर्व करणी करि आत्ममाता ॥
कैकेयिच्याहि नच दोष असे तयांत । श्रीशारदा कलुष तन्मतितें करीत ! ॥५॥
हे उक्तिही कुणि म्हणेल न होय युक्ता । लोकोक्ति, वेदहि मुसमत बुद्धिमंता ॥
गाऊनिया परि जगीं तव पुण्यकीर्ति । होतील दोनि, जन-वेदहि धन्यमूर्ति ! ६
हो लोक-वेद मत कीं, जगिं राज्य ज्यास । दे तात, त्यास मिळणेंचि तसें अशेष ॥
सत्यव्रती, नरपती, तुज बोलवून । देताच राज्य, सुख, धर्म, महत्त्व पूर्ण ! ७
सारा अनर्थ रघुनाथ वनांत जात । जें ऐकतां विकळ सर्वहि विश्व होत ॥८
हें सर्व भाविवश येत असे घडून । राणी अजाण, निज कृतिंत असेचि खिन्न ! ८'
यामाजि अल्पहि तुझा अपराध मानी । तो दुष्ट, नीचमति, होय अती अडाणी
स्वीकारतास भरता ! जर राज्यभार । संतोषता, परिसतां मनिं राम फार ! ९
आतां परंतु भरता ! करतोस चारु । तू हें अतीव, हृदिं घेउनि सद्विचार !
कीं सर्व मंगलनिधाननिदान हेंचि । श्रीरामचंद्रपदपंकजिं भक्ति साची !
तव हृदयिं वसे ती प्राणसर्वस्व एशी । तुजसम जगिं नाच्या एवढी भाग्यराशि
नच तव नवलाची गोष्ट ही एवढीशी । दशरथसुत होशी, बंधुही राघवाशी ! १०
[ती प्राणजीवनधनापरि होय तूतें । आहे न भाग्य तुजसें कवणासही तें
आश्चर्य गोष्ट तव ही मज होय कैशी ? । तू कोसलेशसुत, राघवबंधु होशी ॥ ११]
भरत ! परिस हें कीं रामचित्तीं न अन्य । तुजसम कुणि त्याच्या प्रीतिसत्पात्र धन्य
स्तवनिंच तुझिया रे ! राम सौमित्रसीता । क्षण सकल निशींचे तोषवीती स्वचित्ता !
प्रयागतीर्थीं करितां निमज्जन । या रम्यमर्मा विसरे न तन्मन ॥
ते प्रेमतीर्थीं तुझिया निरंतरीं । निमग्न होती भरता ! खरोखरीं ! ॥ १३ ॥
श्रीरामचित्तीं तुझियावरी रति । स्वप्राणि सामान्यजनीं जशी अति ॥
माहात्म्य हें ना रघुनाथचित्तिचें । भक्तावन प्रेमळ राघवा रुचे ! १४ ॥
माझ तरी हें भरता ! असें मत । कीं रामचित्तामधि तूंच राहत !
मूर्ती जणों राघवभक्तिची निकी । रूपें तुझ्या ये मजला दिसोनि कीं !
घो तू कलंक म्हणशी अपुल्यास लाग । तो आमुच्या मनिं मला उपदश वागे

श्रीरामभक्तिरससिद्धि करावयाला । तो 'श्रीगणेश' शुभकारि अम्हांस झाला१६
इंदू नवाद्भुत तुझें यश निष्कलंक । ज्याचे चकोर-कुमुद प्रभुभक्त नीक ॥
नांदे सदोदित, नसे क्षय, ज्या न अस्त । वाढे दिनानुदिन विश्व नभोंगणांत॰
त्रैलोक्यकोक अति ज्या अनुरक्तभाव । रामप्रतापरवि हारवि तेज नैव ॥।
यत्रंदिनीं सुखद तो सकलांस होय । राहू जया ग्रसि न कैकयिचें कुकार्य !१८
श्रीरामभक्तिच सुधा भरि ज्यास पूर्ण । ज्यालागिं दोष, गुरुचा अपमान हा, न
ज्याची सुधा करित राघवभक्ततृप्ति । केली सुलभ्य वसुधातलिं तूं सुधा ती१९
राजा भगीरथचि भूवरि आणि गंगा । जी सर्व मंगलखनी स्मृतपापभंगा ॥
ना वानवे दशरथोत्तमप्रीलरादि । नोहेचि तत्सम, कथा असणें विशेषीं ?॥
यद्भक्तिभाव बघुनि प्रभुराम जन्म । घेऊनियां प्रकटला पुरवीत काम ॥
श्रीशंभु हृत्सरनिं आपुलिया जयासी । पाही किती हि परि तृप्ति न ज्याचि कैसी॥
हा कीर्तिचंद्र तव सर्वपरीं अमूप । हो प्रेमरूप मृगराम तयीं दुराप ! ॥.
ऐसें असून करिसी मनिं खेद कां रे !। दारिद्रियमी परिस लाभुनि केंवि थारे?॥

ऐकें गा ! भरता ! कधीं नच अम्ही खोटें वदूं अल्पही ।
आम्ही काननवासि तापसि अम्हां व्हावी विरक्ती मही ॥
आलें कीं फल सर्व साधनतपां आम्हांस अत्युत्तम ।
सीतालक्ष्मणरामदर्शन अम्हां जें होय पुण्यागम ॥ २३ ॥
त्या पुण्याचें फल म्हणुनियां पाहतों आज तूतें ।
क्षेत्रस्थांचें सकल इथल्या भाग्य मोठेंच कीं तें ! ॥
विश्रामर्षे सुभग भरता ! धन्य तूं भक्तिपूर्ण ! " ।
बोलोनी हें मुनि गहिंवर जाय चित्तीं भरून ! ॥ २४ ॥
हर्षे तेव्हां हृदयिं भरले सर्व तेथील लोक ।
वृष्टी केली अमरिं सुमनीं गर्जुनी 'धन्य' भाक ॥
राहे व्योमीं ध्वनि भरुनियां 'धन्य ! धन्य !' प्रयागीं ।
ऐकोनी ज्या भरत भरत प्रेमभावानुरागीं ! ॥ २५ ॥

रोमांचली तनु, हृदीं जणुं रामसीत। उद्भूत होति जल लोचनपद्मिं येतां ॥
वंदोनियां भरत त्या मुनिमंडळींना। वाणी अशी वदत गद्गदकंठपूर्णा॥२६॥
"ऐसा तपस्वि जनिं, त्यांतुनि तीर्थरायीं। सत्याउही शपथ, हें नच योग्य होई॥
कोणीहि येथ कथतां कपट रचून। नीचत्व त्याहुन नसे, अघही तसें न ! ॥२७॥

आहात सर्वज्ञ तुम्ही मुनीश्वर । मी सत्य तें सांगतसें मदंतर ॥
असेचि सर्वांतरवासि राघव । न मातृकृत्यीं मम गोष्टही लव । २८ ॥
वाटे न दुःख मज निन्दक विश्व होई । भीती न वा मज मुके परलोक हीही ॥
ना तात मृत्युहि मला बहुशोकदायी । ब्रह्माण्डही भरुनि तयश पुण्य राही ॥२९॥
श्रीरामलक्ष्मण असे सुत ज्यास होत । त्याच्या वियोगिं तनु भंगुर जो त्यजीत ॥
ऐसा नृपालमणि शोच्य गमेल केवीं ? । तत्तात पूज्यतम धन्ययशासि सेवी ॥३०॥
सीतालक्ष्मणराम हे यति वनीं संचारती पाउलीं ।
चालोनी अनवाणि वेष मुनिचा स्वीकारुनी वल्कलीं ॥
खावें कंदफलें, महीशयन हो पर्णी, तरूंखालतीं ।
साहोनी नित राहती हिम, उन्हें, पर्जन्यधारादि तीं ॥३१॥
हें दुःख जाळित सदा हृदया मदीया । नाहींच भूक दिनिं, रात्रि न झोंपही या ॥
लाभे न औषधहि या मम दुष्ट रोगीं । सार्‍या जगीं बघत शोधुनि अंतरंगीं ॥३२॥
मन्मातृधी कुटिल होउनिया सुतार । माझ्या हिता करुन वाकस एक धीर ॥
घेई कुकाष्ठ कलिचें, घनवी कुयन । वर्षे चतुर्दश पुरी पटुनी कुमंत्र ॥३३॥
माझ्याच साठिं रचि ती सगळा उठाव । झाले परी जगतिं नाशक कुप्रभाव ॥
येईल राम तर सर्व कुयोग जाय । साकेतभव्य करण्या न दुजा उपाय" ॥३४॥
परिसुनि भरतोक्ती हो भरद्वाज हृष्ट । सकलहि भरतातें वानिती पुण्य दृष्ट ॥
"नच कर सुकुमारा ! तू मनी रे ! विषादा । चतुनि रघुनराला ना उरे दुःखबाधा" ॥३५॥
ऐसा करूनि उपदेश वदे मुनीश । "होशी मदीय अतिथी प्रिय तू विशेष ॥
जे कंद मूल फल पुष्प समर्पु तूतें । स्वीकारिं रे ! कदनिवास्तव्य आम्हा तें ३६

• इतिश्रीराम० श्रीभरद्वाजभरतसंवादो नाम नवमस्तरङ्ग •

## तरंग १० वा

ऐकोनियां मुनिवरोदित आग्रहोक्ति । संकोचला भरत थोर मतिस्मूर्ति ॥
वाटे तयास जणु संकट तें उद्भवेलीं । आज्ञा प्रमाण गुरुची परि ध स्वमौळीं ॥१॥
जोडोनि हात वदला नमुनी पदासी । "आदेश सर्व गुरुचे मम धर्मराशि ॥
तेव्हा सुतुष्ट हृदयीं मुनिवर्य होय । बोलावि तो निकट शिष्य शुचि स्वकीय ॥२॥
सांगे "करू भरति पाहुणचार भारें । जा, कंदमूलफल घेउनि तूर्ण यावें" ॥
"हो नाथ !" हें म्हणुनि ते समळ नमूनी । सानंद सर्व करण्या निघती क्षणानीं

वाटे मुनीसहि मनीं अहि काळजी कीं। 'हो पाहुणा अति महान् तुल्ना न लोकीं ॥
हो देवता जशि, तशी करणें सपर्या'। तों ऋद्धि सिद्धि अणिमादिक येति कार्या॥
त्या प्रार्थिती प्रणतिपूर्वक "हे गुणज्ञा ! तैसें प्रभो ! करुं जशी भवदीय आज्ञा॥
आहोंत उत्सुक अम्ही प्रभुसेवनास। आज्ञापिलें मुनिवरें करुं जी ! अशेष!" ॥
" भरत सानुज सर्व जनांसह। प्रभुचिया विरहें अति दुःसह ॥
करुनि पाहुणचार तयांप्रती। सुखविणें " वदला मुनि सन्मति ॥ ६ ॥
तें ऋद्धि सिद्धि मुनिवाक्य शिरीं धरुनी। मानूनि घेति निजभाग्य अतिप्रमाणीं॥
संवादिनी प्रमुदिता हृदिं एकमेकां। कीं हा अतुल्य अतिथि प्रभुबंधु देखा!॥७॥
ऐसें करुं मुनिकृपागुणिं सर्व आज। होईल सर्व सुखभाङ् नृपसत्समाज॥
बोलोनि हें रचिलिं चारुगृहें तयांनीं। ज्यां पाहतां खिजलि देवगृहें विमानीं॥
भोगादि वैभव तयांत समस्त पूर्ण। जें पाहतां अमर कांक्षिति त्यासमान॥
सारे सुसिद्ध सुखदायक दासदासी। सर्वांतरीं शिरुनि सेविति त्यां विशेषीं॥९॥
सिद्धि क्षणांतचि करीति समग्र सिद्ध। जी वैभवें सुरगणांसहि नैव लब्ध!॥
सर्वांस आधिं दिधले अतिरम्यवास। ज्यांच्या जसे रुचिस येतिल ते तयास॥
तैसेंचि तें मुनिवरें भरतादि लोकां। केले निवास वसतीस सुरम्य जे कां॥
निर्मी मुनीश सुख वैभव एवढें कीं। धाताहि जें अति मनःकुतुकीं विलोकी! ११
पाहे जधा भरत तो मुनिचा प्रभाव। त्या स्वर्ग लोकहि लघू गमले अतीव॥
ना वर्णवे तिथलिया सुखसंपदेतें। ज्ञानीहि तें विसरती स्वविरक्तितें ते!॥१२॥
शय्यासनें, सुवसनें, विपुलें वितानें। नानासुमें उपवनें मृगपक्षि रानें,॥
नानाफळें सुमधुरें अमृतासमानें। वापी तडाकसर केलिविहारपूर्णें॥१३॥
अन्नें सुधामधुर तेथिल चारुपेयें। संकोच, पाहुनिच ज्यां, यतिहा जना ये!॥
स्रक्चन्दनादि वनितायुत भोग तेथें। पाहोनियांच जन विस्मित हर्षले ते! १४
तेथें कल्पतरू तशा सुरभिही सर्वांचिया केतनीं।
पाहोनी अभिलाष ज्यांस, निपजे इंद्रा–शचीच्या मनीं॥
वाहे मंद सुगंध सौख्यद असा वायू तिथें शीतळ।
सर्वांतें चतुरर्थ लाभति तिथें अन्यत्र जे दुर्मिळ!॥ १५ ॥
संपत्ति ती निरखुनि चक्रवाकी। त्या चक्रवाका भरता, मुनी कीं
तो शारदी आश्रमपंजरांत। ठेवी जणों जोंवरि हो प्रभात!॥१६॥
इति श्रीराम०मकारिप्रजनांना परस्परभक्तिपरीआनन्दमयवर्णनं नाम दशमस्तरङ्गः

## तरंग ११ वा

केलें निमज्जन तयें मग तीर्थराजीं । सान्यासमेत नमि तो मुनिच्या पदाब्जीं ॥
आशी दिल्या मुनिवरें धरि आत्मशीर्षी । साष्टांग वंदि विनयें वदुनी मुनीशीं ॥
घेई समेत पथ उत्तम दाखवीतें । तो चित्रकूटिं मन ठेवुनि जाइ पंथें ॥
हातांत हात धरुनी चलतां गुहाशीं । ते दोन भासति रघूत्तमभक्तिराशि ! ॥२॥
ना छत्र मस्तकिं, तसे अनवाणि दोघे । श्रीरामभक्तिनियमव्रतिं चित्त रंगे ॥
संवादिती वनपथागम गोड वाचा । श्रीरामलक्ष्मणकथा, जनकात्मजेच्या ॥३॥
पाहोनि रामवसतिस्थलवृक्ष चित्तीं । ये प्रेमवीचि उसळोनि न आवरे ती !
ती हृदया वधुनि वर्षति देव पुष्पें । होई मही मृदुल मंगल मार्गरूपें ! ॥४॥
छाया करीति घन त्या सुखदा अतीव । वायूहि वाहत सुखावह सत्प्रभाव ॥
झाला जसा सुखद तो भरतास पंथा । रामासही नच तसा सुखदायि होता ५
जे मार्गवासि जडचेतन जीव सारे । रामास जे बघति, ज्या बघि राम नेत्रें ॥
ते सर्व योग्य जरि का परमा पदासी । पाहोनियां भरत, तद्भवरोग नाशी ।६
नोहे विशेष बहु हा भरतप्रभाव । ज्या रामही स्वहृदयीं धरि याम सर्व !
जो रामनाम जगिं आठवि एकवार । संसारिं तो तरुनि विश्वहि तारणार! ७

" रामाना प्रिय जो असे भरत कीं तद्बंधुही धाकटा ।
वाटा मंगलदायिनी नच कशा व्हाव्यात त्या उत्कटा ! ॥ "
ऐसें सांगति सिद्ध साधु मुनिही पाहोनि वर्णोनियां ।
मोठा हर्ष मेरे बघोनि भरता, चित्तामध्यें त्याचिया ॥ ८ ॥

भरतप्रभाव चिंतुनि चित्तीं चिंता करी सुरेश्वर तो ॥
जग हें भले भल्यांतें दिसतें दुष्टास दुष्टगुण वरतो ! ॥ ९ ॥
प्रार्थुनि वृहस्पतीतें इंद्र म्हणे " हे प्रभो ! करा तेंचि ॥
जेणें न भेट होवो भरताची आणि रामचंद्राची ! ॥ १० ॥

संकोचशील विभु राघवराय होय । सत्प्रेम अंकित तया करतें अमेय ॥
प्रेमाब्धि हा भरत; हो न विनाश आतां! आली सुधून घडि; युक्ति करा जि! नाथा!

— इति श्रीराम० इन्द्रबृहस्पतिसंवादो नामैकादशस्तरङ्गः —

## तरंग १२ वा

ऐकोन तें गुरुगुरु स्मितचित्त चिंती । कीं, ' इंद्र अंध, जरि नेत्रसहस्रमूर्ति ! '

इंद्रा वदे " कपट सोडि, सकोप हो न । येथें छलें विचरतां फलशील पूर्ण ! १
ऐकें सुरेश्वर ! असा प्रभुचा विशेष । न स्वापराधहि तया करि चित्तरोष ।।
भक्तापराध करत्याप्रति मात्र साचा । क्रोधाग्नि जाळित असे रघुनायकाचा ! २
लोकांत वेदिंहि असे इतिहास ठावा । दुर्वास जाणत असे प्रभुच्या प्रभावा ! ।।
हो रामभक्त न दुजा भरतासमान । ज्यातें जगद् जपत, तो जपि त्या सुजाण !३
ऐकें सुरेश्वर ! भला उपदेश माझा । रामा स्वभक्ति निज जीव गमे, न दूजा ।।
रामास तोष निजसेवकसेवनानें । भक्तास वैर करतां, प्रभु वैरि होणें ! ।।४।।
श्रीराम हो सम, न त्याप्रति रागरोष । ना पापपुण्य, गुणदोष शिवे न त्यास ।।
विश्वात कर्मनि तसें रचिलें प्रधान । जो ज्यापरी करित त्याप्रति तेवि मान ! ५
दावीत तोच सम वा विषम स्वरीती। ज्याच्या जशी हृदयिं भक्ति अभक्ति वा ती।।
निर्मान, निर्गुण, अलक्ष्य, रसैकधाम । तो भक्तभक्तिवश घे सगुणत्व राम ६
श्रीराम सेवकमना अति दक्ष रक्षी । या संत देव निगमागम होत साक्षी ! ।।
जाणोनि हे त्यज मनःकुटिलत्व सारें । सप्रेम देख भरताग्रियुगाब्जा रे ! ७
परहितरत सारे भक्त ते राघवाचे । सहति न परदुःखें अब्धि जे कीं दयेचे ।।
भरत तरि असे हा तच्छिरोरत्न साचा । मुळिच न धरिं इंद्रा ! लेशही घोर त्याचा!
प्रभु सुरहितकारी राम हो सत्यसंध । भरत रघुवराचा पाळि आदेशबंध ।
विकळ तुम्हि जहालां, स्वार्थदृष्टी मनानें।भरत न अपराधी, दोष तुम्हींच घेणें !"
परिसुनि गुरुवाक्यें सुंदरें सत्यसारें । सुरपति मनि हर्षें भीतिचें जाय वारें ।।
सुरतरुसुमनांना वर्षि तो हर्षुनीयां । स्तवि अति भरताची भक्ति तो शंसनीया
ऐशापरी भरत जाय पथ क्रमीत । त्या 'धन्य धन्य' म्हणती मुनि सिद्धिमंत ।।
तो 'राम राम!' म्हणुनी जयिं दे उसासे । सर्वत्र उल्लसत भक्तिरसाब्धि भासे!
उद्धार ते द्रवविती कुलिशां, शिलांना । सप्रेम पौरमनिंचें शुचि वर्णवेना ।।
मध्यें वसून दिन तो यमुनेसि येत । पाहूनि नीर, भरि नेत्र जलें नितान्त !१२
श्रीरामरंगशमवारि तसें बघून । झाले समग्रजन ते विरहाब्धिमग्न ।।
लाभे तयांस परि घाव विवेकनौका । वेगें समस्त चढले निजमार्गि देखा!१३

—: इति श्रीराम० भरतस्य चित्रकूटगमनं नाम द्वादशस्तरङ्गः :—

## तरंग १३ वा

विश्रांति घेति दिन तो यमुनातटीं ते । झाले समस्त सुखवासि वसून तेथें ।।
रात्रींत सर्व मिळल्या तटवासि नौका । ना वर्णवेहि गणना इतुक्या अनेका ।

जाती प्रभाति मग पारहि एकलेपीं । श्रीरामसेवकगुहा स्तुति लोक अर्पी ॥
स्नानें करुन यमुनेंत नमून तीतें । जाई गुहासहित बंधुयुग प्रभातें ॥ २ ॥
केलें पुढें मुनिवरोत्तमवाहनातें । मागोनि होति पथि राजसमाज जाते ॥
त्यामागुनी उभय बंधुहि जाति पायीं । अंगांवरी वसन–भूषण अल्प होई॥३॥
ते मित्र, मंत्रिसुत, सेवक संगिं जाती । सीतारघूत्तमसलक्ष्मण यांसि गाती ॥
श्रीरामवास घडला स्थलिं जेथजेथ । सप्रेम ते प्रणमती जन तेथतेथ ॥ ४ ॥
ऐकोन तें, निकटचे नर आणि नारी । येतीं तिथें पळत टाकुनि काम, सारीं॥
पाहूनि भक्तिभरिं तें भरतस्वरूप । वाटे कृतार्थ जनु त्यां सुख हो अमूप ५
सप्रेम तें वदति त्या अपुल्यांत नारी । उद्गारि एक "सखि ! वाटत हेंचि भारी–
कीं रामलक्ष्मणचि हे असतील काय?। यांचें स्वरूप, वय, कांति तसेच काय !
तें प्रेम, शील, तनु, चाल, समग्र तीच । सीता नसे जवळि, वेषहि भिन्न साच !
यांचेपुढें चालतसे चतुरंगसेना । नोहे प्रसन्न मुखभा, हृदिं खेद याना ! ७
शंका असाराथचि येत सखे ! मनास" । ऐकोन तें, म्हणति त्या इतरां सहर्ष
"गे! योग्य तर्क तव, तूं कितिगे ! शहाणी।आहे तुझी अतुल सत्यमनोज्ञवाणी"
लागे दुजी मधुरचें रमणी कथाया । 'राज्याभिषेकसमयस्थिति ये पथा या'॥
साकेतिं केविं सगळा रसभंग झाला । श्रीरामराज्यसुखिं संकटकाल आला ! ९
वाखाणिती भरतशील चरित्रभक्ति । जो त्यागि राज्य पितृदत्तहि पुण्यमूर्ति ॥
आहारकंदफल, जो वनवासिजात । रामा स्वराज्यिं वसवूं वळवूं पहात॥१०॥
"आहे दुजा कवण ? या भरतासमान । ज्याची रती रघुपतीवरि नित्य पूर्ण ॥
तत्प्रीति बंधुवरलीं जगतीं अमेया । पुण्यामृताब्धि भरताचरणें जगीं या ११
गातां तयें परिसतां यश साधु त्याचें । निःशेष होय जगिं दूषण दुःख साचें॥
जें काहि तद्यश वंदू जगिं थोडकें तें । हा रामबंधु मग केविं असा न चित्तें?
आल्यासवें बघितलें भरता अम्ही हो!।यान्चा विचार अम्हि आजि सुधन्य आहों
पाहोनि रूप, गुण ऐकुनि त्या कथीती।"ना योग्य याच जननी मुळिं कैकयी ती!"
कोणी सांगवि " कैकयीप्रति न द्या हो दूषणें अलदी ॥
धाता हें घडवूनि आणि; अमुचीं भाग्यें खरीं श्रेष्ठ हीं ! ॥
कोठें आम्हि अजाण शास्त्रविधिनें, हीन स्त्रिया पामर ॥
कुग्रामीं वसत्या अम्हाप्रति कुठें हें पुण्य हो ! गोचर ! ॥ १४ ॥
-कोठें कुदेश अमुचा? कसल्या अम्ही या? आचारहीन मलिना कुलहीन बाया !

हा पुण्यपाक गमतो अमुचा विशेष । जे आम्हि देखत असूं भरतादिकांस !"

गांवोगांवी अशि ये आश्चर्यानन्दसागरा भरती ।
वाटे कल्पद्रुम ये उगवुनि मरुदेशाभूस्थलावरती ! ॥ ॥ १६ ॥
भरता विलोकतांना मार्गस्थलवासिभाग्य उल्लसलें !
कीं सिंहलवासिजनां दैवें तीर्थप्रयाग ते दिसलें !! ॥ १७ ॥
निजगुणगानांसहितचि रामाचें सुगुणगान आयकत ॥
स्मरत श्रीरघुनाथा चाले मार्गी महामना भरत ॥ १८ ॥
वाटेंत स्नाउ तीर्थें, मुनिवर्याश्रम पवित्र सुरभवनें ॥
दिसतां करी निमज्जन, वंदन भरत स्वकीयदेहमनें ॥ १९ ॥
प्रार्थी विनम्रभावें त्यातें वर भरतराय हा एक ॥
" सीतारामपदांबुजि रति हृदयाची सदा जडो नीक ! " ॥ २० ॥
कोठें मिळती त्या जर किरात कोळी अरण्यिचे वासी ॥
तापसजन, वटुवर; यति संसाराचे तपोनिधि उदासी ॥ २१ ॥
करुनि प्रणाम त्यानें भक्तिभरें ज्यास त्यास भरत पुसे ॥
' कवण्या वनांत लक्ष्मण वैदेहीरामसहित वसत असे ? ' ॥ २२ ॥
तैं ते सांगत त्यांतें प्रभुचा सारा भला समाचार
भरता वधोनि लोचनिं वाटे त्यां ये स्वजन्मफल थोर ॥ २३ ॥
जीं कोण त्या निवेदिति कीं आम्ही देखिले तिथे कुशली ॥
श्रीराम–लक्ष्मण अशीं हृदयप्रिय तीं तया जनें दिसलीं ! ॥ २४ ॥
राघवलक्ष्मणसीतांच्या गोष्टी त्यानें जनांप्रति पुसाव्या ॥
त्यांनेंहि त्याच फिरुनी कितिदा तरि गोड ऐकत असाव्या ! ॥२५॥
वसति करोनी रात्रीं निघति सकाळीं स्मरोनि रघुनाथा ॥
श्रीरामदर्शनाची भरतांचन लालसा तवां चित्ता ॥ २६ ॥
सर्वत्र तैं शकुनमंगल होति त्यांस । होई सुरस्फुरण नेत्रभुजीं विशेष ! ॥
उत्साह ये हृदिं हा भरताननान । ' दुःखानला शमवि राम कधीं मिळून ?। '
ज्याचा मनोरथ असा तयि त्या प्रवृत्ति । स्नेहाल्लं मच करि त्यां प्रति भवमूर्ति
झाल्या तनू शिथिल पाउलिं डोल्ता ये । ते प्रेमगद्गदवचें वदती असेयें । २८
श्रीरामनित्र गुह दासवि त्यास येळीं । तो रम्य शैलवर ज्या वाल्मीकिह भेटी ॥
श्रीरामलक्ष्मण जिथें वसती मजीर । सीतेसमेत युगबंधु तपस्विहीर ! ॥२९॥

साष्टांग सर्वे नमती बघताच त्यास । उच्चारती ' जय रघूत्तम जानकीश !'
प्रेमातिमग्न अति राजसमाज झाला । श्रीराम कीं निजपुरा परतोनि आला !।
भरतहृदयिं तेव्हां प्रेम ये जें भरून । उचित वचनिं गाया शारदी शक्त तें न ।।
कविमति तरि कैशी त्यास वानू शकेल ?।। अहमिति मलिना धी व्रह्मसौख्या धकेलं
।। इति श्रीराम० श्रीअयोध्या० भरतचित्रकूटप्राप्त्यखण्डप्रेमभाववर्णन नाम त्रयोदशस्तरङ्ग ।।

## तरंग १४ वा

*प्रेमान्तरंग जन तो शिथिलांग होता । ते दोन कोस रिघता दिन जात अस्ता ।।*
पाहोनि ठाव जल, राहति ते निशीथीं । होता प्रभात निघती रघुनाथभक्ति ।। १ ।।
तो चित्रकूटिं विभु रात्रिच होय जागा । स्वप्नीं बघ जनकजादि अशा प्रसंगा ।।
कीं येतसे भरत सर्वजनासमेत । श्रीरामचंद्रविरहाङ्कित देह तप्त ।। २ ।।
सारेच दीन गमले-अतिदु खितान्त । माताहि सर्व दिसल्या हृदयात आर्त ।।
तें स्वप्न आयकुनि रामहि साश्रु होय । तो शोकनाशनहि शोकिं बुडोनि जाय ।। ३
श्रीराम बोलत " भलें नच लक्ष्मणा रे ! हें स्वप्न ऐकविल अश्रवणीय सारें "
बोलोनि हें करित बंधुसमेत राम । सुस्नान, पूजि शिवसाधुषि साधुकाम ! ४
पूजुनि देवा, मुनिंसि वदुनी बसता उत्तर दिशि दिसले ।
रामातें नभ धूळीं भरलें खगमृग आश्रमिं भयिं घुसले ! ।।
तुलसि वदे, अवलोकुनि कारण होई राघव चकितमना ।।
तवर येउनी किरात कोळी कळविति सकळ प्रभुचरणां ।। ५ ।।
वाणी अतीव शुभ ती परिसोनि राम । होई प्रसन्न, पुलकांकित हर्षधाम ।।
तें शारदाब्जसहलोचनिं अश्रु आले । स्नेहें भरे उर मुदें तुलसीहि डोले ! ।।६।।
हो काय कारण परी भरतास याया । श्रीजानकीरमण आकुल चिंतनीं या ।।
येवोनि कोणि कथि त्याप्रति हेंहि नीकें । आहेत कीं भरतसंगतिं तीं अनीकें ।।७।।
ऐकोनि तें प्रभुमनीं अति होय पेच । तातोक्ति एकिं, अनुजार्ति समाज साच
चिंतोनिया भरतभाव परी मनात । अस्वस्थ होइ रघुराय अनाथनाथ ।।८।।
होई समाधान परी विचिंतुनी । आहेत वागे भरत स्ववर्तनीं ।
पाहोनि रामासि सचिंत लक्ष्मण । सांगे प्रसंगें न्य रीतिलक्षण ।।९।।
*" प्रभो ! वदे मी अविचारिताही । हें दासकर्तव्य, न हो धिटाई !।।*
आहांच सर्वज्ञ-शिरोमणी तुम्ही । परी मला वाटत तें वदेन मी ।।१०।।

आहात सद्हृदयशीलनिधान नाथ ! । सुष्टुस्वभाव सगळ्यासचि गोड शात ॥
प्रीती समग्रि, सकलीं तुमच्याच साच । विश्वास, वास्तव जगा म्हणता तसेंच!
येता प्रभुत्व जगतीं विषयान्धजीवा । तो मोहपाशवश जाचक होइ सर्वा ॥
आहे परी भरत साधु, सुधी, सुनीति । विख्यात तद्हृदयिंची दृढ रामभक्ति
ऐसें असून मिळताक्षणिं राज्य त्यास । तो धर्मनीति मनिं मानित ना विशेष॥
हा आमची, कुटिल बंधु, कुवेळ पाही । मानीत राम वनवासिं असाह्य राही
ये दुष्टहेतु बहुसैनिक मेळवूनी । राज्या अकंटक करू म्हणतो कृतीनीं ॥
कोट्यिकारिं कुटिलत्व रचोनि दोनी । हे बंधु येति बहुसैन्यबळकरूनी ॥१४॥
याच्या मनात नसता जर घातपात । का सगतीं ह्यरथादिकदंति होत ? ॥
द्यावा कशास भरतालचि मात दोष?। येताच राज्यपद ये मद, ना कुणास !
शशि हो गुरुपत्नीरत, त्यावी नहुष स्वर्यानिं विप्रांसी ॥
लोकस्तुतिविमुख असा वेनासम अधम कोण अधरांचि ? ॥ १६ ॥
सुरपति सहस्रलोचन, सहस्रबाहु, त्रिशंकु वामार्जी ॥
राज्यमदें नच दिधले अपदास्कर दुष्कलंक कवणा जी ! ॥ १७ ॥
शत्रू तसें ऋण न अल्पहि शेष राहो । यांतें उपाय भरतें जरि युक्त हा हो ! ॥
त्यानें परी मुळिं न नीट विचार केला । कीं मानिलें वनिं असाह्य रघूत्तमाला
त्यातें कळेल परि, युद्धि विशेष आज । सक्रुद्ध राममुखिंचें बघुनी सुतेज ॥"
नीतीस विस्मरत लक्ष्मण बोलतां हें । हो भास वीररसवृक्ष फुलोनि राहे । १९
लावोनि रामपदिं आत्मशिरोऽनुजातें । मागे स्वशक्ति सहजा ऋजु निश्चयोक्तें ॥
"मातें प्रभो ! वच गणा न अयोग्य हें कीं । आम्हा छळी भरत दुष्टपरी अनेकीं
व्हावेत केवीं अपमान सहा ? । मनात हे राखुनि योग्य काय ? ॥
होतां प्रभू हे मज पाठिराखे । धनुष्यही मत्करिं सुष्टु टाके ॥ २१ ॥
मी क्षत्रजाति, रघुराज रामबंधु । विख्यात सर्व जगतीतळिं शौर्यसिंधु ! ॥
धूळीसमान जगिं कोण असेल नीच? । तीही शिरावरि चढे पदिं ताडितांच!"
उठोनी तो मागे कर जुडुनि आज्ञा रघुवरा ।
गमे झाला जागा रण रखवडां वीररचि खरा ! ॥
जग पाही शौर्या, कधि कटिंहि भाते वळकट ।
सजे ह्स्ती त्याच्या शरधर धनुर्दंड विकट ! ॥ २३ ॥
लक्ष्मण म्हणे " रणाग्नि भरतातें आज शिकवु दोन धडे ॥

'श्रीरामाचा सेवक' यश हे माझ जगांत हो उघडें ! ॥ २४ ॥
रामागमानफल मी वितरुनि अर्पि त्यासि समरामाजीं ।
निजविन दोनिहि बंधू रणशयनीं, सय समरा माजी ! ॥ २५ ॥
झालें भल, भरत लोकसमत आला । मागील रोष सगळा प्रकट तयाला ! ॥
निर्दाल्तिो मृगपती बहु कुंजराना । लाव्यासि जवि झपटीत असे ससाणा ॥
सैन्यासमत भरतासहि तवि आज । त्या सानुजास रणि पाडुनि दावु तेज ॥
झाल सहाय जरि त्यासि पिनाकपाणि । मारीन त्यासि तुमच्या शपथप्रमाणीं"
तें क्रोधयुक्त अभिभाषण लक्ष्मणोक्त । एकोनिया शपथही जाय तो करीत ॥
लोकेश, लोकहि भयाकुल सव होती । जाया पळून सगळ जण त पहाती ।
झालें भयार्त जग तों नभि होय वाणी । जी होय लक्ष्मणवलस्तुतिचीच खाणी ॥
" हे लक्ष्मणा ! कवण जाणि तुझ्या प्रतापा? कीर्तिप्रभाव तव रे ! वदण्या न सोपा!
जो सवकार्य उचितानुचितत्व जाण । तो साधु होय करि जो उचितप्रमाणें॥
जो आचरीत त्वरा, मग दु खि होत । त्यातें न मानिति भला कधि वेद संत"
एकोनी तें सुरवच मनीं लक्ष्मणा लाज वाट ।
सीतारामा नमित विनयें भक्ति चित्तात दाट ।
बोल राम प्रभु " मजसि तू वर्णिली चारु नीति ।
बंधो ! सर्वांमधि कटु अती राज्यगर्वाधता ती ॥ ३१ ॥
साधो ! ज्यानीं नच कधि सभा वंदिली सज्जनांची ।
स सवा ना घडलिहि जरी त्या नृपां गर्द जाची ॥
नाहीं बंधा ! भरतसम गा ! साधु लोकत्रयात ।
नाहीं तैसा कुणि परिसिला, पाहिला पुण्यवंत ! ॥ ३२ ॥
होईल नैव भरता कधि राज्यगव । ब्रह्मादिविष्णुहर त्या जरि लब्ध सव ॥
१ कीं क्षीरसिंधुमधि साडुनि बिंदु कांजी । नासेल शुद्ध कधि दुग्ध तदीय कां जी!
अंधारही गिळु शकल दुपारि सूरा । होईलही नभ निमग्न घनात आर्या ! ॥
केव्हा बुडल जलिं गोष्पदिंही अगस्ति। जेणीहि साडिल कधीं सहज क्षमा ती ३४
मेरूसि फुंकुनिच कीं उडवील मारुती । ग्रासील नैव भरता मदपूतनारि ! ॥
तातांचिया शपथि मी वदतों तुम्हाही । सद्बंधु साधु भरतासम लोकिं नाहीं !
संमिश्र दुग्धजल सद्गुणदुर्गुणांचें । धाता असे रचित सवतिविश्व साचें ! ॥
या सुरवद्यसरिं हंसचि जो अहाला । घे सद्गुणां भरत टाकुनि दुर्गुणांला !

ह्या हंस दिव्य, गुणदोषविभाग जाणे । तत्कीर्तिराशि उजळी जग सद्द्युतीनें"
गातां असें भरतसद्गुणशीलधाम । प्रेमाब्धिमग्न हृदयांतरिं होय राम ॥३७॥
श्रीरामवाणी परिसोनि कानीं । प्रीती वशोनी भरताभिमानी ॥
स्तुती करीती सुर सर्वरीतीं । " न रामसा नाथ दयाळुमूर्ति ! ॥३८॥
होता जरी भरतजन्म न या जगांत । ऐसा सुधर्मनिधि कोण जगांत होत ? ॥
कैसे कवी भरतसद्गुणगानिं शक्त । रामा ! तुम्हांविण तसा न दुजा समर्थ"
-ठेवी सरित्तटिं तदा निज सर्व लोक । माता गुरू सचिव यांस पुसूनि नीक॥
शत्रुघ्न तेविं गुह यासह भक्तिचिंता । तो जाय तेथुनि, जिथ रघुनाथसीता४०
जाणूनि मातृकृति अंतरिं खंत ज्यास । शंका कुतर्क भरतीं भरती अशेष ॥
"मत्नाम ऐकुनिच लक्ष्मण रामसीता । जातील येथुनि दुज्यास्थलिं काय आतां ?
श्रीरामचित्तिं जर मी जननीमतीच । जें बोलतील बहुही मज अल्प साच !
ते मानितील जर कीं मज आपुलासा । माझ्या मला सदय ते क्षमितील दोषां
माते गणोनि मलिना जरि ते त्यजीत । देवोत मान मज मानुनि दास भक्त॥
होवो कसेंहि तरि राघवपादुकांना । जाईन मी शरण सेवकतारकांना ॥४३॥
सुस्वामिराम, मम दोष न मानितील । त्यानाच मी शरण जाइन भक्तिलोल॥
लोकीं यशें अतुल चातक, मीन यांची । तत्प्रीति नीति शुचि नित्यनवीन साची"
ऐसें मनीं म्हणत चालत जात पंथें । संकोच भक्तिहि करी शिथिलांग त्यातें॥
त्याच्या मना फिरवि मातृकृता कुरीति । त्याचीं पदें चलति भक्तिभरें परी तीं॥
सद्भाव राघवमनांतिल जाणुनीयां । वेगेंचि तो उचलि पाउल शीघ्र पाया
तेव्हां दशा भरतमानसिंची अशी कीं । वारिप्रवाहिं जशि दावितसे जलौकी
प्रीती तशी भरतिं पाहुनि आर्तता ती । झालें निषादमन पूर्ण विदेहवृत्ति ! ॥
होती तदा शकुन मंगलपूर्ण त्यातें । ऐकोनि जें गुह वदे फळ जें मिळे तें४७
' जाऊन शोक भरणार समग्र हर्ष । लोपोनि तोष, परि अंतिं विषादपोष !'॥
मानीतसे भरत सत्यचि तें गुहोक्त । तो पातला तंवर आश्रम जेथ होत ४८
तें तो बघे गिरिनदीश्वनलोकराजि । पक्वान्नशी जणुं गमे क्षुधितांतरा जी ! ॥
जैशी प्रजा हृदयिं दारुण ईतिभीता । दुष्टग्रहीं, त्रिविधतापिंहि जी सुतप्ता४९
जाता सुपर्जिय, सुखदेशिं, सुभावते ती । तैशीच होय भरतस्थिति शोच्यमूर्ति
श्रीरामवाधि अतिहर्ष वनश्रियेतें । जैशी प्रजा सुनृप पाहुनि हृष्ट होते ! ५०
त्या पर्णिं हो सचिव मूर्त विराग हाच । राजा विवेक, वन पुण्य सुदेश साच॥

यद्वीर ते नियमनिग्रहयोग धीट । ज्या राजधानि गिरिसुंदर चित्रकूट ॥५१॥
ज्या श्याति उन्नति अशा शुचि रम्य राशी । उपन्न सर्वपरि सन्नृप वैभवानी॥
श्रीरामचंद्रचरणाश्रित भक्तिभावें । तो भाग्यवान् नृपति वास्तव सौख्य पावे ५२
सकलदलसमेता मोहभूपा जिणोनी । नरपति सुविवेक राज्य केलें सुखानीं ॥
*निखिलसुरसमेता वैभरा पूर खोडे । त्वहि न उरे तें सक्त स्थान कोठें !*
तेथें प्रदेश वनिंचे, मुनिसन्निवास । गावें पुरें, नगरि, खेडि अशीं जयास
नानापरी मृग विहग विचित्र सारे । हेंच प्रजागण तयामधि नांदणारे ! ॥५४॥
गेंडे वराह, गज, सिंह, तसेच वाघ । देखोनिया महिषधेनुवृषादिवर्ग ॥
सोडूनि वैर फिरती वनिं संगतीत । येनाच ती नृपतिची चतुरंगि होत ! ॥५५॥
वारिप्रवाह नदती, धनलात दती । वाद्यें निशाणरव त्यामधि वाजताती ॥
रावे, चकोर पिक, चातक, चक्रवाक, सानंद कूजति मराळहि ते सुरेख ॥५६॥
भृंगालि गाति करितात सुनृत्य मोर । वाहे सुराज्यिं जणु मंगल हर्षपूर ! ॥
वेली तरू तृण फलाढ्य सुपुष्पशाली । आनंदमंगल समाजि भरे विशाली !
रघुवरगिरिशोभा पाहुनी तो अतीव । अमित भरतचित्तीं खेळला प्रेमभाव ॥
व्रतनियमतपाच अति जैशी सुगाति । सुफलित करि वृत्ती सन्मुनाची सुदेती !

— इति श्रीराम० भरतस्य चित्रकूटदर्शन नाम चतुर्दशस्तरङ्ग —

## * तरंग १५ वा

उचावरी पळत जाउनि तो निषाद । सांगे उभारुनि भुजा भरता सुशब्द ॥
"हे नाथ ! वृक्ष निरखा, किति हे विशाल ! हे आम्र, जंबुतरु, पाकळ, हे तमाल
*हा वृक्षमध्यिं वटवृक्ष विराजताहे । उत्तुंग सुंदर अशा मन मोहिताहे ॥*
तो नीलपल्लवि भरे, फलिं लाल शोभा । छायाहि सान्द्र सुखदा मनिं निर्मि लोभा२
हो भास कीं तिमिर आणिक रक्तकांति । एशा अशा विधि रची अतिरम्यमूर्ति
हे वृक्ष होति विभुवर्य ! सरित्तटासी । छायेंत हो रघुवरपर्णकुटी दिसेशी ! ॥३॥
तीचे समीप तुलसीतरुराजि नाना । सीता किती करित, लक्ष्मणही जपाना ॥
वेदीहि उच्च वटवृक्षतळीं विराजे । सीताकराङ्गुलि शुभा रचली असे जे ॥४॥
जेथें वसून मुनिवृंदसमेत राम । सीं सर्व परिसती नित पुण्यधाम ॥
नानापुराणनिगमागम ऐतिहास । नाना कथा मधुर भक्तिविरक्तिबोध "॥५॥
त्रोक तें परिसुनी वचना सरुनें । अश्रू विलोचनिं भरे भरता किती तें ! ॥

वंदोनि त्यांसि चलती मग बंधु दोही ! तद्भक्तिवर्णनि पुरे नच शारदाही ! ६
स्पर्शोनि रामपदचिह्नित भू बघोनी । वाटे तया परिसलाभचि होय कोणी !॥
माथां धरूनि रज, लाविति वक्षि नेत्रीं । होती सुखी, जणुं मिळे प्रभुराम गात्रीं
पाहोनि तेधिं भरतस्थिति मूर्तभक्ति । प्रेमीं निमग्न जडजीव मृगादि होती ॥
मार्गा चुके गुहहि तें अतिभक्तिपूरीं !। सांगोनि वाट, सुर वर्षति पुष्पभारीं ! ८
तैं सिद्धसाधकहि भक्ति बघोनि तैशी । तीतें प्रशंसिति अकृत्रिम भावहर्षी ॥
" होता न भूतलि जरी भरतप्रभाव । येती न जाड्यि चरता, चरि जाड्यभाव!"
चित्रमंदरिं तो भरतांबुधि । मथि रघूत्तम राम कृपानिधि ॥
अमरसाधुहितास्तव सत्सुधा । सृजुनि भक्तिमयी निवची बुधा ! १०
गुहासंग तैसा अमितसुषमा बंधुयुगला ।
तरुच्छन्ना तेव्हां नच निरखुं सौमित्रि शकला ! ॥
निधी तो पुण्याचा भरत बघि रामाश्रम तिथें ।
जगीं मांगल्याचें सकल उगमस्थान जणुं तें ! ॥ ११ ॥
नाचे, प्रवेश करताक्षणिं, दुःखदाव । योग्यांस लाभत जसों परमार्थठाव ॥
रामापुढें भरत पाहत लक्ष्मणाला । माथां जटाभर, कटीं तरुवल्क त्याला १२
भाते कसून शर हस्ति धनुष्य खांदीं । रामा विचारित, वदे प्रभुही प्रमोदीं ॥
वेदीवरी विलसले रघुरायसीता । संतोपवीत मुनिसाधुसमाजचित्ता ॥ १३ ॥
सुश्यामवर्ण जटि वल्कलधारि राम । वेषें मुनीच गमले रति आणि काम ! ॥
हस्तांबुजीं फिरवितां शरकार्मुकांसी । हास्यावलोकि क्षणिं जीवभवार्ति नाशी
श्रीराम सीतेसह शोभतात । रम्यस्वरूपें मुनिमंडळांत ॥
ज्ञानादिसंघीं जणुं ते सुमूर्त । श्री०चिदानंदचि भक्तियुक्त ! ॥ १५ ॥
[ सीता रघूत्तमयुता मुनिमंडळींत । अत्यंत शोभत मनोहर ती नितान्त ॥
ज्ञानादिमेळिं जणुं साजति मूर्त का ती । आनंदसच्चिदभिरूपसमेत भक्ति १५]
तल्लीन हो भरत बंधुयुगासमेत । ना हर्ष शोकसुखदुःख मन स्मरीत ॥
"मां पाहि, पाहि त्रिभुवर्य!" रटोनि ऐसें । तो लोटला भरत भूतलिं काष्ठ जैसें!॥
तें प्रेमयुक्त वच लक्ष्मण ओळखोनी । जाणे मनीं भरत तो नमि आर्तवाणी ॥
सप्रेम बंधुवरलें उरिं ओढि त्यासी । तें स्वामिसेवनहि त्या धरित स्वपाशीं॥१७॥
भेटूं शके न भरता, त्यजुंही शकेना !। वर्णीत सत्कवि मनःस्थिति सोपमाना॥
खेंचूनि उंच पतंगी कुणि [illegible] । [illegible] लक्ष्मण ठेवि चित्तें॥१८।

सप्रेम तो वदत नम्र करूनि माथा। "वदी तुम्हा भरत हा निरखा जि! नाथा"॥
प्रेमें अधीर अति रामहि ऐकतां तें। भाता उठे! शर कुठें! धनुवल्क वातें!॥
त्या ऊचलोनि भरतासि बळेंकरूनी। घेई कृपानिधि उरीं कवळी करानीं॥
पाहोनि त्या भरत रामसुमीलनातें। सारेच विस्मरति कीं तनुतें मनातें! ॥२०॥
ती प्रीति रीति, मिळणी कवि शेश वर्णी!। होती अगम्य कविना मनिं, कर्णि, वाणी
सप्रेम ज्ञाति ऋतु सन्मति धृ दोनी। तें चित्त, धी, मन, अहङ्कृति विस्मयेनीं॥

सांगा, कोण वदें तें प्रकटू शकणार उत्तम प्रेम ?
छायेचीही छाया त्या प्रेमाची अगम्य हा नेम ! ॥२२॥
कविचा समग्र अर्थहि अवलंबुनि राहि अक्षरावरती ॥
नर्तकनाच तरी ते तालाच्या गतिस सर्व अनुसरती ! ॥२३॥
रघुवर-भरतप्रेमा सर्वपरीं हो अगम्य सकलाना ॥
तेथें प्रवेश नाहीं चित्ता हरिहरविधींचिया जाणा ! ॥२४॥
तें मी मंदमति कसा वर्णू शकणार उत्तम प्रेम ? ॥
निर्मोल रिंजणीची तार कधीं का सुराग स्वधाम ? ॥२५॥

पाहोनि रामभरता मिळणी अशी ती। चित्तामधें धडकि देवकुलें वहाती ॥
त्याची बृहस्पतिमतीं समजूत होता। वानोनि वृष्टि करिती सुमिं मुक्तहस्ता ॥२६॥

शत्रुघ्नाला प्रथम मिळुनी राम भेटे गुहाला ।
हृत्प्रेमाला अतिशय तया अंतरीं पूर आला ॥
भेटे प्रेमें भरतहि उरीं लक्ष्मणा आकळोनी ।
सौमित्रे तै भरत नमिला पादपद्मीं मिळोनी ॥२७॥
शत्रुघ्नातें कडकडुनिया लक्ष्मणें आकळीलें ।
वक्षोभागीं उचलुनि गुहा प्रेमिं आलिंगियेलें ॥
दोनी बंधू मुनिगणपदीं वंदुनी भक्तिभावें ।
आशीर्वादा मिळविति मुदा सौख्यदा त्या प्रभावें ॥२८॥
भक्तिप्रेमें हृदयिं भरुनी जानकीपादपद्म ।
धूळी शीर्षी धरिलि भरतें सानुज पुण्यसद्म ॥
वारंवार प्रणमिति तिला बंधु ते तैं तयातें ।
ती हस्ताब्जीं उठवुनि तया मस्तकीं स्पर्शि हस्तें ॥२९॥
चिंदी सीता वितरिति तया प्रेमराशी अनन्त ।

प्रीतीमध्यें स्मरत न तिचें देहभानाहि चित्त ॥
सर्वांरीतीं हृदयिं मुदिता जानकीतें बघोनी ।
चिंता भीति त्यजुनि वरिला थोर संतोष त्यांनीं ॥३०॥
कोणी कांहीं वदत न, न या कोणि कांहीं विचारी ।
प्रेमांभोधीमधि बुडुनियां जाय तद्वृत्ति सारी ! ॥
तैं नावाडी गुह निजहृदीं धैर्य मोठें धरूनी ।
जोडोनीया करयुग तयां बोलला नम्रवाणी !-॥३१॥

"प्रभो! सर्व माता मुनीशासमेत । अयोध्यानिवासी जनादीहि येत ॥
प्रधानादि सेनाधिपां घेउनीयां । इथें येत आहेत तुम्हां मिळाया" ॥३२॥
'येती गुरु' श्रवण हें करि शीलसिंधु । सीतेसमीप निज ठेवि कनिष्ठबंधु ॥
वेगेंचि जाय तयिं राघव धर्मधीर । दीनावरील करुणा हृदिं ज्या उदग्र॥३३॥
पाहोनियां गुरुसि सादरभक्तिपूर्ण । दंडप्रणाम करि राम तयांसि तूर्ण ॥
घेती वसिष्ठ मुनिही कवळीत वक्षीं । सप्रेम त्यां उभय राघवलक्ष्मणांसी॥३४॥
तैं प्रेमहृष्ट तनु सागुनि आत्मनाम । साष्टांग वंदि दुरुनी गुह भक्तिधाम ॥
भेटे बळें मुनिहि रामसखा गणोनी । की स्नेह घेत भुइला लुटतें करांनीं॥३५॥
'श्रीरामभक्ति जगिं मंगलमूल सारी' । ऐसें स्तवोनि सुर वर्षिति पुष्पधारीं ॥
'याचेवरी कवण होय वरें सुनीच? आहे वसिष्ठसम कोण महान् तसाच? ३६
जे भेटले मुनि गुहा बहु मानुनीयां । त्या लक्ष्मणाहुनिहि थोर गुणीं अमेया ॥
हा जानकीरमणभक्तिभरप्रभाव । हो हाच कीं उघड सिद्ध मनोज्ञभाव ॥३७॥
हृद्भाव जाणुनिच रामजनांतरींचा । कारुण्यराशि भगवान् सकलज्ञ साचा ॥
ज्याचा जसा हृदयिंचा अभिलाष होय । त्याचा तसा पुरवि तो प्रभु रामराय'
श्रीराम त्या सानुज भेट दे क्षणीं । प्रचण्ड तद्दुःख निवारि वीक्षणीं ॥
प्रौढी न ही रामगुणीं विशेषशी । कोटीघटीं एक रविच्छवी जशी ॥ ३९ ॥
तैं स्नेहप्रेम उचंबळोनियां । गुहाप्रती भेटति वानुनी तया ॥
स्वभाग्यही वर्णिति दैवतोय कीं । अनन्यभक्ती गुह जाणतो निकी ॥ ४० ॥
पाहि राम अतुल्या जननींना । वल्लरी दिमहता जणुं दीना ॥
कैकयीस विभु भेटत आधीं । प्रेमला सरल अंतरिं ज्या धी ॥ ४१ ॥
कैकयी नमित रामदाजीं । दुःखिता हृदीं लेखण धे जो ॥
रामराय तिजला समजावी । दोष काल-विधि-कर्मिंच लावी ! ॥ ४२ ॥

सर्वांहि मावाप्रति राम भेटुनी । प्रबोधुनी त्या परितोष दे मनीं ॥
" हें ईश्वराधीन समग्र विश्व हो । यावा न कोणासहि दोष व्हाइ हो ! ॥"
अरुन्धती वंदिलि दोंहि वधुनीं । विप्रस्त्रियांही सह येति त्या वनीं ॥
गंगा-भवानीसम त्यांसि मानिलें । त्यांनींहि आशीर्वचिं त्यांसि वानिलें ॥४४॥
केलें मुनिनार्पादिं त्यांहिं वन्दन । भुजीं तदकाप्रति देति नंधन ! ·
एका जणों लाभलि थोर संपदा । प्रहर्ष त्याचा नच वर्णवे कदा ! ॥ ४५ ॥
कौशल्येतें वंदिती दोंहि वधू । तीही झाली व्याकुळा प्रेमसिंधु ॥
घेई त्यांसी ती उरीं आवळोनी । न्हाऊ घाली लोचनीं अश्रुपूर्णी ॥४६॥
त्या वेळेचा हर्ष, तैसा विषाद । वर्णायातें ना कवीतेंहि शब्द ! ॥
कैसा यावा स्वाद मूका वदाया ? । यानी साह्या सर्वदा शारदा या ! ॥४७॥
मातेसि भेटुनि सलक्ष्मण रामराया।प्रार्थी गुरूसि 'अजि आश्रमिं याजि ! पाय'
पौरादि सर्व मग ते मुनिच्या निदेशीं।जागा, जला बघुनि लागति राहण्यासी

ब्राह्मण, मंत्री, माता गुरु तैसें काहिं लोक सागातीं ॥
घेउनि हर्षे आश्रमिं लक्ष्मणरघुनाथ भरत हे जाती ॥ ४९ ॥
तेव्हा सीता मुनिवरपदा भक्तिभावें धरीत ।
आशीर्वादा मिळवि मुदिता इष्ट कल्याणयुक्त ॥
पत्नीलागीं मिळत गुरुच्या ती मुनिस्त्रीसमेत ।
त्या प्रेमाचें कथन करण्या कोण व्हावें समर्थ ? ॥ ५० ॥

वदी पदाब्जिं सकलांप्रति नम्र सीता । आशीर्वचें मिळवि जीं सुरवंति चित्ता
ती जों बघ सकळही निज सासवांना । भीता, मिटी नयन, हाटिस साहवेना! ५१
व्याघाचिया पडलि पाशीं जणों मराली । बोले 'विधे ! किति वरें तव दुष्ट केलि!'
सीते बघूनि अति दुःखित त्याहि झाली।दुःख विधी विचारि, लागति साहणें तीं
तैं जानकी हृदयिं धैर्य धरूनि काहीं । नीलाम्बुजोपमविलोचनिं अश्रु वाही ॥
श्वश्रूजनाजवळिं जाउनि त्यांसि भेटे । कारुण्यपूर अवनीवरि पार लोटे ! ५३
श्वश्रू तिनींहि नमिल्या जनकात्मजेनें । प्रत्येकिच्या धरणिं लागुनि आदरानें॥
प्रेमाधिमग्न हृदिं चिंतिति त्याहि आशी।'सौभाग्य हो तव अनन्तचि सौख्यराशि!'
प्रेमाकुला जनकजा सकलांहि राशी । पाहोनि त्यांसि नसण्या कथिलें गुरूनीं ॥
ते सांगती सकल संसृति मायिका ही । बोधूनि सांगतिहि ते परमार्थ काहीं ५५
भूपालमृत्यु कथिला मग जों मुनींनीं । दुःखीं असलि बुडला प्रभु तें श्रवोनी ॥

सन्मृत्युहेतु गणुनी अपुल्यावरील । प्रीती असी विकल हो प्रभु धैर्यशील ॥५६॥
वज्रापरी कठिण ती कटुवाक् श्रवोनी । सीता सशोक तोश लक्ष्मण आणि राज्ञी ॥
सारेहि लोक अति शोकिं बुडोनि गेले । रायें जणों मरण आजचि सेवियेलें । ५७
रामा मुनी बहुपरीं समजावि चित्ता । मंदाकिनीजलिं नहाति सर्वे समस्तां-
तो निर्जल व्रत करी दिनिं त्यांत राम । लागे गुरू तरिहि लोक तसे निकाम ५८

दुसऱ्या दिवशीं राघव मुनिवर्योचा निदेश आयकुनी ॥
श्रद्धाभक्तिसमन्वित सादर करि सर्व, जें निवेदि मुनि ॥ ५९॥
पितृक्रिया तो करि वेदसंमत । हो शुद्ध तो पापतमोऽर्क कीर्तित ॥
यन्नाम वही अघतूलराशित । होतें जगन्मंगलमूळ चिंतित ॥ ६० ॥

तो साधुसंमत अशा प्रभु शुद्ध झाला । गंगौघ कीं सकल तीर्थि समर्चियेला ॥
जावोनि त्यावरि पुन्हां दिन दोन काल । बोले गुरुंप्रति रघूत्तम भक्तिशील ६१
" हो नाथ! सर्व जन दुःख अतीव सोसी । ज्या कंदमूल फल वारिच सेवनासी ॥
मंत्री, तसा भरत सानुज, आणि माता । पाहोनि हो क्षण मला युगसाच चित्ता । ६२
सर्वांसमेत रिघेंण मुनिनीं पुरासी । येथें अम्ही, नृपति इंद्रपुरीनिवासी ॥
धारिष्ट होय मम हे वदणें तुम्हातें । जें योग्य वाटत असे करणें स्वचित्तें" ६३
तें बोलती मुनि " विभो! करुणानिधाना! । तूं धर्मसेतु वच हें वदशील कां ना ?
हे श्रांत आर्त जन विश्रम पावुं देत । लाभोनि दर्शन तुझें दिन दोन येथ" ६४
रामोक्ति ऐकुनि भयाकुल सर्व होत । नौका जणों जलनिधीमधि वादळांत । ॥
ऐकोनियां मुनिवरोक्ति परी शुभा ती । वाटे तयां पवन कीं अनुकूल होती । ६५
पुण्यौघिं, ज्या निरखितांचि शमे अघाली । त्या स्नान ते करिति सर्व तिनीहि कालीं
आतृप्ति ते बघति मंगलमूर्ति डोळां । सानंद दंडवत घालिति कैकवेळां । ६६
श्रीरामशैलवनिं पाहति हिंडुनी ते । जेथें सुखें सकळ, दुःख नसेचि जेथें ॥
पीयूषतुल्य जलिं निर्झर वाहतात । वायु त्रितापहर मंद सुगंधि शीत ॥६७॥
वेली तृणें द्रुमसमूह अनंतजाति । पुष्पीं फलीं किसलयीं अति शोभताती ॥
छायेंत शोभति शिला सुखदा नितान्त । शोभा वनोद्भव अशी कवि वर्णु येत १६८
तेथें सरें सरसिजें, सलिलें मनोज्ञें । कूजन्मरालगण, गुंजति भृंग गानें ॥
सोडूनि वैर विपिनीं मृग संचरीती । नाना विहंग बहुरंग न वर्णिजेती ६९
कोळी किरातजन भिल्ल वनाधिवासी । घेऊनि गोड शुचि सुंदर जीं सुधासीं॥
द्रोणीं भरून भरुनी रचुनी मनोज्ञ । सत्कंद मूलफल अंकुर हीं जुडून ॥७०॥

सान्याहि देति विनयें करुनी प्रणाम। सांगोनि भेद, गुण, गोडि, तदीय नाम।
जें देति लोक बहुमोलहि ते न घेती। घालोनि रामशपथा परतोनि देती॥७१
स्नेहें मरूनि मृदुमापणिं त कथीत। "जाणोनि भक्ति हृदिंची बुध मानतात
आहा तुम्ही सुहृति, नीच अम्ही निषाद। रामप्रसादिं तुमचे दिसलेत पाद॥
आम्हास लभ्य कुठनी तुम्हि लोचनांसी? भागीरथी कुठुनि यावि मरुस्थलांसी?
पाळी कृपाळ विभु राम अम्हा निषादा। गंगा जशा, जन तशाच तदीय साधा
जाणोनि हें गणुनि भक्ति हृदंतरींची। संकोच सोडुनि अम्हा करुणा कराचि!
आम्हा कृतार्थ करण्यास्तव, अल्प घ्या जी। जे आणिले फलतृणांकुर आम्हि आजी
हो पाहुणे प्रिय तुम्ही वनि येउनीया। सेवेस योग्य नच भाग्य असे अम्हा या
देणार काय? अम्हि दीन तुम्हा महंतां? श्री काष्ठपल्लवचि हो असुची अनन्ता!
सेवा अम्हांकरि तुम्ही प्रभु हीच माना। ना चोरितों तुमचिया वसनादिकांना!
आम्ही अजाण खल घातक जीवजाता। दुर्बुद्धि, योजित दुराचरणांत हाता!
रात्रदिसीं करितसू जरि पापराशि। पोटीं न अन्न, पटवास न वा कटीसी!॥
स्वप्नींहि धर्ममति नाहिं जरी अम्हांस। आम्हास रामपददर्शनलाभ झाला!
श्रीरामचंद्रपदपद्म विलोकिताच। ना दु खदोष असुच उरलेहि साच!" ॥
त्या प्रेमलोक्ति सुरनीति समग्र पौर। त्या धन्यता स्तवनि अर्पिति ते अपार

ऐकुनि त्यांच्या प्रीतिभाषणा भाग्या त्यांच्या ते स्तविती।
सुखित होति जन म्हणुनि ऐकुनी सीतारायवचरणरति॥
निजभक्तिहि त्या तुच्छ वाटली ऐकुनि धन्य किरातवचें।
तुरसि म्हण, तरि स्नेहहि घेउनि तरते, यश हें रघुपतिचें! ॥७९॥

सान्या वनीं विहरता अति हृष्ट चित्तें। चारी दिशा प्रतिदिनीं जन सर्वही ते
येतां जशी प्रथमवृष्टि, वितेत हृष्ट। ते मोर दर्दुर जणों रमतात पुष्ट! ८०
—इति श्रीरघुनाथचवधिउखवादपुरवासियनविहरणं नाम पञ्चदशस्तरङ्ग.—

## तरंग १६ वा

प्रीतींत मग्न सगळे पुरलोकनारी। जाती क्षणासमचि त्या दिन यामिनीही॥
प्रत्येक सासुचि पृथक् तनुनेदरूरें। सेवीतसे जनकजा विनयें अनूर॥ १॥
हें राघवाविण कुणास न मर्म ठावें। मायारतीच रघुनाथ असे स्वभावें॥
सीता प्रसन्न करि घेउनि सासवांना। आसी दिल्या तयिं तिज्ञा उपदेश नाना॥

सीतेसमेत ऋजु देखुनि भाउ दोही । परतावली कुटिल राणिहि कैकयी ही ॥
ती प्रार्थि आर्तपणि भूवि, तसें यमातें । "स्वीकारता अजुनि का उदरीं न मातें ?
लोकांत वेदिंहि तसे म्हणती कवीही । जागा न रामविमुखा नरकींहि काही !"
थेका अशी सकललोकमनीं उदेली, । साकेति राम परतेल न कीं, स्वमेळीं ? ४
रात्रीं न नीज, नच भूक दिनीं सुचेना । चिंतार्त हो भरत कांहिंच त्या रुचेना ।
पंकात मीन रुतल्या जल आटतांना । तैसाच तो तळमळे उपमा दुजी ना ॥५॥
" मातेचियो जणुं मिषें करि दैवघात । दृष्टी विनष्ट करि कापणियोग्य भात
रामाभिषेक तरि होइल केविं रीतीं । यातें उपाय न " म्हणे भरत स्वचित्तीं ६
" आज्ञापितील गुरु तोंच फिरेल राम । ते बोलणार परि जाणुनि रामकाम ! ॥
माता कथील, तरि तो परतेल खास । ती केविं रामजननी परि घे हठास ? ७
माझ्यापरी अनुचरें वदणें कशाला ? । ना वेळ चागलि मला विधि वाम झाला !
हट्टा धरीन तर होइल तें कुकर्म । कैलासतुल्य गुरु सेवकधर्ममर्म ! " ॥ ८ ॥
युक्ती न एकहि ठरे मनिं त्याचिया ती । चिंतेमधेंच सरली सगळीहि राती ॥
स्नाना करून नमि तो प्रभुतें प्रभातें । बैसूं बघे, तंवर त्या गुरु बोलवी तें ९
वंदोनिया गुरुपदांबुजिं, तन्निदेशीं । तो बैसला तंवर येति तिथें सभेसी ॥
सारेच विप्र सचिवादिक सर्व लोक । बोले तयास गुरुवर्य वसिष्ठ नीक ॥१०॥

॥ इति भरत-विषाद–विचारवर्णनं नाम षोडशस्तरङ्गः ॥

## तरंग १७ वा

" ऐका सभासद अहो ! भरता ! सुजाणा ! । श्रीरामराय रविवंशरवीच माना
धर्मैकधुर्य भगवान् प्रभु हा स्वतंत्र । हो सत्यसंध भर्ति रक्षक वेदमंत्र ॥ १ ॥
हा रामजन्म जगिं मंगलहेतु हो कीं । मातापिता गुरु कथी, करि तें विवेकी ॥
निर्दाळुनी खळगणां, प्रतिपाळि देवां । त्यां संत मानिति अनन्य सुधन्य ठेवा !
सत्प्रीति, नीति, परमार्थ, निजार्थ सार्थ । जाणे यथार्थपणि रामचि त्यां समर्थ
सत्ता असे सकल लोकिं रघूत्तमाची । ब्रह्मा रमेश, हर, सूर्य, शशांक हाचि !
दिक्पाळ सर्व, कळिकाळ, अहीश, शेष । पृथ्वीपती जगिं जया प्रभुता विशेष ।
जी योग,सिद्धि, कृति,जीव, अशेष माया।जी वेदशास्त्रिं कथिली, प्रभुशक्ति कीं या
चित्तीं विचार करता सकलांहि यांना।श्रीराम चालक खरा, यश तें दुजा ना ! ।
याकारणें सर्वहित, रामनिदेश आम्हा । तैसेंच आचरूं जसें मत होय रामा ५

रामाभिषेक सकलाप्रति सौख्यदाता । तो एक मार्ग जगिं मंगलहर्षकर्ता ॥
साकेतिं येइल कसा रघुनाथ आता । शोधून त्यास सदुपाय तुम्हीच चिंता!"
ती आर्द्र रुक्त जनें मुनिवर्यवाणी । जीमाजिं नीति परमार्थ निजार्थ तीनी ॥
लोकीं न उत्तर दिलं मनिं गोंधळूनी । तेव्हां वदे भरत वद्दुनी बद्धपाणि ॥७
" झाले कितीक नृपसत्तम भानुवंशीं । एकाहुनीहि गुरु एक असे विशेषीं ॥
माता, पिता, जरि तयाप्रति जन्महेतु । धाता शुभाशुभ कुनी करवी परंतु ॥
दु.खें विनाशुनि समग्र सुभव्य दावी । आशीर्वचोबल असे मुलिं ज्या प्रभावि
जे धातुलेखहि पुसू शकती प्रसाद । आज्ञा तदीय विभु आचरित प्रमोद ॥
त्यानीं उपाय मजला पुसणें, गमे हें । माझेंचि दुर्मग खरोखर सर्व आहे !"॥
ऐकोनि भक्तिमय त्या भरतोक्ति गोड । प्रेमा उचंबळुनि ये गुरुचा अजोड ॥
बोले वसिष्ठ " तव भाषण सत्य ताता ! । सारी कृपा समज तू परि, रामसत्ता!
स्वर्गीहि रामविमुखा नच सिद्धि येई । आशीर्वच सफळ, रामकृपेचि पाहीं ॥
सकोच वाक्य परी सुचवीन एक । सर्वस्वनादिं बुध याकित अर्ध देख !
भ्राते तुम्ही उभय जाउनि काननातें । घ्या पाठवूनि गृहिं लक्ष्मण-राम सीते!"
झाले प्रहृष्ट मुवचें द्वय तेहि बंधू । गात्रीं उरीं भरत त्यामधिं हर्षसिंधु ! ॥
झालें प्रसन्न मन, तेज मुखीं विराजे । झाले, जणों गमत त्याप्रति राम राजे!
लोका गमे तैं बहुलाभ झाला । लघून हानी जरि सोसण्याला !
राज्ञी परी शोक करीति भारी । दु.खें मुखें तुल्यचि तद्विचारीं ॥ १४ ॥
बोले तदा भरत " हें घडता गुरूक्त । लाभेल सर्व जगतास अभीष्ट त्यात ॥
राहेन काननिंच मी मम जन्म सारा । त्याहून सौख्यकर नाहिंच मद्विचारा ॥
श्रीजानकी रघुपती हृदयाधिवासी । सर्वज्ञ सुज्ञमति आपणही महर्षि ॥
मी बोलतो सकळ हें जर सत्य होत । दावोत सत्य करुनी मुनिही निजोक्त"॥
ऐकोनि तीं भरतसद्वचनें सुभक्ति । झाली समेस्थ विदग्ध मुनीशमूर्ति ! ॥
प्रेमाब्धिला सकलमानसिं पूर आला । यावी स्थिती सकल ती कथि वर्णण्याला!

भरतमहिमा वाटे मोठा अगाध रत्नांबुधि ।
तरुनि दिवण्या तीरीं आली गमे मुनिवर्य धी ॥
हृदयिं अवला धैर्या नेघे, न पार दिघू शके ।
नच तिज मिळे होडी, नौका, जहाजहि ज टिके ! ॥ १८ ॥

भरताचा महिमा मग कवण्या मतिनें समग्र वानाचा ? ॥

शिंपलिमधें तळ्याच्या, अगाध जलसिंधु केविं सामावा ? ! ॥ १९ ॥
भरतचि मन तेव्हां वसिष्ठमुनिच्या हृदीं करि निवास ॥
आले सर्व जनाग्रह उभयहि ते विमल राघवापास ॥ २० ॥
श्रीराम नमुनि मुनितें आसन त्यातें निवेदि बैसाया ।
आज्ञापितां मुनींनीं बैसति मग सकल आपुल्या ठायां ॥ २१ ॥

तेव्हां विचार करुनी वदले मुनीश । चिंतोनि मानसिं यथोचित कालदेश
" हो ज्ञाननीतिगुणधर्मनिधान रामा ! । ऐका जि ! सुज्ञ ! परिपूरितभक्तकामा !'
सर्वांचिया हृदि तुम्ही वसतां सदैव । त्याचा तुम्हां कळतसे सदसत्स्वभाव ॥
हो भव्य जेविं भरता, जननींस, पौरा । ऐसाच उत्तम उपाय वदा जि ! सारा
ना आर्तभाषणिं असे स्थल सद्विचारा।जाणे जुगारि जन केवळ कीं जुगारा!"
ऐकोनि वाक्य मुनिचें रघुराय बोले।"स्वामिन्! समस्त तुमच्याच करांत ठेलें !
सर्वांस होइल सुखा भगवन्निदेश । तो पाळितील जनही सगळे सहर्ष ॥
आदेश जो प्रथम झाल मला मुनीश । मानीन मी अखिल तो लववूनि शीर्ष
तैसेच झाल इतरांप्रति जे निदेश । त्यातें यथार्थ करितील विभो ! अशेष "
बोले मुनी " वदसि राघव ! सत्य तेंचि । प्रीती परी न गणिशी भरतातरींची
याचाठिं मी वदत राम ! पुनःपुन्हां हें । हो मन्मती भरतभक्तिमयीच पाहे
माझ्या मतें शुभद शोकशाम हेंचि । जें इष्ट होय भरता, कर तूंहि तेंचि ! ॥
भरतविनति आधीं आदरें आयकावी । मनन करुनि चित्तीं ती विचारें पहावी
सकळ मग करावें योग्य जें साधुचित्तें।जनमति, नृपनीती, सच्छ्रुती सांगती तें"
सप्रीति ती गुरुहृदीं भरतावरील । पाहोनि रामहृदयीं मुदिं येइ डोल ॥
जाणे प्रभू भरत हो शुचि धर्मलोल । तो आत्मदास तनुवाङ्मनिं भक्तिशील
बोले रघूत्तम मनोहर मंजु वाणी । सन्मंगला, गुरुनिदेश मनीं धरुनी —
" बोलेन तातशपथें गुरुच्याहि तेथें । बंधु त्रिलोकिं भरतासम नान्य माझे॥
त्यांची असे गुरुपदांबुजिं भावभक्ति। ते भाग्यशालि जनिं शास्त्रिहि वर्णिजेती
ज्याच्यावरी गुरुहृदंतरिं भक्ति ऐशी । तद्भाग्यराशि कथवेल तरी कुणाशी ? ।
भ्राता लघू म्हणुनि भीड मनासि वाटे । तोंडावर स्तवन त्या भरता न मोठें
सांगेल जें भरत तें करणें, भलें हें" । श्रीराम सांगुनि असें उगलाच राहे ॥ २
तेव्हां वसिष्ठ वदती भरतासि उक्ति । " संकोच सोड सगळा तव जो हृदंतीं॥

श्रीराम म्हणु तव, अवधि जो देरचा।वत्सा! तयास कथिं तू तव भाव साचा'

— इति श्रीराम॰वसिष्ठरामसंवादो नाम सप्तदशस्तरङ्गः —

## तरंग १८ वा

तसें ऐकोनी तें मुनिवचन रामानुमति ही ।
मनीं जाणोनीया प्रभु गुरु विरोधी न लवही ॥
स्वशीर्षी, तें मानी, सकल पडला भार, भरत ।
वदू कांहीं नेणे अतिशय विचारात निरत ॥ १ ॥
उठोनी तो राहे, पुल्कहि उभे तत्तनुवरी ।
तया प्रेमें अस्रू नयनयुगलाभोरुहिं भरी ॥
वदे " माझे हेतू मुनिवरमतीं संमत अति ।
स्थिती आहे ऐशी तर अधिक मी बोलिन किती,! ॥ २ ॥
प्रभूचा मी जाणें सरल ऋजु सद्भाव हृदयीं ।
नसे तो केव्हांही कुपित, अपराध्यावरतिंही ॥
कृपास्नेहप्रीती प्रभुमनिं निरापा मजवरी ।
न खेळामध्येंही चिरड दिसली कीं खुवरी ! ॥ ३ ॥
न बाल्यापासोनी त्यजुनि मम संग प्रभु रिघे ।
कधींही माचित्ता लव न दिधलें दुःख अनघें ॥
कृपारीती जाणें प्रभुहृदयिंची मी अतुलिता ।
हरें मी खेळीं तो प्रभु करि जय मीच जिंतता ! ! ॥ ४ ॥
सकोचुनि स्नेहिं न मीहि कांहीं । समोर त्याच्या वदण्या शकही ।
अजूनि तद्दर्शनलालसानीं । न सेविली तृप्ति विलोचनांनीं ! ॥ ५ ॥
प्रभुप्रमा माझ्यावरिल विधिही साहु न शके ।
मधें केलें नीचें उदित जननीचें मिष निकें ॥
परी ही मद्वाता मम वदनिं ना आज सजतं ।
स्वतां साधोनी का शुचिपण कुणानें समजेंत ! ॥ ६ ॥
आतां म्हणून जर मी मम मद माता । मी मात्र साधु सुभगाचरणीं पहातां ॥
होईल ती कुटिलता मम सर्वरीती । उद्‌बिया कणहिं तांदुळ काय हातीं ! ७
मोतीं कधीं बनति पल्वलशुक्तिमाजीं।माझाच दोष, नच मी कवणाहि देंशि ।

स्वप्नींहि हें नच असे म्हणणें मदीय । दुर्दैवसिंधु मम सत्य अगाध होय । ८
ना आत्मपापपरिपाक कळोनि साच । मातेसि दोषि म्हणणें, तिज भाजणेंच !
चिंतोनि चित्ति बहुही सगळी निराशा । सन्मार्ग एकचि गमे करि सौख्यपोषा
स्वामी महर्षि विभु राघव आणि सीता। यांच्या निदेशें परिणाम भला समस्तां
आहे मदुक्ति ऋजु वा कुटिला कशी ती। श्रीराम, सद्गुरुचि जाणति साधु चित्तीं
हा साधुसंगम, सुतीर्थ, विभू समोर, । यांच्यापुढें वदतसें वच मी विनम्र ॥
पाळीयला मरणनिश्चय भूपरायें । माता मदीय कुमती जगता कळों ये ११
दृष्टीं न देखवति आर्त मदीय माता । नारीनरां नगरिंच्या अतिदुःख चित्तां
हा मीच कारण असें सगळ्या अनर्था । जाणोनि हें सहत मी सकला स्वघाता
गेले वनांत मुनिवेष धरूनि राम । सीतेसमेत सहलक्ष्मण हर्षधाम ॥
पायींच संचरति ते अनवाणि, याच । आहेत साक्ष भगवान् गिरिजामहेश !
राहोनि घावहि असा, अजुनी जगें मी। राहोनि, भक्ति करि जो गुह धन्य रामीं
सप्रेम ते बघुनिही गुहमानसींचें । भंग न हें मदुर वज्रकठोर साचें ! १४
येवोनि मी बघतसें अजि सर्व डोळां । मी हा जिवंतपणिं साहत मंद गोळा !
ज्यांना बघोनि पथि याकिति दुष्ट दर्प । सारा तमोगुण विषादिहि विंचु, सर्प १५
ते राम-लक्ष्मण तशी जनकात्मजा ती । ज्या कैकयीस गमती जणु शत्रुमूर्ति॥
पुत्रा त्यजून विधिया, कवणास यावें । सोसावयास अतिदुःसह दुःख दैवें ?" १६

ऐकोनी ती भरतमुखिची सूक्ति अत्यंत आर्ता ।
भक्तिप्रेमें सुनयविनयें पूर्ण कारुण्ययुक्ता ॥
शोकामध्यें सकलहि सभा क्षुब्ध होवोनि मग्न ।
वृष्टी हेमी सरसिजवना कीं करीते विदीर्णा ! ॥ १७ ॥

आवीन सुंदर कथा कथुनी अनेक । ज्ञानी वसिष्ठ करिती भरतीं विवेक ॥
श्रीराम, चंद्र रविच्या कुलकैरवाचा । बोले सुयोग्य वचनीं भरतास साचा १८
" वत्सा ! नको करूं मुळींच मनांत खंत । जाणोनि जीवगति चालविता अनंत ॥
माझ्या मतें त्रिभुवनांत तिनीहि काळीं । पुण्यात्मलोक तरण्या तव भक्ति झाली !१९
जो कोण मानिल तुला कुटिलात्म त्यास। व्हावा न लोक इह वा पर वा विशेष॥
ज्यांना मुळीं न घडली गुरु-साधु-सेवा । त्यानींच मात्र जननीप्रति दोष यावा !२०
होऊन नष्ट सगळें अघ तत्क्षणींच । लोपोनि त्यापरि अमंगल राशि साच ॥
येथें मिळे सुयश, सौख्य परत्र लोकीं । नामा स्मरोनि भरता! तुझिया, विलोकीं २१

मी हा सुमार्गचि तुझा धिरवाड मार्गे । पृथ्वी सुरजित असे तव पुण्यमार्गे ॥
ताता! कुबकें न करीं निज मानपान । न प्रीति वैर करणा त्यजुहि येउ । २२
जाती विहग, मृग वा मुनिशनिधानीं । ते हिंसका वधुनिया पळतात रानीं ! ॥
पक्षी मृगेंहि हृदिं जाणति मित्र वैरी । कैसा न मानव गुणोत्तमबुद्धिधारी ! २३
मी जाणतों तुजसि उत्तमरीतिं ताता ! । कैसे करूं मजसि हें न कळेचि चित्ता॥
त्यागोनिही मजसि सत्यचि पाळि राय । मत्प्रेमनिश्चयिं नृप त्यजि आत्मराय !
वातोत्किलरानिं मला मनिं दुःख होतें । एकोनतें परि तुम्हा दुरवाचयातें ॥
आज्ञा असे दिधलि सद्गुरुनींहि आता।जें सांगशील मज तेंच करीन ताता ।२५
संकोच सोडुनि करीं हृदय प्रसन्न । जें बोलशील अजि तू मज, तें करीन " ॥
सत्यप्रतिज्ञ रघुनाथवच अशोनी । झाले निमग्न जन तें सुखसन्निधानीं ॥२६॥
सर्वां सुरासहित हो परि इंद्र भीत । चिंतीत विघ्नतति येइल केविं यात ! ॥
चिंतोनिही नच दिसे सदुपाय त्यांनें ! रामाप्रती शरण जाति अनन्य चित्तें २७
तें एकमेक करिती सुविचार चित्तीं । रामास अर्पित करी निजभक्तभक्ति ॥
दुर्वाससा स्मरुनि, त्यापरि अंबरीषा । झाली सुरा, सुरवरा हृदयीं निराशा ! २८
लागोनि कानिं वदती शिर हालवोनी । कीं ' दुःखपंक्ति किति सोसियली सुरानीं
प्रह्लाद तें प्रकटवी नृहरीसि भक्त । हो देवकाज भरतानरि आज सक्त ! ॥२९॥
हे देवहो ! न दुसरा सदुपाय कांहीं । सद्भक्तसेवन रुचे रघुनायकाही ॥
प्रेमें हृदीं स्मरु भलें भरतासि सारे । जो राघवा निजगुणीं धरि सत्यकारें !' ३०
परिसुनि अमरसुनिश्चय सुरगुरु वाखाणि देवभाग्य किती !
कीं ' शुभमूल जगत्त्रयिं अतिरति भरताचिया पदांवरतीं ' ॥ ३१ ॥
जानकीरमणसेवकसेवा । कामधेनुसम मानुनि ठेवा ! ॥
भक्ति आलि हृदयीं भरताची । जाण दैवगति उत्तम हेचि ! ॥३२॥
शोक यात अजि यतुनि सारा । आणि तो विधि सुमंगल वारा ॥
हा प्रभाव मनिं घे भरताचा । रामराय वश त्याप्रति साचा ! ॥३३॥
हे सुरेन्द्र ! सुर हो ! भय टाका । चित्ति सुस्थिर असा, अवलोका ॥
रामचंद्रविभुची गुणग्राही । सत्य हो भरत सत्प्रतिमा ही ' ॥ ३४ ॥
सुरगुरु, सुर याचा ऐकुनी सद्विचार । वधुनि हृदयिं त्याच्या दुःख जें कीं अपार॥
रघुवरमनिं चाले थोर संकोचभाव । भरतहि निजशीर्षी भार मानी अतीव ॥३५॥

वेष मनि त्याच्या कल्पनाकोटि यती।परि टरवि तदा तो हेंचि निश्चिन्तचित्तीं
न रघुराज ऐकेंग भव्यकारी । प्रभु पग निज टाकी, न मला प्रेमपूरीं ३६
राम्नी माझा पण रघुपति प्रेम ऐसें नितान्त ।
सीतानाथें मजवरि दया केलि आहे अनन्त ' ॥
ऐसें चित्तीं धरुनि भरतें वंदिलें रामराया ।
भक्त्युद्रेकें स्वकरयुगला जोडुनीया ॥ ३७ ॥
॥ इति श्रीराम० श्रीअयोध्याकांडोत्तरार्धे श्रीरामगुरुभरतसंवादवर्णनं
नामाष्टादशस्तरङ्गः ॥

तरंग १९ वा

बोले तेव्हां भरत " भगवन् ! काय मी बोलु आता ? ।
अंतर्यामी वससि करुणासागरा ! विश्वनाथा !
मातें झाले प्रभुवर तसे सद्गुरूहि प्रसन्न ।
गेलें माझें सकलहि त्वा कल्पिलें दुःख पूर्ण ! ॥ १ ॥
त्यालों होतों कलंक नसता, दुःख गेलें अशेष ! ।
दिग्भ्रान्तीचा गमिस नसतो दोष, तो आपणास ॥
मद्दैवें विषमविधिनें आइच्या वक्रनेत्रें ।
कालाचाही कठिण गतिनें व्याप्त मी पूर्णनेत्रें ॥ २ ॥
सर्वांहीं या मिळुनि मजला घातला क्रूर घाला ।
कारुण्याच्या परि रघुवरें पाळिलें स्वपणाला ॥
नाहीं रीती प्रभुहृदयिंची ही नवीना जगात ।
लोकामध्यें विदित यश हें, वेदही थोर गात ॥ ३ ॥
हो सर्व विश्व कटु हें, प्रभु मात्र गोड ! । कोणामुळें जगतिं होइल सौख्यजोड?
आहे प्रभू स्वनित कल्पतरूसमान । होता प्रसन्न नच होइल तुष्ट कोण ? ॥
त्या कल्पवृक्ष मनिं ओळखोनी । छायेंत त्याच्या रिघताच कोणी ॥
हो नाश शोका, जगिं रावरंका । भल्या बुऱ्या तोषवि सर्व लोका ! ॥ ५ ॥
पाहूनि सर्व करुणार्द्र गुरु प्रभूही । नासूनि शोक, मनिं अल्प न भीति राही॥
आता कृपानिधि करोत असेंचि जेणें । होईल सर्वहित, जें प्रभुसीहि मानें ॥
जो स्वार्थिं दास अपुल्याच हिता प्रभूतें । संकोचिं पाडि, जगिं त्या अधमत्व येतें

हो सेवकास हित, त्यजुनि सौख्यलोभ । तें सेवन प्रभुसि, मानुनि तो स्वलाभ
सर्वार्थ हा परा चेडत नाथ गेहा । नाथोक्तिपालन परी अतिमन्य ईहा ॥
हें स्वार्थसारपरमार्थविवेकसार । शृंगार हा सुगुणिचा, अतिपुण्यभार ! ॥
मत्प्रार्थना प्रभुवरा ! परिसा चि ! एक । जें आपणा उचित तें करणीय नीक
राज्याभिषेक करण्यास्तव सिद्ध सारें । जें इष्ट तेंचि करणें प्रभुनें विचारें ॥
हो ! पाठवा मजसि लागुन काननाला । साऱ्या सनाथ करणें प्रभुनीं जनातें ॥
दोनीहि बंधु अथवा परतोत गेहा । नेईन काननिं तुम्हासह मीच की हा ! १०
हें ना तरी अम्हि तिघू वनिं तैंनि बंधू । सीतेसवें प्रभु वसो गृहिं सौख्यसिंधू !
जेणें प्रसन्न मन होइल श्रीप्रभूचें । तें आचरीन करुणाबुधि सर्व साचें ॥११॥
देवें दिला मन शिरीं सगळाहि भार । मात न नीति, कळतें नच धर्मसार ॥
मी स्वार्थदृष्टिच असें वदणार जें तें । कैचे विचार करणें तरि आर्त चित्तें !
मी बोललों श्रवुनिही प्रभुचें निदेश । लाजल लावहि मग वधुनी विशेष ! ॥
मी दुर्गुणाबुधि अगाध जरीहि होत । प्रेमें प्रभु स्तवि मला गणुनी सुभक्त
आता कृपाजलनिधे ! मज तेंचि सांगा । सक्रोध जेविं नच हो भवदंतरंगा
मी स्वामिपादशपथें करुनी वद हें । हो चित्तमग्न अता सदुपाय आहे !
आज्ञा प्रसन्नमनिं त्याप्रति देव देती । संकोच सांडुनि जशी करण्या सुरीती ॥
माथा धरूनि जर ती करतील ते तो दुःख त्यां अटळ जातिल की समस्तें"१५

ऐकोनी भरतोक्ति पावन, अती हो हर्ष देवांमजीं ।
शंसोनी बहु 'साधु साधु' म्हणुनी दिव्य सुमें वर्षती ॥
गेले गोंधळुनी मनीं सकळही साकेतवासी जन ।
झाले तापस हृष्टचित्त, वन हो ज्यांचें असे केतन ! ॥ १६ ॥
संकोचोनि मनामध्यें राहे नि सर्क राघव ॥
प्रभुस्थिति बघोनी ती लोक हो शोकविह्वल ॥ १७ ॥
इतुक्यांत तिथें येती जनकें दूत धाडिले ॥
ऐकोनि तें वसिष्ठांनीं जवळी त्यां निमंत्रिलें ॥ १८ ॥
नमोनि वचनी जेव्हां ते तिथें राघवाप्रति ॥
बघोनि वेष तो त्यांचा दुःखें हो चित्ति त्यां अति ॥ १९ ॥
जनक्षेम दूतांतें मुनिनायक तैं पुसे ।
लववोनि स्वमाथा ते जोडिती अंजली तसे ॥ २० ॥

बोलती ते " प्रभो ! जें कीं इतुक्या प्रेमें आपण ॥
पुसता भूपनिक्षेम हेंच तत्क्षेमकारण ! ॥ २१ ॥
कोसलनाथासगें कुशलहि गेलें सरोनिया विलया ।
मिथिला तशी अयोध्या होति अनाथा जगासवें उभया ! ॥ २२ ॥
॥ इतिश्रीराम० जनकदूतवार्तावर्णनं नामैकोनविंशस्तरङ्गः ॥

तरंग २० वा

कोसलपति दशरथगति कानीं येताच लोक मिथिलेचे ॥
झाले दुःखें व्याकुळ शोकभरें इतर भान त्यां कैंचें ? ॥१ ॥
त्यानीं तेव्हां पाहिलें विदेहा । पाहे त्यानें सांगेनामा न कीं हा ! ॥
राजीच्याही ऐकुनीया कुट्‌त्या । काहीं चित्तीं तें सुचेनाचि कीं त्या ! ॥
तो नागसा ह्रनमणी मनि शोकधाम ! को राज्य घे भरत ? का वनवासि राम ?॥
बोलावि मनि बुध साधु सभासमूह । त्यातं पुसे उचित कृत्य तदा विदेह ॥ २
अयोध्यसबधीं समजुनि नृपप्रश्न जसला ।
जनीं दोंहीं पक्षीं मुठिहि न सुचे मार्ग कसला ! ॥
अयोध्येतें जावें, गमन नच वा योग्य म्हणुनी ।
कुणीही सांगेना, सकळ उमले मौन भजुनी ॥ ४ ॥
तदा भूप धैर्या धरुनि, ह्रदि चिंतूनि, ठिमलें ।
अयोध्यमाझारीं चर चतुर धाडूनि दिधले ॥
तया आज्ञा " आणा भरतकृतिवार्ता हुडकुनी ।
त्वरेनें हो ! मातें, उघड न करा ही कृति कुणी " ॥ ५ ॥
अयोध्येतें जानी चर भरतवृत्ती निरखिती ।
कृति ध्यानीं घेती, भरत वनिं रामार्थ निघती ! ॥
यथोनी हें, आले परत मिथिलेतें सकल ते ।
सभेमध्ये त्यानीं निदित मग केलें नृपतितें ॥ ६ ॥
तदा तें एकोनी गुरु सचिव भूपाळ जनता ।
अती हो दु वार्ता ह्रदि कळवळा त्यासि भरता ॥
प्रशंसोनी राय भरतगुणधामा अतिशय ।
त्वरय आमचीले निज भट, बले जीं गतभय ॥ ७ ॥

पुरीं, गेहीं, राष्ट्रीं उचित वस्त्र तो स्थापुनि निधे ।
सुसज्ज प्रस्थाना, हय–गज–रथीं वाहनहि घे ॥
मुहूर्ती तैं मार्गी निघुनि क्षणि कोठें न वसतां ।
प्रयागीं स्नानातें करिति अजि सारे उजडतां ॥ ८ ॥
येती समस्त यमुना उतरूनि जों ते । आलों अम्ही प्रभुपदीं कळवावयातें"॥
सांगोनि हें जनकदूत विनम्रशीर्ष । वंदीति सादर तयां मुनिनायकांस ॥ ९ ॥
तेव्हां सहासात किरात देउनी । दूता मुनी धाडिति मागुती क्षणीं ॥
साकेतपौरां जनकागमें अती । प्रहर्ष झाला सकलां न ज्या मिति ! ॥१०॥
सकोच वाटे अति राघवाप्रति । शोकाकुला हो अमरेन्द्रधी किती ! ॥
पस्तावली पारचि निर्ति कैकयी । द्यावा कुणातें तरि दोष तो तयीं ! ११
नारीनरातें बहुमोद जाहला । कीं यास तेथें दिन चार लाभला ! ॥
ऐशापरी तो दिन जात संपुनी । स्नानें प्रभातीं शुभ केलि त्या जनीं १२
पूजीति सर्व विधिनें नर आणि नारी । गौरीगणेशशिवभास्करमूर्ति सारीं
वंदीति सादर रमागमणाप्रिया । प्रार्थीति सांजलि तया सुखसारसद्मा १३
" असो राम राजा अम्हां सौख्यखाणी । असो जानकी विश्वपुण्यात्म राणी
निजानन्दसीमा अयोध्यापुरीत । स्वयें येउनी नित्य हे राहु देत ! ॥१४॥
घेऊनियां सकललोकसमाज संगें । ते यौवराज्य भरता वितरोत अंगें ॥
सिंचोत हे सुखसुधा सगळ्यांवरीच । देवोत देव जगिं जीवनलाभ साच ! १५
श्रीगुरु-बंधुसमेतचि राजा श्रीराम हो अयोध्येंत ॥
अक्षय्य राम राजा असतां आम्हांसि मरण यो तेथ ! " ॥ १६ ॥
ही प्रार्थना जनाची भक्तिप्रेमें नितांत जी भरली ॥
ऐकुनि मुनि सुज्ञानी यांहीं निजयोगनिरति लघु धरली ! ॥ १७ ॥
ऐशापरिं त्या पौरीं सारुनि निज नित्य कर्म विधि सकल ॥
प्रेमें पुलकित होउनि वंदावें रामचंद्रपदयुगल ॥ १८ ॥
ते उत्तमीचमध्यम नारीनर रामदर्शना घेती ॥
आपापल्या परींनीं मिळविति आनंद थोर निज चित्तीं ॥ १९ ॥
सर्वांवरि समचि कृपा दावुनि सन्मानिती तया धाम ॥
साऱ्यांनीं भक्तिभरें आळविला, वानिला कृपाधाम ॥ २० ॥
" बाल्यापासुनिही हो रघुवर्यांचा असाच कीं बाणा ॥

पाहुनि नीतिन्याया प्रीतिकरा मिसरणें न तें कोणा ॥ २१ ॥
शीलनिधान प्रभु हा सद्‍बोधाचा पयोधि सरलमना ॥
सुवदन कृपाविलोचन, राघवगुणगान करित भरतमना " ॥ २२ ॥
गाऊनि राघवगुणा अति भक्तिपूर्ण । आळंगिती सकलही निज थोर देव ॥
"आम्हासमान जगिं पुण्यनिधान थाडे। कीं ज्यास राम 'अपुले' म्हणताति कोडें ॥
ते प्रेमपूरिं अधिमग्न समग्र तैसें । ये वृत्त कानिं तव 'ये मिथिलेश' ऐसें ॥
सान्या सभेसहित सभ्रमि रामराय। तो तैं उठे रविकुलाब्जदिनेश काय ! ॥२४॥
तो बधुमंत्रिगुरुपौरजनासमेत । श्रीराम जाइ जनकाप्रति आदरार्थ ॥
तैं चित्रकूट बघताक्षणिं तो विदेह। वदी त्यजुनि, रथ राजुनि आत्मवाह॥२५॥
श्रीरामदर्शनिं समुत्सुक चित्तवृत्ति। न क्लेश लेशहि पथश्रम त्यासि होती ! ॥
सीतारघूत्तम जिथें, मन तेथ त्याचें। क्लेशीं तनूप्रति मनाविण भान कैचें? ॥२६॥
येता अस, जनक चालत याप्रकारें। प्रेमें समस्त जन मत्तचि भासणार ! ॥
येतां तसें निकट ते अति भक्तिभावें। सारे परस्पर मिळू रिघती स्वभावें ! ॥२७॥
वंदी तदा जनकराय पदें मुनींचीं। श्रीरामही नमित सर्व ऋषी तसेंचि ॥
भेटेहि राम जनका निजबंधुयुक्त। सर्वांसमेत मग आश्रमिं राम येत ! ॥२८॥
तो राघवाश्रमचि शांतिरसाब्धि पूर्ण। त्याचें पवित्र जल, यद्‍गुण वानवे न ॥
त्या लोकरूप करुणासरितेंसि आणी। श्रीरामचंद्र निजसंगतिं वाहवोनी ! ॥२९॥
जी ज्ञानवैराग्य अशा स्वकूला। पाडीत वेगें वहता सलीला ॥
शोकोर्मि दु वे बहु जे उसासे। तुफान वारे सुस्लेत मासे ! ॥ ३० ॥
धैर्यादि वृक्षा तटिच्या उदारा। पाडीत जीवी द्रुत वेगिं धारा ॥
कोपावतो शोक जिचा सवेग। आवर्त, भोरें, भ्रम भीतिसघ ॥ ३१ ॥
कैवर्तक ज्ञानि, विशाल नावा। विद्यादिका या म्हणणेंचि किंवा ॥
न त्या प्रवाहीं टिकल्या म्हणोनी। खोडूहि तेथें शकती न कोणी ! ॥ ३२ ॥
नदी तशी ती बघुनी किराता। वन्यादिका घोर न होत चिंता !
ही आश्रमामोधित ये मिळाया। तो कीं उठे क्षुब्धचि होउनीया ! ॥ ३३ ॥
ते शोकविह्वल नृपाळसमाज दोनी। न ज्ञान धैर्य, नच लाजहि त्या उरोनी
ते शील रूपगुण वानिति भूपतीचे। ते शोकसिंधुमधिं मग्न अतीव साचे ! ॥
शोकसागरीं बुडोनि गेले नारी नर अति आर्त मनें ।
रोषें सकलहि दोष देति किति दुर्दैवातें कटु वचनें ॥

देव सिद्ध तपि योगि मुनीही जनकाची तशि पंुनि दशा ॥
तुलधि वदे, नच राहि तयाना करुणासरितीं तरणाशा ! ॥ ३५ ॥
तेव्हां तिथें सर्व जना मुनीनीं । केलें किती शोक्न योग्य वाणीं ॥
वसिष्ठही सांगति तैं विदेहा । "धैर्या धरी सोडुनि शोक देहा!"३६
॥ इति श्रीराम० श्रीअयोध्याकांडे द्विसमाजशोकवर्णन नाम विंशतितरङ्गः॥

## तरंग २१ वा

ज्याचा ज्ञानरवी निनाशित निशा ही सत्सतीची क्षणीं ।
स्त्रीचीं वाक्किरणीं विकाशुनिया अंभोजिनीसे मुनी ॥
त्याच्या शुचिष केविं मोहममता राहावि हो ! येवुनी ? ॥
सीतारामपदाब्जभक्तिमहती सर्वाधि या कारिणी ! ॥ १ ॥
लोकीं हे त्रिविध प्रकार दिसती ज्या वेदही वाणिती ।
कोणी साधक सिद्ध कोणि विषयी कोणी, नसे ज्या मिति ॥
यामाजीं परि सन्मती रसिक जे श्रीरामपादाम्बुजीं ।
त्यांना साधुसभेंत आदर असे अत्यंत पुण्याइ जी ॥ २ ॥
शोभे ज्ञानहि तें न, जें असतसे श्रीरामभक्तीविण ।
कैसें तारु सजेल ज्या नच भला नावाडि सद्भूषण ? ॥
नानारीतिं वसिष्ठ सांगिति नृपा ज्ञानी विदेहाप्रती ।
सारे येउनि रामघाटस्थलिंहीं स्नानें करीती व्रती ॥ ३ ॥
सान्या स्त्रीपुरुषांचिया हृदिं असा शोकाख ये तैं भर ।
याच्या वाहुनिया तयीं गमविला तो सर्वही वासर ॥
आहारा दिवतीहि ना पशुगणीं पक्षी मृगें ते तसे ।
अत्यंत प्रियभक्त पौर मग ज त्याचें वदू कायसें ? ॥ ४ ॥
दोनी समाज मिथिलाधिप आणि राम । स्नानें प्रभातिंच करूनि सुपुण्यधाम
ते बैसती सकल स्थलिं त्या वटाचे । सारेच ते कृशतनू मलिनाम साचे ! ५
तेव्हां दशरथपुरिचे विदहपुरिचेहि विप्र मुज्ञानी ।
परमार्थतत्त्ववेत्ते समजाविति नृपतितें स्ववचनानीं ॥ ६ ॥
रविवंशसद्गुरू तैं वसिष्ठ मुनि तेविं ते शतानन्द ।
जनकपुरोहित जनका करिती उपदेश निर्मिती बोध ॥ ७ ॥

ते सांगती बहुपुराण कथेतिहास । सद्धर्मनीतिविरती सुविवेकपोष ॥
सान्या सभेसि रुचली शुचि चारु वाणी । रामाउही कथिलि जी मुनिकौशिकानीं
श्रीकौशिकासि वदले मग रामराय । "हे नाथ! काल जन निर्जल येथ होय!"
बोले मुनींद्र "बहु योग्यचि राम सांगे । झाला उशीर उलटूनि दुपार वेगें!"
ऋषिवाक्य ऐकुनी तें बोले मिथिलेश "येथ उचित नसे ॥
अन्नग्रहण विशेषें" लोकांतें रुचत, म्हणत जनक जसें ॥ १० ॥
आज्ञा घेउनि सारे निघती स्नानास सर्वही लोक ॥
इकडे आश्रमि तोंवरि आणिति वनचर फलादिक अनेक ॥ ११ ॥
तें कावड्या घेउनि लोक यती । सकंदमूलें फल खाद्यजाती ॥
झाला जणों कामद चित्रकूट । रामप्रसादेंकरुनी अभीट ॥ १२ ॥
विषाद लेवे वसतांच त्यातें । सरोनदीदर्शन चारु की तें ॥
सप्रेम आनंद उचंबळोन । झाला गिरी तो सुखहर्षपूर्ण ॥ १३ ॥
तें वृक्षवल्ली सुफला सुपुष्पा । सान्या मनोहारि मनोज्ञरूपा ॥
गुंजारवें मोहविती मिलिंद । पक्षी मृगें जाहलि मोदकंद ! ॥ १४ ॥
उत्साह नांदे किति काननांत । समीर वाहे त्रिविध प्रयात ॥
सर्वांस सौख्यप्रद वायुरीति । सौंदर्य तें शब्दिं न वानवेचि ॥१५॥
पृथ्वी जणों की करि पाहुणेर । हर्षें नृकाता जनकास थोर !
स्नानें करोनी जन सर्व येती । योग्य स्थलें लाभुनि ते रहाती ॥१६॥
सान्यासि रामें जनकें मुनींनीं । निर्देशिलें जेथ रहा म्हणोनी ॥
तेथें बघोनी तरु सावलीही । समग्र तो पौरसमाज राही ॥ १७ ॥
फलें अनेकें दल कंद मूलें । पवित्र रसें अमृतें रसाळें ॥
देऊनि सर्वांप्रति थोर मान । घेती फलाहार सुधेसमान ॥ १८ ॥
ऐशापरी वासर चार गेले । रामा बघोनी नरनारि धाले ॥
दोघी सम.जीं मनिं वासना ही । श्रीरामसीतेविण काहिं नाहीं ! १९
त्यांच्या विना ना फिरणें पुरासी । त्यांच्या सवें होउं अरण्यवासी ॥
संगें जर श्रीरघुनाथसीता । न स्वर्गही तेविं सुखप्रदाता ! ॥ २० ॥
दुर्दैव होय जर जाउं म्हणेल कोण । सीतासलक्ष्मणरघूत्तम या त्यजून ॥
होईल दैव अनुकूल तरीच जाया । रामासवें सुलभ होइल कीं अम्हां या २१
मंदाकिनीसलिलिं मज्जन तीनि काला । श्रीरामदर्शन शुभकर हर्षमाला ! ॥

श्रीरामशैलिं वनिं तापसरुगिं जाण । तें कदमूलफल कीं अमृतात्म खाणें !!
वर्षें सुखानेंचि समग्र चौदा । जातील कोणा कळता न बाधा ॥
रिघेल हा काळ पळासमान । वाटूनि चित्ता जणु कीं लहान ! ॥ २३ ॥
सर्वांस ऐसें नच भाग्य होय ! । थोड्यास ऐशापरि भागधेय ! ॥ ''
श्रीरामभक्ती अशि दों समाजीं । सुव्यक्त होई वचनामध जी ॥ २४ ॥
इति श्रीराम० श्रीअयोध्या० द्विसमाजपरस्परवार्ताकथन नामैकविंशतितरङ्गः

## तरंग २२ वा

ऐशापरी जनाचे चालति तेथें मनोरथ उदार ॥
तन्मय होय प्रेमें, जन त्या प्रेमोक्तिनें परिसणार ॥ १ ॥
सीताजननी तेव्हां पाठवि सीतेप्रती स्वदासीनें ॥
भेटावयास अवसर आहे, हें स्वामिनीसि कळवी ते ॥ २ ॥
पाहुनि समया आल्या सीतेच्या सासवांसि भेटाया ॥
जनकान्तःपुरनारी तेवि सुनेत्रा सती जनकजाया ॥ ३ ॥
सन्मानी कौसल्या त्यांतें अत्यादरें बसाया दे ॥
तीं आसनें यथोचित सर्वांच्या प्रेमभय हृदिं नांदे ॥ ४ ॥
सत्प्रेमशील वधुनी परिसोनि त्यांचें । वाटे द्रवेल जणुं वज्रहि उग्र साचें ! ॥
ये रोमहर्ष, शिथिला तनु, वारि डोळां। शोकार्त भू पदनखीं लिखि भावलोळा!
सीतारामप्रीती सर्वांतर्यामिं पूर्ण वसणारी ॥
वाटे बहुविध मूर्ती करुणा धरि, खिन्नचित्त अवणारी ! ॥ ५ ॥
सीतामाता बोले '' गमत विधाता विशालधी हा कीं ॥
दुग्धाच्या मृदुफेना फोडाया योधि वज्र ही टांकी ! ॥ ७ ॥
एकू सुधा परि दिसे विष हें पुढ्यात । हो क्रूर धातृकृति, ना कळ य अनत
जेथ तेथें बक, कराल उलूक, काक । हो मानसातचि मराल विहंग एक!''
ऐकोन तें अति सशोक वदे सुमित्रा । '' आह किती उलटि दैवगती विचित्रा!
जो निर्मि, पाळि, परि नाशुनि टाकि अन्तीं।हो बालकेलिपरि बालिश धातृमूर्ति!''
वद कौसल्या तें '' नच वितरणें दोष कवणा ।
सुखा दुःखा लाभा क्षतिसि गति हें कर्मांचि गणा ॥
अशी कर्मांची ही गति कठिन, जाणे विधिच ती।
फलें देई धाता शुभ अशुभ कारीं न चुकतीं ! ॥ १० ॥

परेशाची इच्छा सतत सकलांच्या शिरिं वसे
म्हणोनी हो जन्म स्थिति लय सुधेते, विधि जसे ॥
नको मायामोहीं पडुनि करणें दुःखलवही ।
असे कीं धात्याची कृति अशि अनादी अचल ही ! ॥ ११ ॥
अहो कीं भूपानें स्मरुनि जगणें वा न जगणें ।
मनीं दुःखी होणें निजहि न तशी हानि वघणें "॥
तदा सीतामाता वदलि "कथितों सत्य वचनीं
अयोध्येची राज्ञी अमित सुकृताची जणु खनी! " ॥ १२ ॥
" जाती वनात जेर् लक्ष्मण, राम, सीता। त्याचा भलाच परिणाम; न खेद चित्ता
मातें अतीव भरताविषयींच चिंता।" उद्गारि गद्गदस्व अशि राममाता॥१३॥
" अहो! आशीर्वादीं मथि ! तुमचिया ईशकृपया ।
जगीं गंगा तैसे सुत सुतवधू सर्व मम या ॥
पहा, ना मी घेईं खचित कधिही रामशपथ ।
परी ती घेऊनी मम हृदयिचें सत्य वदत ॥ १४ ॥
वसे जें सच्छील प्रचुरगुणिता भक्तिविनय ।
तशी बंधुप्रीती अमित भरतीं सत्य सदय ॥
न वाग्देवीही ती भरतगुण गायासि शकती ।
कधीं शिंपीनें का जलनिधि रिकामे करवती !" ॥ १५ ॥
मना माझ्या ये कीं भरतचि असे दीपक कुलीं ।
कितीदा नाथानीं मज भरतसद्वृत्ति वदली ॥
कथानें ये सोनें कळुनि, मणि ये पारखुनि कीं ।
प्रसंगें जाणावी करणि पुरुषाची तशि निकी! ॥ १६ ॥
हें बोलणें मम अयुक्तचि होय सारें । स्नेहान शोकिं मन होत खुळे विचारें"॥
ऐकोनि ती सुरसरित्सम पुण्यवाणी । प्रेमें मनीं विकल होति समग्र राज्ञी १७
कौसल्या तैं वदत " मिथिलाराज्ञि ! हो आयका जें ।
चित्तीं धैर्या धरुनि निरखा ! काय आम्हीं वदावें ? ॥
भर्ता त्या या जनक नृपती जो विवेकाधिवास ।
त्या तुम्हा मी कथन करणें कोणता जी ! निदश ? ॥ १८ ॥
अहो ! सांगा तुम्ही अवसर बघोनी स्वपतितें ।

स्वतांच्या शब्दांनीं समजवुनि त्यांतें उचित तें ॥
वसो या सौमित्रा यहिं, भरत या धाडुनि वनीं ।
जरी हे मानें त्या मम मतचि आणा घडवुनी ! ॥ १९ ॥
घ्यावा मनीं हा सुविचार आरडीं । चिंता मला हो भरतेंचि एवढी ॥
सद्भक्ति गूढा भरतांतरीं वसे । तो राहुं, ठीक मला न तें दिसे !" ॥२०॥
कौसल्येच्या सरलवचना यापरी आयकोनी ।
कारुण्याच्या रसनिधिमधें मग्न सान्याचि राज्ञी ॥
गेले प्रेमें भरुनि हृदयीं सिद्ध योगी मुनीश'।
धन्योद्गारांसह नमिहुनी तैं झरे पुष्पवर्ष ! !॥ २१ ॥
अंतःपुरीय वनिता चकिता सुनेत्रा । पाहाति तैं वदत धैर्ययुता सुमित्रा ॥
" हो रात्र ही प्रहर दोन, उशीर आतां " । प्रेमें उठे झणिच तैं रघुनाथमाता
स्नेहेंचि ती वदलि हार्दिक सत्यभावें । " आतां निजस्थलि तुम्ही रिघण्या उठावें
आधार येथ मज शंकर हाचि होत। तैसेचि साह्यकर ते मिथिलाधिनाथ!"२३
कौसल्येची विनयसहिता ऐकुनी स्नेहवाणी ।
भक्तिप्रेमें हृदिं सुनयना पूर्ण गेली भरोनी ॥
कौसल्येच्या शुचि पदयुगा वंदुनी, बोलली हें
" नांदे चित्तीं विनय तुमच्या भक्तिही थोर राहे ॥ २४ ॥
दशरथगृहिणी तुम्ही साजतसां रामचंद्रजननीही ।
तेव्हां सुयोग्यचि अशी वसली तुम्हात विनयभक्ती ही ! ॥ २५ ॥
प्रभुपण तेंचि म्हणावें कीं जें नीचाहि सादर धरीत ॥
वहिहि धूमा धरि शिरि, अद्रि तृणा ही दिसे महद्रीत ! ॥ २६ ॥
आहेत नाथ अमुचे सेवक तुम्हास काय-वाक्-चित्तीं ॥
गौरी महेश्वर तसे साहाय्यक आपणां सतत असती ॥ २७॥
आहे कवण जगीं तरि साहाय्यक जो तुम्हास साजेल? ॥
दीपें साहाय्य किती दिवसकरातें यथार्थ करिलेल ?! ॥ २८ ॥
श्रीराम जातिल वनीं सुरकार्या करुनि येतिल फिरुनी ॥
राज्य अयोध्येमध्यें करितिल निश्चितपणें सुखें करुनी ! ॥ २९ ॥
श्रीराम-बाहुबलिं देव-मनुष्य-नाग । आपापल्या स्थलि सुखें वसतील सांग ॥
ही याज्ञवल्क्य मुनिनीं कथिली स्ववाणी।होईल ना मुनिगिरा कधिं खोटि,राणी!"

बोलेनी हृ चरण कवळी प्रेमभावें अतीव ॥
कौसल्येचे, पुसत विनयें जानकीसाठिं माव ! ॥
अत्यानंदें अनुमति दिला लाभता ती मुलीला
घेऊनीया निजसह निघे तें मुनेचा सुशीला ॥ ३१ ॥

— इति श्रीराम० श्रीजनकराज्ञीकौशल्यासमागमो नाम द्वाविंशतितरङ्गः —

## तरंग २३ वा

प्रियजनपरिवारा भेटली तेथ सीता । सुभग उचित रीती योग्य जी त्या समस्ता
बघुनि जनकजेचा, तापसी वेष तैसा । सकल जन विषादा स्थान झाला विशेषा!
घेउनि वसिष्ठमुनिचा निरोप येई स्वत्वासि मिथिलेश ॥
तों तेथें त्या दिसली सीता आली तथा मिळायास ॥ २ ॥
प्रेमें उरिं आलिंगी जनक तदा जानकीस कळवळुनी ॥
कीं हृदयप्रीतीची प्राणाची पाहुणीच ये मिळुनी ! ॥ ३ ॥
जलनिधि जनकार्ती प्रीतिचा हो अथांग। जणु मन नृपतीचें थाटलें कीं प्रयाग!
वट जणु गमला तो स्नेह सीतेवरील । उपरि सतत रामप्रेम हें रम्य चाळ!॥
विकल जनकचित्तीं ज्ञान तें भासलें कीं जणु मुनि चिरजीवी आश्रया जो विलोकी।
जलभरिं बुडताना त्यास आधार हातीं । गवसलि सदृशी कीं राघवी बालमूर्ति !
न व्हायचा मोह कधीं विदेहा । परीं तयाच्यांहि मोह हो हा ॥
हे स्नेहमाहात्म्यचि होय साचें । श्रीरामसीताविषयीं तयाचें ! ॥ ६ ॥
सीतेसही विव्हळता न आवरे । मातापित्याच्या विषयीं महादरें ॥
धैर्या हृदन्तीं धरणीसुता धरी । सद्धर्मकालादि गणूनि ती परी ॥ ७ ॥
बघूनिया तापसवेषि जानकी । होई पित्यातें परितोष पूर्ण कीं ! ॥
वदे "सुते ! तू कुलयुग्म शोधिलें । मातापित्याचीं उभयेंहि निर्मलें ! ॥८॥
तुझ्या यशें विश्व समस्त हें गमे । अतीव झालें धवल प्रभागमें ॥
गंगेस जिंकी तव कीर्तिवाहिनी । ब्रह्मांडकोटीसहि व्यापि भासनी ! ॥ ९ ॥
त्रैलोक्यमाहात्म्यहि जानकीस्तव । तू सत्समाजाप्रति देदि उत्सव ! " ॥
ही सत्यवाणी मिथिलेश बोलला । मनोहरा कोमल विश्वनिर्मला ॥ १० ॥
सीतेप्रती सकुचवी मनीं किती । मही जणो काय गिळील तीस ती ! ॥
आलिंगिती तीस धरूनिया उरीं । मातापिता वत्सल ते किती तरी ! ॥ ११ ॥

आशीर्वचें त्यांहि तिला किती दिलीं । त्यांहीं सुता तैं अतिचारु बोधिली ! ॥
लज्जा न तंतें वदवी तरी तिला । रुचे न तेथें निधि वास तो भला !॥१२॥
जाणे सुनेत्रा, कळवी नृपाप्रती । स्वभावशीला स्तवि तो तिच्या किती !
पुनःपुन्हा तें कवळीत त्यास ती । सन्मानुनी पोंचवि तो पतिप्रती ॥ १३ ॥
तेव्हा निवेदि जनका समया बघूनी । राणी यथोक्त भरताविषयीं शहाणी ॥
भूपाळ हृष्ट भरतस्थिति आयकून । सद्गंधहेमसम चंद्रसुधेसमान ॥ १४ ॥
आनंद नेत्रिं जल ये तनु हृष्टरोमा । तोहि स्तवी भरतकीर्ति तशी असीमा ॥
" तू ऐक गे ! सुनयने ! सुमुखि ! प्रसन्ना । हे सत्कथा भरतकीर्ति सुधेसमाना
संसारबंधनविमोचन ही करीत । सद्ब्रह्मधर्मनृपनीति विवेक यांत ॥
आहे यथामति मदीयगती जशीहो । ना सन्मती भरतकीर्तिलवें तुल्ेही ! १६
स्पर्शीहि सन्मति न करी भरतयशाच्या छबीस लवलेश ॥
लपुनी छपुनीहि कधीं " ऐसें सांगत तियेसि मिथिलेश ॥ १७ ॥
" प्रज्ञा, महेश, गणनाथ, सरस्वतीही । ते शेष कोविद कवीश सुधी कितीही
त्यां धर्म शील, यश, कार्य, चरित्र भूति । सत्कीर्ति आवडतसे भरतोद्भवा ती!
भरतकीर्तिगुणादिक होतसे । सुखकर श्रवणा मनना तसे ॥
शुचितरें, रुचिरें, बहु लाजवी । सुरधुनीस, सुधेस, वदे कवि॥१९॥
भरत भरतसाच, प्रीति रामास याही । निरवधि गुणराशी, ज्या नसे तुल्य कांहीं ॥
गिरिवर म्हणताना मेरु कीं शेरसाच । कविकुलमति जैशी स्पष्ट संकोचतेच !!
वर्णूं कुशा ये वरवर्णिनि ! प्रिये ! । यथार्थतेनें भरता न वानु ये ! ॥
न वारिहीन स्थलि मीन चालतो ! । अवर्ण्य तैसा भरतप्रभाव तो २१
अमेय आहे भरतप्रभाव । त्याचा न लागे कवणासि ठाव ॥
श्रीराम जाणे जरि तो यथार्थ । न वर्णण्या तोहि तया समर्थ ! " २२
सप्रेम वर्णि नृपती भरतानुभाव । जाणोनियां सुनयनामनिंचा सुभाव ॥
" ना लक्ष्मणें, विपिनिं गे! भरतेंचि जावें । हो हेचि उत्तम; जनेप्सित हेंचि व्हावें
अन्योन्यि रामभरतीं परि देवि ! होती । प्रीतिप्रतीति न कुणासहि तर्कवे ती ॥
श्रीराम होय अवधी समतागुणाधी । स्नेहा तसा भरत तो ममतादिकांधी २४
न स्वार्थि तेंवि परमार्थि सुखासि पहो । स्वप्नांतही भरत लोलुप ना कधींही ॥
श्रीरामभक्ति गणि साधन आणि सिद्धि । वांटे मला भरतिं एकचि हे सुबुद्धि!
रामोक्तितें भरत लंघिल ना कधींच । जाणोनि या सुकुनिही, मनिं जाण साच

स्नेहाधिमग्न मनिं तू करि नैव चिंता" । भूपें अशी समजवीयलि आत्मकांता २६
॥ इति श्रीराम० दम्पतीसंवादे भरतगुणवर्णन नाम त्रयोविंशतितरङ्गः ॥

## तरंग २४ वा

सप्रेम गात भरता, रघुनायकांतें । गेली निशा क्षण अशी नृपदंपतीतें ॥
ते दोनि राजजन ह्रांत सकाळिं जागे । स्नानादिका करुन पूजिति देव चांगें
स्नानें करुनि गुरुपाशिं रिघोनि राम । वंदोनियां चरण बोलत पूर्णकाम ॥
" भो नाथ ! पौरजन, वृद्ध समस्त नारी । शोकाधिमग्न, वनवासिं सखेद सारीं
सर्वांसमेत मिथिलेशहि कष्ट सेवी । तो घालवीत दिन यापरि सर्व तवीं ॥
जें योग्य यासमयिं तें प्रभुनीं करावें । हो सर्व भव्य तुमच्याच करीं स्वभावें!"
श्रीराम हें वदुनि सकुचती अतीव । रोमांचले गुरु बघूनि सुशील भाव ॥
बोले मुनीश "सुत सर्व जनांत दोंही । तुम्हांविना नरकतुल्य गमेल त्याही
- प्राण प्राणा जो जिवाचाहि जीव । सौख्याचें जो सौख्य तो तूच सर्व
गेहीं प्रीती ज्या रुचे त्वद्विना ही । दुर्दैवाला त्याचिया जोड नाहीं!५
हो कर्म, धर्म, सुत दग्धचि तें समस्त । श्रीरामपादकमलीं नच भव ज्यात
ते ज्ञान अज्ञपण, योगहि तो कुयोग । ना जेथ रामचरणीं मन सानुराग !६
तें दुःख जेथ नच तू, सुख तें जिथें तू । तू जाणतोस जनहृद्गत भक्तितंतू
आज्ञा समर्थ तव सर्व शिरीं असे ती । तू जाणसी सकलभव्य कृपालमूर्ति ७
जा आश्रमीं प्रभु ! तुम्ही" म्हणुनी मुनीश । हो भक्तिपूरिं भरला हृदयीं अशेष !
वदूनि राम मुनितें, रिघला स्ववासीं । धैर्यां धरून जनका मुनि भण्यासी ८
रामोक्तिभाव मुनि ते जनका कथीत । तत्प्रीतिशील बहुमानुनि साधुरीत ॥
" आता कराजि ! तुम्हि, होय हितास कीं जें । सर्वांप्रती सकलधर्महि ज्यात साजे
ज्ञानाधिरास शुचि सुज्ञ सुधर्मशील । आहा तुम्ही अवनिपाल ! सुकृत्यलोल ॥
आहे तुम्हाविण न कोणि समर्थ आतां । जो दावि या अतुलसकटिं योग्य पथा "
ऐकोनिया या मुनिच्या वचातें । सप्रेम लोट जनकांतरीं तें ॥
पाहूनि त्याची स्थिति त्यापरी ती । ज्ञानें विरागें वरिली विरक्ति ! ११
प्रेमें भरोनी मनिं हचि चिंती । "आलों इथें, ना भलि गोष्ट कीं ती॥
रामाप्रती धाडुनिया वनासी । भूप कृता सिद्धचि मान ऐसी:-॥१२॥
कीं त्यावरी प्रेम अपार होतें । स्वर्गास केलें निजवास कीं तें ॥

आतां अम्ही पाठवुं त्यां वनातें । मुदें फिरू सर्व विवेकि निर्ते!" १३
त्या आयकोनि वधुनी जनकस्थितीही । दुःखार्त होत मुनि विप्र तपी विदेपी॥
जाणोनि तो समय धीर धरूनि येत । भूपाळ आर्य भरता जनतासमेत १४
त्यां घेत जाउनि पुढें भरत स्वकीयां । कालोचितासन तयांप्रति दे बसाया ॥
बोले तदा जनक " हे भरता! समस्त । आहे तुला विदित राघवचारुचित्त!
श्रीराम सत्यव्रत धर्ममूर्ति । सर्वांवरी स्नेह तदीय चित्तीं ॥
संकोचुनी संकट तो सहातो । त्वदुक्त त्या सांगुं अम्ही पहातों" ॥१६॥
रौमांचुनी भरतनेत्रि भरोनि वारि । तो बोलला धरूनि धीर मनीं विचारीं ॥
"आहां तुम्ही प्रभु मला पितृतुल्य नाथा! नाहीं वशिष्ठसम सौख्यद तातमाता
हे कौशिकादि मुनि, मंत्रिसमाज सारा । नानाबुधीच तुम्हिही गमतां विचारां!
जाणोनि बाल, निजसेवक ऐकणारा । कर्तव्य सर्व शिकवा मज नान्य थारा १८
स्थानीं समाजि असल्या पुसतात तात । येथें न मौन मलिना मज योग्य होत!
बोलेन मी शिशुमुखीं गुरुशब्द आतां । त्याची क्षमा मज करा मज वाम धाता।
शास्त्रीं, पुराणि, निगमीं तरि हें प्रसिद्ध । सेवा असे कठिण नीति जगीं विशुद्ध
हो स्वामिधर्म निजधर्म गुणीं विरुद्ध । हो प्रेम अंध जगि वैरहि जेविं अंध!
जाणोनि राघवमनोव्रतधर्म सारा । आणोनि मीहि परतंत्र असा विचारा ॥
सर्वांगि संमत असें सगळ्या हवें तें । तुम्ही करा, करिल जें सकला हितातें"
ऐकोनि तें भरतभाषण साधुभाव । पाहोनि शशिनि तया जन आणि राव ॥
जी चित्रवाक् सुगमही अगमा गमावी । जी मंजुला, मृदुहि वज्रकठोर भावी॥
वर्णाक्षरीं मित परी अमितार्थ दावी । ऐशीचि काय उपमा तरि ती वदावी!॥
हस्तीं असे मुकुर, त्यामधिं आत्मरूप । अग्राह्य तें, भरतवाक् तशि हो अनूप!
राजा, मुनी, भरत, साधु, जनादि जाती । जेथें असे अमर-कैरव-चंद्रमूर्ति ॥
ऐकोनि वृत्त सगळे जन होति खिन्न । कीं मीनषव, नववृष्टिजली निमग्न!
देवीं तदा कुलगुरुस्थिति देखियेली । स्नेहार्द्र ती जनकवृत्तिहि तेविं ठेली ॥
पाहोनि भरत, राघवभक्तिमूर्ति । स्वार्थी समग्र सुर घाबरले स्वचित्तीं ॥२५॥
रामप्रेमीं मग्न झाल्या जनांना । पाहोनीना न्यायरी भक्तिलीला ॥
देखा, एसें जाहलें दुःख देवां । व्हावा कैसा? भाव तो धन्य देवा १२६
[ देखा, ऐसें जाहलें दुःख देवां । व्हावा कैसा भाव तो वर्ण्य त्यांना १२६]
दुःखें तेव्हां इंद्र बोले " पहा की । भक्तिस्नेहा राम हा जाय अंकीं!

कैसें आता हो स्वार्थ किंग्राळ ? । जेणें साधे आमुचें कार्यजाल । " २७
देवीं तेव्हा विनिलो शारदा ती । जी भक्तांनें नित्यकल्याण दती ॥
प्रार्थीती ते " देवि ! आम्हास पाळीं । आर्ती आतां आमुच्या तूच टाळीं।
भरतमतितें तू मायेनें क्षणीं फिरवीं अये ! ।
अमरकुल हें तू रक्षावें छळदि निजाश्रये" ॥
विबुधविनती ऐकोनी ती वदे विदुषी सती ।
अमरपतिची स्वार्थी मदा अशी गणुनी मति ॥ २९ ॥
" मजसि वदसी तू भ्रमाया मती भरतांतरीं ।
दशशतहि या नेत्रीं मेरू न देखिसि तू तरी ! ॥
हरिहरविधी याची माया जरी महती अति
भरतमतितें देखावातें तरी शकती न ती ! ॥ ३० ॥
वदसि मजसी मी मोहावी शुभा मति वन्मनीं
दकन कधि का चोरावातें शशिप्रति चांदणी ? ॥
भरतहृदयीं सीतारामा निवास असे सदा ।
द्युति तरणिची जयें तेथें तमा स्थल का कदा ?" ॥ ३१ ॥
सांगोनि ऐशापरिं शारदा ती । हो ब्रह्मलोकाप्रति वेगि जाती ! ॥
झाले मनीं विकृत देव सारे । कीं कोकपक्षी निशिं ज्याप्रकारें ! ३२
स्वार्थी सुरानीं अति दुष्ट हेटें । दुर्मंत्रयुक्तीं रचिलीं कचाटें ।
मायाचळें निर्मिलि आर्ति, भीति, । उच्चाटन, आति तयीं समस्तीं ३३
॥ इति श्रीराम० श्रीअयोध्याकाण्डे जनकभरतसंवादे सुरशोकवर्णनं नाम चतुर्विंशतिस्तरङ्ग. ॥

## तरंग २५ वा

दुष्टाइ ही करुनिहो सुरराय चित्ती । हो कार्य कीं भरतहृत्ति अकार्य वा तीं ॥
आई तदा जनकभूप रघूत्तमातें । उन्मानिले रघुवरें सगळेंचि कीं तें ॥ १ ॥
रघुवरपुरोधा तैं वदले रामास योग्य समयास ॥
धर्मातें अविरोधी मान्यहि व्हावें जनास जें त्याच ! ॥ २ ॥
कथिला आधि वसिष्ठ झाला संवाद जनकभरताचा ।
" भरतोक्त धर्मसरिणी योग्य गमे हा विचार मन साचा ॥ ३ ॥

चावी आज्ञा राघवा ! तूंच आता । वर्तायाते या जनांना समस्ता " ॥
तेव्हां बोले राम जोडोनि पाणि । सत्या योग्या मंजुल्या साधु वाणी ॥ ४ ॥
"आहांत आपण तसे मिथिलेश येथ । मी बोलणें लगहि होय अयोग्य नाथ !
आज्ञा कराल मज आपण आणि रायाती शीर्वचंथ; शपथें तुमच्या, न वांच"
रामोक्त ती शपथ एकुनि या प्रकारी । संकोचले मुनि नृपाल समाहि सारी ॥
*कोणी सदुत्तर तया करण्या न जाणे । सारे पहाति भरतानर्नि आर्ततेनें* ॥६
संकोचचित्त सगळे भरता पहाती । तें रामबंधु हृदिं घे बहु धैर्यवृत्ति ॥
तो स्नेह वाढत तसा बघुनी अवेळीं । विंध्या अगस्तिमुनिसा शमि दाबि खालीं
धीशोणित कनकलोचनसाच शोक । कर्षीत तें भरतमानसिंचा विवेक ॥
जो विश्वयोनि, शुचिसद्गुणधारि लेकी।उद्धारि तीमति विशाल वराह तो कीं !
बद्धांजली करुनियां सगळ्यां प्रणाम । श्रीराम भूप, गुरु, साधुसि शुद्धकाम
प्रार्थी "क्षमा मज करा, उचिता न जाणें।बोलें वचें कठिन मी मृदु आननानें"
प्रेमें तदा स्मरत तो हृदिं शारदेतें । ये मानसांतुनि मुखाब्जि त्वरितया ते ॥
सद्धर्मनीतिविमला सुविवेकशाली । ती मंजुला भरतवाग् गमली मराली !
स्नेहें हृदीं शिथिल आह्लदिता जनांनें । पाहे विवेकनयनीं भरत स्वचित्त ॥
वंदी विनीत सकलां अतिभक्तियुक्त । सीता रघूत्तमपदा स्मरुनी मनात "
॥ इति श्रीराम० श्रीअयोध्याकांडे वसिष्ठश्रीरामचन्द्रसंवादे सभाशोचवर्णनं नाम पञ्चविंशतिस्तरङ्गः ॥

## तरंग २६ वा

भरत वदत " नाथा ! स्वामि माता पिताही । सकलहृदयवासी तूंच कल्याणवाही
गुरुवर अतिपूज्य ज्ञानवान् शीलराशि । *प्रणतशरणपाळा ! तू सुहृद् विश्वपोषी*
समर्थ तू सर्वहितासि कर्ता । गुणज्ञ तूं दुर्गुणदोषहर्ता ॥
गोसावि ऐसा दुसरा प्रभू न । माझ्यापरी अन्य नसेचि दीन ॥ २ ॥
आज्ञा पित्याची प्रभुनीहि तैशी । भंगूनि यें मी प्रभुच्या पदाशी ॥
मोठ्या जनाच्या समवेत येथ । आलों असें मी बहुदोष यात ॥ ३ ॥
जगांत मोठे लघु उंच नीच । सुधाविषें मृत्यु अनंत साच ! ॥
हृदें अनेकें परि यांन कोणी । आज्ञा प्रभूची नच जो न मानी ॥ ४ ॥
*केली विपर्इ परि मीं अपारा । कली असे ही सकलप्रकारा* ॥

स्नेहें परंतु प्रभुनीं स्वसेवा । मानीरली प्रेमळ देवदेवा ! ॥ ५ ॥
कृपा मलाई अपुलीच, नाथा ! । कीं केलि कीर्ती मम ही अनंता ॥
दोषांहि भूषासम ह्या गणोनी । हा आपुला मानियला प्रभूनीं ॥ ६ ॥
विख्यात लोकीं प्रभुची सुरीति । सद्युक्तिही गौरवशालि कीर्ति ॥
गाईयली जी निगमागमानीं । जियेप्रती सर्वहि विश्व मानी ॥ ७ ॥
कीं क्रूर कोणी कुमती कलंकी । खलाग्रणी लिप्तहि पापपंकीं ॥
नीचात्म, निःशील, निरीशभक्ति । तेही जरी त्वच्चरणार्थि येती ॥ ८ ॥
नमीति तूतें जरि एक वार । अनन्य भावें तुज सद्विचार ॥
तरी तयाच्या विसरूनि दोषा । गासी तया साधुसमाजि, ईशा ! ॥ ९ ॥
दासांसि पोषी सगळ्या परींनीं । स्वामी असा अन्य नसेचि कोणी ! ॥
दासासि पाळी अपुल्यासमान । स्वप्नींहि जो प्रौढि निज स्मरे न ॥ १० ॥
जो दाससंकोचहि वाढि चित्तीं । ऐसा कुठें स्वामि दयार्द्रमूर्ति ? ॥
स्वामीच ऐसे प्रभु रामराज । उभारुनी बाहु वदेन पैज ! ॥ ११ ॥
पशूहि ते नाचुनि दाखवीती । प्रवीण पाठीं शुकपक्षि होती ॥
प्रावीण्य तें नर्तनशिक्षकात । कीं पाठ देत्या पटु पाठकांत ! ॥ १२ ॥
सर्वां परीं मानुनि गोड दासा । सन्मानुनी स्थापुनि साधुशीर्षा ॥
हें ब्रीद कोणा करि शक्य व्हावें । एका कृपामूर्तिविना स्वभावें ? ॥ १३ ॥

शोकें, स्नेहें, विपुल अथवा मांक्षिया बालभावें, ।
आलों येथें टकळुनि दुरीं आपुलें शब्द डावे ! ॥
ऐशा मातें सदयहृदयीं स्वामिनीं आत्मभक्ति ।
मानोनीया, मम सकलही शासिलें तुष्टचित्तीं ॥ १४ ॥

सन्मंगलाचें जगतीं निदान । हें स्वामिपादांबुजसंनिधान ॥
मीं देखियेलें सहजानुकूल । हें भाग्य माझें कधि वर्जिलें ? ॥ १५ ॥

सान्या लोकां मम कळविलें भाग्य अत्यंत थोर ।
माझी मोठी असुनिहि चुकी, स्वामिचा प्रीतिपूर ! ॥
मातें स्वामी ! तुम्हि निववितें सत्कृपानुग्रहानें ।
विश्वामध्यें अधिकचि दयापरि हा सर्वमानें ॥ १६ ॥

संभाळिली प्रभुवरें मम आवडी ही । शीलस्वभावें अपुल्या सहजप्रवाहीं ॥
हे नाथ ! केलिच मियां बहु दांडगाई।नाथा अतिक्रमितसे, चढिला जनाहीं !

मी बोलतों अविनयें विनयें इवें तें । आतां क्षमा प्रभुवरें करणेंचि मातें ॥
दुःखार्त जाणुनि मला प्रभुनीं मनांत । घोरें मदीय सहणें करुणाधिनाथ ! १८
मी बोलणें बहुत, हो अतिखोडि माझी। जाणोनिही प्रभु सुजाण, सुहृद् असा जी!
आज्ञा करोत मज देव ! यथेच्छ आतां । सर्वां परीं मजसि सावरणेंचि नाथा!
श्रीस्वामिपादकमलोद्भव जे पराग । जे सत्य, पुण्य, सुख यां अवधी सुभाग॥
घेऊनि तच्छपथ बोलत सत्य हें मी । हो आवडी मम मनीं प्रभुदास्यि नामी
हो स्वप्न, जोर अथवा मम जागृती जी । वाछा असे सहज मानसि हेचि माझी
न स्वार्थ वा कपट वा मम अर्थ चार । याच्याविना इतर काहिंच ना विचार!
आज्ञा प्रभूतम अशा तुमचीच सेवा । याश प्रसाद मजला अजि हाच देवा!"
प्रेमें भरे भरत विह्वल हें वदोन । रोमांचकाय नयनांबुज अश्रुपूर्ण ॥ २२ ॥
तो व्याकुल प्रभुपदाब्ज धरीं नमून । तत्प्रीतिवर्णन यथार्थ करील कोण ? ॥
तेव्हां रघूत्तम कृपांबुधि त्यासि मानी। प्रेमार्द्रवाक् उचलि त्यासि करीं धरूनी!

राम, जनकही, साधु, सभाजन शिथिलित झाले प्रेमभरें ।
मनीं प्रशंसिति भरत-बंधुता भक्ति अनुत्तम जी विचरे ॥
भरता शंसिति देवहि वर्षति सुमनें, मनिं जरि मलिनमति ।
तुरुषि वदे, जन विकल जाहले ऐकुनि, जशि निशि कमलतति।२४

ऐकोनियां ती भरतोक्ति लीन । पाहोनि त्याचें मन भक्तिपूर्ण ॥
प्रेमार्द्र झाली सकला सभा ती । श्रीरामही स्नेहिं भरे स्वचित्तीं ॥ २५ ॥
दोंही समाजीं अति दुःखि दीन । नारीनरां सर्व तशां बघून ॥
मूतांचि मारूनिच नीच इंद्र । साधावया पाहत आत्मभद्र ! ! ॥ २६ ॥

—:इतिश्रीराम० श्रीअयो० भरतविनयवर्णनं नाम षड्विंशतितरङ्गः :—

## तरंग २७ वा

ना इंद्रसा कपटि ना कुणि दुष्टचित्त । स्वार्थार्थ अन्यहितघातकरी यथार्थ ।
काकासमानचि दिसे चतु इद्रवृत्ति । विश्वासशून्य मलिना करवी अती ती
आधीं करीत करवी कुटणी विदेष । उच्चाटना सकलहीं करी सुरेश ॥
मोही समस्त हृदयांप्रति इंद्रजाल । श्रीरामभक्ति परि वाचवि त्यां सलील।२
उच्चाटनें हृदयिं चंचलवृत्ति झाली । हो आवडी क्षणि वनीं, क्षणि गेहिं ठेली
सारी प्रजा द्विविध चित्ति सचिंत होत । कीं सिंधुसंगमि दुसंगत गांगतोय!॥ २

कोठेंच त्यांस परितोष न तें दुर्चिंत्त । कोणांस बोलूं शकती नच मर्म 'कां तें?'
बोले ह्मणूनि मनिं तें करुणानिधान। हो श्वान, तेविं मघवाहि, युवा, समान!"
भरत, जनक साधू, मंत्रि यांना त्यजून।तशिच मुनिजनांना सोडुनी जे सुजाण
छलि बहु सकलांना देवमाया अनीव ! जशि जशि मति ज्याची, त्यापरी भेदभाव।

पाहे कृपासागर रामराय । स्वस्नेहभारें जन आर्त होय ॥
तैसाच झाला जन दीनवाणी । इंद्रें कृता त्या कपटादिकांनीं ॥ ६ ॥
सभा, वसिष्ठादिक विप्र, राजा । मंत्री अशांच्या मति यंत्रिता ज्या ॥
भक्तीच हेतू भरतांतरींची । सर्वांप्रती मोहविणार साची ! ॥ ७ ॥
तें चित्रसे पाहति सर्व रामा । संकोचुनी बोलति वाक्यसीमा ॥
ते मेजकें बोलति, वाटलें कीं । जणों तयां शिक्षित तेंचि लोकीं ! ॥८
ती प्रीतिभक्ती विनयप्रभाव । जे शोभती त्या भरतास सर्व ॥
ते ऐकतांना अति सौख्य देती । वर्णावया मात्र न शक्य उक्तीं ! ॥ ९
यद्भक्तिचा लेशहि पाहुनीया । हो प्रेममग्ना मुनिवृत्ति ठायां ॥
तैसाच हो कीं मिथिलाधिनाथ । प्रेमामधें त्या विनिमग्नचित्त ! ॥ १०
माहात्म्य त्याचें तुलसीमतीला । वर्णूं कसें ये जरि ती सुलोला ? ॥
ती भक्तिधारा हृदयांत ओती । सद्बुद्धि, उत्साह भरूनि चित्तीं ॥
माहात्म्य मोठें, लघु आत्मशक्ति । जाणोनि संकोचति बुद्धिवृत्ति ॥
म्हणोनि येथें कविसत्तमांनीं । न वर्णनीं प्रेरिलि भीरु वाणी ! ॥ १२
अत्यंत गोडी भरतांतराची । तद्वर्णनें शक्यहि होति कैंचीं ? ॥
होते मतीची स्थिति वर्णितांना । कीं बालकोक्ती वदणें अजाणा ! ॥ १३

भरतविमलकीर्ती हाच कीं निर्मलेन्दु । उदित विमल चित्तीं सज्जनीं हर्षसिंधु
कविसुमति चकोरी त्याप्रती भक्तिलोला । सुखति बघत राही वर्णनीं घे अबोला !

सद्भाव जो कीं भरतांतरींचा । अगम्य शास्त्रां निगमांहि साचा ॥
तेथें मदीया मति चंचला ही । असा क्षमावी कविनींहि कांहीं ! ॥ १५

भरतविमलभावा वर्णिता ऐकतांना । मनिं रघुपतिसीतामक्ति लाभे न कोणां?
स्मरणहि भरतानें निर्मितें रामभक्तिानच सुलभ जया ती, कोण ऐसी कुमूर्ति ?
निरखुनि सकलांची त्यापरी चित्तवृत्ति।गणुनिहि हृदिं त्यांची हार्दिका भावभक्ति
रघुपति नयशाली धीर, धर्मी धुरीण । सुखजलनिधि सत्यस्नेहि बोले सुजाण ॥१७
निवडुनि मनिं सारें देशकालप्रसंग । विकल जनमनेंही चिंतुनी चित्ति सांग

अमृतमधुरवाणी सार जें शारदेचें । स्वहितपरिणामीं राम बोले स्वबाचें १८
"प्रियतम भरता रे ! तूंच धर्मी धुरीण । तुजसम जगिं जाणे लोकशास्त्रादि कोण?
कृतिवचनमनांनीं शुद्धनेमाजिं अन्य । नच कुणि तुजऐसा; तूं जसा तूंच धन्य!
ऐशा गुरूंच्या बहु या समाजीं । कनिष्ठबंधुस्तुति योग्य ना जी ! ।।
कसे करूं ये गुणवर्णनातें । वेला गमेना उचिता मनातें ! ।। २० ।।
तूं जाणशी सूर्यकुलीन रीति । सत्यप्रतिज्ञारुचि तातचित्तीं ।।
सत्कीर्तिभक्ती तुज होय ठावी । लगे मला ती न तुला वदावी ! ।। २१ ।।
तूं जाणसी समय, लोक, तशी गुरूंची । लज्जा, उदास-रिपु-मित्रमर्मेंहि साची
ठावें तुला सकलमर्म, तसेच धर्म । माझें तुझें अहित वा हित, सर्व वर्म ! ।।
आहे मला भरंवसा तव सर्वरीतीं । बोलेन काहिं समयोचित अल्प उक्ति ।।
वत्सा ! पित्याविण अम्हां हितकारि जें तें । केले समस्त कृपया गुरुंनीं सुचित्तें
नाहीं तरी परिजनांसह पौर सारे । आम्हांसमेत पडते असुखीं बिचारे ! ।।
जाता अकालिं अथवा दिनराज अस्ता । क्लेशास पार कसला जगतीं समस्ता!
उत्पात याचपरिचा विधि निर्मि ताता ! । सरक्षिलें मुनिवरें जनकें अनाथां ।।
हें राज्य, काज, धरणी, यश, धर्म, मान।गेहें धनें गुरुचि सांवरि यांचि पूर्ण
येणेंचि होतिल हितें सकलां अम्हांही । गेहीं वनीं गुरुकृपा तुज रक्षि पाहीं ।।
माता, पिता, गुरु, विभू कथिती निदेशा।आधार धर्म; जणुं काय धरेसि शेषा!
तो सन्निदेश कर तूं भरता ! सुगीता।। माझ्याकडूनि करवूनिहि घेचि ताता!
ऐशा प्रकारिं कर रक्षिल सूर्यवंश । हो हेंचि एक अपुलें करणें विशेष ।। २७
जें सर्व सिद्धि मज साध्य करील पूर्ण ! जे कीर्ति-भूति-सुगतिप्रति वेणि जाण!
ऐशा विचारिं सहुनी लव संकटातें । ठेवीं प्रजा सपरिवार सुखांत कीं ते ।।२८।।
थंबो ! विपत्ति मजला, सकला छळील । तूंतें परी कठिन ही अवधी गमेल।।
जाणोनिही मृदु तुला वदतों कठोर । आहे कुवेळचि अशी; म्हणु मी न उग्र ! ।।
येतां प्रसंग गुणि बंधुच होय साह्य । हो वज्रघात तर हात न वारि काय ! ।।
होतात सेवक जसे कर, पाद, नेत्र । स्वामीसमान म्हणणें मग कां न वक्त्र ! ।।
"हो प्रीतिची अतुल रीत अशी प्रशस्ति । गातात सत्कवि" वदे तुलसी निजोक्ति ।।
ऐकोनियां रघुवरोक्ति सभा निमग्ना । प्रेमाब्धिनिर्मित सुधेमधि भावलीना ।।३१।।
स्नेहान्विया जणुं समाधित लोक रंगे । तें शारदा धरित मौन निजांतरंगें ।।
झाला तदा भरतही अति हृष्ट चित्तीं । हो संमुख प्रभु; पुरे हृदयीं अघार्ति ।।

झालें प्रसन्न मन, सर्व विषाद लोपे । मूकास लाभलि गिरा जणुं वाक्स्वरूपें॥
प्रेमें प्रणाम करुनी वदला फिरूनी । जोडोनि अंबुरुहयुग्म असे स्वपाणि ॥३३॥
"नाथा! तुम्हांसह गतोत्सवसौख्य झालें। वाटे कृतार्थ जगिं जन्मुनि चित्त घालें!
आतां कृपाळ तुम्हि जेवि निदेश द्याल। तो शीर्षवंद्य मज होइल सर्वकाल॥३४॥
द्यावा विभो! मज असा अवलंब कांहीं। उत्तीर्ण होइल जयें अवधी अशाही॥
देवाभिषेक करण्या शुभतीर्थवारी। म्यां आणिलें मजसवें गुरुसद्विचारीं॥३५॥
आज्ञा तयाविषयिं काहिं मला करा जी! ती मी करीनचि तयापरिं सर्व आजि॥
इच्छा असेचि महती मम एक चित्तीं। संकोचभीति मज या वदवीति ना ती"॥
"ती सांग, तात!" म्हणुनी कथिता प्रभूनें। स्नेहार्द्र तें भरत बोलत याप्रमाणें॥
"आज्ञा कराल तर पाहिन चित्रकूटीं। सर्वस्थलें प्रभुपदांकित थान मोठीं॥३७॥
तीर्थ, वनें, मुनिसदाश्रम अद्रिभाग। पक्षी, मृगं, सर, झरे, सरिताहि साग॥
येईन पाहुनि मनोहर पुण्यभूमी। होईन धन्य शुभदर्शन लाभुनी मी" ॥ ३८॥
सांगे रघूत्तम तदा "वद्य रे! अवश्य। घे अत्रिवाक्य शिरिं त्यापरि देख दृश्य॥
कांतारिं निर्भय तुवां अजि संचरावें। अत्रिप्रसादिं वनिं मंगल सर्व पावें॥
बंधो! मनोज्ञ वन पावन सर्व आहे। ज्या सांगतील ऋषि त्या स्थलिं तीर्थ वाहें॥
स्थापीं तिथें सकलतीर्थजलें" प्रभूक्ति। ही ऐकुनी भरत तुष्ट अतीव चित्तीं॥४०॥
सानंद वंदि मुनिवर्यपदांबुजाला। तो तत्कृपा मिळवुनी मनिं धन्य झाला॥
संवाद रामभरतांतिल सद्रसाचा। देव प्रशंसिति महानिधि मंगलांचा॥४१॥
स्वार्थी समग्र सुर शंसति सूर्यवंशा। ते वर्षती अमरणादपपुष्पवर्षा॥
सानंद गर्जति मनोहर धन्यवाद। 'हे धन्य धन्य भरता! जय राम!' शब्द॥
सारी सभा, जनक, लोक समस्त तेथ। सोत्साह होति, भरतोक्तिहि शंसतात॥
श्रीरामसद्गुणगणा स्तवुनी प्रशंसी। रोमांचुनी जनकभूपति तद्गुणांसी॥४३॥
स्वामी विशुद्धमति सेवकही सुभाव। ते प्रेमनेम अति पावन पुण्य सर्व॥
जो तो प्रशंसि अतिशादरचित्त त्यांना। मंत्री, सभासद समग्र रघूत्तमांना॥४४॥
संवाद रामभरतांतिल तो श्रवोनी। दोनी समाज सुख तेविं विषाद मानी॥
ती सौख्यदुःख सम मानित राममाता। राज्ञीमनां समजवी गुणदोषयुक्ता॥४५॥
कोणी प्रशंसी गुण राघवाचे। गाई कुणी तें भरता सुवाचें॥
मुनीश तेव्हा कथि अत्रि सारें। स्थापावि तीर्थें कहिं सत्प्रकारें॥४६॥
"शैलाचिया सन्निध हो सुकूप। पीयूषसा उत्तम जो अमूप॥

स्थापीं तिथें हे भरता ! सुतीर्थें "। तो प्रेरि पार्त्रें मग सर्व तेथें ॥ ४७ ॥
जाई स्वतां सानुज अत्रियुक्त । येती वसिष्ठादिकही समेत ॥
कीं जेथ तो कूप अगाध ठेला । स्थापीयली त्यामधिं तीर्थमाला ॥ ४८ ॥
सप्रेम तैं अत्रि वदे प्रसन्न । कीं " स्थान हें होय अनादि जाण ॥
हो लुप्त काळें, परि हा जनानीं ! केला तुझ्या, उत्तम रे ! खणोनी ॥ ४९ ॥
दैवें जगा हा उपकार होय । सुलभ्य होई जगिं तीर्थतोय ॥
हा कूप नामें तुझिया प्रसिद्ध । होईल लोकां करण्या विशुद्ध ॥ ५० ॥
स्नानादि येथें करताचि नेमें । विशुद्ध पुण्यावलि त्यांत जन्मे " ॥
सांगोनि माहात्म्य समस्त येती । कीं जेथ होती प्रभुरायमूर्ति ॥ ५१ ॥

अत्रि मुनी तैं सांगे सकलांप्रति भरतकूपगौरव तें ॥
धर्मेतिहासगोष्ठी सांगुनि तो साधुवृंद तेथ रते ॥ ५२ ॥
यापरि रात्री सरतां स्नानादिक नित्य सर्व ते करुनी ॥
सानुज भरत निघे तैं रामानिवसिष्ठनमन आचरुनी ॥ ५३ ॥
सर्वांसमेत पायीं अनवाणी जाय भरत देखाया ॥
श्रीरामशैलशोभा, होई क्षिति मृदुल तत्पद वहाया ॥ ५४ ॥
कुशकंटक तृण छुडुपें स्पर्शा दुस्तर कुमार्गि दूरवुनी ॥
सेवी भरता अवनी, पवनहि वाहे सुखावह त्रिगुणी ॥ ५५ ॥
वर्षति देव फुलांनीं छाया घन करि निवारुनी ऊन ॥
तरुराजी फलपुष्पीं भरली होती, तृणें सुमृदु पूर्ण ॥ ५६ ॥
हरिणें प्रेमें चरती, खग गाउनि मधुरशब्दि सुखवीती ॥
त्या रामभक्त जाणुनि सेविति सारेचि आदरें चित्तीं ! ॥ ५७ ॥
सामान्य लोक जर का जाभई देताहि ' राम ' नाम वदे ॥
त्यांतेंहि सिद्धि सुलभा, भरता मग केविं सुकृति आनंदें ? ॥५८॥
रामाचा प्राणप्रिय भरत, तया सिद्धि का न भजतील ?
त्या सेविति सकलाही कथणें ही गोष्ट केविं हो नवल ? ॥ ५९ ॥

ऐशापरी भरत त्या वनि संचरीत । तत्प्रेम तें मुनिजनांसहि लाजवीत ॥
पुण्यें बलें, अवनिभाग विशेष पाही । जे कीं पवित्र अति चित्र विलेक्ष्यांही ।
पक्षी मृगें तरु तृणें गिरि कुंज बागा । आलोकि तैं भरत काननिच्या विभागा ॥
मार्गीं पुसे कुतुकें समजूनि घेव । आनंदि होत हृदयीं प्रिय रामभक्त ॥६१॥

हर्षेचि सांगति ऋषी भरतासि नामें । पुण्यप्रभाव, गुण, कीर्ति महत्त्वमर्मे ॥
केलें निमज्जन कुठें, विनयप्रणाम । कोठें वसे भरत तें नवानाभिराम ॥६२॥
कोठें बसे मुनिनिदेशिं विनम्रभावें । सीतारघूत्तमपदां हृदयें स्मरावें ॥
बंधूसमेत भरतातरिं रामभक्ति । ऐशापरी करित तन्मय चित्तवृत्ति ॥६३॥
सेवा अनुत्तम तशी उभयीं वचोनी । आशीर्नचें वितरिलीं वनदेवतांनीं ॥
येती फिरूनि तिसऱ्या प्रहरीं स्ववासा । वदोनि रामपदिं पावति भूरि हर्षा ॥
हीयें स्थलें पंच दिनावधी अशीं । पाहीयलीं श्रीभरतें अहर्निशीं ॥
सत्कीर्तिगानें हरिशंभुकीर्तनें । नेले दिना, सांज गमे सुवर्तनें ॥ ६५ ॥
—इति श्रीराम० श्रीअयोध्या० श्रीरामचन्द्रभरतात्रिसंवादे सप्तविंशतितरङ्गः—

## तरंग २८ वा

प्रातःकालीं स्नानें आटपुनी मीनले सकल लोक ॥
मिथिलेश्वर भरत तसे ब्राह्मण सुविचारकारण अनेक ॥ १ ॥
श्रीराम जाणुनि मनीं कीं आहे आजचा मला दिवस ॥
बोलुं वधे हृद्गत परि, संकोच शब्द ये न वदनास ! ॥ २ ॥
अवलोकुनि मिनले जन गुरु नृप भरतादि सर्वहि समेत ॥
संकोचोनि परि हृदीं राघव अवलोकि भूप्रतिच तेथ ॥ ३ ॥
तें शील रामरायीं वानिति जन भक्तिपूर्ण आर्तमनें ॥
उद्गारति ' नच दुसरा स्वामी संकोचशील रामविणें ! ' ॥ ४ ॥
पाहोनि कष्ट रघुनाथमनीं अतीव । धैर्ये उठे भरत जाणुनि तत्त्वभाव ॥
जोडोनि हस्त करि दंडवत प्रणाम । बोले " प्रभू पुरोचि सर्व मदीय काम॥५॥
सहे माझ्यासाठीं प्रभुवर किती ताप सकल ।
दिलेंसें लोकांनी निजतनुसि दुःखांत अतुल ॥
मला आज्ञा द्यावी प्रभुसि रुचते ती निजहृदीं ।
अयोध्येची सेवा करिन जंव हा जाय अवधि ॥ ६ ॥
सांगा उपाय, शुभ पाय पुन्हां बघेन । संपोनियां अवधि, दीनदयाळ ! पूर्ण ॥
या जी ! मला सदुपदेश कृपानिधाना । हे कोसलेश्वर विभो ! मजला सुदीना ! ॥
हे नाथ ! पौरजन, दास, शुभ प्रजाही । संबंध सर्व जरि उत्तम भक्तिवाही ॥
नाथा ! तुम्हांस्तव भली भवदुःखकोटी । तुम्हांविना मज नको जरि मोक्षभेटी ! ॥

स्वामी सुज्ञाण शरणागत पाळणारे । जाणोनि दासरुचिकांक्षितवृत्त सारें ॥
सर्वांधि रक्षित असा, मन काय चिंता ? । दोनीहि पक्षि मज देवाचि सौख्यदाता ॥
विश्वास हाच मम मानसि सर्वरीतीं । निश्चिंत मी म्हणुनि राहत आत्मचित्तीं ॥
आर्ती मदीय, विभुची मज टायिं भक्ति । दोनी बळेंचि करिती मज धीट चित्तीं ॥
मद्दोष हा प्रभुवरा ! दुरिं सारुनीयां । संकोच टाकुनि निदेश करा मला या" ॥
सारे तदा विनय तो भरतीं स्तवीती । कीं क्षीर-नीरविवृतिस्तव हंसकीर्ति ! ॥
ऐकोनि बंधुवच दीन ऋजू सुयुक्त । तो दीनबंधु रघुवीर वदे निजोक्त ॥
जें देशकालसमया अनुकूल होय । श्रीराम सुज्ञमतिमान् बुधमाननीय ॥१२॥
"ताता ! मदीय तवही सकलां जनांची । चिंता गुरू नृप करीति गृहीं वनींची ॥
माथां मुनीश, मिथिलेश असे असोन । स्वप्नींहि दुःख तुज, तेविं मलाहि कोण ! ॥
माझा तुझाहि पुरुषार्थ महान् जगांत । सत्कीर्ति धर्म परमार्थ निजार्थ मूर्त ॥
हे दोहि साधुं पितृशब्द करून बधू । हो लोकवेदमत तातहिताहि साधूं ॥१४॥
आज्ञा करीत पितृ-मातृ-गुरु-प्रभूंची । गेला कुमार्गिहि तरी कधि ना पडेचि ! ॥
ऐसा विचार करुनी त्यज दुःख सारें । साकेत रक्षि, सरतो वनवास तो रे ! ॥१५॥
तूं देश, कोष, परिवार, समस्त पौर । सांभाळ हा गुरुपदाब्जरजीं स्वभार ॥
मानीं निदेश जननी, मुनि, मंत्रि याचे । साकेतपौरपृथिवीप्रति पाळ साचे

मुख्यें मुखाचे परि हें असावें । खाण्यापिण्यातें जरि एक व्हावें ॥
परी विवेकें सकलांगपोष । करी, वदे हें तुलसी विशेष ! ॥ १७ ॥
सर्वस्व हे जाणुनि राजधर्मी । संकल्प रक्षीं मम आत्ममर्मीं" ॥
श्रीराम ऐसें भरतासि बोधी । नानापरी सांवरि बंधुची धी ॥ १८ ॥

परी न संतोष, न शांति चित्तीं । आलंबनावीण तयास हो ती ॥
जाणोनिही त्या भरतांतरास । संकोचला राम मनीं विशेष ॥ १९ ॥
संकोच कीं गुरुजनादिक पौर तेथ । स्नेहार्द्र बंधु भरतीं तरि सर्व चित्त ॥
श्रीराम दे सकृप त्यां निज पादुकातें । शिरीं धरी भरत त्यांप्रति भक्तिचित्तें !
तें पुण्यराशि पदपीठ दयानिधींचें । कीं पौरजीवपरिरक्षकयुग्म साचें ! ॥
की रत्नपेटि भरतांतरभक्तिभावा । मंत्राक्षरें उभय रक्षणकारि जीवा ! ॥
कीं तें कपाट परिपालक सूर्यवंशा । कीं पाणियुग्म करि उत्तमकर्मपोषा ! ॥
कीं युग्म तें विमल सेवनधर्मनेत्र । श्रीरामभक्तियुगतीर्थचि तें पवित्र ! ॥
आधार तो भरत घेत मुदें भरोनी । सीतारघूत्तम जणों हृदिं लब्ध मानी !

रामा प्रणाम करि, मागि निरोप जाया।त्या राम घे कवळुनी हृदिं आपुलीया!
साधूनि वेळ कुटिला करि तैं सुरेश। उच्चाटनाचि जनचित्तगणीं विशेष ॥
सर्वांसि पथ्यकर जाहलि ती कुचाळी।आशा, खरें अवधि तो, जनजीविं आली!
ना हैं तरी, विरह, लक्ष्मणरामसीता। यांचा जनांप्रति कुरोग तशा वधीता! ॥
तो वक्रयोग परि रामकृपें सुधारी। हो देवकोपहि गुणावह साह्यकारी!॥२५॥
आलिंगि राम भरता हृदयें भरून। तो प्रीतिचा रस कथूं शकणार कोण?॥
सप्रेम उल्हसुनि ये तनुचित्तवाचीं। धैर्येंहि विद्रवति धैर्यधुरंधरांचीं!॥२६॥
अश्रु स्रवे कमललोचनिं सर्वलोकां। पाहोनियां सुरसभाहि मनीं सशोका ॥
जे धैर्यमेरु गुरुसे, मिथिलेश ऐसे। ज्ञानाग्नि यन्मन कसाप्रति लावि जैसें!
ज्यातें विरिंचि विरची जणुं पद्मपर्णे। निर्लेप जे जलमळें जगतीं सुजाण ॥
त्यानाहि रामभरतातिल ती अमूपा। प्रीती करी विरति-वाक्-तनु-चित्तलोपा!
जेथें वशिष्ट जनकस्थिति होय मुग्धा। ती प्राकृत। समजणें नच बुद्धि शुद्धा
सांगेन रामभरतांमधला वियोग। मानील लोक मजलागिं कठोरभाग! ॥२९॥
संकोच तेथिं रस तोहि अवर्ण्य साचा। संकोचते स्मरुनिही कविची सुवाचा!
भेटोनियां समजवी भरतासि राम। भेटे मुदें उरिं रिपुघ्न मनोऽभिराम ॥३०॥
भटोनि मंत्रिभरतां जन कार्यि लागे। आपापल्या सकलसेवकवर्ग वेगें ॥
ऐकोनि दोनिहि समाजि सचिंत होती। तैं सिद्धता करिति ते परतावया ती
वंदोनियां प्रभुपदांबुजि दोनि बंधू। श्रीरामशब्द शिरिं घेउनि धैर्यसिंधु ॥
प्रार्थोनियां ऋषितपीं वनदेवतांसी। संमानिती बहुपरीं सकलां मुनींसी ॥३२॥
ते लक्ष्मणा मिळति, वंदिति जानकीतें। तत्पादपंकजरजां स्वशिरीं धरीते ॥
आशीर्वचें वितरि त्यांप्रति रामजाया। जीं सुखमें सकलमंगलता सृजाया ३३
श्रीराम सानुज नमी जनका सभक्ति।त्या प्रार्थि तो स्तवुनि तन्महिमा सुरीती
" हे नाथ! कष्ट किति घेउनि हे दयेनें।केलें असे विपिनिं आवण तात! येणें
आम्हां अम्हां वितरुनी शुभदा प्रभूनीं। कार्या सुखी परतुनी निजराजधानी"
पूजूनि साधुमुनिविप्रगणा सुमानें। दे त्यां निरोप गणि शंभुहरप्रमाणें ॥३५॥
अश्रमसमीप मग जाउनि बंधु दोनी। आशीसि घेति मग येति पुन्हां नमूनी॥
जाबालि, कौशिक तसे मुनि वामदेव। ते पौर मंत्रि नृपसेवक याद सर्व ३६
यातें यथाविधि नमूनि निरोप देत। श्रीराम लक्ष्मणसमेत अती विनीत ॥
नारी-नरां परतवी लघु-मध्य-थोरां। संमानुनी करुनि आत्मकृपा अपारा

कैकेयीचें वंदि पादाब्ज राम । भेटे तीतें प्रेमभावें निकाम ॥
दुःखें लज्जा पावली; पाळवोनी । दे मायाची पालवी वैसवोनी ३८
मातापिता परिजनादिक यांसि सीता । भेटोनि ये पतिचिया अनुरागि पूता ॥
श्वश्रूंसि भेटुनि नमी सकलांसि भावें । तच्चीतिवर्णन करीप्रति हे जि यावें ।
आशीर्वचें अभिमतें मिळवूनि सीता । घेवोनि घेत उपदेश मनीं पुनीता ॥
प्रीतींत दोनिहि समाजि निमग्न ठेली । भावावली सकलवृत्ति सुभावशाली ४०
श्रीराम मागवुनि सुंदर पालखींना । मातांसि त्यांत बसवी, समजावि नाना!
दोनीहि बंधु मिळती मिसळूनि त्यातें । स्नेहें समें अतुल पोंचवि भक्तिचित्तें ॥
नानापरीं सजवुनी गजवाजि यांना । भूपाल सैन्य भरतादि करी प्रयाणा ॥
चित्तें सहीत सहलक्ष्मण रामि होतीं । वाटे समस्त चलतीं गतचेतसीं तीं । ॥४२॥
तेव्हां वृषादि-गज-वाजि पशूहि सारे । ते चालती जणु विना हृदयें, विचारे!॥
त्यांची दशा करुण ती कवि वर्ण्य व्हावी । ते चालती परतुनी परतंत्रभावीं ! ४३
गुरुतें, गुरुपत्नीतें, वंदुनि सानुज सखीत राम तदा ॥
परते पर्णकुटीतें दुर्भरें तेथि आर्तियुक्तहृदा ! ॥४४॥

॥ इति श्रीराम० श्रीअयोध्या० श्रीरामचंद्रसकाशाद्भरतप्रत्यागमनं नामाष्टाविंशतितरङ्गः ॥

## तरंग २९ वा

संमानुनी मग निरोपिधिलें निषादा । तो जाय चित्ति धरुनी अमिता विषादा ॥
कोळी किरातगण भिल्ल वनाधिवासी । माघारि जाति नमुनी किति दां तयांसी ॥
सीतालक्ष्मणराम बैसति वटच्छायेंत विश्रांतिनें ।
होती दुःखित आत्मलोकविरहें स्नेहार्द्र अत्यंत ते ॥
त्यांसी राम सुचारुभाव भरतीं सत्स्नेहवृत्ती तदी ।
सीतालक्ष्मण यासि सांगत किती वाखाणुनी बंधुसी ॥ २ ॥
प्रीति र्सतीती कृतिचाळणें तशी । श्रीराम वर्णी भरतांतरीं जशी ॥
सप्रेम तो श्रीमुखि वानि राघव । सत्प्रीतिचें जें भरतात लाघव ! ॥३॥
खगमृगजलमीनीं तेथवां चित्रकूटीं । चरि अचरि विशेषा म्लानता व्यापि पोटीं ॥
भ्रमर वधति सारी राघवाची दशा ती । दिसति कथुनि गर्हीची ते सुमें वर्णतातीं ४

नमन करुनि देवां राम आश्वासि त्यातें। विगतभय निघोनी जाति निश्चित चित्तें॥
प्रभु विलसत सीतालक्ष्मणांच्या समेत। विलसति जणुं भक्ति, ज्ञान, वैराग्य मूर्त॥
इकडे श्रीगुरु मुनिजन मिथिलाधिप भरत जाति आत्मपथें॥
श्रीरामचंद्रविरहें झालेले आर्तचित्त सकलहि ते॥ ६॥
ध्याती चित्तामध्यें प्रभुचे गुणगण नितान्त अभिराम॥
चालति मौनचि भजुनी, चित्तानंदें गाहिला भरुनि राम! ॥ ७॥
झाले समस्त यमुना उतरुनि पार। तो भोजनाविणचि वासर जाय सारा॥
गंगा नदी उतरली दुसऱ्या दिनीं ते। सेवीत रामखल त्यां गुह सर्व तेथें॥८॥
गई नदीतें उतरुनि येत। ते गोमतीच्या सलिलीं नहात॥
चौथ्या दिनीं ते जन राममक्त। सारे अयोध्यानगरीसि येत॥९॥
राहे तदा जनकही दिन चार तेथ। तो राज्यकार्य तिथलें सर्वि सावरीत॥
तें सोपवोनि सचिवीं, भरतीं, गुरूंसी। तो जाय भूप मिथिलेसि मनें उदासी॥१०॥
साकेतवासि जन मानुनियां गुरूक्त। ते राहती सकल रामपुरी सुशांत॥
श्रीरामदर्शनसुखास्तव आचरीती। नारीनरादि नियमव्रत सत्यभक्ति॥११॥
करीति नाना उपवास साधनें। त्यजोनियां भोगविलास भूषणें॥
न चित्त त्याचें सुखसेवनामधीं। प्रतीक्षिती केविं सरे वनावधि! ॥१२॥
मंत्र्या, सुसेवकगणां भरत प्रबोधी। कार्यें निजें करिति ते भरतोक्तबुद्धि॥
सागे रिपुघ्न-हृदयासहि बोधुनीयां। योजीत मातृपदसेवन त्या कराया॥१३॥
विप्रांसि बोलवुनि राजकि सांगि त्यांतें। वंदोनिया भरत कद्विनयें सुचित्तें॥
"हो उच्च, नीच, लघु-दीर्घ करेंहि कार्य। सांगोनियां मज करीं करवोत आर्य!॥
दासादिकां, पुरजनां, सकलां प्रजांना। बद्धांजली भरत वंदुनि सांगि नाना॥
केलें तयां स्ववश, तोषवुनी तयांतें। ते मानिती सकलही भरतोक्ति चित्तें॥१५॥
जाई पुढें गुरुग्रहीं अनुजासमेत। बद्धांजली भरत दंडवतें करीत॥
प्रार्थी "विभो! मज निदेश असो गुरूक्त। राहीन मी मुनियमें व्रत आचरीत॥
प्रेमें मुनीश पुलकांकितगात्र बोले। "जें धर्मसार जगतीतलि योग्य झालें॥
तूं तेंचि जाणसि, कथीसि, करीसि सारें। आदर्श तूंच भरता! स्तुतिसद्विचारें"॥
ऐके गुरूक्ति, शिरिं घेइ तदुक्तमाशी। बोलावुनी गणक पाहुनि सद्दिनासी॥
सिंहासनीं बसवि तो प्रभुपादुकांतें। निर्दोष सद्यश रचे कविनायकां तें॥१८॥
श्रीराममाता गुरुपाद वंदुनी। श्रीपादुकांचाहि निदेश साधुनी॥

ये नंदिगांवा भरत प्रभुप्रिय । राहे रचनी तरुपल्लवालय ॥ १९॥
तो धैर्यमेरु शुचि धर्मरक्षक । शोभे जटाजूटिं तदीय मस्तक ॥
तो वल्कलें प्रावरणें निजें करी । मुनिव्रतं सन्नियमादि आचरी ॥ २० ॥
मही खणोनी करि आसनस्थली । कुशावृता भू करुनी तयांतली ॥
आरंभि तो सद्व्रत खाद्यसेवनीं । राहे मुनीचें व्रत पूर्ण घेउनी ॥ २१ ॥
तो भूषणें, प्रावरणें, सुखावली । त्यजी तनूचित्तवचें धरातलीं ॥
विरक्तता श्रीभरतें निषेविली । मुनींद्रिहीं तन्नियमादि गाइलीं ॥ २२ ॥
साकेतराज्या सुरराजहि स्तवी । श्री तेथली त्या धनदाहि लाजवी ! ॥
असक्त तेथें भरत व्रतोद्यमें । तो चंपकोद्यानिं अली तसा गमे ! ॥ २३ ॥
रामानुगामी, कमलाविलास ते । सद्राम्यवान् होति समस्त याकृते ॥
न सेविती त्यां वमना गणोनिया । सुखोपभोगीं नच लालसा तया ॥२४॥
भरत, रघुवरचा जो असे प्रेमपात्र । नच तवि कुतुकार्चे होय हें फार मात्र ॥
स्तवि जग कुतुकानें चातकाच्या व्रताला । स्तुतिसि निजविवेकें हंसही पात्र झाला ॥
त्याचा दिनानुदिन दुर्बल देह होत । तजोबलच्छवि सुखांबुजि वृद्धिमंत ! ॥
सो नित्य रामनियमव्रतिं पुष्टता घे । सद्धर्मसैन्य भरतांतरिं वाढुं लागे ! ॥
होई प्रसन्न मन नित्य तदीय पुण्यें । तेजोबलादिक तयीं गमतीं अगण्यें ! ॥
जैसें घटे जल जरी शरदागमात । पद्में विकासति, विराजति रम्य वेत ! ॥

भरतहृदयव्योमीं शोभा दिसे विमलेत्तमीं ।
शमिं, अनशनीं नक्षत्रीं या व्रतीं नियमीं, दमीं ॥
पुनिव अवधी, विश्वाशाचा तिथें ध्रुव तारक ।
विकसत वियद्गंगा तशी प्रभुस्मृति तारक ! ॥ २८ ॥
अचल अमल प्रीती रामीं, गमे शशिची कला ।
विलसत तिथें तारावर्गी शशी द्युतिनें भला ! ॥
अनुपमचि ती भक्ती रामीं विरक्ति विराजते।
भरतचरितें वर्णायाला । गिरा बहु लाजते !!! ॥ २९ ॥

भरतवर्तन-सत्कृति सद्गुण । कवण हें कवनीं करि गायन ?
सकल सत्कवि लाजति वर्णितां । धकति शेष, गणेशहि वर्णतां ! ॥ ३० ॥
पुजुनि नित्य प्रभुपादुकांतें । तद्धेम ना मानधि मानिजे तें ॥
सो मागमागोनि निदश त्याचा । करीत राज्या बहुरीति साचा ॥ ३१ ॥

पुलक गात्रिं, हृदीं प्रभुजानकी । नयनिं नीर, सुनाम वसे मुखीं ॥
अशि असे भरतस्थिति निर्मला । कशि वदें लवही कथवे मला ! ! ॥ ३२ ॥
सीतारघूत्तम सलक्ष्मण काननांत । राहोनि जें तप करीति विरक्तियुक्त॥
तैसें करी भरतही भवनीं वसोनी । देहासि कष्टवुनि त्यागपरी कसोनी ! ३३
दोघांसही तुलुनि, सांगति सर्व लोक । कीं सर्वरीतिं भरत स्तवनीय नीक ! ॥
साधूंहि लाजतिच तन्नियमव्रतांसी । तैसे मुनींद्रहि तया नमिती स्वशीर्षीं ३४
भरतचरित आहे पुण्यराशी अनन्त । मधुरसुखद, मोदा मंगळा नित्य देत ॥
कलिकलुष निवारी, तीनही क्लेश नाशी।दिनकर जणुं, शोषी मोहरूपी निशेसी!
अघतति गज यांचा सिंह जें मारणारें । असह सकलतापां वारि जें सद्यकारें
रमवुनि जनचित्ता भंजि संसारभार । शशि जणुं रघुनाथप्रीति जी तींत सार।
सीतारामप्रेमसुधाकर भरत न जन्मा जर येता, ।
मुनिहृद्दुर्गम शमदमनियम-व्रतविषमा कां जन करता ? ॥
दुःखाग्नी, अघदंभ, अघनता कोण सद्यशीं निज हरता ?
कलिकाळीं या तुलसीसम शठ कोण राघवापशि धरता ? ! ॥ ३७ ॥
तुलसिदास म्हणे, नियमें कुणी । भरतकीर्ति अशी जर आयके ॥
जनकजारघुनाथपदीं तया । रति घडोनि विरक्ति भवीं टिके ! ॥ ३८ ॥
श्रीरामभरतभक्तिप्रेमाचा सिंधु हा मदीय मना ॥
व्यापुनि राहो संतत ' रामा'र्तिस रामभरत करु शमना ! ॥ ३९ ॥

इति श्रीरामचरितमानसानुवादकाव्ये ' श्रीमुश्लोकमानसे ' कलिकलुषविध्वंसने श्रीअयोध्याकाण्डोत्तरार्धे भरतवैराग्यविवेकवर्णनं नामैकोनत्रिंशत्तरङ्गः

—: इति अयोध्याकाण्डस्समाप्त :—

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादकाव्ये कलिकलुषविध्वंसने ' विमलविज्ञान-वैराग्यसंपादनो ' नाम द्वितीयः सोपानः श्रीसीतारामचंद्रकृपया संपूर्णः ॥

— श्रीरस्तु —

—० ● ● श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तु ● ● ०—

— शुभं भवतु —

[ कांहीं श्लोकपंक्ति राहिल्या, त्या पुढीलप्रमाणें घालणें. ]

पृ. ३९, अयोध्याकांड, पूर्वार्ध, तरंग ११

श्लोक १९ चा पूर्वार्ध–

व्योहार त्या करुनि येति गृहाधि पौर । संध्याविधिस्तव निघे रघुवंशहीर ॥

श्लोक २७ चा पूर्वार्ध–

जें पुण्य सुंदर, सुचित्र सुभोगदायी । सद्रत्ननालयुत पूर्ण मणिप्रमांहीं ॥

पृ. ७३, अयोध्याकांड, उत्तरार्ध, तरंग ४

श्लोक ३० चा पूर्वार्ध–

ती शोचनीय पतिवंचक तेवि नारी । जी स्वैरिणी कुटिल, आवडि मांडणारी ॥



श्रीगणेशाय नमः ।

श्रीभवानीकमलेश्वराभ्यां नमः । श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ।

श्रीसरस्वत्यै नमः ।

तुलसीरूपिणे श्रीमद्वाल्मीकिमुनये नमः ।

यस्य प्रसादात्सुलभं स्वर्गीयममृतं भुवि ॥ १ ॥

# ❀ सुश्लोकमानस ❀

## श्रीरामचरितमानस अथात् श्रीतुलसीरामायण

या महाकाव्याचा अनुवाद

## तृतीय सोपान

# अरण्यकांड

तरंग १ ला

मंगलाचरण

जो धर्मवृक्षाप्रति मूळ होय । आनंद दे जो हृदया अमेय ॥
विवेकसिन्धूप्रति पूर्णिमेन्दु । त्या श्रीशिवाचें पदपद्म वंदू ॥१॥
वैराग्यपद्मा रविसा विकासी । पापान्धकारा निवटूनि नाशी ॥
त्रितापहारी, शमवीत पूर्ण । मोहाम्बुदाली अनिलासमान ॥ २ ॥
श्रीरामभूपप्रिय शंकराला । ऐसा नमीं मी अघनाशनाला ॥
ब्रह्मीं वसे जो नित लीन भावें । त्या शंकरें नित्य अम्हा जपावें ॥३॥

जो सान्द्रमेघापरि इर्वदच्छवि । पीतांबरें सुंदर, चित्त लोभवी ॥
सचाप-बाणांकित-पाणिपद्म तो । तूणीरिं ज्याचा कटिभाग शोभतो ॥४॥
श्रीराम तो पद्मविशालनेत्रन । शोभे जटाजूटशिरोविभूषण ॥
सौमित्रिसीतायुत मार्गि चालत । तो रम्य रम्यांहुनि मी स्मरें नित ॥५॥

'उमे! श्रीरामाचे गुण अमित जे गूढ कळुनी !
मुनि ज्ञाते साधू विरति भजती निर्मळ मनीं ॥
परी ज्यांच्या चित्तीं कधिच नसते धर्मरति ती ।
मनीं अप्रीती ज्यां हरिगुणिं, तयां ते भ्रमविती ! ॥ ६ ॥

पुरजन-भरतांची प्रीति जी रामरायीं । अनुपम सुरसा ती मी यथाशक्ति गाई॥
प्रभुचरित वदें मी आचरी जें वनांत । सुर-नर-मुनिवांच्छा विश्व जेणें पुनीत ॥७॥
एके दिनीं जमवुनी सुमनें मनोज्ञें । भूषा अनेक रचिल्या प्रभुनें रसज्ञें ॥
तो भूषवी प्रियतमेप्रति विश्वनाथ । सप्रेम ते उभय तें स्फटिकासनस्थ ॥८॥
देवेन्द्रपुत्र धरि वायसरूपवेष । तो देखु इच्छि बल राघवि जे विशेष ! ॥
मुंगी जशी कुबुद्धि सागरिं पाहि खोली । तैसे वधे, 'रघुपती किति शक्तिशाली?'॥
तो मूर्ख मंदमति आपलि रोंचि चोंच । सीतेचिया पदिं, पळे मग भीत साच ॥
श्रीराम देखुनि तदा व्रणि येत रक्त । हाणी तया तृणशरें तृणचापिं युक्त ॥१०॥
दीनीं सदा अति कृपालु जरीहि राम । त्यातेंहि तो छळित दुर्गुणपूर्णधाम ॥
तो ब्रह्मबाण अभिमंत्रित वेगिं जाय । धावेहि काक हृदिं भीतमना अपाय ॥
जयन्त तें सत्वर मूळरूप घे । पित्याकडे आश्रय मागण्या रिघे ॥
परंतु तो राघवशत्रु जाणुनी । देवेन्द्र त्याच्या शकला न रक्षणीं ॥१२॥
निराश होऊनि भयें हृदीं भरे । दुर्वास त्या चक्रभयाकुल स्मरे ॥
ते ब्रह्मलोकीं शिवलोकिं, अन्यिही । श्रमें भरे व्याकुळचित्त तो मनीं ॥ १३
कोणीहि त्यातें नच देइ आसरा । वदे न त्या कोणिहि 'बैस रे जरा !' ॥
त्या रामशत्रुप्रति कोणि आश्रय । देऊं शके काय कधीं विनिर्भय ? ॥ १४
श्रीरामशत्रुप्रति सर्व संकटें । होतात एके गवडा । न एकटें ॥
मृत्यूपरी हो जननी; पिता यम । सुधाहि होई जणुं ती विषाधम ॥ १५ ॥
सखाहि त्याचा शतशत्रुसा बने । गंगाहि हो वैतरणी तया गुणें ! ॥
ऐसें तया सर्वहि अप्रिय जग । जे रामशत्रुत्व करीति दुर्भग ! ॥ १६

जेथें जिथें व्याकुळ इन्द्रनन्दन । दुःखें बघे आश्रय काहिं धावुन ॥
तेथें तिथें रामशरें न सोडिला । त्या पाठलागा करता मुदुर्बला ॥ १७
जयंतदुःखा बघुनी तदा मुनी । श्रीनारदा ये करुणा मनातुनी ॥
तो पाठवी त्या शिकवूनि राघवाकीं बोल "रामा ! शरणार्थि वाचवा!"
तैं आर्त तो भीत रिघूनिया पदा । धरी प्रभूच्या, विनवीतहि तदा ॥
"हे नाथ ! दीनावन रामराय रे !। मा त्राहि ! मा त्राहि! दयानिधे! त्वरें
अतुलबल न जाणें, त्वत्प्रभावा न सीमा। मज नच कळला तो मंदबुद्धीस रामा!
प्रभुवर! अजि पावें मत्कृतीच्या फला मी।शरण तुजसि आलों त्वत्पदांभोजगामी
अत्यार्त वाणी परिसोनि त्याची । प्रभू करी त्यास कृपाच साची ॥
एकाक्ष त्यालागिं करुनि सोडी । म्हानि ! हे रामकृपा न थोडी॥२१॥
त्या चित्रकूटीं प्रभुराम राहता । नानापरी दावि चरित्रचारुता ॥
जी वर्णिता चिति सुधाच वाटली । तेव्हां विचारी प्रभुराय हृद्‌ती॥२२॥
" येथें समस्त जन जाणति आपणास । भेटावया सकळ येति इथें विशेष !
संमर्द होइल" म्हणून, इथून दूर । जाती मुनीसि पुसुनी प्रभु रामचंद्र २३
सीतेसवें निघत सानुज रामराय । अत्र्याश्रमीं रिघति, तैं मुनि हृष्ट होय ॥
रोमांचकाय मुनि धावत जाय वेगें । त्या स्वागतें उभय दृष्टिति अंतरंगें २४
श्रीराम त्या करित दंडवत प्रणाम । धावूनि तच्चरणिं भक्तिभरें निकाम ॥
रामा मुनी उचलुनी कवळी स्वपक्षीं । प्रेमाश्रुनीं प्रभुसि न्हाणित तो निजाक्षीं
पाहूनि रामचरणां मुनिनेत्र धाले ! । सर्वांसि ने मुनि निजाश्रमि अल्पकालें॥
पूजूनियां प्रभुवरा अति आदरें तो । सर्वांसि कदफलमूल मुनीन्द्र देतो २६
तैं बघुनी प्रभुवरा अतिशोभमाना । डोळेभरी निरखि ज्या उपमा असेना ॥
जोडोनि हस्तयुगुलावुल्हा तयातें । भावें स्तुती करित अत्रि निजोत्तमोक्तें २७
" हे भक्तवत्सल कृपामृदुशील रामा !। निष्कामिंयाहि वितरीसि सुधास्वधामा
हे श्यामसुंदर भवांबुधिमंदरा रे !। फुल्लांबुजाभनयना नमुं भक्तिपूरें २८
त्वत्पादपद्म मदनाशन मी नमीत । देवा अभेयविभवा ! सुखवीशि भक्त ॥
हे दीर्घबाहुकृतविक्रम ! सज्जचाप । त्रैलोक्यनाथ ! शरणागतनष्टताप २९
हे सर्पपदुभंजन ! शंभुचाप । खंडीसि, तू वरिसि जानकिते अपार ॥
हे सज्जनावन ! मुनीन्द्रमनोभिरामा। देवारिनाशन ! विभो चिरसौख्यधामा !

आता वदा म्हणु कसें प्रभुनीं निवावें । सर्वांतरात वचना, प्रभुसीच ठावें " ॥
ऐसें म्हणोनि मुनि धीर बघ प्रभूतें । रोमांचली तनु विलोचनिं अश्रु ये तें ॥१८॥

तनु रोमांचित पूर्ण प्रेमें प्रभुमुखकमलीं नयन दिले ।
मनोज्ञानगुण यासि अगोचरिं जपतप मीं तरि कधि केलें ! ॥
जे कुणि निशिदिनिं शुभ रघुचरिता गाती सादर त्या मिळते ।
योगधर्मजप नाचरिताही, अनुपम भक्ती तुलसिमतें ॥१९॥

श्रीरामचंद्रयश उत्तम सौख्यमूल । तें वासि नाशि, कलिपातक तें हरील ॥
जे आदरें परिसती यश राघवाचें । श्रीराम त्यास अनुकूलचि होति साचे ॥२०॥
आहे कराल कलिकाल निधी अघाचा । हो ज्ञान योग जप धर्म करील कैंचा ! ॥
जाणोनि हें भरवसा न दुजा धरीती । ते मान या जगि खरे चतुरानमूर्ती ! ॥२१॥
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे कलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे
श्रीरामस्यात्रिसमागमो नाम द्वितीयस्तरङ्ग. ॥

## तरंग ३ रा

मुनिपदकमलातें वंदुनी नम्रशीर्षी । सुरनरमुनि याचा नाथ चाले वनासी ॥
रघुवर पुढतीं हो बंधु मागूनि चाले । मुनिवरसम वेषें ते अती शोभलेले ॥१॥
विल्सत उभयांच्या मध्यि सीता वधूटी । जणु विल्सत माया ब्रह्म जीवात होती॥
अवघड वनिं वाटा घाट शैलीं नद्या त्या । उमगुनि जणु नाथा त्याप्रती मार्ग दात्या
रघुवर वनिं जाई यापरी जेथ जेथ । गगनिं घन करीती सावली तेथ तेथ ॥
पथिं असुर तयांतें भेटला तैं विराध । प्रभु वधित तयात, येत जो तो अशुद्ध॥३॥
त्वरित रुचिररूपा पावुनी तो विराध । प्रभु मग निजधामीं पाठवी त्या अबाध ॥
मग मुनि शरभंगा भेटती रामराय । तुमग अनुज सीता संगतीं ज्यास हेय ॥४॥

रामचंद्रमुखपंकजाप्रति । नेत्रभृंग मुनिचे विलोकती ॥
आदरें करिति सौख्यपान ते । धन्य धन्य शरभंग सन्मतें ॥५॥

वद मुनि " रघूत्तमा ! परिस गा ! दयाळा ! खरें ।
विराजसि विभो ! उमारमणमानसीं हंस रे ! ॥
विरंचिसदनास मी रिघत तों भलें येकिलें ।
वनात तुम्हि येतसां, बघिन आधुनीं पाउलें ! ॥६॥

म्हणोनि दिन रात मी वधितसें कधीं ये क्षण ।
अतीव अजि हर्षलों मिळुनि आपुलें दर्शन ! ॥
प्रभो ! परम हीन मी सकल साधनीं हा असें ।
सुदीन समजूनिही मज कृपा करीतां असे ॥७॥
न हें करितसां प्रभो ! बघुनि काहिं माझेमधें ।
स्वरीति तुम्हि राखिली जनमनोहरा ! सन्निधे ! ॥
कृपा करुनि राघवा ! तंवर येथ थांबा जरा ।
तनु त्यजुनि मी तुम्हांमधिं मिळेन जों ईश्वरा ! " ॥८॥

तो योग यज्ञ जप सत्तप सद्व्रतादि । अर्पी प्रभूसि शुभभक्तिवरासि साधी ॥
मोठी चिता करि, बसे शरभंग तींत । सोडोनि संग हृदिंचे मुनि शुद्धचित्त ॥९॥
"नीलांबुदच्छवि विभो! रघुवर्यनाथा । सीतेसमेत अनुजासह विश्वकान्ता ! ॥
माझ्या हृदीं सगुणरूप तुम्ही रहावें । घ्यावें निरंतर असें वरदान देवें!"॥१०॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे कलिकलुषविध्वंसने अरण्यकांडे शरभङ्ग-वैकुण्ठवर्णनं नाम तृतीयस्तरङ्गः ॥

## तरंग ४ था

यार्थोनि हें करित दग्ध निजा तनूसी । योगाग्निनें मुनिहि हो हरिलोकवासी ॥
रामस्वरूपिं मुनि हो नच लीन तो कीं । तें द्वैतभक्तिवर मागत विष्णुलोकीं ॥१॥
पाहोनि तद्गति अशी,सगळ्या मुनींना । झाला प्रहर्ष हृदयीं मज वर्ण्य हो ना ॥
उद्गारती स्तुतिवचें मुनि हृष्ट भावें । "श्रीराम भक्तकरुणाकर कीर्ति पावे!" ॥
जाती पुढें रघुवरादि वनीं समस्त । त्यांचेसवें मुनिसमूहहि सर्व जात ॥
मार्गात त्यांस दिसतां बहु अस्थिराशि । 'कोठून हा?' पुसत राम दयाब्धि त्यांसी ॥
तें सांगती मुनि "कसें पुसतां जि!नाथा!। सर्वां हृदीं वसतसां, सकलां पहातां ॥
मक्षीयलें मुनिगणांप्रति राक्षसांनीं!"। एकोनि रामनयनांमधिं येइ पाणी ॥४॥
उभारुनी बाहुसि, रामराय । तेव्हां प्रतिज्ञा करि जी न वांय ॥
'करीन मी राक्षसहीन भूमी । मक्तांसि निर्विघ्न करीतसें मी' ॥५॥

॥ इति श्रीरामचरित० सकलकलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे रामस्य निशिचर-विनाशाय प्रतिज्ञाकरणं नाम चतुर्थस्तरङ्गः ॥

ज्या सेविती सुर अजादिक भक्तिभावें । ज्या वांदितो स्मररिपूहि निजस्वभावें॥
ज्ञानस्वरूप विभु तो सकलाघनाशी । त्या श्रीपतीसि नमि मी रघुनंदनासी ॥११॥
जो सौख्यराशि जगिं सद्गति सज्जनांचा । जो शक्तियुत निजानुजयुक्त साचा
जो वानिला स्तविं सुरेन्द्रकनिष्ठबंधु । तो वंदितों निजजनाप्रति सौख्यसिंधु ॥
जे मत्सरा त्यजुनि, येति तुझ्या पदाब्जीं।त्यांना नसे पतन घोर भवाब्धिमाजीं
ना ते वितर्कलहरींमधि मग्न होती । एकान्त सेवुनि तुला भजती समाधि १३
भक्ती करीति तव इंद्रियनिग्रहानें । घेती तुझी सुगति साधुनि भक्त तेणें ॥
देवा ! तुला नमितसें प्रभुला निरीहा।एकाद्भुता विभुवरा ! अविकार्य तू हा
हे भक्तिवल्लभ ! कुयोगिजना दुरापा । हे भक्तकामतरुरूप समा ! अपापा !॥
हे विश्वसद्गुरुवरा ! अचला तुरीया।हे शाश्वता ! प्रभुवरा ! नित वंदनीया!१५
हे विश्वसुंदर नृपा ! तुज मी नमीत । हे जानकीरमण ! मी चरणाब्जभक्त ॥
होई प्रसन्न; मन हो तव भक्तिमग्न । भक्ता तुझ्या मिळतसे तव लाभ पूर्ण १६
जे स्तोत्रि सस्तुति तुझी करितील ऐसी । वाढेल मानसिं तयां तव भक्तिराशी
लाभेल त्यांप्रति तुझें पद सौख्यसार । आनंदधाम तव भक्त तुझी अपार"१७
प्रार्थोनि यापरि मुनी नमि त्यासि शीर्षी । जोडोनि पाणियुग मागत हें तयासी
"देवा ! सदैव मम या मतिनें भजावें । त्वत्पादपंकजयुगलाप्रति भक्तिभावें"१८
॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे
अत्रिकृतश्रीरामस्तववर्णन नाम प्रथमस्तरङ्गः ॥

## तरंग २ रा

तदा सीता प्रेमे नमुनि अनसूयेसि चरणीं ।
कितीदा ती भेटे तिजसि अनघा सादर मनीं ॥
हृदीं अत्यानंदें मढनि अनसूया तिजसि दे ।
शुभाशीर्वादातें निज निकटही बैसवि मुदें ॥ १ ॥
ऋषिजाया अनसूया लेववि सीतेसि वस्त्रभूषण जें ॥
तें दिव्य अमल नूतन सतत शोभायमान तिजसि सजे ॥ २ ॥
सरस मृदुवचें ती प्रेमला आर्यपत्नी । सहज कथि सतीचा धर्मही तत्त्ववाणी॥
"हितकर जरि आईबाप बंधू जगांत । परिमितचि तयांचें दान न ठीकि होत

अमित वितरि भर्ता मात्र नारीसि सीते। ।अधम समज नारी जी न सेवी पती
समज मनिं कसोटी आपदा हीच चारां।धृतिगुणिं निजधर्मी स्त्रीस तैसीच मित्रा
जी वृद्ध, रोगि, धनहीन जडा सुदीना। कोपिष्ट अंध बधिरा पतिला पुसेना।
त्यातें करीत अपमानचि मात्र ऐसी। नारी लभे यमपुरीमधिं दुःखराशि ॥५॥
हो धर्म एक जगतीं व्रत नेम एक। कीं देहवाङ्मनिं भजे पतिलागिं नीक ॥
वेदीं पुराणिं सुजनीं कथिल्यात चार। नारी पतिव्रतपरा कथिते प्रकार ॥६॥
जी श्रेष्ठ, मध्यम, मुनीच कनिष्ठरीति। ती वर्णित्यें जनकजे! धरिं तूं स्वचित्तीं॥
जे ऐकतील वच हें, तरतील तेही। संसार हा जलधि, त्यांसि न कष्ट कांहीं॥७॥
ती जाण उत्तम अशी, जिस ना मनांत। स्वप्नींहि अन्य पुरुषस्मृति लेश होत॥
ती मध्यमा समज जी नर अन्य मानी।भ्राता, पिता, सुत अशा उचिताभिधानीं
जी धर्म बुद्धि कुलनीतिविचारिं राही। ती हो निकृष्ट गणिली श्रुतिमाजिं, पाहीं
जी भीतिनें अवसराविण राहि तैसी। सीते! गणीं अधम यास्तरि तूं तियेसी ॥९॥
जी भर्तृवंचक रमे परक्या नराशीं। ती रौरवीं नरकिं कल्प पडे न कैसी? ॥
जी कोटिजन्मशत दुःखचि भोगण्यास! सेवी क्षणैक सुख ती किति मूढ खास! १०
पतिव्रता स्त्री सहजीं निवेविते। सत्यें सुशीलें गति उत्तमाचि ते ॥
जी वंचिते आत्मपतीस वर्तनें। वैधव्य ती यौवन अन्य जन्मिं ने!॥ ११
अपावनी स्त्री गमतें स्वभावतः। घे सद्गतीतें जर ती पतिव्रता ॥
गाती तिचें सयश चारिही श्रुति! प्रिया म्हणोनी तुलसी हरिप्रति ॥१२
सीते! तुझें स्मरुनि नामचि अन्यनारी। धन्या पतिव्रत करीति सुखप्रकारीं ॥
प्राणांहुनी प्रिय तुला मनिं होय राम। हे मी वदें भवि हितास्तव नीतिधर्म"॥१३॥
ऐकोनि हर्षलि मनीं अति जानकी तें। ती आदरें नमित तत्पदपंकजातें॥
बोले रघूत्तम ऋषीसि कृपानिधान। "आदेश द्या जि! दुजिया वनिं मी रिघेन॥
होवो कृपा मजवरी तुमची सदैव। स्नेहें अखंड मम मानुनि दास्यभाव" ॥
ती धर्मधीर विभुची परिसोनि वाणी। ज्ञानी मुनी वदत सादर या वचांनीं
"ज्याची कृपा विधि-हरी सनकादिकांना। इच्छा गमे सकलही परमार्थपूर्णा ॥
तो राम तूं जगिं अकाम समस्तसेवी। दीनीं कृपाळु मृदुवाग् वदसी न केवीं? ॥
आली मला चतुरता प्रभुची कळेन। वंदीन मी तुजसि, सोडुनि देव आन ॥
ज्याच्या समान न दुजा, कुठनी विशेषें॥ त्याचें कसें नच असेल सुशील ऐसें!?

तरंग ५ वा

सर्वांचिया आश्रमिं राम जाई । भेटे मुनींना बहु सौख्यदायी ॥
अगस्तिचा शिष्य सुतीक्ष्णनामा । स्वदेहवाक्चित्तिं सुभक्त रामा ॥१॥
विश्वास त्याचा प्रभु रामिं एकीं । कळे तया जैं प्रभुवर्य ये कीं ॥
मनोरथा कैक करीत चित्तीं । सोत्कण्ठ तो धावत हर्षमूर्ति ॥ २ ॥

"दैवा ! मला वधिल कीं प्रभु दीनबन्धु ?। दावो दया मज शठा करुणैकसिंधु ॥
मानोनि दास मजला बघतील नाथ ?। ते भेटतील मज कीं अनुजासमेत ? ॥३॥
विश्वास ना मम हृदीं दृढ एवढाही - न ज्ञानभक्ति, विरतीहि नसेचि काहीं ॥
सत्संग योग जपयागहि म्या न केले । न प्रेमही प्रभुपदाबुजिं चारु ठेले ॥४॥
बाणा असे दृढ दयानिधिचा असा कीं । जो हो अनन्य मनिं,तो रुचतो अनेकीं ॥
होतील आज मम लोचन हे कृतार्थ । पाहोनि राममुखपंकज सौख्य मूर्त !"॥५॥
तो प्रेमनिर्भरिं निमग्न सुतीक्ष्ण ठेला । ज्ञानी मुनी,स्थिति न ती वदवे कुणाला ॥
तो या दिशीं,मग तया दिशिं गौरि ! जाय । त्यालागिं भान नुरलें पथ कोण काय ? ॥
केव्हा फिरे परत तो प्रभुभक्तिमग्न । सानन्द नाचत कदा गुण आळवून ॥
ती गाढ भक्ति मुनिच्या प्रकटे हृदन्तीं । श्रीराम पाहि तरुआडुनि कौतुकें ती ॥
प्रीती बघूनि मुनिमानसिंची नितान्त । आविर्भवे हृदयिं जो भवभी हरीत ॥
बैसे जणों अचल तो मुनि तैं पथींच । रोमांचुनी फणसशी तनु होइ साच ! ॥
तेव्हा तयानिकट ये प्रभु रामराय । त्याची दशा बघुनि राघव तुष्ट होय ॥
श्रीराम जागवु बघे बहु त्या मुनीतें । तो ध्यानसौख्यिं रत, जागति घे न चित्तें ॥
तो भूपरूप दुरवी रघुराय त्याचें । ठवी हृदीं निजचतुर्भुज रूप साचें ॥
तैं तो मुनी उठत आकुल होत कैसा ?। कीं तो फणीश मणिहीन सुदीन जैसा !
पाही समोर घननीळ रघूत्तमासी । सीतासमेत, अनुजासह सौख्यराशि ॥
काष्ठापरी पडुनि तच्चरणासि लागे । भाग्यें अतुल्य मुनि रामरतान्तरंगें ॥११॥
तेव्हा महाभुज रघूत्तम त्या स्वभक्ता । घेई हृदीं उठवुनी अतितुष्टचेता ॥
शोभे मुनीश मिळतां करुणाकरासी । कीं तो तमालतरु कांचनवृक्षपाशीं ! ॥१२॥
राहे मुनी बघत राममुखाबुजाला । भासे जणों अचल चित्रिंच काढियेला ।
[त्याची स्थिती कवण वर्णु शकेल शब्दीं । तो भक्तचातक मिळे प्रभुपयदाब्दीं ॥]

तेव्हां धरूनि हृदिं धीर, पुनः पुन्हांही। तो राघवांघ्रि धरि लावुनि त्यासि डोई!॥
तो आश्रमीं अपुल्यिा अति भक्तिपूरें। रामासि नेउनि समर्चि बहुप्रकारें ॥१४॥
बोले मुनी " विनवितों प्रभुजी! तुम्हां हें। कोण्यापरी स्तवन हो मज शक्य आहे?
आहे अगाध महिमा, मति अल्प माझी। खद्योत केविं रविच्या पुढतीं असे जी!
इंदीवरांचितमनोहरदामकाय। माथां जटामुकुट, वल्कलशोभनीय ॥
हातांत चापशर, होत कटीस भाते। मी हा निरंतर नमीं रघुवीर चित्तें ॥१६॥
जो मोहघोरविपिना दववह्नि साजे। जो सूर्य सज्जनसरोरुह पोषि तेजें ॥
जो राक्षसाख्य गजसंघि हरीच भासे। जो श्येन संसृतिखगा, मज रक्षि हर्षे ॥१७॥
रक्तोत्पलोपमविलोचन चारुवेष। सीताविलोचनचकोरशशी विशेष ॥
जो शंभुचित्तमयमानसराजहंस। तो राम मी नमि विशालभुजाढ्यवक्ष ॥१८॥
जो सशयोरगखगेश्वर शोभणारा। जो तर्ककर्कश विषाद विनाशणारा ॥
संसारभंजक सुराप्रति रंजवीता। रक्षो अम्हां सतत तो करुणार्द्रचेता ॥ १९ ॥
जो निर्गुणी, सगुणही सम वा तसा न। ज्ञानेंद्रियासि वचनासि अतीत पूर्ण॥
निर्दोष निर्मल अपार असा अरूप। भूभारहारिरघुनाथ नमीं अमूप॥ २० ॥
आराम कल्पतरुपूर्ण असा स्वभक्ता। जो क्रोधलोभमदकाम अशासि हन्ता ॥
जो सेतु होय भवसागरिं जो कुशाग्र। तो केतु सूर्यकुळिंचा मज रक्षणार ॥२१॥
ज्याचें अतुल्य बलतेज, भुजप्रताप। यन्नाम नाशि कलिकल्मषही अपाप ॥
ज्याचा गुणौघ सुख दे जगिं धर्मवर्म। रक्षो अम्हास जगिं संतत तोच राम॥
नोहे जरी रज तुझ्यांत, अनन्त होसी। व्यापूनि सर्व सकलांहृदिं तूं निवासी॥
राहो तरी मम मनीं विपिनाधिचारी। सीतेसमेत अनुजासह हा खरारि ॥२३॥
जाणोत ते तुजसि जाणति जे अनन्ता! कीं होसि तूं सगुणनिर्गुण चित्तनाथा!॥
तूं कोशलेश, कमलाक्ष, हृदीं सदैव। माझ्या निवास कर राघव देवदेव!॥२४॥
मी दास तूं रघुपती मम नाथ ऐसा। लोपो न हा मदभिमान कदापि ईशा!"॥
ऐकोनिया मुनिवरोक्तिस राम तोषे। त्यातें पुन्हा कवळि तो उरिं राम हर्षे॥
सांगे तया प्रभु " अतीव सुतुष्ट मी हा। तूं माग रे! वर मला, पुरवीन ईहा"॥
बोले मुनी " वर न मी कुठलाहि याचीं। खोटा खरा मजसि हेंहि न हो कळचि!
जो आपणास दिसतो मज योग्य तोच। दे भक्तसौख्यद विभो! मज देइं साच!"॥
'विज्ञान, भक्ति अति, तेविं भली विरक्ति। ज्ञाना गुणांसि निधि होशिल सव रीतीं'

"मातें दिल्यात वर जो मज पावला तो । मी मागतों वर मला अति इष्ट होतो"
ऐसें म्हणोनि अति भक्तिभरें मुनीश । बोले प्रसन्न करुणाकर राघवास ॥२८॥
" हे चापबाणधर ! लक्ष्मण आणि सीता । याचे समेत मम चित्तिं वसावि ! नाथा !
हें व्योमसें हृदय जें मम, त्यात इंदू । निष्काम सतत वसा तुम्हि सौख्यसिंधु"२९
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे
सुतीक्ष्णप्रेमस्तुतिवर्णनं नाम पंचमस्तरङ्गः ॥

## तरंग ६ वा

तेव्हां 'तथाऽस्तु ।' म्हणुनि प्रभुवर्य राम । चाले अगस्तिमुनिसंनिध पूर्णकाम ॥
"झाले कितीक दिन मी गुरुला न्यहोनी । या आश्रमीं निवसण्या जव य तिथूनी ॥
येईन मी प्रभुसवें गुरुदर्शनार्थ । हो मार्गदर्शिहि हवाच तुम्हास नाथ ।" ॥
हासे प्रभू कुशलता मुनिची बघूनी । जाती तयासह शुचिस्मित बंधु दोनी ॥२॥
गेला सुतीक्ष्ण, मुनिच्या झणिं संनिधानीं । घालोनि दंडवत सांगत गोड वाणीं ॥
" हे कोसलेश्वरकुमार तुम्हास यती । भेटावयास जगदीश्वर रम्यमूर्ति ॥३॥
ज्यातें अहर्निश तुम्ही जपता हृदन्तीं । तो जानकीसह सलक्ष्मण राम य जी!"॥
जाती अगस्ति मुनि धावत तें उठोनी । पाहोनिया हरिसि लोचनिं वाहि पाणी ॥
हे दोनि बंधु धरती मुनिपादपद्म । तो प्रीतिनें कवळि त्या मुनि भक्तिधाम ॥
ज्ञानी मुनी कुशल त्या पुसि भक्तिपूर्ण । तो आसनीं बसवि त्याप्रति आणवून ॥
पूजी अनेक परिनीं प्रभुसी विनीत । प्रार्थी "नसेचि कुणि मत्सम भाग्यवत"॥
अन्य तथ मुनिवृंद समस्त होते । ते पाहती सुखनिधि प्रभु हृष्टचित्तें ॥६॥
सर्वांचि समुख बस मुनिवृंदि राम । वाटे अवर्ण्य सुषमा नयनाभिराम ॥
कीं शारदेन्दु अतिसुंदर रामराय । त्यातें चकोरगण ते बघतात काय ! ॥७॥
तेव्हां वदे मुनिवराप्रति रामचंद्र । "नोहेचि ना विदित काहि तुम्हा मुनीन्द्र !॥
आलों कथास्तव जरी तुम्हि जाणता कीं । सांगू कथास किती वचनीं अनेकीं ॥
द्यावा मला आज तुम्ही उपदेश साचा । हो नाश जेविं मुनिभंजक राक्षसाचा" ॥
रामोक्ति ऐकुनि वदे मुनि हांसुनीयां । 'जाणोनि कोण पुसतां मज गोष्टि हो या ! ॥
मी जाणतों प्रभुजि ! भक्तिबळेंकरून । माहात्म्य ज तरिहि तें तुमचें अपूर्ण ! ॥
औदुंबराश्रम गुरू भवदीय माया । ब्रह्माण्डकोटि गमते फल त्यात ती या ॥१०॥

सारें चराचर असे तयिं जंतुसें तें । राहे फळीं परि न जाणतसे परातें ॥
ऐसा फलासि जरि मक्षक उग्र काल । त्यातेंहि भीति तुमची असते कराल ॥११॥
ते तुम्हि हे सकलदैवत देवदेव ! । हें प्राकृतापरि मला पुसतां सुभाव ॥
मी मागतों वर तुम्हांस कृपानिधान ! । श्रीलक्ष्मणांसह वसा मम चित्ति पूर्ण ॥
भक्ती दृढा, विरति, सज्जनसंगतीही । प्रीती अभंग तुमच्या चरणाब्जि राही ॥
हो ब्रह्म यद्यपि अखण्ड अनन्त ऐसें । संतांस ये अनुभवा भजनें विशेषें ॥१२॥
तें रूप निर्गुण जरी समजे मलाही । वाखाणितोंहि जरि मी नित त्या स्तवांहीं॥
माझें परी हृदय हें फिरुनी फिरूनी । श्रीं रमे सगुणि या सुखसन्निधानीं !
मोठेपणा वितरतां तुम्हि आत्मदासीं । मातें तुम्ही म्हणुनि हें पुसतां विशेषीं॥
आहे प्रभो ! परमसुंदर ठाव एक । त्या नाम पुण्यतम पंचवटी सुरेख १५
रामा ! पुनीत करणें तुम्हि दंडकांतें । कीं उग्रशापिं मुनिगौतमिं शापिलें तें ॥
तेथें निवास करणें तुम्हि आपला हो! । होवो मुनींसि करुणानिधिचा सुलाहो"
निघती, मुनिवर्याची आज्ञा त्यापरि रामुनी ॥
येती पंचवटीमध्यें रामचंद्रहि ते क्षणीं ॥ १७ ॥
भेटे जटायु खग त्या स्थलि गृध्रराय । स्नेहासि वृद्धि घडली उभयीं अमेय॥
गोदावरीनिकट बाधुनि पर्णशाला । श्रीरामचन्द्र निजवास करी तियेला ॥१८॥
— ॥ इति श्रीरामचरितमानसे सकलकलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे
अगस्त्यरामसमागमपंचवटीवर्णनं नाम षष्ठस्तरङ्गः ॥ —

## तरंग ७ वा

श्रीराम तेथ वसले, तिथुनी समस्त । झाले मुनी विगतभीति तया वनांत ॥
चारे गिरी वन तडाक नद्या सुशोभा । रूपें दिनानुदिन निर्मिति नेत्रलोभा १
तेथें विहंगमृगवृंद अतीव मोदें । संचारती, मधुप गुंजति मंजुनादें ॥
व्हावा अहीशहि कसा वन गावया तें । श्रीरामही सजत ज्यांत वसावयातें॥२
श्रीराम एक समयीं सुखि बैसलेले । त्यां लक्ष्मणें पुसियलें वच साधुशीलें ॥
" स्वामी सुरा, मुनिनरां सचराचरांला । साक्षात्प्रभू मम, तुम्हां पुसतों जि ! बोला
सांगा मला समजवूनि जयें सदा मी । टाकूनि सर्व, रत हों प्रभुपादपद्मीं ॥
हो ज्ञान तेंवि विवरा जि ! विरक्तिमाया। तैसें दया करुनि भक्ति निवेदणें या

सांगा मला ईश्वरजीवभेद । जेणें मला सर्व कळेल शुद्ध ॥
नाशोनि मोहभ्रम अंतरींचे । भवत्पदीं चित्त जडेल साचें ! ” ॥५॥

बोले रघूत्तम “ कथू समजेल ऐसें । एकाग्रधीमतिमनें परिसें विशेषें ॥
मी तू, तुझें मम अशी गण सर्व माया । जीवास अंकित करी सकलांवही या ॥
जें होय गोचर मनाप्रति इंद्रियांसी । मायाच ती सकल तू समजोनि तैसी ॥
बंधो ! तिचे उभय भेदहि जाण बुद्ध्या । विद्या तशी अपर ती समजें अविद्या ॥

अविद्या असे सर्वही दुःखरूपा । जियें पाडिला जीव संसारकूपा ॥
प्रभुप्रेरिता जाण विद्या करीत । गुणें सृष्टि ही, सार हें जाण तात ! ॥८॥
नसे ज्ञान वा मान ज्यातें जराही । बघे ब्रह्म सर्वत्र जो पूर्णवाही ॥
म्हणावें विरागी तयालागिं ताता ! । गुणातीत, सिद्धी तृणें लाखि चित्ता ॥

मायेश आपण असूनहि ज्या कळे ना या लक्ष्मणा ! ह्रदयिं त्याप्रति 'जीव' जाण ॥
जो बंधमोक्ष वितरी, सकला अतीत । मायाधिचालक तया 'शिव' नाम होत ॥

• ॥ इति श्रीराम०अरण्यकाण्डे ईश्वरजीवभेदवर्णन नाम सप्तमस्तरङ्गः ॥ •

## तरंग ८ वा

धर्मे विरक्ति लाभे, योगाचरोनि लाभतें ज्ञान
ज्ञान असे मोक्षप्रद शास्त्रांमिंहि वेद तत्त्व हें जाण ॥ १ ॥

जेणें द्रवे त्वरित मन्मन, ती मदीय । तू जाण भक्तिच सखेश्वर एक होय !
आहे स्वतंत्र तिज आश्रय नान्य लागे। हो ज्ञान तेंवि विरती तिच्चियाच संगें
भक्ती सरी अनुपमा सुखमूल सांगीं । सत्संगतीस्तवचि लाभत भक्तभागी ॥
प्राप्यास भक्ति मिळण्या सदुपाय होती । ती साधनें सुगम पंथ वदेन उक्ती ॥३॥
सुप्रीति विप्रचरणीं पहिली असावी । स्वस्तुतिनीति निजकर्मरतीहि व्हावी ॥
लाभे विरक्तिफल या श्रुतिनिष्ठतेंना । मद्भक्तिधर्मि उपजे रति येरवीं ना ! ॥४॥
तैं आवडे नवविध श्रवणादि भक्ति । लीला मदीय अति आवडतीहि चित्तीं ॥
सन्तांचिया पदसरोरुहिं भक्ति गाढ । देहें वचें मनि निरंतर हो अपाड ॥५॥
मातेंच बंधु गुरु आइ वडील देव । स्वामीहि मानुनि मला भजणें सदैव ॥
गातां गुणां मम भरे तनु रोमहर्षे । येई गळा भरुनि, लोचनि अश्रु वर्षे ॥६॥

कामादि दंभ मद होति विकार ज्या ना। त्यांनाच मी वश असें प्रिय रे! सुजाण!
जे देहवाङ्मनिं मला भजती अकाम। त्यांच्या हृदीं वसत मी नित सौख्यधाम" ॥
—॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे 'सुश्लोकमानसे' कलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे भक्तियोगवर्णनं नामाष्टमस्तरङ्गः ॥—

## तरंग ९ वा

हा भक्तियोग परिसोनि अती सुखावे। सौमित्रि रामचरणां नमि भक्तिभावें ॥
ज्ञाना, गुणा, विरति-नीतिस वानिताना। त्यांचि निरूपणिं असे दिन जाति नाना

भगिनी रावणाची जी नाम शूर्पणखा तिचें ॥
दारुणा दुष्टहृदया उपमा नागिणी सुचे ! ॥२॥
ती ये पंचवटीमध्यें एकदा घोर राक्षसी ॥
कामार्त होय पडता रामलक्ष्मण दृष्टिसी ॥३॥

भ्राता, पिता, पुत्र असा सुरूपा। बघोनि नारी पुरुषा अमूपा ॥
येथूं शके चित्त न ती स्मरार्ते। सूर्यां द्रवे पाहुनि सूर्यकान्त ॥४॥

धरुनि रुचिर रूपा जाय ती राघवासी। वचन वदत त्यातें लोलनेत्री मुखासीं ॥
"पुरुष न तुजऐसा, मत्समा नाहिं नारी। विधिच जणु विचारी साधि ही गोष्ट सारी।
जगतिं न नर माझ्या योग्यतेचा दिसे कीं। निवडुनिहि पहावी त्वां समग्रा त्रिलोकी
म्हणुनि अजिवरी मी राहिलेसें कुमारी। भुलत अजिच काहीं मी तुला पाहणारी"
रघुपतिहि, बघोनी जानकीलागिं, बोले। "मम अनुज असे हा लग्न ज्याचें न झालें!
त्वरित मग तयातें जाय ती, तोहि जाणे। निजरिपुभगिनी हें, बोलला याप्रमाणें
प्रभुसि बघत बोले तीस वाक्यें मृदूशीं। "परिस! रघुवरा मी दास हों, रूपराशि!
परवश पति तूतें योग्य गे! केविं व्हाया?। प्रभुवरचि अयोध्यानाथ तूं हा वरावा!
प्रभु करिल तसें त्या सर्वही साजणारें। सुख मिळत न दासा, मान भिक्षाप्रकारें॥
व्यसनि धनि न राहे, ना यशें लोभियाला। सुगति न शिनळाला, हाच निष्कर्ष झाला
होऊनि सेवक सुखाप्रति लुब्ध झाला। गर्वान्वितासि कधि साधुपणा मिळाला ?॥
जो स्वास्थ्य इच्छि असुनी परदास्यपाशीं। तो काधि दुग्ध जन दोहुनियां नभासी"
आली पुन्हां फिरुनि ती प्रभुरामपाया। सौमित्रितें तिज पुन्हां प्रभु लावि जाया ॥
"ती तूजला वरिल" लक्ष्मण तीज सांगे। "लज्जेंवि तोडि तृण जो निज सर्व अंगें।"

ती खट्टु हेउनि पुन्हा क्षणिं जाय रामा । रूपा भयंकर अशा प्रकटी निकामा ॥
सीतेसि पाहुनि भयाकुल, तें खुणावी । श्रीरामराय अनुजा कृति काय व्हावी ॥
तैं नाक कान अति लाघविं लक्ष्मणानें । कापीयलें क्षणिं तिचे कुपिताप्रमाणें ॥
तेणें जणों वितरिलेंचि दशाननाला । आह्वान त्या उघड मार्गि, रुदावयाला ॥
ती नाककानविण दारुणरूप दुष्ट । रक्त स्रवे गिरिहुनी जणु गेरुलोट ॥
गेली निनादत क्षणीं खरदूषणातें,"धिग् धिग्" वदे "बल, भवत्पुरुषत्वही तें ॥
बंधो ! तुम्हा बघवते मम की दशा ही ?" ते तैं तिला पुसति कारण काय होई!
येताचि त्या कळुनि कारण सर्व शोका । सेना सुसिद्ध करिती लढण्या अनेका
तेव्हा निशाचर अपार क्षणीं निघाले । कीं घोर कज्जलगिरीच रुपक्ष झाले ॥
ज्या वाहनें विविध आयुधराशि नाना । आकार रूपहि अनेकपरीं तयाना ॥
केलें पुढें प्रथम शूर्पणखेस त्याहीं । जी नासिकाश्रुतिविहीन अशोभना ही ! ॥
झाले तदा शकुन दुष्ट अनेक त्यातें । ना लक्ष देति, मरणा वश जाहले ते ।
ते गर्जती सकल तर्जुनि एकमेकीं । उड्डाणही नभिं करीति तयावरी कीं ॥
झुंझार त्यात म्हणती अति हपुनीया । "बांधून आणु उभया क्षणिं बधुना या
मारूनि त्या घरु ग्रळें लल्नेसि आम्ही"।या गर्जितीं नभ भरे धुळि आणि धूमीं
श्रीराम तें निरखुनी अनुजास सांगे । " जा जानकीस गिरिकंदरिं नेइ वेगें।
हें देख भीषण निशाचरसैन्य आलें । तू राहिं सावध !" असेंरघुराय बोले ॥
सीतेसमेत मग लक्ष्मण चापबाण । घेऊन जाय, कळता प्रभुहेतु तूर्ण ॥२०॥
श्रीरामचंद्र अरिसैन्य बघुनि येत । हातोनि सज्ज करि कार्मुक शीघ्रहस्त ॥
तैं शोभले सहजसुंदर नीलराम ।। । युग्मभाधर मनोज्ञ घनाभिराम ॥ २१ ॥

कठिन शरासन चढवुनि वाधित शि ीं जयाचा जू सजे ।
मरकतशैलीं कोटिदामिनी चमकति, मु ग्द्व वरि ज ॥
कटिसि टाकले निषंग भुजवरिं चापशरास । सज्ज असे ।
वाटे निरखी मृगपति तो प्रभु गजराजघटा आवेश । ॥ २२ ॥

" धरा धरा ! " क्रोधात वीरराक्षस । आले तयाचे वरि शीघ्रहस्त ॥
एकाकिशा पाहुनि बालभास्करा । घेरू जसे पाहति दैत्य सत्वरां !

हो सव सैन्य हृदिं धकवि राक्षसांचें । पाहोनि तें प्रभुखि याण न सोडि साचें
तों चेतवोनि सचिवा खरदूषणांनी । सांगीतलें निजमनोगत हें स्ववाणी २४

" हे राजपुत्र नरभूषण होति खास ! । आम्ही सुरासुरनरां मुनिनाश यांस-॥
जिंकीयेलें, वधितलें, वधिलें अनन्तां । सौंदर्य यांसम कधींच न मोहि चित्ता ॥
यान्याहि जन्मि असलें अतिरम्यरूर । ना देखिलें अजिवरीं कधिंही अमूप ॥
केली इंहीं जरि कुरूप मम स्वसा ती । ना ह्या वधाहं गमती मनिं चारुमूर्ति ॥
देवोत सोडुनि अम्हांकारिं आत्मनारी । यांनीं तिला लपविलें इतुक्यात दूरीं
जावोत हे उभयबंधुहि आत्मगेहा । त्यांतें त्वरेंचि कळवूनि निरोप या हा."
रामासि सर्व ह्मणि ते कळवीति दूत । ऐकोनि राम वदले हंसुनी सुयुक्त ॥
" हो क्षात्रनीति अमुची मृगया वनींची । दुष्टां तुम्हां मृगगणां वधुं शोधुनीचि ॥
शत्रू बलाढ्य म्हणुनीहि न भीति आम्हां । काळासवेंहि लढुं येळि वलें असीमा ॥
आहों मनुष्य तरि दैत्यकुलांसि नाशूं । रक्षूं मुनींसि, सगळे खळ आम्हि शासूं ॥
तुम्हां नसेल बल तों, परता रहातें । होती रणा विमुख, संहरुं आम्हि ना तें ॥
युद्धामधें कपट ही तुमची भलाई । शत्रूवरी सदयता नच शौर्य होई "॥२०॥

सांगती जाउनी तेव्हां सारें ते खरदूषणां ।
ऐकतांक्षणिं तें, झाला कोधानें  ाप तन्मना ॥ २१ ॥

क्रुद्ध होउनी म्हणति " धीर घ्या राक्षसभट हो ! निजहृदयीं " ।
घेति चापशर तोमरशक्ती परिघ परशु असि शूल तयीं ॥
रामें निजधनु टणत्कारिलें आधिं भयंकर कटु निनदें ।
झाले राक्षस बधिर व्याकुल भान लव न तो ध्वनि उरुं दे ! ॥ २२ ॥
होती पुन्हां सावध ते निशाचर । चलित्र शत्रू समजे तदंतर ॥
शस्त्रास्त्र ते त्यावरि सर्व वर्षती । नानाप्रकारीं निज आयुधांप्रति ॥२३॥
शस्त्रें परी खंडिलि सर्व राघवें । तिळांपरी खंड करूनियां जवें ॥
आकर्ण ओढूनि शरासनाप्रति । त्याचेवरी सोडित बाणसंहति ॥२४॥
फुंकारत सर्पेंसे चालले बाण ते । तीक्ष्ण अग्रें जयां राम हो हाणिते ॥
युद्धि कोपे बहू रामराय स्वतां । राक्षसाचे गणीं भीतितें निर्मिता ॥२५॥
पाहुनी बाण ते राघवाचे खर । टाकिलें भीतिनें राक्षसीं संगर ॥
तेधवां क्रुद्ध ते भाउ तीनी तयां । बोलती "जो रणा टाकुनी जाइ या ॥२६॥
त्यास आम्ही वधू, दाखवूं ना दया!" सर्व ते वाहती मृत्युच्या निश्चया ॥
आयुधें घेउनी तें अनेकें करीं । हाणुं पाहाति ते राघवाचें वरी ॥२७॥
कोपल्या शत्रुला त्यापरी पाहुनी । चापि जोडी शरां राम वीराग्रणि ॥
बाणवृष्टि प्रभू तें करी त्यावरी । कापिले, खंडिले शस्त्र ते संगरीं॥२८॥

वधि शीर्षी तसें पादकरबाहुंनीं । पूर्ण झाली तिथें संगरीं मेदिनी ॥
लागती बाण जें विव्हळत त्या क्षतें । पडत भूमीतलीं शैल्सें रक्ष तें॥३९॥
वीर ते खंडिले जरिहि शस्त्रें किती । उठुनि भूतें परी त्यांतुनी नाचती ॥
व्योमिंही उडति किति दंड, मुंडें तदा । मौलिविण धावती तें धडें धडधडा ! ॥
ओरडत धांवती काक गृध्रादि ते । कर्णकटुभीषणें तीं शृगालीं रुतें ॥
वर्णणें केविं तें दृश्य जें भीषण । राघवें मारिला सन्खर जैं दूषण! ॥४१॥

क्रदति जंबुक भूतप्रेतें तेविं पिशाचे रक्त पिती ।
वेतालहि ते वीर कपालीं तालीं जोगिणि नृत्यमती ॥
रघुवीराच्या चंडशरानीं खंडित अवयव वीरांचे ।
पडति चहुंकडे तरिहि लढति किति 'धर ! धर !' भयकर रव वाचें ! ॥

धरुनि आंतडीं गृध्र उडति तैं भुजा घेउनी भूतगण ।
रण-पुरवासी जणों बालकें खेळति झेंडे उभवून ! ॥
मेले, पडले, विदीर्ण झाले वीर व्याकुल रणिं कण्हती ।
बघुनि अशा त्या, त्रिशिरा दूषण खर हे 'आपण लढुं' म्हणती ॥४३॥
शक्ति-तोमर, परशु शूल, खड्गशरांहीं एकवटीं ।
श्रीरघुवीरीं अगणित राक्षस हाणिति चेतुनि कोपमटीं ॥
प्रभु क्षणांतचि वारुनि-शस्त्रां गर्जुनि सोडी लाखवरीं ।
राक्षसनायकिं दश दश सकलीं बाण चंडकृति घोर उरीं ! ॥४४॥
पडति महीवरि उठति पुन्हां परि लढति झटुनि अति मायावी ।
सहस्र चौदा ते, प्रभु एक, प्रेमें अमरां हें भिववी ॥
सुरमुनि-भीती मायानाथ प्रभु तें घालवि कुतुककृती ।
परस्परातें राम गणुनियां राक्षस हाणिति, मृत होती ! ॥४५॥

ते 'राम राम !' म्हणतां त्यजिती तनूतें । निर्वाण घोर पदवी मिळवीति कीं ते ! ॥
युक्ती अशी करुनियां प्रभु तो दयार्द्र । मारीत राक्षस समग्रहि रामचंद्र ॥४६॥
व्हां प्रहर्षभरिं वर्षुनि पुष्पराशि । वाजेहि देव भरवी नभ वाद्यघोषीं ॥
रामस्तुती करुनि ते फिरुनी फिरुनी । जाती निघूनि सजुनी अपुल्या विमानीं ! ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे कलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे
श्रीरामखरदूषणयुद्धवर्णनं नाम नवमसर्गः ॥

## तरंग १० वा

जेव्हां रणीं रघुपती अरि सर्व जिंकी । झाले मुनी सुरनरादि अभीति ते कीं ॥
सौमित्रि येइ तंव घेउनि जानकीतें । वंदी प्रभूसि चरणांबुजि हृष्ट चित्तें ॥१॥
सीता पश्चात मृदुलांग सुनील मूर्ति । प्रेमें तिचे नयन पावति नैव तृप्ति ॥
श्रीराम होत मग पंचवटी-निवासी । देवां-मुनींसि अति तैं सुखराशि वर्षी ! ॥२॥
झाले चघून खरदूषण नष्ट साच । ये रावणानिकट शूर्पणखा क्षणींच ॥
क्रोधें तयास वदली वचनें कठोरें । "देशादि-कोष निज नाठवसी कसा रे ? ॥३॥
रात्रंदिनीं पिउनि मद्यचि घोरसोस । नाहींच शुद्धि तुज, शत्रु चढे शिरास ! ॥
ना राज्य नीतिविन, धर्मविना धनें न । ईशार्पणाविण नसे शुभकर्म जाण ! ॥
विद्या तरी कशि विवेकविना सजावी । लज्जा तरी श्रमचि ती म्हणुनी गणावी ॥
दुःसंगिं नासति यती, नृपती कुमंत्रें । गर्वे सुधी स्खलत लाजहि पानमात्रें ॥५॥
प्रीती विरे प्रणयहीन, गुणी मदानें । हे नीति ऐकिलि तुझ्या कधिं कां न कानें ॥
न व्याधि, शत्रु अघ अग्नि अही प्रभूही । मानोनि अल्प म्हणुनी अवमानिं पाहीं"
ऐसें परोपरिं वदून तया बयेनें । आरंभिलें रुदन फारचि रोषमानें ॥
आक्रंदुनी बहु असे, पडली सभेंत । अत्याकुला वदत होउनि आर्तचित्त ! ॥७॥
"तूं एवढा दशमुखा ! असतां जिवंत । व्हावी कशी करुण मत्स्थिति हे समस्त ?" ॥
तों त्या सभेतिल किती, क्षणि तैं उठूनी । तीतें धरोनि उठवीति भुलें करांनीं ॥
ते सांत्विती तिजसि, रावणही विचारी । "हे कान नाक तव जाय कशा प्रकारीं ?" ॥
सांगे तदा सदय शूर्पणखा तयातें । जें शल्यसेंच तिजला दुखवीत होतें-॥९॥
"दशरथनृपतीचे पुत्र साकेतवासी । नरहरि मृगयेतें पातले काननासी ॥
करणि सकळ त्याची आलि मातें कळून । करितिल धरणीच्या राक्षसां नाश पूर्ण ॥
हे रावणा ! विचरती मुनि काननांत । ज्यांच्या बळें करुनि निर्भय हृष्टचित्त ॥
ते बाळ हे दिसति काळसमान मूर्ति । अत्यंत शूरवर धीर धनुष्यकीर्ति ॥११॥
शक्तिप्रतापिं न तुला मुळिं बंधुयुग्मा । दुष्टां वधीति, सुख देति सुरां न सीमा ॥
विश्राम जो मुनिमनाप्रति रामराय । जो सुंदरीसह असे अतिरम्यकाय ॥१२॥
सौंदर्य कोटिरतिंहून तिचें अतीव । ओवाळिजेतिल तिच्यावरुनीच सर्व ! ॥
नाशारुती तदनुजें मम कापियेली । मी हो तुझी बहिण, वास्तव हास्यकेली ! ॥
सुद्धा तयास खरदूषण बोलवीती । सैन्यासमेत एकलां, क्षणि ते वधीती ! " ॥
मारीयले त्रिशिर ते खरदूषणादि । ऐकोनि रावण जळे हृदिं दग्धबुद्धि ॥१४॥

काढी तिची तें समजून रावण । बहुप्रकारीं स्वबल प्रशंसुन ॥
अत्यंत चिंतेंत शिरे स्वमंदिरीं। रात्रीं न निद्रा, लव सौख्य अंतरीं! ॥१९॥
" अनुचर मम होते शक्तिचे पूर्ण धाम।सुरनरखगनागीं देखिं वा ते असीम॥
खर बलि मजऐसा, दूषणीं शक्ति तीच। कवण वधुं शके त्यां, ईश्वरावीण साच.
झाला असेल अवतीर्ण जर प्रभू तो। भूभार जो हरुनि देवहिता करीतो॥
जाऊनि त्यासिं हठिं मी करणार वैर। प्राणान्त हो प्रभुशरें; भव होय पार!
होतें न सद्भजन तामसि मत्तनूनें। वाक्‌कायचित्तिं मज निश्चय हाच माने॥
कीं राजपुत्रयुग तें नररूपिं कोण। जिंकूनि त्यासि रणिं तल्ललने हरीन!"
चिंतूनि हें रथिं चढे झणिं एक, येत। मारीच सिंधुतटिं वास करीत जेथ॥
तों रामही करितसे इकडेहि एक। वैचित्र्ययुक्ति गिरिजे! कुतुकेंचि ऐक! ॥८
गेला लक्ष्मण जेव्हां आणाया कंद मूल फल विपिनीं॥
जनकसुतेतें बोले राघव सुखकंद सकृप मनिं हसुनी॥ २०॥
" ऐकें प्रिये! रुचिरशील शुभव्रते गे! लीलाविशेष नरयोग्य करीन अंगें॥
तूं राहिं तोंवरि वसूनि कृशानुमाजीं। मी जोंवरी करिन नष्ट निशाचरें जीं" ॥
जेव्हां तिला समजवी प्रभु रामराय। चिंतूनि भर्तृपद, ती अनलांत जाय!॥
राखूनि ठेवि निज ती प्रतिबिंब मात्र। हो तेंच शील विनयादिक रूपगात्र!॥
जाणें न मर्म परि लक्ष्मण हें जराही। जें आचरीत भगवान् विभु तेथ काहीं!॥
मारीचसन्निध निघे तंव राक्षसेश। स्वार्थी मुनीच नमि त्याप्रति नम्रशीर्ष!॥
नम्रत्व अंगिं धरि नीच कुणी यदा कीं। क्लेशावयासचि दुज्याप्रति तें सुदुःखी!॥
जैसें धनुष्य अहि, अंकुश वा बिडाल। वांकोनियांच इतरां करि दुःखजाल!॥
दुष्टोक्ति हो प्रिय तरी भयकारिणीच। जैसी अकालकुसुमोद्गति दुष्ट साच" ॥
*मारीच पूजि अति आदरपूर्ण त्यास।"का पातला?" पुसत " आज असे विशेष?
तुम्हां करी कवण हेतु असे सचिंत। हे पातलां त्वरित कां प्रभु तुम्हि येथ?"*
तेव्हां दशानन तयाप्रति सर्व सांगे। चित्तीं तदीय अभिमानविशेष जागे॥
[मारीच पूजुनि पुसे अति आदरेंसीं। "का आज राक्षसपते! मज पातलासी?"॥
तेव्हां अभागि कथि रावण त्यास सारें। चित्तांत त्यास अति गर्व तसा भरारे॥]
सांगे " असें कपट तूं मृगरूपिं साधीं। जेणें नृपालयुवती यदिं आणुं आधीं।"
मारीच सांगत " दशानन! नीट जाण। होती चराचर-विभू नरसा बसन २७
त्यांशीं नको करूंस रे! कधिं काळिं वैर। त्याचे करींच जगणें मरणें समग्र।

गेले कुमार मुनिच्या मखरक्षणाला । रामें फळाविण मला शर हाणिलेला ॥
मी फेकिलों क्षणि शतावधि योजनें कीं। त्यासीं विरोध करणें हित ना, विलोकीं
हें कीटभृंग म्हणती तशि मन्मती हे । त्या दोन बंधुंविण मी चहुंभागिं पाहें
आहेत ते नर तरी अति शूर होती । शल्यत्व त्यां कडनि नाहिं निभाव अंतीं
जे ताडकेसि वधितीच सुबाहुतेंही । खंडीयलें हरशरासन यत्करांहीं ॥ ३० ॥
जे दूषण-त्रिशिर तेविं खरा वधीती । ते केविं मानुं नर केवल, वीर्यमूर्ति ?
तूं जाउनी निज विचार करीं कुलाचा ।कल्याणकारि घर मार्ग गृहाश्रि साचा"
ऐकोन तें वचन रावण रुष्ट होय । देई शिव्या बहुत त्याप्रति ज्या अदेय ॥
बोले " मला करिशि तूं गुरुसाच बोध।आहे जगीं कवण योग्य मला सुबोध?"
मारीच तें निजहृदीं करि हा विचार । ' नोहे नवांप्रति विरोध सुखप्रकार–
मर्मज्ञ, शस्त्रि, शठ, वैद्य, धनी, नृपासीं। बंदी, कवीश,निज सूपकरादिपासीं'
दोहीं प्रकारिं बघुनी मरणा स्वकीया । जाऊं म्हणे शरण तो रघुनाथपायां ! ॥
यातें अमान्य करतां मज हाच मारी । मारी न कां मज शरें प्रभु रावणारि?'
चिंतूनि हें झणिच रावणसंगिं जाय । मारीच रामपदिं ठेवुनि चित्तकाय
ना रावणासि परि जाणवि तो स्वभक्ति । 'देखेन आज करुणानिधि राममूर्ति

पाहुनि त्या निज सौख्यसागरा नयनसार्थका करिन सुखें ।
सीतालक्ष्मणसमेत रामा स्मरिन दयाळा मी हरिलें ॥
क्रोधहि ज्याचा मोक्षद हो जो भक्तिस वश जगिं सर्वपरीं ।
निजशर जोडुनि मजसि वधो तो अपुल्या करिं सुखराशि हरि॥३६॥

घेऊनि चापनर सायक आत्महस्तीं । धावेल पाठिं मज राघव रम्यमूर्ति ॥
मी त्या बघेन फिरुनी फिरुनी किती तें॥माझ्यासमान नच धन्यपणा कुणातें!'

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे कालिकलुषविध्वंसने अरण्यकांडे
रावणमारीचवार्ता-श्रीरामसमीपगमनं नाम दशमस्तरङ्गः ॥

## तरंग ११ वा

मारीच जाय वनिं रावणसंगिं तूर्ण । मायामृगत्व अतिचारु असें धरून ॥
कोणास वर्ण्य   मग कपटी मृगाची ! सौवर्ण रत्नमणि याहि मनोज्ञ साची !

सीता बघे परमसुंदर कांचनांगा । तेजस्वि चित्तहरणा रिणा सुरंगा ॥
रामा वदे, " रघुवरा ! दयिता कृपाला । यांचें मनोज्ञ मज चर्म गमे मनाला
सत्यप्रतिज्ञ तुम्हि या हरिणा वधा जी।त्याचें सुचर्म मज द्या!" वदते प्रिया जी
जाणोनि सर्व, रघुनाथ उठे सहर्ष । सिद्धीस नेउं बघतो सुरकाज ईश ॥३॥
श्रीराम देखुनि मृगा, क्षणिं सिद्ध होत । घेऊनि चापशर सज्ज करांबुजांत ॥
तो लक्ष्मणा समजवी " वनिं संचरीती दुष्टात्म राक्षस, रहा अति दक्षवृत्त ४
सीतेचि रक्षण करीं प्रियलक्ष्मणा रे । ठेवोनि सावधपणा सगळ्या प्रकारें!"
पाहोनियां प्रभुसि, दूर पळे कुरंग । मागूनि राघव पळे शरचापसंग ॥ ५ ॥
ज्या 'नेति नेति' म्हणती सगळ्या श्रुतीही।जो ध्यानिही हि मनाप्रति गम्य नाहीं
मायामृगा बघुनि धांवत त्याजपाठीं । तो रामचंद्र विभु ही किति गोष्ट मोठी!
केव्हां गमे निकट तो मृग, दूर केव्हां।केव्हां दिसे प्रकट, गुप्तहि होत केव्हां॥
ऐशापरीं दिसत, लोपत, भूरुवीत । नेलें प्रभूप्रतिहि दूर तयें वनांत ! ॥ ७॥
श्रीराम तीक्ष्ण शर त्यावरि एक सोडी । जो त्यास घोर रवि घोक करीत पाडी
तो 'लक्ष्मणा!' म्हणुनि आणि विरावि नामाचित्तामधें स्मरतसे मग 'राम राम!'
प्राणां त्यजी प्रकटुनी निज सत्स्वरूप । चित्तीं स्मरूनि रघुनाथपदा अमूप ॥
श्रीराम जाणुनि तदीय रती हृदींची। योग्या सुदुर्लभ अशी गति त्यासि देचि!॥

तदा देवांनींही वरुनि सुमवृष्टी वितरुनी ।
प्रभूची सत्कीर्ति स्तविलि गुणमूर्ती सुवचनीं ॥
'दिलें औदार्यानें स्वपद असुरातें प्रभुवरें ।
सुदीनांचा बंधू रघुतिलक वंदूं किति बरें ! ' ॥ १० ॥
दुष्टासि वधुनी ऐसें रघुराय फिरे क्षणीं ॥
चाप बाण करीं साजे भाते कटिसि लावुनी ॥ ११ ॥
आयके जानकी जेव्हां आर्तस्वर तसा वनीं ॥
बोलली लक्ष्मणातें ती अतीव भिउनी मनीं ॥ १२ ॥
" वेगेंचि नीघ साह्यार्थ संकटीं बंधु रे ! अति ॥ "
बोले लक्ष्मण हासोनी " माते ! परिस मन्मति ॥ १३ ॥
ज्याच्या भृकुटिलीलेनें सृष्टीचा लय होतसे ॥
संकटनाशि तो केंवा पडावा तरि मानसें ! " ॥ १४ ॥

मर्मभेदक वाक्यांनीं भेदी जें जानकी तया ॥
चळे लक्ष्मणधी दोला हरिवत्तेकलनियां ! ॥ १५ ॥
सर्व कांहीं सोंरचोनी वनदिग्देवताकरीं ॥
जाय तो जिकडे राम रावणद्विपकेसरी ॥ १६ ॥

पाहूनि शून्य तंव आश्रम रावणानें । केला प्रवेश तनुवेष यतिप्रमाणें ॥
ज्याच्या भयें हृदयिं धाक सुरासुरांशीं। रात्रीं न शोर, दिनिं अन्ननिला उपाशी
तो येत तेथ दशशीर्ष विशेषभीत । कुश्वापरी लपत धाइंत, दुष्टचित्त ! ॥
जाती असे कुपथिं जे गवडा ! खगेशा !॥त्यांना न तेज लव बुद्धिहि राहि शेषा
नानाविधा कथुनि पाहि कथादि सीते । तो राजनीति कथि हृद्गत भीतिही ते
सीता म्हणे "यतिपरी दिसतोस योगी । हें दुष्टभाषण करें करिशी अभागी!"
तेव्हां करी प्रकट रावण आत्मरूप । झाली मनीं समय तो कळतांच पाप !
सीता वदे धरुनि धैर्य मनांत थोर । "थांवें खला ! परतण्या प्रभु ना उशीर
विहीसि वांछि जणुं नीच ससा स्वसंगीं।नं होशि मृत्युवश राक्षसनाथ! वेगीं"
ऐकोनियां वचन तें दशशीर्ष लाजे । चित्तांत तपद नमी सुखवी मना जें ॥

क्रोधेंचि तेव्हां धरि तीस रावण । रथामधें बैसवि तीस घेउन ॥
नभःपथें तो निज घेउनी निघे । रथें न जाई मनिं रामभीति घे ! २२

"हे राघवा ! प्रियतमा ! जगदेकवीरा ! । कैसी दया विसरलां ? प्रभु रामचंद्रा !
माझ्या करीं कवण हो! अपराध झाला ?।नाशूनि दुःख सुख द्या शरणागताला,
हे भानुवंशकमलाप्रति भानुराया ! । हे लक्ष्मणा ! लवहि दोष तुझा नसे या॥
रागावलें तुजवरीं फल हें तयाचें!" । सीता विलाप करि यापरि दीन वाचें ॥
"होती कृपा मजवरी प्रभुच्या हृदन्तीं।स्नेहाविमीच मुकल्यें तुमच्या कशी ती!?
सांगेल कोण विभुतें, मम आपदा ही?।यदीय भाग खल रासभ खाउं पाही!"
ऐकोनियां जनकजामुखिचा विलाप । झाला चराचरिं अतीवचि शोकताप !
तों गृध्रराज परिसे करुणार्तवाणी । चित्तांत ओळखित तो रघुनाथपत्नी २६
नें दुष्ट राक्षस तिला पळवून काय ? कीं म्लेच्छहस्तिं पडली कपिलाच गाय ॥
"सीते ! मुली ! भय नकोच धरूं मुळींही।मी राक्षसास वधितों लवलाहिं पाहीं!"
धावे जटायु खग यापरि देत धीर । कीं वरुद्ध वज्र करितें गिरिलें प्रहार !
बोले "खळा ! नच कधा वद थांबशी रे।निःशंक जाशि मज नेणशि सत्प्रकारें"

ऐशा तया जणुं कृतान्तसमा विलोकी । चित्तांत रावण करी अनुमान हें कीं—
"मैनाक हाचि अथवा खगराज होवा तो तत्प्रभूहि बल जाणतसे मदीय!" २९
जाणोनि गृध्रपति वृद्ध अशा जटायू। "मत्पाणितीर्थि निज नेइल नादि आयू!"
हें रावणोक्त परिसोनि जटायु धावे । क्रोधें वदे "दशमुखा ! हित ऐक भावें
सीतेसि सोडुनि भलेपणि जा गृहासी । नाहीं तरी तव गती टळणार कैची ?॥
अत्युग्र घोर रघुनायककोप वह्नि । जाळील तूं शकुल होळ तयीं जळूनी ! !"
देतां न उत्तर दशानन युद्ध माडी । तों गृध्र त्याप्रति स्वयें नखि चोंचि खंडी
त्यातें धरूनि करि भूवरि शीघ्र पाडी । सीतेसि रावण-रथांतुनि दूर काढी ॥
येई फिरूनी, करि रावणदेहिं घाव । झाला दशानन विमूर्च्छित दीर्णकाय ॥
क्रोधें उठूनि फिरुनी दशकंधरानें । हाणीयले खगवरा अतुल्या कृपाणें ॥३२
तोडीयले दशमुखें झगि पंख दोनी । तेणें जटायु पडला तळिं आदळोनी ! ॥
चित्तीं स्मरे रघुपतीस अनन्य भावें । शौर्यें लढूनि शुभकीर्तिसि गृध्र पावे!॥
घालोनि ने रथि पुन्हा जनकात्मजेसी । आकाशमार्गि रथ हांकि दशास्य रोषीं
जातां विलाप करि आर्त अतीव सीता। क्रीं व्याधपाशि पडली हरिणीच भीता!
देखोनियां गिरिवरी बसल्या कपींना । ती खालि टाकि पट 'राम' म्हणोनि दीना
सीतेसि घेउनि असें दशवक्त्र जाइ । ठेवी अशोकवनि तीस तयें असाह्य॥
तो प्रीति भीति तिज दावुनि फार भागे । ठेवी अशोकवनिं तो तिज एक जागे ः
जैसे सुवर्णमृग-पाठिसि राम जाती । ती मूर्ति चित्ति, मुखिं राघवनाम घे ती॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे कलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे जानकीहरणवर्णनं नामैकादशस्तरङ्गः ॥

## तरंग १२ वा

जेव्हां बघे रघुपती अनुजास येतां । दावीत मानसिं विशेषचि दुःखचिंता ॥
बोले "कसा तिजसि ठेवुनि एकटी तें।आज्ञेविरुद्ध मम लक्ष्मण! येसि का तें?
संचारती वनि निशाचरसंघ मत्त । सीता नसेचि, गमतें मज, आश्रमांत।"
तेव्हां धरूनि पदपंकज राघवाचें । बद्धांजली वदत लक्ष्मण दीनवाचें ॥ २ ॥
"हे नाथ! दोष मम यांत मुळीं न कांहीं।मी पातलों प्रभुवरा! अनिवार्यता ही।"
तें आय राघव निजाश्रम पाहण्यासी । गोदावरीतटि जयास्थळि ते निवासी ३

पाहोनि आश्रम दिसे न च तेथ सीता । तेव्हां रघूत्तम अतीवचि आर्तचेता॥
सामान्य लोकचरिता प्रभु दावि ऐसें । शोकें विलाप करि दीन नितान्त भासे
" हा सीते ! हे जानकि ! गुणखनि सौंदर्यराशि ! मम भार्ये ! ॥
शीलव्रतनियमघने ! पुण्यतमे ! लोपलीस कां आर्ये ! " ॥ ५ ॥
जरि लक्ष्मण समजावी राममनातें बहुप्रकारानीं ॥
सीतावृत्त विचारी राम लतावृक्षपल्लवा रानीं ! ॥ ६ ॥
" सांगा खगमृगगण हो ! अलिवृंदांनो ! तुम्हीं बघितली का ? ॥
सीता मृगनयना मम रमणी सुकुमार चारु शशिलेखा ! ॥७॥
हे शुक-कपोत-खंजन ! मृग-मीन- भ्रमरनिकर पिक मधुर ! ॥
सौदामिनि ! कुंदकली शारदशशि नागिणी कमल रुचिर ! ॥ ८ ॥
हे हंस वरुणपाशा ! स्मरधनु गज सिंह हो ! तुम्हां मिळे ॥
स्वस्तुति ऐकायातें कीं येथें जानकी न हें कळतें ! ॥ ९ ॥
श्रीफल ! कांचन कदली ! हर्ष तुम्हां फार वाटतो आतां ॥
शंका लेश न उरली कीं तुम्हा लाजवी न अजि सीता ! ॥ १० ॥
गे ! ऐक जानकि ! तुझ्याविण या समस्तां।झाला प्रहर्ष, जणुं राज्यचि येत हस्तां॥
त्यांचा कसा सहतसे तुज हर्ष आज?। वेगें प्रिये ! कदि न दर्शविसी मुखाब्ज?"
ऐशापरी प्रभु विलाप करूनि शोधी । जाणों महाविरहि तो रतिकामबुद्धि ॥
जो पूर्णकाम सुखराशि अनाद्यनन्त । तो मानवी चरित दर्शवि बुद्धिमन्त ॥१२॥
त्या गृध्रराज दिसला पुढतीं जटायु । जो रामचंद्रपदचिंतनि नेत आयु ॥
त्या स्पर्शि राम शिरिं लावुनि हस्तकंज । जो शोकनाशन विभू करुणाधिराज॥
॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे कलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे
श्रीरामविरहवर्णनं नाम द्वादशस्तरङ्गः ॥

## तरंग १३ वा

सौंदर्यधाम बघुनी मुख राघवाचें । होई जटायु गतदुःख अतीव साचें ।
पीडा तुटेचि कसलीहि तया शरीरीं । धैर्या धरूनि वदला वच या प्रकारीं ॥१॥
"हे नाथ राम ! भवभीति विलोपकारी।माझी दशा करि दशानन आज ऐशी ॥
दुष्टेंचि त्या हरियलें तव जानकीला । तो होय दक्षिणदिशेप्रति शीघ्र गेला ! ॥

होती विलाप करती कुररीरवी ती । हे प्राण ठेविं मम मी तव दर्शनार्थी ॥
आतां निर्धृं वधति हे करुणानिधाना"।त्यातें वदे रघुपती "त्यजि ना तयांना।"
तें हांसुनी वदत त्यासि जटायु "रामा। ये नाम ज्यासि मरतां, तव सौख्यधामा ॥
हो का जरी अधम तो तरि मुक्ति त्यासी।त्यासे असें वदतसे श्रुतिशास्त्रराशि ॥
तो तूं मला नयनगोचर आज होतां। सांगूं कशास मम जीव कृतार्थ आतां!"॥
अश्रू भरूनि नयनीं रघुराज बोले। "बा! स्वा स्वकर्मगतिचें फल मेळवीलें ॥
ज्याचें मनीं परहितास्तव थोर चिंता। त्याला नसेचि जगि दुर्लभ काहि ताता!॥
त्यागून देह अजि जा मम सौख्यधामा। मी पूरवूं कवण रे! तव अन्य कामा?॥
स्वर्गी पिताास मम तूं कळवूं नकोस। श्रीजानकीहरण हें अजि या क्षणास! ॥
जैं राम मी सकुल रावण संहरीन। येऊन तो कथिल सर्वचि वृत्त तूर्ण!"॥७॥
तो गृध्रदेह विसुजी–हरिरूप होई। हो दिव्यभूषणविभूषित दिव्यदेही ॥
शोभे चतुर्भुज मनोहर पीतवासा। सुश्याम तो स्तवि सगद्गद सादर ऐसा॥८॥

" जय जन रामा! निरुपमरूपा निर्गुणसगुणा सज्जक गुणा।
दशाननबाहुच्या खंडनकर्त्या चंडशरीं, क्षितिमंडना! ॥
घनश्यामतनु सरोजवदना कमलदलायतलोचना!।
नमीं सतत मी कृपालु राघव विशालभुज भवमोचना! ॥९॥
अमेयबल तूं अनादि ईश्वर एक अगोचर अव्यक्त।
ज्ञानघना! निर्द्वन्द्व अतीन्द्रिय जो गोविन्द क्षिति धरित ॥
'राम'मंत्र जे संतत जपती संत असे तू सुखि करिशी।
निष्कामप्रिय त्या तुज मी नमिं रामा! खलदल तूं हरिशी ॥१०॥
ब्रह्म व्यापक विरज निरंजन निगमें अज ज्या वर्णियलें।
ध्यानें ज्ञानें विरक्तियोगें मुनिजनिं ज्यातें मेळविलें ॥
शोभासागर तो करुणाकर मोहितसे जो चराचरा।
प्रकट होउनी तो विभु शोभवुं मम हृत्कमलीं भृंग खरा! ॥११॥
अगम्य सुगमहि निर्मल सुमती ख्यात सुशीतल सम असम।
योगि जयातें यत्नें बघती इंद्रियदमनें सुख परम ॥
स्वभक्तवश जो विश्वाधीश्वर रमानिवास प्रभु राम।
पावनकीर्ती भवहरमूर्ती करो हृदय मम निजधाम!!" ॥१२॥

श्रीराममक्ति अचला वर मागुनीयां । गेला जटायु हरिधामि मुखें वसाया ॥
त्याची क्रिया करि यथोचित आत्महस्तें । श्रीरामराय अति आदरपूर्ण चित्तें ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे कलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे गृध्रराजमोक्षवर्णनं नाम त्रयोदशस्तरङ्गः ॥

## तरंग १४ वा

श्रीराम कोमलमना करुणानिवास । दीनीं अहेतुक दयाळु उदार ईश ॥
तो नीच गृध्र खग आमिषभोगि ऐसा । योग्यासि योग्य गति त्यासि दिली सुवासा ॥
ऐकें उमे ! जन किती तरि हे अभागी । होती त्यजूनि हरितें विषयानुरागी ॥
ते दोन बंधु मग धुंडित जाति सीते ! । त्या काननीं सकल शोधुनिशां पहाते ॥२॥
कांतार तें तरुलतादिकिं दाट घोर । पक्षी, मृगें बहु जिथें गज, सिंह उग्र ॥
मार्गी कबंध वधिला प्रभुरामरायें । तो आपला कथित शाप कदा कशा ये ॥३॥
"दुर्वास देति मजला बहु उग्र शाप । देखोनि पुण्यपद शोधत सर्व पाप ! ।
बोले तयास विभु "सागत मी तुला हें । जो ब्रह्मवैरि मज तो प्रिय नैव, पाहें ॥४॥
निर्दंभ सेवन करी हृदिं विप्रपादा । देवें मनें वचनिं त्या स्तविती विशुद्धा ॥
ब्रह्मादि शंभु वश त्याप्रति सर्व भावें । यासाठिं भूसुर विनम्रपणें नमावे ॥५॥
हो कां जरी परुषवाक्‌शरिं ताडणार । वा शापणारहि असो द्विज कोणि उग्र ॥
त्यातेंहि पूज्य म्हणुनि स्तवितात संत । गंधर्व ! रे समज तूं अपुल्या मनात ॥६॥
हो विप्र शीलगुणहीन तरीहि मान्य । ना शूद्र पूज्य जरि सद्‌गुणराशि धन्य "
त्या आत्मधर्म कथि राम कृपानिधान । सद्भक्ति पाहुनि तयीं प्रभु हो प्रसन्न ॥
वंदोनि रामपदपद्मयुगा समक्ति । स्वर्गी रिघे मिळवुनी गति आपुली ती ॥
अर्पोनि त्या स्वपद, राम उदार येत । ते आश्रमीं शबरिच्या अतिहृष्टचित्त ॥८॥
झाली प्रहृष्ट शबरी गृहिं राम येता । आधी दिसया मुनिवरें मुदिं येति चित्ता ॥
आजानुबाहु कमलाक्ष वपे स्वदृष्टीं । शीर्षांधि भूषवि जटा, वनमाळ कंठीं ॥९॥
सुश्यामगौर अतिसुंदर दोन बंधु । वदीतसे शबरि केवळ सौख्यसिंधू ॥
पादांबुजा कवळि, शब्द मुखीं फुटे न । माथा लवूनि नमि त्या किति भक्तिपूर्ण !
प्रक्षाळि राघवपदां जळ आणुनी ती । त्या आसनीं बसवि सुंदर भक्तिमूर्ति ॥
ती कंदमूलफल सद्रस देइ त्यासी । प्रेमें प्रशंसित किती प्रभु घास मसी ॥११॥

जोडोनि पाणि शबरी उभि राहि भावें । श्रीराघवापुढतिं ती हृदिं हर्ष पावे ॥
बोले "विभो ! स्तवुं तुला कवण्यापरीं रे ! । मी नीचजाति जडबुद्धि अशा प्रकारें ॥
ही होय मी अधम, त्यांतुनि हीन नारी । मी मंदबुद्धि, अपराधि मदीय भारी ! ॥
तीतें वदे रघुपती "परिसें मदुक्ती । मातें करीत वश भक्तिच एकली ती ॥१३॥
ना जातपात कुलधर्म महत्त्व मान । न द्रव्य शक्ति विभवादि, गुणाढ्यता न ॥
चातुर्य सर्वपरिचेंहि न शोभणारें । हो भक्तिहीन जर तन्मन कीं बिचारें ! ॥१४॥
पाण्याविणा घन, तसें मन भक्तिहीन । सांगेन मी नवविधा तुज भक्ति जाण ॥
तूं ठेव नीट हृदिं ऐकुनि सावधान । सत्संग ही प्रथम भक्ति विशेष मान ! ॥
माझ्या कथारसिं रती अति अद्वितीया । ही जाण तूं हृदयिं भक्ति मम द्वितीया ॥
भक्ती तृतीय गण सद्गुरुपादसेवा । टाकोनिया दुरभिमान, धरोनि भावा ॥१६॥
गाणें मदीय गुणकीर्ति उदारमूर्ति । भक्ती तुवां समजणें मम ही चतुर्थी ॥
विश्वासयुक्त जपणें मम मंत्रबीजें । दृढयुक्तभक्ति गण ही मम पांचवी जे ॥१७॥
जी कर्मकांडिं विरती, दम-शील-युक्ता । जी सज्जनानुकृति संतत धर्मसक्ता ॥
ती भक्ति साहवि बरी शबरी ! मनीं घे । ओघेंचि मीं कथियली तुजलागिं ही गे ! ॥
माझ्यासमान बघणें सगळया जगातें । संतां गणून मजहूनहि थोर कीं तें ॥
ही सातवी समज तूं हृदयांत भक्ति । संसारतापशमना गण या सुयुक्ति ! ॥१९॥
हो लाभ जो सहज त्यावरि तुष्ट होणें । स्वप्नींहि नेत्र बघणें परदोष तेणें ॥
ही जाण भक्ति बरवी मनिं आठवी गे ! । नाहीं तुला कमरि, हें जर चित्ति वागे ॥
सर्वांसि निष्कपट वर्तन साधुभावें । विश्वास सर्वपरि कीं मजठायिं पावे ॥
ना हर्ष खेद कसलाच मनांत घेणें । ही जाण तूं नववि भक्ति सुधीर तेणें ॥२१॥
यांतूनि एक जरि भक्ति मनीं मदीय । विश्वीं चराचरिं मला प्रिय तोच होय ॥
स्त्री वा असो पुरुष तो प्रिय तोच मातें । साऱ्या प्रकारिं दृढ भक्ति तुझी असे ते ॥
जी योगिवृंद म्हणती गति दुर्लभा ती । हो आज गे ! सुलभ ती तुज साधुरीतिं ॥
जें दर्शनें अनुपमें फल लाभिया हो । जीवा मिळे सहज कीं निजरूपलाहो ! ॥२३॥
सीतागती तुजसि का जरि होय ठावी । ती त्वां मला शबरि ! सत्वरिं जाणवावी" ॥
सांगे तदा शबरि "जें सर होय पंपा । तेथें मिळेल तुज वृत्त निर्षे अपापा ! ॥ ।
सुग्रीव तेथ तुजलागिं सखा मिळेल । त्याचेकडून विभुरा सगळें कळेल ! ॥
जाणोनिही मजसि हें पुसतां सुधीरा !" । सांगे तदा प्रभुपदां नमुनी उदारा ॥२५॥

वंदे यकठ ती, विलोकि हरिपुर धरि हर्दि राघवपदकमला ।
योगाग्नीमधि विसृजि तनूने अनन्तपदि हो लाभ जिला ।।
टाकुनि कर्मा तशा अधर्मा मताधि नर हो दुःखकरां ।
तुलसि वंदे दृढ रामपदाब्जिं विश्वासें अनुरक्ति करा ।।२६।।
स्त्री जातिहीन अबला, अघजन्मभूमी । ऐशीसि मुक्ति दिधली प्रभुंनीं स्वधामीं।।
त्या राघवा विसरुनी सुखकांक्षि होशी । मूढा मना ! न तुलना तव मंदतेशी ।।२७।।

— ।। इति श्रीरामचरितमानसानुवादे कलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे
शबरीभक्ति-मुक्तिवर्णनं नाम चतुर्दशस्तरङ्गः ।। —

## तरंग १५ वा

त्यागोनि तें वन, पुढ्या वनि येत राम । शौर्यें अतुल्यबलतेज नृसिंहयुग्म ।।
शोकाग्निमग्न विभु तो विरहीच भासे । संवाद लक्ष्मणसवें करि काभि ऐसे ।।१।।
"हे लक्ष्मणा ! बघ वनीं सुषमा किती ही।कैसा वियोगिजन हीप्रति चित्ति साही?।।
हें देख पक्षि मृगवृंद सह-स्व-नारी । माझा जणों करिति हीं उपहास सारीं ! ।
मातें बघूनि पळती मृगवृंद दूरीं । त्यातें मृगी कथिति 'भ्या न; तुम्हां न वैरी!।।
खेळा सुखांतचि अहो ! मृगबालकांनो । शोधीत हे फिरति हेममृगासि जाणों !'।।
जाती करी ,बघ कसे करिणींसमेत । जावें प्रियेसह असी शिकवीति रीत ! ।।
शास्त्रें सुचिंतित तरी फिरुनी शिकावीं । राजा सुसेवित तरी न कृपेसि दावी !।।
स्त्री रक्षिली जरि उरीं तरि त्यापरी ती ।शास्त्र,नृपाळ, युवती जणु तुल्यरीति!
बंधो !पहा तरि वसंत वनांत शोभे। माझ्या वियोगिहृदयीं परि निर्मितो भें ! ।।५।।
हा एकला, विरहदुःखि नितान्त दीन । ऐसा मला बघुनि केवळ साह्यहीन ।।
स्वारी करूं मजवरी बघतो अनंग । कांतार-भृंगयुतसंगिं विहंगसंघ ! ।। ६ ।।
जैं कामदूत बघुनी मज बंधुसंगीं । ते वृत्त सांगति तसें मदनासि वेगीं ।।
नेलें त्वरें स्वदल मागुति तें स्मरानें । डेरे दिले उचित पाहुनि काय रानें !७
जे कीं विशाल तरु, वेष्टित वल्लरींनीं । जाणों छतें विविध ताणिलि जेविं ताणीं ।।
जे ताल रम्भ-कदली-ध्वज-सत्पताका । पाहोनि मोहित न हो जन धीर तो कां ? ।।
नाना तरू विविध पुष्पभरीं नटोनी । ते वाटती रुचिरवेषि धनुर्ध्दि कोणी ।।
कोठें कुठें विटप सुंदर शोभणारे । ते दूर दूर जणु सैनिकयुक्त डेरे ! ! ।।९।।

जे कूजती मधुर कोकिळ-मत्तहस्ती । ते उंट सारस, महोलहि खेचरें तीं !
ते सुंदराश्व शुक मोर तसे चकोर । ताजी सदश्व जणुं हंस कपोत सार॥१०॥
तें पादचारिदल तित्तिर आणि लावे । तें कामसैन्यवर केविं वरें तुलावें ? ॥
वाटे, विलाच गिरिच्या रथसा विशाल । त्या निर्झरीं सहज दुंदुभिनाद झाला॥ ॥
त्या चातकादि गुणगायक भाट मानूं । भृंगादि भेरि सनयादि सुरेल वानूं ॥
सद्गन्धशील मृदु मारुत दिष्ट आले ! सेनानिवेश चतुरंगि विराजलेले !॥१२॥
ऐश्वा समेत अधिनायक कामदेव । सर्वांसि कीं तुचवि-तद्दश विश्व सर्व ! ॥
हे लक्ष्मणा ! बघुनि कामचमू अशी ही । जो धैर्य राखि, जग वानि तयास पाहीं !॥
नारीच ही परमशस्त्र मनोजहस्तीं । तीतें न जो वश, तयासचि वीरकीर्ति ।
ताता ! गणीं प्रबळ हे खळ लोकिं तीन|जे काम कोप, तिसरा रिपु लोभ जाण॥ ॥
ते ज्ञानपूर्ण मुनिच्याहि मना क्षणांत । व्यापावयास असती जगतीं समर्थ !
इच्छा तसें कपट हें म्हण लोभसैन्य । नारीच हो मदनसैन्य जगीं अनन्य ॥१५॥
हो क्रोधसैन्यबल—भाषण जें कठोर । ऐसा असे मुनिजनीं कथिला विचार ॥
बोले महेश्वर "उमे ! समजें मनीं हें । सर्वांतरीं वसत रामचि एक आहे॥१६॥
तो हो चराचर विभू त्रिगुणां अतीत । विख्यात कामिजनदैन्य निदर्शवीत ! ॥
तैसाच वाढवित तो निजभक्तचित्तीं । सर्वोपरी सुखद जी सुदृढा विरक्ति ॥
जे क्रोध काम मदलोभ तशीच माया । श्रीरामराजचि दयानिधि वारितां यां ॥
ज्यातें प्रसन्न नटनायक रामराय । त्या इंद्रजाल भुलवील कदापि काय ? ॥१८॥
मी सांगतों मम उमे ! हृदयानुभूति । हें स्वप्नवत् जग खरी रामभक्ति ॥
गेले पुढें प्रभु सरोवरपम्पतीरा । पंपा सजे सुभग नाम सरा गभीरा ॥१९॥
ज्याचें विशुद्ध जल सज्जनचित्त जैसें । ज्या घाट चार सजती अति चारु तैसे ॥
पक्षी मृगें पिपति ज्या जलपानकामें । जैसे उदारगृहिं याचकवृंद नेमें ॥२०॥
पर्णादिकीं कुवलयीं बहु झांकलेनी । त्याचें न तें सलिल सत्वर ये कळोनी ॥
आच्छादि ज्यासि चहुंबाजुंसि गाढमाया । तें ब्रह्म जेविं बहु दुस्तर हो कळाया ॥
ज्याचें अवर्ण्यजल यापरि सर्व रीतीं । पंपेसि त्या रघुकुलोत्तम बंधु येती ॥
ज्यांतील मीनगण मग्न जलीं गभीरीं । धौम्यासि सेवि अतिमात्र बहुप्रकारीं ॥
सद्धर्मशील नर धौम्यरसासि सेवी । सेवीति सर्व जलवासि सुरासि तेवीं ॥
देती बघा सरसिजें बहुरंगि शोभा । भृंगालि गुंजन करी मकरंदलोभा ॥२१॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे 'सुश्लोकमानसे' कलिकलुषविध्वंसने अरण्यकांडे श्रीरामचन्द्रस्य पम्पासरगमनवर्णनं नाम पंचदशसर्गः ॥

## तरंग १६ वा

केले निनाद जलकुक्कुटरम्यहंसीं ! चाटे प्रशंसिति रवें वधुनी प्रभूसी ! ॥
जे चक्रवाक-बक पक्षिसमूह तेथें। त्यांची विभा विपुल वर्णनशक्य ना ते ॥१॥
ते वल्गुकंठि खगवृंद मृदुस्वरानें । पाचारितात पथिका जणु आदरानें ! ॥
तीरीं सुशोभतिहि आश्रम ते मुनींचे । सर्वत्र रम्य तरु शोभति काननींचे ॥
चांफे पलाश बकुलादि कदंब ताल । आम्रे तमे पनस पाटल जे विशाल ॥
नाना तरू कुसुमपल्लवि शोभणारे । ज्यांचेवरी मधुप गुंजनमग्न सारे ॥३॥
वाहे मनोहर सुगंधित मंद वारा । जो वर्षतो सकलमानसिं हर्षधारा ॥
'कुहू-कुहू' वदति कोकिळ मंजुनादें। ध्यानें हि भंग करिती मुनिंचीं स्वशब्दें॥४॥
होती तरू फलभरें लवले क्षितीसी । लक्ष्मी उदार पुरुषा करि नम्र जैसी ! ॥
ऐसें सरोवर बघून मनोज्ञ, राम । स्नानादि त्यात करि, सेवि सुखा निकाम
पाहोनि सुंदर तरू, बसले तळीं ते । छायेंत लक्ष्मणसमेत सुशांत चित्तें ॥
तेथें पुन्हां मुनिसभेत सुरादि येत । रामा स्तवोनि निजधामिं निघोनि जात ॥
होते प्रसन्नमनि राघव बैसलेले : बंधूसमेत अभिभाषण रम्य चाले ! ॥
देखोनिया प्रभुसि तैं विरहाधिमग्न । झाले मनांत मुनिनारद फार खिन्न ! ॥७॥
'मी शापिलें प्रभुसि यास्तव दुःख सोसी । श्रीरामचंद्र विभु भक्तसुखासि पोषी॥
ऐशा प्रभूसि अवलोकुनि धन्य व्हावें ! पैसा पुन्हां समयही मज केविं पावे?'
चिंतूनि हें प्रभु जया स्थलिं बैसलेले । वीणा करीं धरुनि नारद तेथ आले॥
गाऊनि रामचरितः अति गोड वाचें । प्रेमें स्तवीत मुनि सद्गुण राघवाचे ॥९॥
घालीत दंडवत जों मुनि त्यासि राम । आलिंगितो उठवुनी प्रभु सौख्यधाम !
लावी उरीं फिरफिरूनि किती तया तो !। त्या स्वागता करुनि सन्निध बैसवीतो ॥
अत्यादरें मुनिपदांबुज लक्ष्मणानें । प्रक्षाळिलें नमियलें अतिपूज्यमानें ॥
नानापरी स्तवि मुनीश रघूत्तमातें। जाणेहि त्याप्रति अतीव सुतुष्ट चित्तें ॥११॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे कलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे श्रीरामसमीपे नारदगमनवर्णनं नाम षोडशस्तरङ्गः ॥

## तरंग १७ वा

जोडोनि हस्तकमलां मुनिवर्य बोले । ऐकोनि जें सकलसज्जनचित्त डोले ॥
" ऐका उदारतम सुंदर रामराय ! । आहां अगम्य वरदायक चिंतनीय॥१॥
मागेन मी, 'प्रभुवरा ! वर द्याच एक।सर्वान्तरस्थ विभु त्या जरि जाणि नीक" ॥
बोले रघूत्तम "मुने ! तुम्हि जाणतांच । माझा स्वभाव, नच मी कधिं ठेविं साच ॥
माझ्या जनाजवळुनी दुरवूनि कांहीं । तुम्हां अदेय मजपाशिं मुळींच नाहीं !
जाणा तुम्ही मुनिवरा ! मम सत्य हें हो । विश्वास मद्वचनिंचा हृदिं नित्य राहो!"
तेव्हां वदे मुनि मनीं अति हर्षुनीयां । "मी धाष्टर्यही करुनि मागतसें वरा या॥
नामें जरी असति कीं प्रभुचीं प्रभूत । ज्यांतें श्रुतीहि चतुरा बहु वर्णितात ४
त्यांच्यामधेंहि अधिकोत्तम नाम 'राम' । पापात्मपक्षिगण संहरि जें निकाम ! ॥
भक्ती रघूत्तम ! तुझी जणुं पौर्णिमा ही । ज्या यामिनींत शशि 'राम'सुनाम राही!॥
नामें अनन्त इतरें जणुं तारकाली । भक्तांचिया विमल हृन्नभिं नित्य ठेली!"॥
बोले 'तथाऽस्तु !' करुणाब्धि मुनीसि राम । श्रीनारदाधि हृदिं लाभत सौख्यधाम॥
वंदीत रामचरणीं मुनिवर्य माथा । बोलेहि मंजु वच जाणुनि हृष्ट नाथा ॥
"हे राम ! मी पुसतसें परिसा ! स्वमाया।प्रेरूनि मोहवियलें तुम्हि मन्मना या॥
व्हावा विवाह मम हें मनिं जें उदेलें । तें फोल कां प्रभुवरें मम आर्त केलें?"
" ऐका मुने ! कथित मी मन खोलुनी हें । जो विश्वसूनि मज ठायिंच भक्त राहे-८
त्याचें सदैव परिपालन मी करीत । बाळासि माय करि रक्षण तीच रीत !
अग्नीस बाळ धरुं धावत, वस्त्र नाग। त्यां वारि आइ तर्हि धेनुहि धावुनी गा!
जे प्रौढ होति सुत त्यांवरि माय दावी। प्रीती, परी पहिलि ती अतुला वदावी॥
ज्ञानी मला गमति पुत्र जणों अ-बाळ !॥ हो बाल पुत्रसम भक्त अगर्वशील!१०
ज्ञान्या गमे स्वबल; मद्बलि भक्त नांदे।तो क्रोध-काम,-रिपु त्या उभयां भया दे!
ऐशा विचारिं बुध ते भजनांत मातें । ज्ञानासि पावुनिहि यांकिति भक्ति ना तें!!
तू जाणसी मुनिवरा ! मनिं भक्ति माझी।येथें परी विरह केलि मियां तुझ्या जी
जे क्रोध-काम-मद-लोभ बलाढ्यसेना । मायाचि पोषित हिला, दुसरें असेना १२
त्यांतूनि होय अति दारुण दुःखदात्री । मायास्वरूपचि अशी मनिं एक ती स्त्री !
गाती मुने ! निगम आगम सर्व संत । नारीच मोहविपिनास्मति हो वसंत ! १३

ती ग्रीष्म होउनि विशोषि जलें झरे वा । जे शोभले जपतपोमय पुण्यपर्वा ! ॥
जे क्रोधकाम मदमत्सररूपि भेक । वर्षा ऋतूपरि तथा करि हर्षसेक ! ॥१४॥
दुर्वासनादि कुमुदांप्रति सौख्य देती। स्त्री हो जणों शरदृतू अति इष्ट त्यां ती !
ती वादवीत फिरुनी ममता-जवासा । जैसा ऋतू शिशिर त्याप्रति दे विपोषा॥
पापादि संघ जणुं भीतिद जे उलूक । स्त्री हो तमोरजनि हर्षद त्यासि एक१६
ते सत्य-शील-बल-धी-मयमीनघात । स्त्री ही करी बडिशसी, बुध बोलतात !
जी दोषमूल अतिशूलद दुःखखाणी । ती एक होय जगतीं प्रमदा गणोनी १७
केलें निवारण मुने ! तुमच्या विवाहा । मी तें तसें, मज नसे मुळिं अन्य ईहा॥"
ऐकोनि तें रघुवरोक्त मनोज्ञ सार । रोमांच ये मुनिशि लोचनि अश्रुनीर !
हे गौरि ! सांग कवण्या प्रभुची स्वभक्तीं ।प्रीती तशीच ममता अशि हो सुरीतीं?
निःशंकचित्ति भजती प्रभुला न ऐशा । दुर्दैवि मदमति ते नर जाति नाशा॥"
बोले पुन्हांहि मुनि नारद आदरानें । " आहा विशारद विभो ! तुम्हि सर्व मानें
सांगा मला खुबरा ! तुम्हि लक्षणें तीं । जीं शोभतात जगिं संतत मात्र संतीं!"
बोले विभु सकलसंसृतिभी-विनाशी । " सांगेन तीं मजसि वाटति सौख्यराशि
मी ज्यांमुळें वश असें मम भक्त संतां । तीं लक्षणें वदतसें मुनिवर्य आतां-२१
जे संत ते अनघ, षड्रिपु जिंकिलेले।जे कीं अकिंचन, अकाम शुचित्व ल्याले॥
जे सौख्यधाम,मतिमान्,अति ज्यांसि बोध।ईहा न ज्यां,अमद,सुस्थिरधी विशुद्ध
सत्यप्रतिज्ञ, मितभोगि, कवीश, योगी । जे सावधान, विनयान्वित जे अरागी
जे भक्तिमान्, परमपंडित भक्तिमार्गी । ज्ञानी गुणाढ्य भवदुःख जयां न भागी!
निःशंकचित्त, तनुगेहिं न सक्ति ज्यांस।माझ्या पदाब्जिं करि यन्मति नित्यवास
संकोचती निजगुणश्रवणें मनात । संतोषती परगुणश्रवणीं नितान्त ॥ २४ ॥
जे शांत शीतल, न टाकिति जे सुनीति । सद्धावशील ऋजु, ज्यां प्रिय सर्व होती
ज्यां आवडे जपतप व्रत संयमादि। हे नित्य नेम, दम पाळिति निर्मळा धी २५
ज्यां विप्र-विष्णु-गुरुपादसरोजभक्ति । श्रद्धाक्षमासुजनताकरुणा यदन्तीं ॥
जे नित्य हृष्ट मम भक्ति खरी करीती । विज्ञान युक्ति विनयादि जया विरक्ति
ज्यांतें यथार्थमति वेदपुराणधारीं । ज्यां दंभ-मान-मद हे नवती विचारीं॥
जाती अनीतिपथि जे चुकुनी कदा न । ज्यांतें रुचे सतत मद्गुणकीर्तिगान॥
निष्काम जे भजति अन्यहितें करणा । संता यथार्थपणिं गाइल कोण गा या?
संता न गाउ शकती श्रुतिशारदाही।त्यांच्या गुणां न दिसतो मज पार कांहीं"

"संतांचे गुण शेष शारदा वर्णु न शकती !" प्रभु वदतां ।
मुनि नमि विभुनें, भक्तगुणां जो वदय निजमुखीं हो स्तविता ॥
पुनःपुन्हां शिरिं नमुनी रामा ब्रह्मपुरातें जाय मुनी ।
तुलधि वदे, ते धन्य हरिगुणीं रंगति आशा त्यजुनि मनीं ! ॥ २९॥
पवित्र हें सुयश राघवाचें । जे ऐकती, गातिल वा स्ववाचें ॥
त्यां रामभक्ती दृढ होय वेगें । त्यां योग वैराग्य न मंत्र लागे !॥३०॥
रे चित्त ! जाण युवतीजन दीपवह्नि।ना हो पतंगपरि त्यावरि तूं पडोनी!
सोडोनि काम,भज रामपदाब्ज गोड।सत्संग जोड,मद सोड,मुळा न जोड
संतांच्या चरणांतें वंदुनि विनवीत ' राम ' त्यां विनयें ॥
श्रीरामकृपें लाभो सत्पुरुष जें नैव सत्कृपेविन ये ! ॥ ३२ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने अरण्यकाण्डे विमलवैराग्यभक्तिसंपादनं नाम सप्तदशस्तरङ्गः ॥

❀ इति श्रीसुश्लोकमानसे ' विमलवैराग्यसंपादनो ' नाम तृतीयः सोपानः श्रीसीतारामकृपया संपूर्णः ❀

इति अरण्यकाण्डः समाप्तः

॥ श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तु ॥

॥ शुभं भवतु ॥



श्रीगणेशाय नमः ।

श्रीभवानीकमलेश्वराभ्यां नमः । श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ।
श्रीसरस्वत्यै नमः ।

तुळसीरूपिणे श्रीमद्वाल्मीकिमुनये नमः।
यस्य प्रसादात्सुलभं स्वर्गीयममृतं भुवि ॥ १ ॥

# ❀ सुश्लोकमानस ❀

## श्रीरामचरितमानस अर्थात् श्रीतुलसीरामायण

या महाकाव्याचा अनुवाद

## चतुर्थ सोपान

# किष्किन्धाकांड

तरंग १ ला

मंगलाचरण

ज्यां कुन्दनीलोत्पलगौरनीलत्वा । धनुर्धरें ज्यांचें तुळि ये न तोलतां ॥
विज्ञानराशी सत्त्वाश्रयभूषण । वंदूं अम्ही भक्तिद रघुनंदन ॥ १ ॥
ज्यां वेद गाती, द्विजधेनु ज्यां प्रिय । मायामनुष्यत्व धरीति निर्भय ॥
सीतेसि जे शोधिति दोन रघुवर । वंदूं तयां धर्मरत हितास्तव ॥२॥

ब्रह्माग्निमाशारिंच जन्मलेलें । ज्याच्या प्रतापें कलिताप गेलें ॥
जें श्रीशिवाच्या मुखचंद्रिं साजे । श्रीजानकीजीवन जें विराजे ॥३॥
संसाररोगाप्रति नाशितें जें । श्रीरामनामामृत एक गाजे ॥
सेवोनियां संतत हेंचि संत । कृतार्थता पावति कीं अनन्त ! ॥४॥

पापापहा, जगति मुक्तिस जन्मदेती । जी ज्ञानखाण अशि वर्णियली सुकीर्ति॥
श्रीपार्वतीश्वर सदैव जिथे निवासी । काशी अशी सतत सेव्य अम्हां न कैसी ? ॥
जेणें समस्त सुरवृंदहि दग्ध होता । त्या जो विषा पिउनि रक्षि जगा समस्ता ॥
हे मूढचित्त ! मजसी न तयास काय ? । श्रीशंकरासरिस कोण कृपाळु होय ?॥६॥

येती प्रभू पुढति सन्निध ऋष्यमूका । सुग्रीव मंत्रिसह ज्या स्थलि राहि एका ॥
सुग्रीव त्या अतुलवीर्यबलां विलोकी । जे शक्तिचें गमति त्याप्रति ग्रीवसे कीं ! ॥
बोले भिऊनिच तदा "बघ मारुते ! रे । येती इथें पुरुष दोन अतुल्य सारे ॥
सौंदर्यसागर तयांप्रति ये बघोन । घेऊनि वेष बटुचा, मनि त्यांचि जाण॥८॥

हे पाठवीत मज का जर दुष्ट वाली । जाऊं त्वरेंचि अम्हि येथुनि अन्यशैलीं ! ॥
तेव्हां धरीत हनुमान् द्विजवेष साचा । जाई, तयासि नमि आणि वदे सुवाचा॥
"हे श्यामगौरतनु कोण तुम्ही अहांत ? । का क्षत्ररूप धरुनी फिरतां वनांत ? ॥
भूमी कठोर, तुम्हि हे सुकुमारपाद । स्वामी कशास्तव वनीं फिरतां सखेद ? ॥
आहा मनोहरतनू मृदुरम्यकाय ! का वात ऊन सहतां वनिं हे असह्य ? ॥
देवत्रयांतिल तुम्ही कुणि देव दोन । नारायणासहिन जो नर ते तुम्ही ना?॥११॥

जे विश्वकारण, निवारण जे भवाला । भूभारभंजक तुम्ही अवतीर्ण झालां ॥
त्रैलोक्यनाथ तुम्हि का मनुजावतारी । सांगा भला अजि कथा तुमचीच सारी"
वदत रघुपती तें वाक्य हें त्या बटूनें । "दशरथसुत आम्ही; तद्वचें येत येथें
मजसि अनुज आल्या'राम'हा लक्ष्मणाख्य। अम्हि उभयहि वंद्य ज्यांचने भक्तिसख्य
मजसह सुकुमारी जानकी होति जाया । परि वनिं पळवीली राक्षसानीं स्वजाया॥
द्विजवर ! अम्हि तीतें शोधताहोंत येथें । चरितहि अपुलें वा ! ऐकवावें अम्हातें"॥

प्रभूतें जाणोनी पदकमल तें मारुति धरी ।
उमे ! त्या सौख्याचें कवण तरि तें वर्णन करी ? ॥
तनू रोमाचांनीं भरलि, वदनीं शब्द न निघे ।
अशा भक्तिप्रेमा सहृदयपणें जाण अनघे ! ॥ १५ ॥

चित्र.-श्रीविनयकुमार मित्र ] श्रीराम-हनुमान् [ मानसांक, कल्याण के



" मातें कळे न मुळिंही भजनादुपाय । हें सांगतों, नमित मी प्रभुचेच पाय ॥
निश्चिन्त मी प्रभुकृपेस्तव हो विशेषीं । स्वामी स्वदासि, जननी स्वशिशूसि पोषी" ॥२१॥
ऐसें वदे कवळि आकुळ तत्पदासी । दावी स्वरूप हनुमान् हृदि भक्तिवर्षी ॥
श्रीराम त्या उठवुनी धरि आत्मवक्षीं । सिंचून बिंदु विभु शातवि पंकजाक्षीं ॥२२॥

सुश्लोकमानस-चतुर्थसोपान-किष्किन्धाकांड, तरंग १, पृ. १७७

धरूनी हृदयीं धैर्य करीं स्तवन मारुति ।
माळा कीं भक्तिनें घाली प्रभूसि अति चारु ती ! ॥ १६ ॥
" स्वामिन् ! मीं पुसलें तुम्हा तें असे न्याय्य अंतरीं ॥
परी केंवि तुम्हीं ऐसें सर्वज्ञ पुसणें तरी ? ॥ १७ ॥
आधीं मी चुकलों होतों मायाविवश होउनी ॥
प्रभूसि ओळखायातें आधीं मी चुकलों मनीं ॥ १८ ॥

अज्ञानि मी कुटिलहृद् मतिमंद त्यांत । मोहें वृनाहि मम धी मज भूलवीत ॥
हे दीनबंधु भगवन् ! मजलागि केवीं । तुम्ही सुधी विसरलां मनिं शुद्धभावीं ! ॥
आहेत दोष जरि कीं मम ठायि भारी । दासासि विस्मरं नये प्रभुनें विचारी ॥
मायेमुळेंचि तुमच्या, अति मूढजीव । त्या मुक्तिकारि विभुचीच कृपा सदैव ॥२०॥
मातें कळे न मुळिंही भजनादयुपाय । हे सांगतों, नमित मी प्रभुचेच पाय ॥
निश्चिन्त मी प्रभुकृपेस्तव हो विशेषीं। स्वामी स्वदासि जननी स्वशिशूसि पोषी"॥
ऐसें वदे कवळि व्याकुळ तत्पदांसी । दावी स्वरूप हनुमान् हृदिं भक्तिवर्षी ॥
श्रीराम त्या उठवुनी धरि आत्मवक्षीं । सिंचूनि बिंदु विभु शांतवि पंकजाक्षी ! ॥
बोले विभू "समज ना कमि आपणासी । तूं लक्ष्मणाहुनि रे ! प्रिय मन्मनासी ॥
सारे जरी म्हणति मी समदर्शि होय । मातें अनन्यगति भक्त रुचे स्वकीय ॥२३॥
ज्यातें चराचर गमे प्रभु विश्व सारें । जो आपणासि गणि दास असा तया रे !
ऐसा सुनिश्चय जया हृदिंचा ढळे ना। तो मी म्हणत मम भक्त अनन्य जाण ! ॥२४॥

—॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे कलिकलुषविध्वंसने किष्किन्धाकाडे हनुमद्रामसमागमवर्णनं नाम प्रथमस्तरङ्गः ॥—

## तरंग २ रा

पाहूनि दृष्ट अनुकूल असा प्रभूतें । झाला प्रहृष्ट हनुमान् अतिमात्र चित्तें ॥
बोले "प्रभो ! वसतसे येथ कपीश शैलीं । सुग्रीव दास तुमचा अतिभक्तिशाली ॥१॥
मैत्री तयासह करी करणें प्रभूनीं । जाणोनि दीन तिस्ता अभय स्वयाणीं ॥
दाही दिशासि कपिकोटिहि पाठवोनी। सीतेसि काढिलचि शोधुनि तो प्रयत्नीं"

ऐसें कथोनि समजावुनि त्या द्वयासी । तो नेत बैसवुनि त्यां निज पृष्ठदेशीं ॥
सुग्रीव जैं प्रभुवरा नयनीं विलोकी । त्यातें स्वजन्म अति धन्यचि वाटला कीं ॥
ठेवूनि मस्तक पदावरि भक्तिभेला तो सानुजा मिळत राघववंशनाथा ॥
चिंती कपीश मनिं कीं, "करितील का हे प्रीती विधि! मजवरी, तर धन्य आहें"
तेव्हां । समस्त कळवी हनुमंत वृत्त । दोघांहि पाहि अति आदर भक्तिचित्त !
तो सख्य जोडि दृढ त्यांमधि अग्निसाक्ष । जेणें सुखावत मनीं प्रभु पंकजाक्ष ॥
होतांच सख्य उभयांत विशुद्धभाव । सौमित्र रामचरितासि निवेदि सर्व ॥
सुग्रीव तैं वदत नेत्रिं भरोनि वारि ।"सीता मिळेल, विभुच्या अघुला निवारी
होतों विचार करण्यास्तव मंत्रिमेळीं । मी बैसलों गिरितटावरि एकवेळीं ॥
मीं देखिली युवति शोक करीत जातां । आकाशमार्गें रिपुपाशिं निबद्ध नाथा !
'हा राम रामां' म्हणुनी मुखि फोडि टाहो । आम्हां बघूनि पट खालतिं फेकि ती हो"
श्रीराम मागत तदा, पट तूर्ण दे तो । लावूनि त्यासि उरिं शोक विभू करीतो ॥
सुग्रीव सांगत "विभो ! रघुनाथ ! ऐका । घ्या धैर्य चित्तिं निवटूनि समस्त शोका
ऐशा प्रकारिं करु आम्हि समग्र सेवा । सीता मिळेल झणिं जेविं तुम्हांस देवा!"
ऐकोनि मित्रवच तें हृदिं धैर्य देतें । होई अनेयवल तो प्रभु हृष्ट चित्तें ॥
त्यातें पुसे "कवण कारण या वनांत । सुग्रीव रे! वससि तूं कपिराज्यनाथ ! ?"
सुग्रीव बोलत "विभो ! मम बन्धु वाली । प्रीती अवर्णचि अम्हांमधि भाग्यशाली
'मायावि' नामक मयासुरपुत्र आला । पंपापुरावरति चालुनि एक वेळा ॥ ११॥
वेशीपुढें करित गर्जन मध्यरातीं । मायावि येत, नच वालि सहे अराति ! ॥
धावूनि जाय रिपुपाठिं सवेग वाली । मी बंधुसंगतिंच जाय तयाच काळीं १२
मायावि जाय भिउनी गिरिच्या गुहेंतावाली म्हणे मजसि 'मीहि शिरेन तेथ !
थांबाह दोन जर मी परतेन ये न । मी वाहालो हत असें हृदयात जाण !'॥
मी राहिलों सरसिलें ! दिन तीस तेथ । आला महान् रुधिरपूर तिथे वहात॥
वालीस मारुनि मयादि वधीत वाटे । मी लावुनी मग शिला, करिं रुद्ध वाटे॥
आलोंहि मी स्वपुरिं धावत तांतडींच । माजे अराजक असें बघवाच साच ॥
मार्तेचि भूप सचिवादि मला करीती । वाली, वधूनि अरितें, परते महान्तीं ॥
राज्यीं बघून मज, वालिस येत चेत । मातेहि मारि अरिसा, करि तो अनर्थ ॥
सर्वस्व तो मम हरी, दवितेहि नेती । त्याच्या बळें विकळ मी अतिदैन्य सेवी

मी लस्त दिडुनि फिरें भुवनें समग्र । तो येथ शापवश वालि न येत उग्र ! ॥
माझें तथापि मन भीत असे तयाला।भक्तार्ति जाणत असां प्रभुजी ! दयाळा !"
तेव्हां उभारुनि विशाल भुजासि वीर।श्रीराम गर्जुनि वदे " नच सोड धीर !
वालीस मी वधिन एक शरींच तूर्ण।घाला, हरा, शरण तो जरि जाय जाण !
जे मित्रदुःखिं नच दुःखित अंतरंगें । व्यक्ती अशा बघुनिही अघ फार लागे ॥
ज्यांतें रजःकणपरी निजदुःखशैल । ज्यां मित्रदुःखरज मेरुपरी गमेल ॥१९॥
ऐशापरी कळवळा नच ज्यां मुळींही । ते मित्रता शठ करीति भलेंचि, पाहीं॥
वारोनि दुष्टपथ सत्पथिं चालवीती । झाकूनिया अवगुणां, सुगुणां स्तवीती२०
जे देति, घेति गतशंकचि एकमेक । जे कीं यथाबल करीति हितेंचि नीक ॥
जे संकटीं करिति उत्तम भक्तिपोषा । सन्मित्रलक्षणगणा दरुनि वानि ऐशा२१
तोंडावरी मृदुवचें करि दंभराशी । मार्गें करी कुटिलनीति सुदुष्ट ऐशी ॥
सर्पापरी कुटिल चित्तगती जयाची, । ऐशा कुमित्र नलगे, झणि त्या त्यजाचि!
राजाहि जो कृपण, सेवक जो लबाड । नारी कुशील, कपटात्मक मित्रजोड ॥
हे चार शूल सलया ! दृढ सत्य माझें । विश्वास ठेव, करतों तव कार्य हो जें"॥
बोले सुकंठ " परिसा रघुवर्य ! मात । वाली महाबलि, रणांगणि शूर होत"॥
तो अस्थि दालवि तया मम दुंदुभीचे । तैसेच ताल, बल पारखण्यास साचें२४
लीलेंचि त्यां उलथवी रघुराय वीर । सुग्रीव घे, बल अनन्त बघोनि, धीर ॥
प्रीतीहि वाढलि तया प्रभुपादिं चित्तीं । वालीस तो वधिल ही दृढ घे प्रतीति
तो रामपादिं शिर लावि अनेकवार । जाणोनियां प्रभुसि हर्ष तया अपार ॥
त्या ज्ञान होउनि वदे वचनें प्रभूतें । झालों कृपें प्रभुचिया, स्थिरधी तुझ्यिचें॥
संपत्ति, सौख्य, परिवार महत्त्व हें मी । टाकूनियां करिन दास्यचि एक रामीं!
हीं राममक्तिस विरोधक सर्व होतीं; हें संत भक्त विभुचे वदती सदुक्ति ॥२७॥
जे शत्रुमित्र, सुखदुःख वदू जगांत।मायाच ती गमत, ना परमार्थ होत !॥
वाली गमे परम जो हितकारि माझा । गेला विषाद ! मज लाभत रामराजा !
[वाली गमे परममित्र, कृपाचि त्याची । चिंता निमे, मज तुम्ही प्रभु भेटलांचि]
स्वप्नीं जयासह घडे समरप्रसंग । संकोच वाटत मना जंव येत जाग ॥
आतां कृपा प्रभुवरें करणें अशी ती । सर्व त्यजून दिनरात्रि करीन भक्ति !"
वैराग्ययुक्त अशि ती कपिराक् भवोनी । हांसोनि बोलत विभू शरचापपाणि॥
" जें सांगतोस मज, सत्यचि तें घडणार !।मीही वदें तुजसि सत्यचि जाण सारें"

कीं नर्तवीत नट ज्यापरिं मर्कटास । विश्वा तसा हरि, वदे स्तुति रे! खगेश !॥
सुग्रीवसंगतिं निघे मग रामराय । हातांत चापवर-सायक ज्यास होय ॥३१॥
श्रीराम वालिजवळीं सु-गळासि धाडी। तो जाय गर्जत, मिळे जणुं शक्ति गाढी!॥
ऐकोनि, वालि अति कोपुनि ये लढाया । वारी जरी नमुनि त्या दयिता तदीया॥
वंदोनि ती चरण हातिं, म्हणे "जि! नाथा। सुग्रीव ज्यासि मिळला, प्रभु ते समस्तां
ते दोन बंधु अमितद्युति शक्तिशाली । श्रीरामलक्ष्मण अजेयचि सर्वकालीं!"॥
वाली वदे "परिस गे! दयिते! मदीये। तूं भीरु जाणसि रघूत्तम हा पुढें ये॥
मारील तो जर मला समदर्शि राम । होईन धन्यचि सनाथ, सुखात्मधाम!"॥
बोलोनि हें निघा तो अभिमानशाली। सुग्रीव, वाटुनि तया, तृण काडि झाली ॥
तेजस्वि ते उभयही भिडले धडाडी । मुष्टिप्रहारिं अति गर्जुनि वालि ताडी॥
सुग्रीव वज्रसम तो न सहोनि मार । होऊनियां विकल जाइ पळोनि दूर ॥
रामा वदे "म्हणत मी नच काय होतों? । भ्राता न हा, प्रभुवरा! मज काळ होतो!"
सांगे विभू "तुम्हि समानचि दोन बंधू । भ्रांतीमुळें न कळुनी, न शरेंचि विंधूं!"
सुग्रीवदेहिं निजहस्त रघूत्तमानें । स्पर्शोनि केलि दृढता कुलिशाप्रमाणें ॥३७॥
त्याची व्यथाहि हरिली, गळिं पुष्पमाला। घालोनि धाडि बळाढ्य तया रणाला॥
नानाविधा करिति ते भिडनी लढाई । राहोनि आड तरुच्या रघुवीर पाही ॥
सुग्रीव पुष्कळ करी जरि डावपेच । सामर्थ्य दावि परि हो हृदिं भीत साच!॥
श्रीराम जें निजसखा भयभीत लखी । वालीसि हाणि शर घेउनि नीट वक्षीं।
वाली पडे क्षितिसि आर्त शरप्रहारीं । वेगें उठोनि, तंव राम दिसे समोरी!॥
तो श्यामलाङ्ग शिरिं शोभतसे जटांनीं । रक्ताब्जनेत्र शरकार्मुक सज्जपाणि ॥
लावूनि चित्त निरखी चरणाब्ज वाली । जाणे प्रभूसि, जनि सत्फल मानि झाली॥
सप्रेमचित्त हृदयीं, परि वाक् कठोर । वाली वदे, बघुनि राम उभे समोर ॥
"हे नाथ! धर्मपरिपालनहेतुसाठीं । झाल्यात येथ अवतीर्ण जि! भूमिपृष्ठीं ॥
कां व्याधसे मज तुम्हीं वधिलें असे हें । माझा वदा कवण तो अपराध आहे?!॥
मी वैरि केवि? तुमचा प्रिय का सुहृद?" । तेव्हां वदे वच रघूत्तम त्यासि नीट ॥
"रे ऐक! सून भगिनी तशि बंधुनारी। कन्याहि तेवि समजे, सम होति चारी॥
यांच्याकडे बघत जो जन पापरूप । दुष्टा! वधास बघणें नच दोष पाप ॥
मूर्खा! अनीतिचि तुझा मनि गर्वमान। नाही तुला शिकवि त्याहि न देशि कान ॥
जाणोनिही मम सुसाधित बंधुभागी । मारूं पहासि अधमा! अभिमानसंगी!"

वाली म्हणे "प्रभुजि! नाथ तुम्हीं जगासी। माझी घडे सकलरीतिं चुकीच ऐसी॥
मी कां अजूनिहि असें प्रभुवर्य! पापीं। पावेन अंतिं तरि सद्गति रामरूपीं!"॥
ऐकोनि तें वच सुकोमल भक्तियुक्त। स्पर्शी तयासि शिरिं ठेवुनि आत्महस्त॥
बोलेहि राघव "तुझे असु राखुं, देहा देऊनि तेविं अमरत्व जर त्वदीहा"॥
वाली वदे "परिस गा! करुणानिधाना! मी प्रार्थना करितसें अजि तीस माना॥
हो! जन्मि जन्मि करिती मुनि थोर यत्न। ना अंति येत मुखिं 'राघव'नामरत्न।
जें नाम चिंतुनिच शंकर काशिवासी। भक्तासि देति सुगती नच नाश जीसी॥
तो राम तू दिससि आज मदन्तकालीं। यत्नेंहि का फिरुनि ये घडि भाग्यशाली?
ही आणवोनिहि कधीं नच आणितां ये। केलें मला अजि सुधन्यचि रामरायें!॥

गाति श्रुति ज्या 'नेति नेति' नित तो प्रभु दिसतां मज ऐसा।
दुर्लभ जो मन, पवन जिंकुनी इंद्रियदमनें मुनिंसि तसा॥
जाणुनि मातें अत्यभिमानी सांगे प्रभु मम राख तनू।
कोण असा शठ तोडुनि सुरतरु बाभुळकुंपण करित जणूं?! ॥५०॥

आतां नाथा! करुणादृष्टीं द्या वर जो मी मागतसें।
ज्या ज्या योनित घेइन जन्मां तेथ तेथ तुज भजिन असें॥
विनय -बळें हा मम सुत मजसम मंगलपदिं तव आश्रयिं हो।
धरुनि करीं निज दास करावा अंगद अपुला माना हो!" ॥५१॥

श्रीरामपादकमलीं दृढभक्तियाली। ठेवूनि चित्त निज टाकि तनूसि वाली॥
कीं पुष्पमाळ करिंधरिं घातलेली। गेली गळोनि तरि त्याप्रति ना कळाली!! ॥५२॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे 'सुश्लोकमानसे' कलिकलुषविध्वंसने,
किष्किंधाकांडे वालिवधो नाम द्वितीयस्तरङ्गः ॥

## तरंग ३ रा

वालीस दे रघुपती निजधौल्यधाम। तें पौरलोक धरि आकुलता निकाम॥
तारा विलाप करि दुःखित वालिजाया। तत्केश विस्कटित सावरि ते न काया!
तारेसि दुःखित अती रघुराय पाहे। मायेसि आवरुनि तन्मनिं बोधताहे॥
"भू, वारि, अग्नि, नभ, वायु मिळूनि पाच। हो पंचभूतमयदेह खरान नीच॥

तें हृदय हें तुजपुढें पडलें शरीर । हो नित्य जीव, मग शोक कशास फार!" ॥
तैं ज्ञान चित्तिं उपजे, प्रभुपायिं लागे । श्रीरामभक्ति विमला वर मागुनी घे ॥३॥
हें गौरि! काष्ठपुतळीपरि विश्व सारें । श्रीरामचन्द्र विभु नाचवि याप्रकारें ॥
तो वालिबंधुसि वदे मग योग्यरीतीं । अंत्यक्रिया सकलही करणास ती ती ॥४॥

मग रघुपती सौमित्रीतें वदे समजावुनी ।
'कर कपिपती सुग्रीवाला यथाविधि जाउनी' ॥
रघुवरपदीं वंदोनीया तदा सगळे जण ।
करिति वदलें जें नाथानीं यथोचित योजुन ॥ ५ ॥

सौमित्रि आमंत्रि समस्त पौर । विप्रादिकांतें अविलंबिं धीर ॥
सुग्रीव राजा कपिराज्यि झाला । तैं अंगदाला युवराज केला ॥६॥

रामासम हितकर्ता नाहिं उमे! कोणि अन्य जगतांत ॥
गुरु माता बंधु पिता स्वामी हेही तसे न असतात ॥ ७ ॥
सुर नर मुनि सर्वहि ते असती परि दाखवीति हे रीती ॥
स्वार्थास्तव सगळ्यांची प्रीति असे, स्वार्थ सर्व हेरीती ॥८॥

ज्या त्रास रात्रिदिन वालिभयें अपार । चिंतेमुळें हृदिं घरे, जळतें शरीर ॥
सुग्रीव तो प्रभुवरें कपिराय केला । नाहीं तुला रघुपतिप्रभुच्या कृपेला! ॥९॥
जाणोनिही प्रभु असा, न कसा भजावा? । त्याचेविना सकलतापहि केविं जावा? ॥
त्याची कृपा अमित जाळि विपत्तिजाल । रामा भजाल तर दुःख तरून जाल! ॥

तो सुग्रीवा बोलवूनी पुन्हा घे । नाना रीतीं राजनीतीहि सांगे ॥
बोले "ऐकें, वानरेशा! न यें मी । चौदावर्षे ग्रामिं वा लोकधामीं ॥११॥
वर्षर्तु हा पातला, ग्रीष्म गेला । पर्जन्यार्थी मी निवासीन शैला ॥
सेवीं राज्या अंगदाचें सवें रे । ठेवीं चित्तीं नित्य मत्कार्य सारें" ॥१२॥

आला परत सुग्रीव तेथुनी स्वगृहाप्रती ॥
प्रवर्षण गिरीतें तैं येवोनी राम राहती ॥ १३ ॥

आधींच देव करिती अतिरम्य वेष । राम्या गुहादि गिरिमाजि गुहांमधील ॥
श्री रामराय करुणांबुधि, कांहि काल । येवोनि त्या गिरिवरी वसती करील! ॥१४॥
शोभे अतीव वन तें कुसुमादिकांनीं । भृंगालि गुंजन करी मधुरें ध्वनीनीं ॥
पानें फुलें किसलयें तरि कंदमूलें । शाखीं मनोहर, जधां प्रभु राहुं आले ॥१५॥

पाहोनि सुंदर अतुल्य अशाचि शैल। राहे सलक्ष्मण रघूत्तम साधुशील ॥
येऊनि रूप वनि पक्षि-मृगालि यार्वे। रामासि सेविति मुनी सुरसिद्ध ऱ्हार्वे ॥
तें जाहलें विपिन मंगलरूप पुण्य। श्रीराम येइ वसतीस्तव जैं शरण्य ॥
पाहोनि त्या स्फटिकशुभ्र शिला तिथील। ते बैसती उभय बंधु मनोज्ञशील ॥
सौमित्रिशीं वदत राम कथा अनेका। ज्यां ज्ञान भक्ति विरती नृपनीति रेखा॥
वर्षर्तु काल नभ झाकिति मेघमाला। ज्या गर्जतां सुभग लागति अंतराला ॥१८॥
श्रीराम बोलत तदा "बघ लक्ष्मणा रे॥ हे नर्तती बघुनि मेघ मयूर सारे ॥
येतांचि दृष्टिपथि भक्त रमापतीचा। हर्षे जसा विरतियुक्त गृहस्थ साचा! ॥१९॥
हा मेघ वर्षत नभीं घनघोर नादें। भीती प्रियाविरहिता मम या मना दे ॥
सौदामिनी चमकुनी घनिं गुप्त होत। मैत्री जशी खलजनीं स्थिर ना रहात! ॥
हे वर्षती जलद येउनि भूसमीप। विद्याविभूषित नवे बुध कीं अमूप! ॥
आघात साहति कसे गिरि, बिंदुजात। दुष्टोक्ति जेविं सहती मवि धीर संत॥
क्षुद्रा नद्या भरुनि वाहति वारिपूरीं। थोड्याहि वैभवि वहे खळ गर्वभारीं !॥
पाणी धरे पडुनि पंकिल होत, जेवीं मायेमुळें मलिनता भरतेचि जीवीं ॥२२॥
पाणी हळू हळु भरी सकला तलावा। कीं सद्‌गुणीं भरुनि सज्जन पूर्ण व्हावा॥
जाई समुद्रिं मिळुनी सरिदंबु सर्व। पावे प्रभूसि मिळुनी स्थिरभाव जीव ॥२३॥

गेले हरित तृणांनीं झांकुनि, उमगति न साधु पंथ कसे ! ।
पाखंडवाद करिती सद्‌ग्रंथार्थेंहि गुप्त लुप्त जसे ! ॥ २४ ॥

सर्वत्र दर्दुरव प्रकटूनि येत। कीं विप्रवृंद मिळुनि स्वति घोषतात ॥
ये पालवी नवनवी बहुतां तरूंसी। कीं साधकांतरिं भरे सुविवेकराशि॥२५॥
ते पर्णशून्य तरु अर्क, जवास होती। जैसें सुराज्यिं खळ उद्यमशून्यवृत्ति ॥
शोधूनिही मिळत नाहिं कुठेंचि धूल। कीं क्रोध जेविं उरवी नच धर्म शील!
शोभे धरा सुभग सस्यभरें अतीव। संपत्ति जेविं उपकारिजनीं सदैव ॥
खद्योत दाट तिमिरांत विराजतात। कीं दंभवालिजन लोकसमाजिं होत २७
वृष्टी महा, विघडवीत जलाऽस्त्वाला। नारी स्वतंत्र बिघडे मुकुनि स्वशीला॥
केली कृषी अतुग नुरु कृषीवलांनीं। कीं मान-मोह-मद टाकुनि बुद्धि ज्ञानी॥
देखावयास न मिळे खग चक्रवाक। येतां कली नच मिळे जणु धर्म नीक!॥
वर्षे तरीहि नुगवे तृण वाळवंटीं। ना काम जेविं उपजे हरिभक्तपोटीं! ॥२९॥

शोभे मही विविध जीवसमूहिं पूर्णा । जैसी सुराज्यजनता सुखराशिमग्ना ॥
जेथें तिथें थबकुनी वसले प्रवासी । ज्ञानातिनें अचल इंद्रियवृत्ति जैसी!॥३०॥
केव्हा कहा येउनी गात मोठा । आकाशींचा विरकडे मेघ-साठा ॥
जन्मा येता वधि कोणी कुपुत्र । सद्धर्मानें लोपों जातवत्र ! ॥ ३१ ॥
केव्हा दिनीं निबिड होत घनान्धकार । केव्हा दिसे रवि, घनालि विघूनि दूर ॥
ज्ञानद्युती विलसते, अथवा तुरे ते । सत्संग वा कुटिलसंगति हेतु त्यातें ॥३२॥
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे ' सुश्लोकमानसे ' सकलकलिकलुषविध्वंसने
' किष्किन्धाकाण्डे वर्षाऋतुवर्णनं नाम तृतीयस्तरङ्ग. ॥

## तरंग ४ था

वर्षर्तु जाउनि, पहा, आला शरदृतु मनोहर नितान्त ॥
रे लक्ष्मणा ! वनश्री वर्णायातें कुतूहली स्वान्त ! ॥ १ ॥
ही काशपुष्पि सकला आच्छन्न शोभत कशी धरणी ।
कीं ही वर्षर्तूच्या वार्धक्याचीच भासली करणी ? ! ॥ २ ॥
होता उदित अगस्ती मार्गातिल जल सुकोनिया जाय ॥
कीं लोभ उदित होता हृदयीं तोषासि तुरतसे ठाय ! ॥ ३ ॥
सरिता सरोवरांचें सलिल विनिर्मल अतीव शोभतसे ॥
जाउनि मदमोहादिक सतांचें हृदय सदयशील तसें ! ॥ ४ ॥
ग्यानी जसे हळुहळू ममता त्यजीती । शोषे सरिज्जल, सरोजल त्याचरीतीं ॥
आला बघोनि ऋतु सुंदर शारदीय । ये खंजनालि मुखुनालि मुक्तालि काय ?
ना पंक धूलि अधि शोभाखे धरा ही । कीं नीतिशालि नृपनीति मनोज्ञ राही ॥
संकोच सलिलवर्दी मिनरीति मीन । कीं ते कुटुंबि जन अन्न धर्म विहीन! ॥६॥
मेघाविहीन नभ निर्मल शोभताहे । आशाविहीन भगवज्जनचित्त का हे ? ॥
हो शारदी विरल वृष्टि कुठे कुठे हा । भक्ती मदीय जशि अन्य जनींच काहीं ! ॥
हर्षोनि हे नगर सोडुनि जाति त्यागी । राज, वणिग्जन, तपस्वि तसे भिकारी ! ॥
पाणोनि माशि हरिनी त्यजिती भना । चार दि कीं भरयातिल आश्रमी ते ! ॥
नीरीं अगाधि सगळेहि सुखात मीन । निर्भीत ज्यापरि जन प्रभुभक्तिलीन ॥
शोभे सरोवर जसें कमळें फुलून । कीं ब्रह्म निर्गुण जसें गुणयोगि पूर्ण ! ॥९॥

हे गुंजती भ्रमर गोडिस ज्या तुला न । नाना मनोहररवीं खगवृंदगान ॥
देखोनि रात्र अतिदुःखित चक्रवाक । देखोनियां परघनें खल मानि दुःख ॥
तृष्णार्त चातक निनादति दुःखितान्त । कीं शंभुशत्रु सुख लेश न पावतात ॥
नाशीत चंद्रचि जसा शरदातपाला । सद्भक्तदर्शन निवारित पापमाला ॥
चंद्रासि देखत चकोरसमूह तैसा । होतो प्रसन्न हरिला हरिभक्त जैसा ॥
थंडीमुळें मशकदंश नुरे कुठेंहि । कीं विप्रमत्सर कुलासहि नाशि वाही ॥
वर्षर्तुकालिं बहु जीव भरोनि ठेली । आतां धरा शरदिं त्याविण शोभलेली ॥
कीं लाभतां जगति सद्गुरुसंग जैसा । भ्रांत्यादि संशय समूह रिघे विनाशा ॥

सरत्र वर्षर्तु पहा आला शरदृतु नितान्त निर्मल हा ॥
नाहीं अद्यापि कथा सीतेचा शोधसमय येत अहा ॥ ॥१४॥
समजोचि एकदां ती आहे अमुकस्थलीं म्हणुनि सीता ॥
काळासहि जिंकुनि मी तिजला आणीन निमिष ना जातां ॥१५॥

होवो कुठेंहि, जर ती असली जिवंत । यत्नें करून तिज आणिन मी अनन्त ॥
सुग्रीव तो मजसि विस्मरल्याचि वाटे । तो राज्य-कोप-युवती-पुरिं काल कंठे ॥
मीं ज्या शरें वधियला खलाहि वाली । तेणेंचि मारिन उद्यां खळ हा सकाळीं ॥"
ज्याच्या कृपें नुरति कोपमदादि वैरी । स्वप्नींहि कोपवश तो नच होय गौरि ॥
ज्याची रती खुरदांबुजि हो पवित्रा । ते ज्ञानि सन्मुनिच जाणति या चरित्रा ॥
तैं लक्ष्मणें गणुनि कोपवश प्रभूतें । केलें सुसज्ज धनु घेउनि बाण हस्तें ॥
तेव्हा दयांबुधि अपार असाच राम । बंधुप्रती समजवूनि वदे स्वकाम ॥
"दावूनि भीति नुसती मजपाशिं आण । सुग्रीव तो मम सखा प्रिय तात ! जाण" ॥
चित्तीं विचार इकडे करि मारुती कीं । सुग्रीव चित्ति नच राघवकार्य राखी ॥
जाई तयानिकट शीर्षि पदीं नमूनी । सामादि चारि विधि जाणवि त्या स्ववाणीं ॥
सुग्रीव तें परिसुनी भयभीत होई । बोले "कुसे विषय लोपविती मती ही !
आता अशेचि करिं वायुसुता ! झणीं रे । सर्वत्र धाडिं कपि दूतसमूह सारे ॥२१॥
त्यां सांग 'जो न परतेलचि अर्धमासीं । राहेन मीच वधित्याविण ना तयासी'" ॥
तैं बोलवी पवननंदन सर्व दूतां । सन्मान त्यां बहुपरीं करितो समस्तां ॥२२॥
प्रीती तसें भय, सुनीतिहि त्यांसि दावी । सारेहि ते नमुनि त्या निघती सुभावीं ॥
ये तोंच लक्ष्मणहि त्या कपिच्या पुरींत । क्रुद्धा बघूनि कपि धांवत जेथ तेथ ॥

श्रीलक्ष्मण स्वधनुतें चढवूनि बोले। "जाळीन मी नगर हें क्षणि अग्निलोळ!"।
होती समस्त पुरवासि अतीव भीत। तों तेथ वालिसुत अंगद वीर येत ॥२४॥
सौमित्रिनें नमुनि तो पदपद्मिं माथा। प्रार्थी तया अभय लक्ष्मण दे विनीता।
सक्रुद्ध लक्ष्मण, असें परिसूनि कानीं। बोले कपीश अति आकुल भीतवाणी ॥
"तारेस ने तुजसवें हनुमंत! तेथें। श्रीलक्ष्मणा समजवीं सुविनीत उक्तें" ॥
तारेसमेत हनुमान् मग लक्ष्मणातें। जाऊनि वंदि सुयश स्तवि पुण्यगीतें ॥
प्रार्थूनि त्यासि निजमंदिरिं आणवूनी। प्रक्षाळि तच्चरण मंचकिं बैसवूनी ॥
सुग्रीव लक्ष्मणपदाबुजिं शीर्ष भेगी। घेई भुजीं, कवळि लक्ष्मण त्या स्वकंठीं॥
सुग्रीव बोलत "विभो! विषयासमान। मोही मुनींसहि क्षणीं असलें दुजें न!" ॥
ऐकोनि ती विनयवाक्, सुख लक्ष्मणातें।तोही तया बहुपरी समजावि तें तें २८
सांगे तया पवननंदन सर्ववृत्त। शोधार्थ दूतगण धाडियलेचि होत ॥
सुग्रीव हर्षभरिं घेउनि अंगदादि। सौमित्रिपाठिं मग ये, प्रभुभेट साधी ॥२९॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे कलिकलुषविध्वंसने किष्किन्धाकाण्डे
लक्ष्मणस्य सुग्रीवसमीपगमनवर्णनं नाम चतुर्थस्तरङ्ग. ॥

## तरंग ५ वा

श्रीरामपादिं शिर ठाउनि जोडि हस्त। बोले "नसे मदपराध मुळींहि नाथ!॥
मायाचि देव अपुली प्रबळा अती हे। सोडील ती, जर दयाकर राम पाहे!॥१॥
होतीच लोक विषया वश सर्व नाथा! मी तों पशू कपि अतीवचि कामचेता!॥
ज्यांचे कटाक्षशर ज्या नच लागतीच। तो हे रघूत्तम तुम्हासम होय साचा! २
जो क्रोध घोरतिमिरा रजनींत जागा। ज्या लोभपाश न गळ्याप्रति बांधिला गा!
तो वाटतो नर तुम्हांसमान धन्य। ना या गुणा तव कृपेविण हेतु अन्य"।
बोले तदा रघुपती स्मितयुक्त बोल। " मद्बन्धु तू भरतसा प्रिय मन्मनाला॥
आतां करीं सकलयत्न मनेंचि साचा। लागेल शोध क्षणि ज्यापरिं जानकीचा"
ऐशापरी जव तयांमधिं होति गोष्टी। आले तिथें कपिसमूह अनन्त कोटी॥
त्यांचे किती विरसती वनुवर्ण नाना।त्यांच्या यथार्थ करि कोणिहि वर्णना ना।

ती मी उभे ! कपिचमू निरखीलि डोळां।मोजूं बघेल तिज तो जणुं मूर्ख भोळा।
येवोनि ते नमिति रामपदीं स्वशीर्षी। देखोनि रामवदना हृदिं हर्ष वर्षी। ६
ऐसा न कोणि कधि त्या चमुमाजिं राही।रामें न ज्यासि पुसलें कुशलादि कांहीं
आश्चर्य यांत कसलें ? प्रभुराम आहे। व्यापोनि विश्वहि समग्र परोपरीं हें ॥७॥
आज्ञापिलें कपि उभे मग ठाइंठाईं। सुग्रीव त्यासि समजावि निजोक्ति कीं हीं॥
" हो रामकार्य-मजही उपकार मोठा। जाहो ! क्षणींच कपियूथ समस्त वाटां॥
कादाचि शोधुनि तुम्ही जनकात्मजेसी।या परतुनी ! परतुनी मज एक मासीं ॥
शोधाविना समय टाळुनि येति जे कीं।त्यां मी वधीनचि धरा नच यांत शंका"
तें ऐकतांच वच वानर सर्व जाती। चोहोंकडे त्वरित शोध करूं पदाती ॥
सुग्रीव तैं जवळ घे निज बोलवूनी। ते वायुपुत्र, नल, अंगद वीर तीनी १०
"हे नील ! अंगद ! मरुत्तनया !" वदे तो "ऐका सुजाण ! धृतिमन्त ! निदेश देतों
जावें तुम्ही सकल सङ्कट दक्षिणेतें। सर्वां पुसा जनकजा कवण्यास्थलीं तें !
देहं वचं, मनिं करा अतियत्नधीर। श्रीरामकार्य करणें तुम्हिं हें समग्र ॥
पृष्ठीं रवीस भजणें, उरिं अग्निलागीं। स्वामीसि निष्कपट भावें समग्र अंगीं! !
माया त्यजून, परलोक सुखें भजावा। जेणें पुन्हां सकल संसृतिशोक जावा! ॥
पावोनि जन्म जर सार्थक देहिं व्हावें। सोडूनि काम भजणें प्रभु राम भावें १३
तो हो गुणज्ञ सकलांपरिं तो सुधन्य। कीं जो रघूत्तमपदीं रत हो अनन्य !!"
आज्ञा अशी मिळवुनी नमुनी कपीशा। रामा स्मरूनि निघती धरुनी प्रहर्षा॥
रामप्रणाम करि मारुतिराय अंतीं। बोलावि त्यासि निकटीं प्रभु हेतुचित्तीं ॥
स्पर्शोनि मारुतिशिरा करपंकजानें। दे मुद्रिका स्वकरिंची, निजदास जाणे
सांगे "अनेकपरिं तूं समजावि सीते। ये शीघ्र सांगुनि बला, विरहादि येथें॥
तेव्हां गणी सुफल मारुति आत्मजन्मा। गेला धरूनि हृदिं तो करुणाब्धि रामा॥

प्रभु श्रीराम तो जाणे जरी वृत्तान्त सर्वही ॥
त्राता तो देवदेवांचा राजनीति जपे महीं ॥ १७ ॥

शोधावया निघति वानरयूथ सारे। रानें नद्या सर गिरी सकल प्रकारें ॥
श्रीरामकार्यरत तन्मन गाढ होतां। त्यां देहभानहि नुरे, श्रम केविं चित्तां? ! ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे 'सुश्लोकमानसे' कलिकलुषविध्वंसने किष्किन्धाकाण्डे सीतान्वेषणाय कपिविसर्जनं नाम पंचमस्तरङ्गः ॥

## तरंग ६ वा

कोठें कुठें जर निशाचर त्यांस भेटे। एकेक देउनिच त्यां वधिती चपेटे!! ॥
त्यांनीं अनेकपरिं धुंडिलि अद्रिरानें,। भेटे कुठें शुनि तरी मिळती सुभानें॥१॥
झाले तृषार्त अति ते कपि, त्यां मिळेना। पाणी कुठेंहि चुकती पथ हिंडताना॥
तेव्हां करीत हनुमान् हृदयानुमान। आम्हांसि ये मरण, ना जर वारिपान॥२॥
तें पर्वताग्रिं चढुनी हनुमान् विलोकी। सर्वत्र, तों विवर कौतुकि भूत देखी! ॥
जेथूनि हंस रिघती, बक, चक्रवाक। पक्षी उडोनि शिरती विवरीं अनेक॥३॥
तेव्हां गिरीवरुनि मारुति खालिं येत। सर्वांप्रती विवर नेउनि दर्शवीत ॥
त्यांनी पुढारि करुनी पवनात्मजातें। ते होति शीघ्र विवरीं तर्पि सर्व जाते॥४॥
उद्यान तेथ दिसलें सकलां तयाना। तैसा सरीं विकसिताम्बुजराजि नाना॥
होतेंहि मंदिर मनोहर जें नितान्त। नारी तपोद्युतिमयी वसली तयांत ॥ ५ ॥
दूरूनि वंदिति तिला नतशीर्ष सारे। ती जें पुसे, कथिति ते सगळें विचारें।
सांगे तयांस जलपान करावया ती। सुस्वाद सुंदर फळेंहि तयांस देती॥६॥
स्नानादि ते करुनि खाति फळें रसाळ। आले तिच्या जवळि ते मग काहिं वेळ॥
सांगीतली मग तिनें स्वकथा समूळ। बोले "रिघेन रघुराय जिथें दयाळ!॥७॥
डोळे मिटा तंवर या विवरा त्यजाल!। चिंता त्यजा जनकजेप्रति सर्व जाल!"
ते नेत्र घेति मिटुनी मग जों पहाती। तों सर्व सिंधुतटिं पोचति ते क्षणान्तीं॥८॥
रामाकडे निघुनि जाय तपस्विनी ती। त्याचे पदाम्बुजयुगीं नमि ती सुभक्ति ॥
नानापरी स्तवुनिया विनवीत रामा। दे भक्ति राम तिज उत्तम सौख्यधामा॥९॥
गेली पुढें बदरिकाश्रमिं ती सुधन्या। चित्तीं स्मरूनि रघुनाथपदां अनन्या॥
ज्या ध्याति वंदुनि उमापति तेविं धाता। अत्यंत भक्तिभरिं लाभुनि तोष चित्ता॥
सारे कपी बसुनि चिंतिति अब्धितीरीं। 'आतां सरेल अवधी झणिं' या विचारीं॥
"नोहेचि कार्यलवही! न चले उपाय। सीता कुठें न कळतें, करणें जि! काय?॥
डोळे भरूनि म्हटलें मग अंगदें कीं। "दोहीं परीं मजसि निश्चित मृत्यु ठाकी॥
शुद्धी न लागत मला मुळिं जानकीची। सुग्रीव खास वधणार गमे मलाचि! ॥
ताताशि मारुनि मला वधिता कपीश। मी वांचलों, करि दया प्रभु रंकजाश॥
मातें वधीलचि, गमे नच यांत शंका। ऐसें वदे बहुत वालिज सर्व लोकां॥१२॥

ऐकोनि अंगदवचा कपिवीर शोकीं । होऊनि मग्न, नयनीं बहु नीर ये कीं ॥
शोकार्त ते क्षणभरीं, वदती परी ते । "ना शोधितां जनकजे न फिरूं गृहातें ॥१४॥
हे अंगदा ! कपिवरा ! युवराज वीरा !" । ऐस म्हणोनि रिघती कपि सिंधुतीरा ॥
दर्भांसि तेथ पसरूनि कपी समस्त । ते त्यांवरी बसति चिंतनशीलचित्त ॥१५॥
जैं जांबुवंत वधि दुःखित अंगदासी । बोले तया सदुपदेशवचें विशेषीं ॥
"ताता ! न तूं समज मानव मात्र रामा । तो ब्रह्म निर्गुण अनादि, जया न सीमा ॥
हा ब्रह्म कीं, सगुण राघव रामराय । तद्भक्तिपूत अम्हि धन्य सुभागधेय ॥
स्वेच्छेंचि हा अवतरे प्रभु भक्तपाल । गोविप्रदेवबसुधावन हेंचि शील ॥१७॥
आम्ही असे सगुणसेवक सर्वरीतीं । त्यातें भजूं त्यजुनि मोक्षसुखादिकें तीं" ॥
ऐशा तदुक्ति बहु चालति अब्धितीरीं । संपाति अद्रिकुहरीं परिसे–विचारीं
येवोनि बाहिर बघे कपि ते अनन्तामानी " दिलें विधिकरें जणुं खाद्य होत !
आतानि खाइन तयां सकलां, क्षणांत । खाण्याविना मरत मी बहुकाल येथ!
आहार पोटभरि आजवरीं न देता । आतान्न एक समयीं परि दे विधाता !"
तें गृध्रवाक्य पडतां श्रवणीं कपींहि । उद्गारती " मरण आजि चुके न कांहीं!!"
संपातिलें बघुनि ते उठले समस्त । तैं जांबुवन्त मनिं चिंतित भीतियुक्त ॥
बोलेहि अंगद मनामधिं चिंतुनीयां ।"नाहीं जटायुसम लोकिं सुधन्य कीं या !
श्रीरामकार्यिं तनुतें त्यजिलें तयानें । भाग्येंचि किं निज पुरा हरि त्याप्रती ने !"
ती हर्षशोकयुत ऐकुनि सर्व वाणी । संपाति त्यांनिकट ये, कपि भीति मानी !
घोर करी पळति, पाहुनि गृध्रराया । देऊनि त्यां धरथ थांबवि तोहि ठायां ॥
देई तया अभय, सर्व विचारि वृत्त । तेही तयासि सगळे मग तें कथीत २४
संपाति ऐकुनि तदा निजबन्धुकीर्ति । तोही स्तवी बहुपरी प्रभुराममूर्ति ॥
सांगे "मला जलधिच्या तटिं वाहुनी न्या।बंधूसि देइन तिलांजलि मी सुधन्या !
तुम्हासही करिन साह्य, वदोनि कांहीं।सीतेसि शोधुनि बघा; मिळवाल तीही!"
बंधुक्रिया करुनि तो मग अब्धितीरीं।बोले, "कथा निज कथीन तुम्हासि सारी
दोघेहि बंधु अम्हि यौवनिं आधि होतों।तेव्हा नभीं रविकडे उडु लागलों तों–
मागें जटायु परते, रविते न साहे । मी मात्र जाय रविसन्निध, आयका हें !
गेलों । मी उडुनि दग्ध मदीय पंख । मी भूवरी पडत, ओरडलों सशोक ॥
तों 'चंद्रमा'-मुनि दयाळु पाहि मातें । ज्ञानादि सांगुनि मला समजावि तें तें

नानाप्रकारि कपि हो ! मज तो विरोधी । देहाभिमानरहिता मम तो करी धी॥
' त्रेतायुगीं धरिल जें सगुणावतार । सद्ब्रह्म तें दशरथात्मज रामवीर २८
भार्या तदीय दनुजाधिप तें हरील । शोधार्थ राम कपियूथहि पाठवील ॥
ते भेटताचि तुज, होशिल तूं पुनीत । येतील पंखहि पुन्हां, नच हो उचित !
कोठें असे जनकजा कथि रामदूतां '– हें वाक्य आज मुनिचें मधि सत्य होतां
ऐका तुम्ही मम वचा, प्रभुकार्य साधा । लंका त्रिकूटगिरिमाजि वसे अबाधा॥
तीचेवरी करित रावण राज्य देखा । त्यातें न भीति लवही, नच चित्ति शंका!
त्याच्या अशोकवनि ठेवियली सशोका।सीता दिसे मजधि, ना जरि तुम्हि देखा
गृध्राधि दृष्टि अति तीक्ष्ण, तशी न कोणा।नेणें तुम्हांस न दिसे, मम शब्द माना
मी जाहलों बहुत वृद्ध अशक्त होई । नाहीं तरी वितरतों लव साह्य मीही!
जाईल जो उडुनि हा शतयोजनाब्धि । तो रामकार्य करणार अपारबुद्धि ॥
पाहूनिया मजधि धीर धरा कपी हो ! कैसें शरीर मम रामकृपेंचि हें हो ! !
जो कोणि आठविल पापिहि रामनाम । तो हा भवाब्धिहि अपार तरी निकाम!
आहांत दूत तुम्हि त्या प्रभु राघवाचे।ध्याऊनि राम हृदिं, कार्य कराचि साचें।"
हे गौरि ! सांगुनि असें जंव गृध्र जाय । सारे कपी करिति विस्मय की अभय
आपापल्या कथिति सर्व कपी बलातें । ओलांडण्या जलधि त्यां परि धैर्य नातें
तें जाम्बुवंत म्हणतो "अजि वृद्ध मी हों।नाहींच पूर्विल मला बल लेश तें हो!
झाले त्रिविक्रम जधां प्रभु हे खरारि । होतों तदा तरुण, तें मज शक्ति भारी!
बांधीत जैं बलिस तैं प्रभुरूप मोठें । ज्या वर्णना जगिं नाहिच शक्ति कोठें!
त्यातेंहि दोन घडिमाजिंच सात वेळ।आलों प्रदक्षिणिं पळोनिच मी सलील !"
सांगेहि अंगद "जरी मज येइ पार । जाया, परी परतण्या मज नाहिं धीर !"
तें जाम्बुवंत वदला "जरि तूं समर्थ। स्वामी अशा तुज अम्ही त्यजणें न युक्त!"
तें मारुतीस वदला वच ऋक्षराज "कां गप्प तूं ? बल अपार तुझेंचि तेज !
तूं वायुसूनु बल वायु तुझें तसेंच । विज्ञानबुद्धि मतिसागर तूंच साच !॥
हे तात ! कार्य तरि तें कुठलें जगांत? । होणार जें न करण्याप्रति तू समर्थ
हो रामकार्य करण्या अवतार तुझा !" हो अद्रिसा परिसतां क्षणिं तो महौजा!
सौवर्णवर्ण नटला कपिराज साच । मेरूचि की अरर ! त्या तुलना नसेच !!
तो सिंहनाद करि गर्जुनियां किती तें !"लीलेचि लंघिन, अपार न अब्धि मातें

मारीन रावण, समेत तदीय सेना । आणीं त्रिकूटहि विपाटुनि, सत्य माना ॥
हे जांबुवत ! पुसतो तुज, सांग माते । दे तू मला सदुपदेश विशुद्ध चित्तें"
तें जांबुवत वदला "कर एवढेंचि । सीतेसि ये बघुनि, आणचि शुद्धि तीची॥
येईल तो रघुपती कपिसैन्यसंगे । राजीवनेत्र विभु तो कुतुकान्तरंगें ! ॥४३॥

कपिसेनान्वित राम रावणा वधुनि आणितिल सीतेतें ।
तें त्रैलोक्या पावन करि यश, सुर मुनि नारद वर्णिति ते ! ॥
प्रभुयश गाउनि, ऐकुनि, वानुनि, चिंतुनि नर ये परमपदीं ।
रघुवरचरणाम्भोरुहमधुकर तुलसि गात तें स्वच्छंदीं ! ॥४४॥

रघुवरचरणाम्भोरुहमधुकर तुलसि गात तें स्वच्छंदीं ! ॥४४॥

भवारिभेषज असें यश राघवाचें । जें ऐकतील जन गातिल वा स्ववाचें ॥
त्याचे मनोरथ करीलचि पूर्ण सारे । श्रीरामराय करुणाबुधि सत्प्रकारें ! ॥४५॥
नीलोत्पलापरि सुनील तनू जयाची । कीं कामकोटिसुषमाहि उणीच साची ! ॥
त्याचें अनन्तगुणवर्णन आयका हो ! । तन्नाम पापखगगणाघ्नक, गायका हो ! ४६

किष्किन्धाकाण्डाचे गायन हें आवडो सदा रामा ॥
'रामा'च्या हृदया या देवो प्रभुगान नित्य आरामा ! ॥४७

॥ इति शम् ॥

श्रीरामचरितमानसानुवादे 'सुश्लोकमानसे' सकलकलिकलुषविध्वंसने किष्किन्धाकाण्डे हनुमदादिवानराणां संपातिसमागम समुद्रतीरगमनवर्णनं नाम षष्ठस्तरङ्गः ।

इति श्रीरामचरितमानसानुवादे श्रीखण्डेकुलचिन्तामणितनुजरामचन्द्रकविरचिते 'सुश्लोकमानसे' महाकाव्ये रामायणे कलिकल्मषविध्वंसने विमलसन्तोषसंपादनो नाम चतुर्थः सोपानः श्रीसीतारामचन्द्रकृपया संपूर्णः

## —* इति किष्किन्धाकांडः *—

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तु ॥

## — श्रीकमलेश्वरस्तुति * —

हृदय–सत्कमल कमलेश्वरा । नमुनि भक्तिभर प्रभुवरा ॥
विनत मी सदया विनवीतसें । प्रभुवरा ! मम हृत्कमलीं वस ॥ १ ॥
विमलता मम हृत्कमलीं भर । सदय सुंदर भो कमलेश्वर !
कमलिनी मम मानसनन्दिनी । तुज समर्पित मी पदिं वदुनी ॥ २ ॥
अजि मला घडलें तव दर्शन । अमृतमेघ करी जणु वर्षण ॥
तुजसि वदुनि धन्य गमे मना । पुरविं रे ! मनिंच्या शुभकामना ॥३॥
तव पदाम्बुजिं सतत मग्नमन । वसुनि नित्य करो तव गायन ॥
तव कृपानिधि हा मम वैखरी । करिल सत्कविता रसनिर्झरी ॥ ४ ॥
हृदयिं मानस, 'मानस' सुंदर । तुलसिदासकृती सुमनोहर ॥
रचुनि काव्यमयी मम भाविनी । तुजसि अर्पुनि होइन मी कृती ॥ ५ ॥
प्रभुवरा ! वरदा ! वर दे असा । कवनिं गाइन मी तव सद्यशा ॥
सहज अज्ञचि मी अति पामर । परि कृपा करिं भो ! परमेश्वर ! ॥ ६ ॥
हे कोरदाव जणु सुंदर चन्द्रकोर । जी शोभत तव शिरीं, सुघना अपार ॥
सेवीति सादर तुझे प्रिय जे चकोर । हा त्वत्प्रसाद कमलेश्वर ! हे उदार !! ॥७॥
'श्रीखण्डे कुल मला कमलेश्वर तू विभो ! विकासविता ॥
कविताकमलाष्टक हे ' राम ' तुला वाहि तू सकलसविता ॥ ८ ॥

॥ इति श्रीभवानीकमलेश्वराभ्यां नमः ॥

[* मी प्रथमच ता १९।१२।५३ कोरगाव–पडणेमहाल गोवा यथील आमचे कुलदैवत श्रीकमलेश्वर यांचे दर्शनार्थ गेलों असतां रचलेले हे कविताकमलाष्टक श्रीकमलेश्वरपदीं अर्पण केले आहे. ]

# महत्त्वाचें शुद्धिपत्रक

| पृ. | श्लोक | शुद्ध |
|---|---|---|
| १३ | १५५ | प्रेम स्वकीय० |
| १४ | २ | म्हणूनि अर्जुनीहि० |
| २० | ८८ | बोलुनीयां |
| २१ | ४ | केला अर्थ |
| २४ | १५ | राज्यदाना |
| २४ | १७ | रामविरहा |
| २४ | १८ | जणुं |
| २५ | २८ | पुण्यशील |
| २५ | ३० | प्रकारें |
| २५ | ३७ | श्लोकांक १७ ऐवजीं ३७ |
| २६ | ४० | हृत्प्रीतिचीं |
| २६ | ४९ | मातेसही |
| २६ | तळची ओळ | मातेसमीप |
| २७ | १ | राजतनये ! |
| २७ | ४ | गोड वाणी |
| २८ | ९ | जलाविण |
| ३० | २८ | तुम्हांसि बोलवुनि |
| ३१ | ८ | हृदिं दुःखहि० |
| ३५ | ६ | परि हें कैकेयीवच |
| ३८ | ७ | सकलार्ति० |
| ३९ | १८ | निषादपति व श्लो. १९व२७ची दुरुस्ति. पृ. १४२ वर पहा. |
| ४० | ३७ | आव्यहृदया० |
| ४१ | ७ | रामराय प्रबोधी |
| ४१ | ८ | कठिनहि |
| ४२ | १४ | संकोचुनी |
| ४२ | १९ | त्यजुनियां |
| ४३ | ३२ | जगेल कैशी !' श्लोकांक ३१ ऐवजीं ३२ हवा |

| पृ. | श्लोक | शुद्ध |
|---|---|---|
| ४४ | ३ | " हे नाथ ! |
| ४५ | २री ओळ | श्लोकांक १० हवा |
| ४५ | १७ | त्यां करोनी |
| ४५ | २३ | श्लोकांक खालून दुसऱ्या ओळीस हवा |
| ४७ | १० | निषादराय |
| ४८ | १ | ० कन्यकेसि ० |
| ४८ | २ | " अशा तुम्हा० |
| ५० | २१ | शेषावरी जोंवरि |
| ५० | २४ | काढुनी !" हवें |
| ५० | २७ | धावा करीत |
| ५२ | ९ | तेहि धन्य ! |
| ५२ | १६ | लाभे रामधामीं० |
| ५४ | ६ | मज |
| ५६ | ४ | तनूवि वेंचिते |
| ६० | ४ | जणु सावल्या या ! |
| ६१ | ३ | ते चालता |
| ६१ | ८ | दुभंग ! " |
| ६१ | ९ | स्वचित्त |
| ६७ | २० | कृपादरपूर्ण |
| ६८ | २३ | भेट दिलीत |
| ६९ | ४१ | शत्रुघ्न तें० |
| ७३ | २५ | मुनीन्द्रहि वसिष्ठ निमग्न होई |
| ७३ | ३० | दुरुस्ती पृष्ठ १४२ वर पहा |
| ७४ | २८ | शोक योग्य |
| ७५ | ३ | तुझ्यावरुनी |
| ७९ | ४ | कैकयीच्या |
| ७९ | ६ | की येि |
| ८० | १७ | राज्याभिषेकास्तव |
| ८३ | ११ | कोटि अगाध |

| पृ. | श्लोक | शुद्ध |
|---|---|---|
| ८३ | १४ | लागे निषाद० |
| ८५ | ३७ | केलें एकलें पुण्यधाम |
| ८८ | ५ | कैकेयिचाहि |
| ९२ | ४ | वर्षति देव पुष्पें |
| | ८ | चित्तामधें त्याचिया |
| ११० | ४ | प्रभुहृदयिंची |
| ११२ | ३५ | वाडे घोर |
| | ३० | श्लोकांक १० ऐवजी ३० हवा |
| ११४ | ८ | शृंगार |
| | १३ | निदेश । लाजेल |
| १२० | ३ | सीतेच्या आश्रमासि |
| | ८ | ऐकू सुधा |
| १२१ | १८ | त्या तुम्हा मी कथन करणें कोणता जी! निदेश? |
| १२३ | ६ | ब्रह्माण्ड० |
| १२६ | १७ | तातमाता |
| १२७ | २८ | कल्याण देती ॥ |
| | २९ | विबुधविनती |
| | २९ | स्वार्थी |
| १२८ | ५तळ.ओळ | केली जये ही सकलप्रकारा |
| १३३ | ४७ | शैलाचिया सविध |
| १३५ | ६२ | नयनाभिराम |
| | २ | सर्वांचें शब्द ये न वदनास ! |
| १३७ | २९ | ती प्राकृता समजणें नच बुद्धि शुद्धा |
| | ३१ | ऐकोनि मन्त्रिभरता जन कार्यि लागे |
| | ३२ | प्रार्थोनिया |
| १४० | २६ | तेजो० |
| | २६ | सद्धर्मधैर्य |
| | २८ | दैवी प्रभुस्तुति० |
| | ३१ | निदेश त्याचा |
| १४३ | १ | आनंद दे बो हृदया अमेय |

| | | |
|---|---|---|
| १४७ | ४ | अघम समब नारी जी न सेवी पतीतें |
| | १५ | घर्मधीर |
| | लळची ओळ | ज्याच्या समान न दुजा, कुटुनी विशेषें |
| १४९ | ९ | मुनि शुद्धचित्त ॥ |
| १५१ | १७ | राक्षसाख्य गजसंघि |
| | १९ | संशयी ० |
| | २३ | विपिना ० |
| | २६ | कळेचि ! |
| १५२ | ९ | अनि तुम्ही |
| १५२ | १० | माहात्म्य जें तरिहि तें० |
| १५३ | २ | ० विहगमृगवृंद ० |
| १५६ | २१ | अरिसैन्य |
| | २१ | विद्युत्प्रभाधर मनोरा घनाभिराम |
| | २४ | हो सर्व सैन्य० |
| १६२ | २ | चित्तहरणा हरिणा |
| | ४ | दक्षवृत्ति |
| १६३ | २१ | चित्तान तत्पद नमी सुखवी मना जें |
| १६४ | ३० | मत्पाणितीर्थि० |
| १६८ | २५ | पाण्याविना घन० |
| | २३ | जें दर्शनें० |
| १७० | १५ | ० विचार ! ” |
| १७७ | १८उत्तरार्ध | प्रभूपि ओळखायाते शकलों मी न मन्मनीं ॥ हवा |
| १७७ | २३ | तू लक्ष्मणाहुनिहि रे ! ० |
| १७८ | ११ | पपापुरावरर्ति० |
| १७९ | १९ | ज्यातें रजःकण० |
| १८० | ३२ | कोपुनि ये लढाया। |
| १८४ | ९ | शोभे सरोवर तसें कमळें फुलून । |
| १८५ | १९ | तेव्हा दयाबुधि |
| १९२ | टीप ओळ१ | ता. १९।१२।५२ |
| | ओळ२ | कुलदैवत श्रीकमलेश्वर यांचे दर्शनार्थ |

श्रीरामपादुकाप्रदान रंगित चित्रकार श्रीद्विजेन्द्र ऐवजीं श्रीरवींद्र असें वाचावें.

तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहम् ।
श्रवणमङ्गलं श्रीमदाततं भुवि गृणन्ति ते भूरिदा जनाः ॥
श्रीमद्भागवत १०-३१-९

— श्री —




गोस्वामी श्रीतुलसीदासजी यांच्या श्रीरामचरितमानसाचा
मराठी सुरस श्लोकानुवाद

# भाग तिसरा

पंचमसोपान-सुंदरकांड, षष्ठसोपान-लंकाकांड व
सप्तमसोपान-उत्तरकांड.

—: रचयिता :—

कॅ. डॉ. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे, एम्. बी., बी. एस्.
'वाङ्मय-श्री-खण्ड' 'सुश्लोक गोविन्द' 'कुन्दमाला'
'सुश्लोककुमार' 'सुश्लोकमेघ' 'सुश्लोकमानस'
इ. चे संपादक, प्रकाशक व रचनाकार.

प्रथमावृत्ति
श्रीरामनवमी शके १८७७
तारीख १ एप्रिल १९५५ इ.

मूल्य ५ रुपये

—

श्लोकमानस-सुंदरकांड-लंकाकांड व उत्तरकांड यांतील कांहीं चित्रप्रसंग ३

मैनाकाचा सन्मान (पृ. २, श्लो. १) लंकिनीचा उद्धार (पृ. ४, श्लो. ४)









रावणाच्या दरबारांत (पृ. १२, श्लो. २१) मारुतिपुच्छास पेटविणें (पृ. १३, श्लो. १)

४ सुश्लोकमानस-सुंदरकांड-लंकाकांड व उत्तरकांड यांतील कांहीं



लंकादहन (पृ १२, श्लो. १२)



बिभीषणावर चरणप्रहार (पृ.२१,श्लो



शरणागत बिभीषण (पृ. २२, श्लो २१)



नागपाशबंध-लीला (पृ.६६, श्लो. १३)

रावणाला मुष्टिप्रहार (पृ.७३, श्लो.१७) रामासाठीं देवरथ पृ ७७, श्लो २४)







रावणाची माया (पृ.७७, श्लो २६)



रावणवध (पृ.८६, श्लो.९)

६ सुश्लोकमानस सुंदरकांड-लंकाकांड व उत्तरकांड यांतील कांहीं चित्रप्रसंग

आनन्दोत्सव (पृ १०१, श्लो. ८) प्रभूंचें ऐश्वर्य (पृ. १०३, श्लो. २५









मंगल आरती (पृ १०४, श्लो ३३.) रामसख्यांचें गुरुवन्दन(पृ १०४, श्लो.४५)

॥ श्री ॥

'सुश्लोकमानसा'चा हा सुंदर-लंका-उत्तरकांडात्मक
तृतीय भाग

श्रीमद्रुइयाकुलभूषणा श्रीसीतारामचंद्रभक्तिरसमधुपी
पुण्यशील सुपुत्रवती महोदारहृदया

## श्री. सुव्रतादेवी रामनारायण रुइया

यांस

त्यांचें श्रीरामचरितमानसप्रेम

व

सुश्लोकमानसानें त्यांना झालेला सात्त्विक आनंद पाहून

**अत्यंत आदरानें समर्पण करीत आहें**

धन्य श्रीमत्साध्वी अतुल श्रीरामचरितरसरसिका ।
श्रीसुव्रता तियेला वाटेल न गोडि राम-मानसिं कां? ॥१॥

सदाशीर्वादाभिलाषी
रामचंद्र चिंतामण श्रीखंडे
श्रीरामनवमी, शके १८७७
[ १ एप्रिल १९५५ ]

# उपोद्घात वा मंगल तोरण

सुश्लोकमानसाची अखेरची तीन हस्तलिखित कांडें डॉ. श्रीखंडे यांनीं पहावयास दिलीं ती त्याच्या पूर्वभागाप्रमाणेंच चांगलीं उतरलीं आहेत. सुंदरकांडांत सीतेनें रावणास ' शून्याश्रमातूनि मला हरिलेंस चोरा ।। निर्लज्जचित्त तुज खंत न या प्रकारा ! ॥ ' हें उत्तर जसें बाणेदारपणानें दिलें आहे तसेंच टक्केदार भाषाशैलीनें डॉक्टरांनी तें मराठींत निनादित केलें आहे. असे प्रसंगोचित संभाषणप्रकार ह्या विभागांत जागजागीं विखुरले आहेत हनुमंताचें लंकादहन त्रुटें आहे पण तें येथें रसभरित काव्यवाणीनें वर्णिलेलें वाचून ' प्रतिक्षणिं नवीच दे रुचि ' ह्या पंतवचनाची आठवण करून देतें

लंकाकाण्डांत वीर व रौद्र रस चांगले साधले आहेत. रामलक्ष्मणाचे प्रताप ज्या उत्कटतेनें डॉक्टरांनीं वर्णिले आहेत त्याच उत्कटतेनें त्यांनीं कुंभकर्ण, इंद्रजित् व रावण यांनीं वानरसेनेची केलेली दाणादाणही चित्रित केली आहे. तुलसीरामायणांत सर्वत्र व्यापून असलेला भक्तिरस सुश्लोकमानसांतही तसाच रचलेला आढळेल.

डॉ. श्रीखंड यांची वाणी अनेक सत्कवींच्या उत्कृष्टकृति मराठींत सरस व आकर्षकपणें वर्णून सहजरम्य बनली आहे तुलसीदासाचें हिंदींतील रामचरित मानस मराठींत सुश्लोकमानसाचा सुरम्य वेष घेऊन अवतरलें आहे. आपला दीर्घोद्यम तडीस गेल्यानें आपली सभाग्यकृति " सीतारामपदाभोजीं राम सुश्लोकमानस । अर्पि प्रेमाश्रुपूरानें सगद्गदितमानस ॥ " अशा भक्तिभावानें अर्पण करतांना जी धन्यता डॉ श्रीखंड यांना वाटते तीच मराठी रसिकांना हा त्यांचा वाङ्मय यज्ञ यथासांग परिपूर्ण झाल्यानें वाटल्य यांत शंका नाहीं. आर्षीय सीतारामचरित्र अत्यंत पवित्र व मनोज्ञ, तेंच भक्तिरसाच्या गोडवाणीनें गावून तुलसीदासांनीं नितांत पावन व मनोहर केलें त्यांतील पावनपणा व हृदयंगमता मराठींमध्यें असाधारणपणें उतरविण्याचें जें यश डॉ श्रीखंडे यांनीं मिळविलें त्याबद्दल त्यांना यावा तेवढे धन्यवाद थोडे आहेत.

२।१०।५४ नवी दिल्ली. ग. स. अळतेकर.

श्रीशंकरो जयति

# प्रस्तावना

अहो जी ! माझेनि स्वामी । मज संत जोडलेति तुम्हा ।
देखलेति तेणें सर्वकामीं । परिपूर्ण झालों ॥ १७७५

पहा पां मातें तुम्हा सांगडे । माहेर तेणें सुरवाडें ।
ग्रंथाचें आलियाडें । सिद्धी गेलें ॥१७७६

काय बहु बोलों सकळां । मेळविली जन्मफळा ।
ग्रंथसिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ॥१७८५

मिया जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा ।
तो पुरवूनि जी बहुवसा । आणिलों सुखा ॥१७८६

पुढती पुढती पुढती । इया ग्रंथपुण्यसंपत्ती ।
सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होइजे ॥ १८१० अ.१८ ज्ञानेश्वर

श्रीसीतारामचंद्रकृपाप्रसादानें सुश्लोकमानस महाकाव्याचा हा तृतीय भाग रसिक भक्तांना अर्पण करितांना मला आज अत्यंत आनंद वाटत आहे. २३-५-१९४२ ला शुभसंकल्प करून केव्हा येथें केवळ आरंभलेलें, पण मुख्यतः २३-३-१९४७ पासून आतांपर्यंत हळूहळू धिमेपणानें रचना करून श्रीकृपें १४-७-५४ संपूर्ण झालेलें हे प्रचंड कार्य खंडशः तीन भागांत प्रकाशित करूं शकलों याची किती धन्यता वाटत असेल याची कल्पना सहृदयांस आल्यावाचून राहणार नाहीं ! श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं वरील ओव्यांत ग्रंथसिद्धीचा सोहळा पूर्ण करून जन्मसाफल्य प्राप्त झाल्याचा अवर्णनीय आनंद जो व्यक्त केला आहे तो किती यथार्थ आहे त्याची मला ,आज सानन्द प्रतीति येत आहे ! आणि सर्व रसिक सुहृदांनीं व महोदारांनीं या ग्रंथाच्या परिपूर्ततेस जो हातभार लावलेला आहे त्याचा मी सानन्द कृतज्ञतेनें गौरव करतो.

सुश्लोकमानसाच्या या तृतीय विभागात श्रीतुलसीदासाच्या श्रीरामचरितमानसाचीं शेवटचीं तीन काडें— सुदरकाड, लंकाकाड व उत्तरकाड हीं अनुवादिलेलीं असून त्याचे श्लोक पुढीलप्रमाणें झाले आहेत:—

| | | |
|---|---|---|
| सुंदरकाड (तरंग १३) | श्लोकसंख्या | ३६१ |
| लंकाकाड (तरंग २६) | ,, | ८५२ |
| उत्तरकांड (तरंग ३६) | ,, | ९६० |
| इतर | ,, | ६ |
| | एकूण | २१७९ पद्यसंख्या |

याप्रमाणें सर्व सुश्लोकमानस ग्रथाची श्लोकसख्या ६७३० चे आसपास झाली आहे.

सुदरकाडाचे अथवा पचमसोपानाचें दुसरें नाम ' ज्ञानसंपादन ' असेंहि प्रचारात आहे. सुदरकाडाचें सुदर हें अभिधान कसें पडलें असावें याची सयुक्तिक उपपत्ति लागत नाहीं. सुमेर काड असेंहि या काडाचें नाम एका ' मानस ' प्रतींत आढळतें ( प्रयागच्या पचकोषी समितीनें प्रकाशिलेलें श्रीरामचरितमानस पहा ) सर्वच काडें सुदर आहेत मग याच एकाला ' सुदर ' अभिधान का ?

सुदरे सुदरो राम· सुदरे सुदरी कथा ॥
सुदरे सुदरी सीता सुदरे किं न सुदरम् ॥१॥

अशा आशयाचें सुभाषितहि क्वचित् विद्वन्मुखात आढळतें तें एक रसिक चतुरोक्ति म्हणून विचारणीय आहे यात शका नाहीं

सुदरकाडातले अनेक प्रसग श्रीतुलसीदासानीं निरुपम सौंदर्यानें वर्णन केलेले आहेत. प्रथमतः रामदूत हनुमान् अनेक सकटावर मात करून लकेंत प्रविष्ट होतो, बिभीषणाची भेट व त्याचे सल्ल्याप्रमाणें अशोकवनिकेंत सीतादर्शन, मुद्रिकाप्रदान इत्यादि प्रसग कवींनीं फारच हृदयस्पर्शी रीत्या वर्णन केले आहेत. सीतेस रामविरहात जीवन असह्य होतें व

त्रिजटेकडून ती अग्नि मिळवूं इच्छिते परंतु तें अशक्य झाल्यानें सीता अशोकाचे लाल कोवळे पल्लव पाहून हा अशोक तरी अग्नि देऊन मला अशोक करील काय असें म्हणते. तोंवर अशोकवृक्षावर झाडींत बसलेला मारुति श्रीराममुद्रिका खालीं हळूंच सीतेकडे फेंकतो! सीतेस वाटतें अशोकानें दयाळुपणें आपणाकडे अंगारच फेकला! परंतु मुद्रिका पाहून हर्ष व शोक दोनीहि सीतेस होतात. या नाट्यमय प्रसंगास तुलसीदासानीं प्रसन्नराघवनाटकांतील काव्यकल्पनांचा (अंक ६-३० ते ३८) सुंदर अनुकार केलेला आहे. पुढें मनोहर असा हनुमज्जानकी संवाद आहे ( तरंग ४ ) लंकादहन व तत्पूर्वी रावणपुत्र अक्षय याचा मारुतीनें केलेला वध, रावण हनुमत्संवाद, सीतेचा निरोप व खुणेसाठीं तिनें दिलेला चूडामणि घेऊन श्रीहनुमान् परत समुद्राच्या पैलतीरीं येतात तो व पुढें रामभेटीचा प्रसंग फारच सुरस असा आहे. कपिसैन्य सिद्ध करून श्रीरामलक्ष्मण लंकेकडे प्रस्थान करतात तो प्रसंगहि ( त. ७ ) आश्चर्यकारक असाच आहे. इकडे लंकेंत बिभीषण, माल्यवंत मंदोदरी वगैरेंचे उपदेश रावण मुळींच ऐकत नाहीं. उपदेश करणाऱ्या बिभीषणास रावणानें लत्ताप्रहार केला तेव्हां तो रामाकडे येण्यास निघतो तो प्रसंग ( त. ९ ) भक्तिरसानें भरलेला आहे. रामबिभीषणभेट व संवाद अद्‌भुत सौरस्ययुक्त असून बिभीषणाचे उद्गार संस्मरणीय आहेत—

" स्वप्नींहि तोंवरि मनास कुठून शांति। जीवासही कुशललाभ कुठून होती।
टाकोनि काम सगळाच विपत्तिधाम। ना जोंवरीं भजत हें मन गोड राम! ४
हे तोंवरी हृदयिं दुष्ट करीति वास। ते मोह, लोभ, मद, मत्सर, मान, रोष।
ना जोंवरी रघुपती शरचापहस्त। राहे उभा शरनिषंग कटीसि युक्त! ६
रामप्रतापरविभा जंवरीं नुदेली। अज्ञान-घोर-रजनी तंवरींच ठेली।
जी द्वेष-रागमय या सुख दे उलूका। जी आसराच ममतातिमिरासि देखा ।।७।।
—सुंदरकांड तरंग १०

श्रीरामाचें बिभीषणास सांगणेंहि फार रसाळ व सिद्धांतमय आहे—
" माता, पिता, स्वजन, बंधु तसें कलत्र। तें देह गेह धन वा परिवार मित्र ।।
यांचे ममत्वमय ताग वळून चोख। बांधीं तसें स्वमन मच्चरणां सुरेख!"।।१२
( सुं. त. १० )

*रामाच्या भाषणानें बिभीषण अत्यंत समाधान पावतो, तो म्हणतो—*
बोले " चराचरविभो रघुराय ! ऐका । सर्वां हृदीं वसतसां शरण त्रिलोकां ॥
होती हृदीं प्रथम जी लव वासना ती । वाहोनि नेलि विभुभक्तिसरिज्जलान्हीं १९
( सुं. त. १० )

असो. सुंदर कांडांत सीतेचा शोध लागणें ही अत्यंत आनंदप्रद व *सुंदर गोष्ट घडून आली असल्यानें सुंदर शब्दाचें खरोखरच समर्थन करावेंसें* वाटतें. श्रीरामचरितमानस या ग्रंथातील हेंच कांड असें आहे कीं पुष्कळ लोक हें कांड नित्य पाठात ठेवतात. रामाच्या मनःकामना पूर्ण होण्याचा उपक्रम या कांडांत होतो तसाच भाविकभक्ताच्याहि मनःकामना या लहान-सर पण महाप्रभावी कांडाच्या वाचनानें परिपूर्ण होण्याचा अनुभव येत असलाच पाहिजे.

यानंतर सहावें लंकाकांड हें २६ तरंगात विभागलेलें आहे. कांहीं रामचरितमानस प्रतींत या कांडास वाल्मिकिकृतींतल्याप्रमाणें युद्धकांड म्हणूनहि संबोधिलेलें आढळतें. *मानसरूपक या बालकांडांतल्या तरंगात* लंकाकांडात वर्षर्तुशोभा आहे असें वर्णिलें आहे—

*भीषण निशाचरांचीं केलें जें तुमुल युद्ध घनघोर ॥*
*वर्षर्तु तोच सुरकुलशालीतें सुखद पय्यक्र थोर ! ॥*
सुश्लोकमानस प्रथम सोपान त. १२—श्लो. २१

प्रस्तावनेंत लंकाकांडाचें सविस्तर वर्णन करणें स्थलसंकोचामुळें शक्य नाहीं. तथापि कांहीं वेंचक उल्लेख केले पाहिजेत. या कांडाच्या मंगलाचरणातहि युद्धाचा बीभत्स असलें वर्णन केलें आहे:—

परमाणू निमिषे लव युगवर्षे कल्प हे प्रचंड शर ।
कोदंड काल ज्याचें त्या रामा भजनि, का मना ! उशिर ? ॥ तरंग १—७

*प्रारंभीच, सुंदर ठिकाणीं रामानीं केलेली श्रीरामेश्वरस्थापना अतिशय* मनोहर आहे. नंतर सेतुबंधवर्णनहि अद्भुतरसानें नटलेलें आहे. पुनः लंकेंत मंदोदरी रावणाचें मतपरिवर्तन करण्याचा व्यर्थ प्रयत्न करते. इकडे सुवेल शैलावर प्रभुरामचंद्राचें अत्यंत सुंदर असें वर्णन आहे तें शब्दचित्र हृदयांत कायमचें ठसावें असेंच आहे. ( लंकाकांड त. ३ )

" सुवेलशैलीं इकडे रघूत्तम । सेनेसवें वास करी मनोरम ॥
उत्तुंगशृंगा अभिराम देखुनी । स्वच्छा समा भू रुचली तयां मनीं ॥१॥
तेथें तदा लक्ष्मण आपुल्या करीं । शय्या सुमें पल्लव आणुनी करी ॥
आच्छादि ती रम्य मृदू मृगाजिनीं । कृपाल त्या बैसत राम आसनीं ॥२॥
सुग्रीवाच्या अंकिं ठेवूनि शीर्ष । डाव्या बाजू ठेविलें कार्मुकास ॥
भाता ठेवी दक्षिणागीं कडेला । दों हस्ताब्जीं बाण सांभाळियेला ॥३॥
कानीं सांगे मंत्र लंकेश काहीं । पादाभोजें चेपिती भक्त दोंहीं ॥
नानारीतीं मारुती वालिसूनू । भक्तिप्रीती तद्‌हृदीं केविं वानूं ? ॥४॥
वीरासना घालुनि वीर लक्ष्मण । प्रभूपदीं सज्जनि राहि बैसुन ॥
हस्ताबुजीं बाण तसे शरासन । निषंगशोभा कटिभाग–भूषण ॥५॥
देशापरीं सद्‌गुणधाम राघव । नवांबुदश्याम असा दयार्णव ॥
ध्यानीं असा यन्मन लीन संतत । ते धन्य होती नर भक्तिभूषित " ॥६॥

पुढें चंद्रोदयशोभा पाहून रामाचा विरहभाव उद्दीपित होत असतां रामचंद्रांनीं चंद्रावर कृष्णता का ? असा प्रश्न बरोबरच्या मंडळींना केला, तेव्हां कोणी काहीं कोणी काहीं कल्पना लढवतात. स्वतः प्रभूहि सांगतात कीं बहुधा गरलाला बंधु इंदूनें हा ठाव स्वहृदिं दिला आहे ! म्हणून विरहांत चंद्र असह्यतापद होतो. श्रीहनुमंत सांगतो, ' चंद्र तुमचा भक्त आहे. त्यानें स्वहृदयात ठेवलेली प्रभूंची सुश्याम मूर्तिच असा भास उत्पन्न करीत आहे ! ' अर्थात् प्रभूंना या कल्पनेनें फार आनंद झाला. असा इकडे भक्तिभावसंपन्न विनोद चालला आहे, तर समोर लंकेंतल्या त्रिकूटपर्वत-शिखरावर रावणाचा संगीत-विलास चाललेला मेघादींचा आभास उत्पन्न करीत आहे ! प्रभूंनीं बाण सोडून रावणाचें छत्र, कुंडलें, मुकुट इत्यादि पाडले. तथापि रावण तो अपशकुन न समजतां उद्दाम धैर्यवृत्तीनें उद्गारतो—

'हो ! शीर्षपातहि जया शुभकारि साचा । त्याचा कसा मुकुटपात अमंगलाचा ?'

ती संगीतसभा विसर्जन झाल्यावर मंदोदरी पुनश्च रावणास राम-शत्रुत्व सोडण्याचा व सीतेस परत देण्याचा हितकारि उपदेश करते;

रामाचें विराट् स्वरूप ती अद्भुत काव्यात्मकतेनें वर्णिते. परतु रावणास सर्व उपदेश विफल होतात—कवि सागतात— पृ. ३८

'वेतास येत फल पुष्प न वा कदापि। पीयूषवृष्टि जरि मेघ तयास ओपी!॥ तैसें न मूर्खहृदयीं कधि ये प्रकाश। लाभोनिही गुरु तया विधि वा महेश!' १२

नतर अगदशिष्टाई वर्णनातीत सुदर वर्णिली आहे! (त. ५,६,७) पुढें मदोदरी पुनः रावणास आर्ततेनें उपदेश करते. पण सर्व व्यर्थ!

इकडे रामाकडे अगद येतो. व रावणाचे जे चार उज्ज्वल मुकुट राघवाकडे फेकून दिलेले असतात ते म्हणज साम दाम दड भेद हे राजाचे उदार सद्गुण रावणाला सोडून तुमच्याकडे आले, ही अगदाची चतुरोक्ति प्रभूस फारच आनदविते. (त. ८) नतर प्रत्यक्ष युद्धवर्णन आहे, तें 'रामरावणयोर्युद्ध रामरावणयोरिव' या अनन्वय अलकाराच्या सूक्तीप्रमाणें निरुपम असेंच श्रीतुलसीदासानीं अद्भुत सौंदर्यानें वर्णिलें आहे. त्यात लक्ष्मणमूर्च्छागमनवर्णन (त. ११) *हनुमदौषधानयनवर्णन ( त. १२ ) यामधील श्रीरामचद्राचे लक्ष्मणाविषयीं* शोकोद्गार व भरत–हनुमद्–मीलन–प्रसग, व सत्वर द्रोणागिरीसह हनुमताचें येणें इ. प्रसग फारच हृदयस्पर्शी आहेत! राम व सर्व कपिसैन्य लक्ष्मण-मूर्च्छेमुळें विकल झालें असता हनुमान् औषधींसह अवतीर्ण होतात— त्याचें साहित्यदृष्ट्या वर्णन अत्यत बहारीचें आहे– ( *लकाकाड त. १२* )

"ऐकोनिया श्रवणिं तो प्रभुचा विलापा झाले मनीं विकल सर्व कपी उमाप १४ तों त्यात पोंहचत येउनि वायुसूनु। कारुण्यपूर्ण रसिं तो रस 'वीर' मानू। श्रीराम मारुतिस भेटत हर्षराशी। सुज्ञ प्रभू अतिकृतज्ञ धरी उराशी॥" ४२

पुढें कुभकर्णवध, मेघनादवध, इत्यादींचीं वर्णनें ( त १३,१४ ) अत्यत वाचनीय आहेत.

रामरावणयुद्धास प्रारभ ( त १५ ) होताना ज्या विजयरथाचें वर्णन रामचद्रानीं बिभीषणास सागितलें आहे तें श्रीरामचरितमानसाचें अणु सारभूत असेंच अति उज्ज्वल तत्त्वकाव्य आहे–

" पाहूनि रावण रथी विरथीच रामा। झाला बिभीषण अधीर मनीं निकामा॥ प्रीती अती उपजवीत मनांत भीतिस्नेहें नमूनि पदपद्मि वदे निजोक्ति १७

'हे नाथ ! ना रथ तुम्हां अनवाणि पायां कैशाप्रकारिं बलवान् अरि जिंक्य होय?'
तेव्हां वदे विभु तयास कृपानिधान।'ये ज्या रथें विजय तो रथ अन्य जाण ।
ज्या शौर्यधैर्यमय दोन रथास चाकें।ज्या सत्यशीलमय हे ध्वजयुग्म ठाके ॥
घोडे जया बलविवेकदमोपकार । ज्याला क्षमा गुण दयासमतादि दोर १९
ज्या ईशभक्तिमय सारथि सुज्ञ ऐसा । वैराग्यढाल जणुं खड्ग सुतोष जैसा ॥
ज्या ज्ञान हें परशु, शक्ति उदंडबुद्धि । विज्ञान तेंच वरकार्मुक ज्या त्रिशुद्धि
माता विशुद्धमन सुस्थिर होय ज्यासाया बाग़ जाण नियमांस शमा-यमांस
ज्या विप्रसद्गुरुसमर्चन हें सुवर्म । ऐसें दुजें न विजया सदुपायमर्म ।॥२१
सद्धर्मरूप रथ यापरिं ज्यास होय । जिंकील कोण अरि त्या, जगिं तो अजेय !
जिंकील तोच भवरूपमहाखळाला । मित्रा ! जयास रथ यापरि हो मिळाला॥
संसाररूप अरि दुर्जय जिंकिणारा । तो जाण वीर सखया मतिमान् सुधीरा !'
ऐसें प्रभूक्त परिसोनि बिभीषणानें । वंदीयलें प्रभुपदांबुज हर्षपूर्णें ॥ २३ ॥
राम युद्धात अजेय आहे असें पाहून रावण अद्भुत मायायुद्ध करतो. तें वीररसानें भरलेलें आहे. तुलसीदास काव्यमयी निरुपम वाणीनें वर्णन करतात—

' माया सरतां ऋक्षकपी मुदिं परतति घेउनि गिरितरुंना ।
शरवृष्टीनें राघव पाडी रावण-मस्तक-हस्त पुन्हां ॥
श्रीरघुपति-दशकंधर-संगर गातिल जरि का कल्पभरीं ।
शेष-शारदा-निगम-कविव्रातें पावति ना ते पार तरी !!! ॥२९॥
प्रभुचे गुणगण करि लव वर्णन तुलसिदास हा मंदमति ।
मशक ज्यापरीं निजबलमानें बघत उडाया गगनपथीं ! ॥
छेदियले कर-शिरें कितीदा, लंकापति तरि तो न मरे ।
क्रीडा प्रभुची सिद्ध-मुनि-सुरां व्याकुळवी परि, ती न सरे ! ॥३०॥

शेवटीं रावणवध होऊन—

शामावली प्रभुमुखीं दशकंठदीप्ति । ब्रह्मा महेश अति हृष्ट बघूनिया ती ॥
ब्रह्मांडही भरुनियां 'जय' शब्द राहे !। "श्रीरामराय ! जयराम ! रघूत्तमा हे "
त्या पुष्पवृष्टि करिती मुनिदेववृंद । उद्घोषती "जय कृपाळ ! विभो ! मुकुंद ! ॥
हे विश्वनाथ ! जय राघव ! रामराया ! । सीतापते ! जयजयाजि विभो ! अमेया !

जय करुणाब्धे, द्वंद्वविनाशा ! शरणागतसुखवितरण रे !।
खलदलदारण आदिकारणा ! करुणायतना नाथ हरे !" ॥
सहर्ष वर्षति कुसुमें सुरगण दुंदुभि निनदुनि बहु गगनीं ।
संग्रामांगणिं रघुकुलमणि तो शोभे मनसिज-कोटिंहुनी ! ॥१४॥
जटामुकुटिं शिरिं शोभति सुंदर मधें मधें सुमराजि कशा ! ।
नीलगिरीवरि तडिल्लतांसह उडुगणकांती सजुनि जशा !
भुजदंडीं शर चाप फिरवितां तनुवरि सजले रुधिरकण ।
तमालवृक्षीं सुखीं बैसले रायमुनीखग चारुगण ! ॥ १५ ॥

पुढे सीताशुद्धिप्रसंग आहे. पावकामध्यें मायासीता नाहींशी होऊन खरी सीतादेवी अग्निनारायण श्रीरामास देतो त्यावेळचें दृश्य किती मनोज्ञ आहे पहा—[ तरंग २२ पृ. ९० ]

पाहे महाग्नि जेव तो पुढतींच सीता । द्रवें भरे हृदयिं, भीति न लेश चित्ता॥
बोले " मनोवचनदेहिं उरीं मदीय । रामाविना जर न अन्य गतीच होय ॥

तर हे भगवन् अग्ने ! सर्वान्तर्याम जाणका ।
पावका ! स्वप्रभावानें श्रीखण्डासम होशि कां !" ॥ ३८ ॥

श्रीखण्डापरि पावकिं शिरली प्रभुतें ध्याउनि जानकी ।
निज यत्पदा 'जय जय रामा !' म्हणुनि वंदितो शिव हर कीं ॥
प्रचंड पावकिं सदा जळे प्रतिबिंब, कलंकहि लौकिक तो ।
अगम्य हेतु प्रभुचा, गगनीं चकित सिद्ध मुनि सुर करितो ! ॥३९॥
अग्नि प्रकटुनि निजपाणीं श्री, वेदस्तुत जगिं विदित अशी ।
घेउनि अर्पी रामा, लक्ष्मी क्षीराब्धी जशि विष्णूसी ॥
वामविभागीं श्रीरामाच्या शोभत रुचिरा अतिशय ती
नवनीलाब्जानिकट वाटली कांचन-पंकज-कलिकुनी ! ! ! ॥४०॥

विजयी श्रीरामचंद्राचें मोठ्या हर्षभरानें स्तवन सर्व देव–सिद्धगणादिकांनीं केलें. पुलकितांग होऊन व गहिंवरून विधात्यानें प्रभूची स्वतंत्र स्तुति केली ( त. २३ ) त्याचप्रमाणें देवेंद्रानेंहि श्रीरामचंद्राचें स्तवन केलें. या व पुढेंहि अनेक ठिकाणीं आलेल्या सर्व स्तुति म्हणजे अतिशय भक्ति-

प्रेमभराचे हृदयोद्गार आहेत. व त्यामुळें त्या सूक्ति नितान्त रम्य झालेल्या आहेत. वेंचक अवतरणें देत आहें—

"आहोन देव अग्निहि हे परमाधिकारी। स्वार्थान्ध भक्ति तव विस्मरुनीच सारी॥ तेणेंच नित्य बुडलेंत भवप्रवाहीं। आलों तुला शरण रक्षण तूंच वाहीं" ॥६॥

हे देवाचे उद्गार. किंवा, पुढील (श्लो. १७,१८)

'अजि करिंच दया तूं दीनबंधो! दयाळा। विषममति मदीया त्यावि तूं रे लयाला सुखचि गणुनि दुःखा सेवतों सर्वकाळा। करितचि विपरीता सर्व मी कर्मजाला निवडुनि खल सारे शोभसी सुक्षमेनें। अनिश भव भवानी स्वस्पदीं हृष्ट होणें॥ अखिलनृपतिरत्ना, या वरा एवढ्याच। तव शुभपदिं वाढो मद्रती नित्य साच'

हे विधात्याचे उद्गार अतिशय उद्बोधक आहेत. त्याचप्रमाणें देवेन्द्र म्हणतो—

"होता मातें हा अभिमान। कोणि न जगतीं मजसि समान॥
आज पाहुनी प्रभुपदकमलें। गर्वमान मम दुःखहि शमलें॥३१॥
गाती श्रुति ज्या अव्यक्तातें। ध्यावीतहि जें ध्याउं पहातें॥
प्रीति परी मम कोशलभूपीं। श्रीरामाच्या सगुणसुरूपीं॥३२॥
सीता लक्ष्मण यासह रामा। माझ्या हृदयीं कर विश्रामा॥
जाणुनि मातें दास आपुला। रमापते दे भक्तिच मजला" ॥३३॥

त्या भावनाची यथार्थता श्रीतुलसीदासांनीं अत्युत्कटतेनें पटविली आहे. नंतर भगवान् श्रीशंकर श्रीरामचंद्राची भक्तिप्रेमोद्रेकानें सगद्गद स्तुति करतात (तरंग २४) त्यांतील उद्गार पहा—

"कमललोचना दुःखमोचना। प्रणततोषणा दीनतारणा॥
अनुज-जानकीयुक्त मन्मनीं। वस रघूत्तमा! तूं निरंतरीं दिनीं॥१३॥
त्रिभुवनोत्तमा श्याममुंदरा। मुनिमनोहरा तापसंहरा॥
तुम्हिदासहृन्नाथ सौख्यदा। हृदयिं मी नमीं राघवा सदा॥१४॥

हे नाथ! कोसलपुरीमधि होय जेव्हां। राज्याभिषेक तुमचा बघणार तेव्हां॥ प्याहीन उत्सव मनोहर तो अनन्य। होईल चित्त मम हें अतिमात्र धन्य।"१५

यानंतर पुष्पक विमानानें श्रीजानकीलक्ष्मणादिसमेत अयोध्येकडे श्रीराम येतात तेव्हां सीतेला महत्त्वाचीं सर्व स्थळें-रणांगण, सेतु, वनवासांत

निवास केलेल्या त्या त्या जागा, ऋषिस्थानें, दंडकवन, गंगानदी प्रयाग इ. दाखवितात.

" सीतेसमेत राघव करित अयोध्येसि वंदन कृपाल ।
लोचन भरले सलिलीं तनु पुलकीं हृदय हर्षभरिं लोळ ।। ६ ।।
तरंग २६, लंकाकांड

भागीरथीस व दूर दिसणाऱ्या अयोध्येस प्रभु वंदन करतात. त्रिवेणींत प्रभु सर्वांसह स्नान करतात. रामाज्ञेनें बटुरूप घेऊन हनुमान् भरताकडे कुशल कळविण्यास जातो इकडे गुहाला राम आल्याचें कळतांच तो प्रेमभरानें 'गड्यांनो नावा, नावा!' म्हणून हाकारतो. मग त्याला कळतें कीं प्रभु पुष्पक विमानानेंच आले. गंगापार होण्यास त्यांना नावेची आवश्यकताच नाहीं! तुलसीदासांनी हा प्रसंग अतिशय स्वभावप्रीतिद्योतक असा वर्णिलेला आहे. गुंसाईजी या लंकाकांडाची फलश्रुति सांगतात—

" जे सुत कीं वाचति राघवाचें । चरित्र युद्धीं विजयी प्रभूचें ।।
करील त्यांला भगवान् अनन्त । विवेकलक्ष्मीजयभूतिमन्त" १८, त. २६

यानंतर सप्तमसोपान उत्तरकांड यांत आपण प्रविष्ट होतों. हें कांडहि अद्भुत, मनोहर व काव्यमय असें आहे. भरताला हनुमान् बटुवेषानें रामागमनाचें अत्यानंददायी वृत्त कळवितो तो प्रसंग अत्यंत बहारीचा व भक्तिरसानें अपूर्व नटलेला आहे. ( तरंग १ ) हनुमान् भरत रामाकडे येऊन ते सर्व विमानानें अयोध्येकडे जातात. सर्वांच्या आनंदाचें वर्णन काय करावें? भरत वंदन करताना त्यांची स्थिति पहा—

'हस्ताब्जि घे भरत रामपदांबुजातें । वंदीति देवमुनि साम्बमहेश ज्यातें १८
भूमीं पडे भरत तें उठता उठेन ।। घे त्या उरीं निज दयानिधि ऊचलून ।।'
तो श्यामलांग पुलकीं भरला दयार्द्रानेत्रीं नवाम्बुजसमीं जलबिंदु सांद्र १९

श्रीरामचंद्र सर्वांना भेटतात. कौसल्यादि मातांचें अंतःकरण किती भरून आलें असेल! कवि सांगतात—

" तान्ह्या वत्सा त्यजुनि गृहीं, वनिं धेनु चराया नेलेली ।
सांजे नगरा हुंबरत धावे फुटुनी पान्हा त्यांजवळीं ।।

भेटति सकला माता प्रेमें प्रभुसि मोलुनी लडिवाळ ।
विरह-विपत्ती दग्ध होउनी अमित हर्षसुख ये जवळ ! ॥ २९ ॥
उत्तरकांड त. २

सर्व पौरजनांचा प्रहर्षर्दि अवर्णनीय आहे. अयोध्येचा सर्वत्र शृंगार, तोरणें, पताका, हेमकलश, इ. मंगलें, सुगंधी द्रव्यजलानें रस्त्यांचें सिंचन, हस्तिमुक्ताफलांची तोरणें व माला, नाना प्रकारची सुस्वर मंगल वाद्यें, गायनें व सर्वांचे सानन्द आशीर्वाद इत्यादि सर्व मांगल्याला तुलनाच नाहीं !

नानारीतीं शोभलीं मंगलें तीं । वाद्यें नाना मंगलें वाजताती ॥
ओवाळाया सिद्ध सर्वत्र नारी । आशीर्वादां हर्षुनी देति सारी ॥३॥
घेऊनीया आरत्या स्वर्णताटीं । ओवाळीती अंगना रामभेटीं ।
गाणीं गाती सुस्वना हर्षपूर्ण । मांगल्याला ना तुला अन्य कोण ! ॥४॥
त्या आरती आर्तिहरा करीती । श्रीभानुवंशाबुजभानुतें ती ॥
उत्साह सर्वत्र अतीव नादे । आनंद-मांगल्य जनांत कोंदे ॥ ५ ॥
साकेतशोभा शुभसंपदा ती । श्रीशारदा वेद अहीश गाती ॥
यथार्थगानीं नच शक्ति त्यांही । कैचें उमे ! शक्य नरास होई ? ॥६॥

जयाविसर्जन, मंगलस्नानें इ. होऊन राज्याभिषेकाची सर्व सिद्धता होते.

स्नान समाचरुनि प्रभु भूषिततनु शोभले किती राम ! ।
कोटि अनंगासम ती कांति तदीया नितान्त अभिराम ! १९ (त.१९)
अत्यादरें सादर सासवानीं । सीतेसही उत्तम न्हाववोनी ॥
दिव्यांबरीं भूषणि सर्व अंगीं । ती भूषवीली शुभ त्या प्रसंगीं २०
रामाचिया वामदिशीं विराजे । लक्ष्मीस्वरूपा गुणखाणि की जे ॥
दृष्टा तिला देखुनि सर्व माता । ये जन्मल्याचें फलपुण्य हाता !

वसिष्ठ महामुनींनीं प्रथम श्रीसीतारामचंद्रांना तिलक लावला. नंतर सर्व मुनींनीहि त्याप्रमाणेंच केलें. अगणित यथेच्छ दानें दिलीं.

'दानें दिलीं द्विजगणा विविध प्रकारीं । केली अयाचकचि याचकराजि सारी
सिंहासनीं त्रिभुवनेश्वर बैसलेले । पाहोनि देवगणिं दुंदुभि वाजवीले ॥२६॥

नंतर वेद वंदिवेष घेऊन प्रभुरामचंद्रांची स्तुति करूं लागले. ही स्तुति सहा कडव्यांत येथें वर्णिली आहे. (तरंग ४– १ ते ६ ) हीं गीतें प्रत्येक वेदानें

रणधीर खलांसि संहरी । रवि तो सज्जनपंकजा हरि ! ४२ इत्यादि
आशाच ज्या विपुलसंख्य अनेक माशा।जो नाशकारि हिमराशिच त्यां अशेषा।
स्वानन्दराशि अज तो अविनाशि होय।तो कां न हो भजतसां प्रभुरामराय?

मुनिमानसपूर्णरंजन । महिभाराप्रति जो विभंजन ॥
तुलसीप्रभु तो रघूत्तम । भजतां कां न तुम्ही मनोरम ? ॥ ४७ ॥

अर्थात् अशा अनन्यभक्त प्रजेकडे प्रभु आपलें अनुकूल अवधान देतच असे ! १० व्या तरंगांतील सनकादिकांनीं केलेली स्तुतिहि अशीच अत्युत्तम प्रकारची आहे. प्रभुरामानीं साधु व असाधु यांचें वर्णन भरताच्या विचारण्यावरून केलें आहे ( त. ११ ) तरंग १२ मध्ये रामगीतावर्णन आहे. त्यामध्ये पुढील विचार पहा—

नौकाच ही नरतनू भववारिधींत । माझा अनुग्रह तिला अनुकूल वात ॥
हो कर्णधार दृढ सद्गुरुराय नावे । हें सर्व दुर्लभ परीं सहजींहि पावे ! ॥९
साहित्यसंच मिळुनीहि असा उदार । जाईल जो नच भवाब्धि तरून पार॥
तो आत्मघातकि कृतघ्न विमूढबुद्धि । त्याच्याच तो गतिसि केवळ अंतिं साधी !

रामगीता प्रकरणाचे दोनीही तरंग बहारीचे आहेत. ( त. १२ व १३ ). यानंतर नारदस्तुति आहे व सर्व समाजासह प्रभूंचें परमधामगमन सहज संदर निर्देशिलेलें आहे.

अशाप्रकाची अति सुंदर रामकथा शीरीकराकडून ऐकून भगवती पार्वती जे धन्योद्गार काढते ते अवर्णनीय आहेत—

माधुर्यपूर्ण रघुवीर-चारित्रपान । संतृतता मम मना नच दे अजून
संतृप्त रामचरिता परिसोनि होती। त्यांना विशेष रस ना कळलाच चित्तीं ।७
( तरंग १५ )

यानंतर पार्वती साहजिकच विचारते कीं इतकें सुंदर रामचरित्र आपण तरि कोठें ऐकलेंत ? या प्रश्नातून पुढें काकभुशुंडी व गरुड यांच्या संवादाची अत्यद्भुत अशी भक्तिमधुर व सर्वोत्कृष्ट कथा सुविस्तर शंकरांनी वर्णिली आहे. तीमधें रामाचा भक्तप्रतिपालन असा स्वभाव, काकभुशुंडीचें रमणीय कथानक, त्या मुनीच्या पर्वताचें वर्णन, त्याचीं ती चार शिखरें, तें सरोवर, ते अश्वत्थ, पाकळ, पिंपळ, वट वृक्ष, वटवृक्ष-

च्छायेंतील ती भुशुंडीची रामकथेवरील परम रमणीय प्रवचनें, त्यांत भुशुंडीचें आत्मवृत्तकथन, ज्ञानदीपवर्णन, भक्ति-चिंतामणि-वर्णन इ. इ. अनेक सुश्राव्य विषय मनोहरतेनें आलेले असून सर्व रामचरितमानसाची सांगता काकभुशुंडि-गरुड संवादात सामावलेली आहे.

श्रीतुलसीदासांचें रामचरितमानस इतकें मनोहर होण्याचें हेंहि एक कारण असेल की त्यांनी इतर रामायणात वर्णन केलेला सीतात्याग आपल्या कथेंत कोठेंहि वर्णन केला नाहीं! त्यामुळें सर्व रामायण अत्यंत मधुर आनंदपर्यवसायी झालें आहे. बालकांडांत मानस-रूपकांत वर्णन केलेले सर्व गुणनिर्देश तुलसीरामायणांत प्रतीतीस येतात. व वाचकास धन्यता वाटते. या मानसाच्या भक्तिरसाची अवीट माधुरी रसिक भक्तांनीं वारंवार घ्यावी अशी प्रार्थना करून या भागातील संविधानकाचें वर्णन मी अधिक करण्याचा मोह स्थलकालसंकोचास्तव येथें आवरता घेतों.

' स्वान्तःसुखाय तुलसी रघुनाथगाथा-
भाषानिबन्धमतिमञ्जुलमातनोति । '

अशी आपली भूमिका तुलसीदासांनीं सांगून त्याप्रमाणें सर्व रचना अत्युत्कृष्ट प्रतिमेनें व भक्तिभावानें रचली आहे. त्या रचनेस मीं हा जो मराठी वेष सुश्लोकमानस रूपानें चढविला आहे तो सर्व रसिकांस निरंतर आवडेल यात मला संशय वाटत नाहीं. माझा हा अनुवाद आषाढ शु॥ १४ शके १८७६ या दिनीं श्रीकृपें संपूर्ण झाला व मला अतिशय आनंद झाला. एक अतिशय उत्कृष्ट कृति निर्माण झाल्याचे धन्योद्गार अनेक रसिकांनीं काढून माझ्या आनंदात अतिशय भर घातली आहे. जसजसे भाग होत गेले तसतसे त्याचें गुणवर्णन करून सर्वांनीं मला अपूर्व प्रोत्साहन दिलेलें आहे. मी अनेकांचे आभार पहिल्या दोन भागांत अंतःकरणपूर्वक व्यक्त केले असले तरी अनेकांचे अभार अजूनहि मला मानल्यावाचून राहवत नाहीं! व तसें झालें; तरीहि माझें आभारप्रदर्शन अपूर्णच राहणार यातहि मला शंका वाटत नाहीं!

प्रथम भागाच्या प्रकाशन समारंभाचें किंचित् वर्णन मीं दुसऱ्या भागाच्या प्रास्ताविकांत केलें आहे. सुश्लोकमानसाच्या द्वितीय भागाचा

एक एक व राहिलेलीं सर्वांनीं मिळून म्हटलीं असें कांहीं टीकाकार म्हणतात. पण कोणतें पद्य कोणत्या वेदानें म्हटलें असावें त्याची खूण कोठें अर्थ-सिद्धान्त-दृष्ट्या दिसून येत नाहीं. श्रीमद्भागवतांत दशम स्कन्धांत जशी वेदस्तुति उत्तरार्धांत ८७ व्या अध्यायांत ‘ जय जय जह्यजामजित दोष-गृभीतगुणां त्वमसि यदात्मना समवरुद्धसमस्तभगः। अगजगदोकसामखिल-शक्त्यवबोधक ते। क्वचिदजयाऽऽत्मना च चरतोऽनुचरेन्निगमः ॥१४॥’ अशी आहे त्याप्रमाणेंच श्रीरामस्तुति वेदानीं येथें गाइली आहे. श्रीमद्भागवतांतील वेदस्तुति गंभीर, अर्थदृष्ट्या अवघड असून नर्दटकवृत्त असल्यानें जरा कठिणच आहे। तुलसीरामायणांतील वेदस्तुति पुष्कळच सोपी व हरिगीतिका छंदांत आहे. मुश्लोकमानसांतीच तिच्या अनुवादापैकीं एक जरासें अवघड कडवें येथें रामभक्त कै. यादव शंकर जामदार यानीं विशद केलेल्या अर्थानुरोधानें उद्धृत करावेंसें वाटतें—

व्यक्त मूळ नच अनादि तरु जो निगमागमिं मत चतुस्त्वची ।
स्कन्ध सहा ज्या पंचाधिक विस शाखा, बहु सुमदल सुरुचि ॥
कटु मधु ऐशीं द्विविध फळें ज्या एकलि वल्ली आश्रयिणी ।
पुष्पपल्लवीं नव ललिता तुज भवतररूपा स्वुं नमुनी ॥ ५ ॥

यात प्रभु अद्भुत संसारवृक्षरूपकात नटलेला असा वर्णन केला आहे. रूपक असें—अव्यक्तमूळ म्हणजे सांख्यशास्त्रवर्णित पुरुष, त्या वृक्षाच्या चार त्वचा म्हणजे महत्तत्त्व व सात्त्विक, राजस व तामस हे तीन अहंकार मिळून चार, त्यास तीन गुण व काल, जीव व कर्म या सहा प्रधान शाखा ( स्कन्ध ), मन, बुद्धि, चित्त, अहंकार हें अंतःकरणच-तुष्टय, पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हीं पंच महाभूतें. शब्द, रूप, रस, गंध, स्पर्श हीं ज्ञानेंद्रियें, कर्ण, त्वचा, नेत्र, जिह्वा आणि घ्राण हीं पंच कर्मेंद्रियें आणि हात, पाय, शिश्न, गुद, वाणी व एक जीव मिळून पंचवीस उपशाखा, स्वेदज, अंडज, जारज व उद्भिज्ज असे अनेक जीवरूपी पर्ण-समूह व वासनारूप ( उच्च लोकरूप ) पुष्पें, पाप-पुण्यानुसार अनुक्रमें कटु व मधु अशीं द्विविध फळें—या वृक्षाच्या आश्रयानें राहणारी एकच वेल म्हणजे अहंममत्वात्मक अविद्या, जीवाचें पुनरुज्जीवन, व वासनापरंपरा

यांच्या घडामोडींच्या रूपानें नित्य नव पल्लव व कुसुमें; अशा प्रकारचें हें एक वेदांतांतलें रूपक वेदानीं वर्णिलें आहे. [ अशाच प्रकारचे कूटार्थ श्लोक श्रीमद्भागवतांत अनेक आहेत. उदाहरणार्थ पहा दशमस्कंध पूर्वार्ध अध्याय २, श्लोक २७—

एकायनोऽसौ द्विफलस्त्रिमूलश्चतूरसः पञ्चविधः षडात्मा ।
सप्तत्वगष्टविटपो नवाक्षो दशच्छदो द्विखगो ह्यादिवृक्षः ॥ ]

भगवान् शंकरांनी जी श्रीरामस्तुति केली आहे तीही अत्यंत मधुर व रमणीय आहे. उदाहरणार्थ—

सदा हा अज्ञानें विषयवनिं जीव भ्रमतसे ।
अनेका रोगाही वडुतर वियोगीं सुख नसे ॥
तुझ्या पादांभोजां विसरुनिच हें दुःखफल ये ।
म्हणोनी श्रीरामा ! तुजसि कधिंही विस्मरुं नये । ४ ( त. ५ )

तसेंच —

मानोनि मानअपमान समानमान । सारेच संत मुखिं संचरती अदीन ॥
तूं नांदसी मुनिमनोऽम्बुजभृंगसाच । हे राघवा । समरधीर अनादि तूंच॥८

यानंतर रामराज्याचें अत्युत्तम असें वर्णन श्रीतुलसीदासानी केलें आहे. आदर्श प्रजापालनकर्ता परमसत्त्वसंपन्न प्रभु श्रीराम, अत्यंत सच्छील, प्रेमळ, सेवापरायण अशी सीता, उत्कृष्ट सेवाशील आज्ञाधारक, बंधुप्रेमानें नटलेले कर्तव्यदक्ष बंधु, अतिशय सरल, सर्वोपी, न्यायी, भक्तिभावसंपन्न अशी प्रजा, सर्वत्र सुव्यवस्था, उपवनें, वापी तडाग, सरिता, उत्तम उत्तम आज्ञाधारक सुशील बालकें, पतिपरायण स्त्रिया, सर्वत्र आनंदी-आनंद व निर्वैरता, अशा रामराज्यांत लोकांची एकमेकांस एकच शिकवण असे व ती ही ( तरंग ८—श्लो. ३९ ते ४७ )

प्रणत-प्रतिपाल जो करी । भजणें तो प्रभुराम अंतरीं
अतिशोभनशील सुंदर । सुगुणांचें जणुं भव्यमंदिर । ॥ ४० ॥
जलजायतचारुलोचन । प्रभु जो श्यामल दुःखमोचन ॥
नयना परिरक्षि पांपणी । रत तैसा निजदासरक्षणीं ॥ ४१ ॥
धृतबाण-मनोज्ञ-कार्मुक । धरि तूणीरांहि भक्तरक्षक ॥

प्रकाशन-समारंभ प्रथम भागाच्या प्रकाशनसमारंभाप्रमाणेंच उत्साहानें कोल्हापुर येथें श्रीगुरुमहाराजांचे वाड्यांत शके १८७५ चे चैत्र शुद्ध पौर्णिमेस हनुमज्जयन्तीच्या शुभसमयीं पं. महादेवशास्त्री जोशी यांचे मंगलहस्तें झाला. सभेंत अनेक रसिकविद्वानांचीं ग्रंथगौरवपर भाषणें झालीं. अनेक शुभसंदेश आले होते. वक्त्यांमधें श्री जेरेशास्त्री, श्री. कात्रेशास्त्री, प्रा. हुपरीकर, पं. खुपेरकरशास्त्री, सौ. सुमति पंडित, ती. सौ. पार्वतीबाई सरदेसाई (ज्यांना तो भाग भक्तिपुरःसर अर्पण केला आहे त्या) श्री. हिरळीकर, कु. भागवत, पं. महादेवशास्त्री यांचीं फार उत्कृष्ट भाषणें झालीं. *अध्यक्ष पंडित महादेवशास्त्री यांच्या भाषणाचा सारांश येथें द्यावयाचा तो त्यांच्या भाषणाचें टिप्पण त्यांच्या हातचें येथें देत आहे—*

"श्रीतुलसीदास रामायणाचें साहित्यांत व इतिहासांत स्वतंत्र स्थान. ८ कोटी लोक वेदतुल्य मानतात. हा ग्रंथ धर्मजागृतीचा आधार. रामभक्तीच्या प्रचारांत वाल्मीकि-रामायणाला 'शिष्यादिच्छेत्पराजयम्' चा आनंद देणारा ग्रंथ. भक्तिमार्गांत अद्वितीय. राष्ट्रदृष्टि, धर्मदृष्टि अन् भक्तिदृष्टि या तीन्ही दृष्टींनीं विचार केला तर अनन्वय अलंकार. 'रामरावणयोर्युद्धम्'

रामायण म्हणजे मर्यादापुरुषोत्तमचरित्र. तुलसीनें तें मर्यादा संभाळूनच लिहिलें. 'अनौचित्यादृते नास्ति रसभंगस्य कारणम्' त्यामुळें ग्रंथ सरस निर्दोष व पवित्र. रसवर्णनें नैतिकमर्यादा संभाळून. भक्तीला नीतीची शिस्त गूरदासाची मस्त भक्ति व तुलसीदासाची नेमस्त. वाल्मीकिरामायणापेक्षां अध्यात्मरामायणाशीं विशेष संबंध. भक्तीच्या उद्गारांवर भागवताची छाप. *मराठी संतांशीं संबंध असलेल्यांना तुलसीरामायणांत चुकल्या चुकल्यासारखें वाटत नाहीं मराठी संतांचीच नीति, भक्ति आणि* संयम. सुदाम्याला परत द्वारकेंत पोंचलों असें वाटलें तसें मराठी मनाला पूर्वपरिचित वचनें वाचल्याचा भास होतो. त्यातल्या त्यात नाथांची आठवण विशेष. दोघे समकालीनच नव्हेत, समध्येयाचे, समविचारांचे, दीनदयाळ. नाथ कृष्णभक्त, तुलसी रामभक्त. कृष्णभक्त असूनहि मर्यादशील म्हणून नाथांना दोन मार्क अधिक.

तुलसीची मुख्य करामत अयोध्याकांडात. विशेष परिश्रम. भरताची भूमिका लोकोत्तर. तो त्यांचा ध्यानमूर्ति. ते रामापेक्षां भरताचेंच भक्त अधिक असें वाटतें. ते म्हणतात— ' कलिकाल तुलसीसे सठन्हि हठि रामसनमुख करत को ', लक्ष्मण-भरत दोघेहि भक्त. एकाला संगतीचें आणि दुसऱ्याला वियोगाचें भाग्य. भरतानें वियोगांतहि संगतीचा अनुभव मिळवला. शारीरिक संगतीपेक्षां मानसिक संगतीचें महत्त्व अधिक. शरीरानें जवळ तो मनानें दूर राहूं शकतो. पाण्यातला धोंडा. भक्तीची तीव्रता वियोगानें वाढते. सासरीं राहिल्यावरच माहेरानें ध्यान तीव्र होतें. भरत भ्रातृभक्तीचा आदर्श. राम पितृभक्तीचा. हनुमान् दास्यभक्तीचा. रामायणातले नात्याचे म्हणजे शारीरिक संबंध तुलसीनीं आत्मिक केले, गहिरे, पवित्र, आदर्शभूत केले, माणसें देवापेक्षाहि मोठीं केलीं. अयोध्या, दंडकारण्य स्वर्गाच्याहि वर नेलीं.: त्यांच्या रूपानें मानवतेचा पूर वाहवला.

असा हा ग्रंथ मराठींत त्याच तोलानें येणें आवश्यक होतें. त्या कामीं डॉ. श्रीखंडे योग्य पुरुष लाभले. गोविंद, कुमार, मेघ, या रूपानें आधीं तप केल्यावर मग या ग्रंथाला प्रारंभ. जणूं तपावर शिक्कामोर्तब करून रामानेंच प्रेरणा. तुलसीदासांना वाल्मीकीचे अवतार मानतात. आतां डॉक्टरांना कोणाचे अवतार मानावयाचें ? अवतार माना अगर मानूं नका. पण ते नाथ, मुक्तेश्वर, श्रीधर, समर्थ, मोरोपंत या सत्कविमालिकेंत ग्रथित झाले! हें भाग्य काय कमी ! हें त्यांचें त्याबरोबरच विसाव्या शतकांतल्या मराठीचेंहि भाग्य. कारण आज लघुतेचें युग. यांत हा महान् ग्रंथ अवतरतो. महाराष्ट्राच्या मनःशुद्धीला, प्रेमभावाला, उत्कर्षाला हा कारणीभूत होवो. आतां माझेंच उदाहरण पहा. मागच्या समारंभांत मी सदस्य. आज अध्यक्ष. ही उन्नतीच नाहीं कां ? प्रत्यक्ष डॉक्टरांचाहि उत्कर्ष. पहिला कीर्तिलाभ, दुसरा गृहलाभ. ग्रंथाच्या गुणदोषचिकित्सेचें काम तुमचें. कारण ' कविः करोति काव्यानि ' मात्र तें करतांना कवीच्या प्रचंड तपस्येकडे दुर्लक्ष न व्हावें. माझ्या मतें तें सत्काव्य. अमृतस्यंदी वाणी

" अमृतजलधैः पायंपायं पयांसि पयोधरः ।
किरति करकास्ताराकारा यदि स्फटिकावनौ ॥
तदिह तुलनामानीयन्ते क्षणं कठिनाः पुनः ।
सततममृतस्यन्दोद्गारा गिरः प्रतिभावताम् ॥ " प्रसन्नराघव १–२१"

पं. विश्वनाथशास्त्री कात्रे यांनी पुढील कवितारूपानें आपला हृदयंगम आशय व्यक्त केला:–

रामें पुष्प समर्पिलें प्रथमहि श्रीशंकराच्या शिरीं ।
गेलें तें परि तच्चिवासि सहजीं भागीरथीच्या करीं ॥
कंठीं भूषवुनी द्वितीय कुसुमें श्रीपार्वतीशंकरा ।
तद्भक्तां अजि अद्वितीय दिधला आनंद आम्हां खरा ! ॥ १ ॥
आर्षीच पावन चरित्र रघूत्तमाचें । येई प्रसादपण त्यासहि शंकराचें ॥
त्याची समग्र महती कवि कोण वानी । भक्तासि राम वितरी अजि मेजवानी!॥
ऐशीं ईशचरित्रें आम्हा रामा ! पुनःपुन्हां वितर ।
विश्रांत वंद्य व्हाया तुज साधन याविना नको इतर ! ॥ ३ ॥
श्रीरामयशोगानें त्वद्यशही दशदिशीं पहा पसरे ।
संतांचा अनुभव की, ' प्रभु कधिं निजसेवकासि ना विसरे!'॥ ४ ॥
या सीतारामांनीं श्रीशिवकृपया चिरायु व्हावेंच ।
तल्लाय–वाङ्मनांचा रामीं व्हावा सदा असा वेंच ! ॥ ५ ॥

*टीपः–*[पद्य १ सुश्लोकमानस प्रथमभाग ज्या आर्येला अर्पिला आहे त्यांचें नाम श्री. भागीरथी आहे व त्या भारताचे सन्मान्य अर्थमंत्री श्री. चिंतामणराव देशमुख यांच्या मातुश्री होत. सुश्लोकमानस द्वितीय भाग कविभगिनी सौ. पार्वतीबाई व त्यांचे पति श्री. शंकरराव सरदेसाई या दंपतीस अर्पिला आहे. इतरत्र **राम** हें कविनाम व **सीताराम** हा उल्लेख कवि व कविपत्नी यांना उद्देशून आहे. ] ( गर्जना एप्रिल १९५३ )

प्रकाशनसमारंभाचे प्रारंभीं सौ श्री. सुधा नाडकर्णी यांनीं चत्यायुक्त रामस्तुतिपद्यें ' जय जय रामा॰ ' इ. गाइलीं. समारंभास

प्रशंसोद्गारसंपन्न संदेशांनी अभीष्टचिंतन करणाऱ्यांत रॅ. प्रा. नारळीकर, डॉ. पु. वि. घारपुरे, प्रा. मंगरुळकर, भक्तिभूषण श्री. आण्णासाहेब कुलकर्णी, इचलकरंजी, राजे श्री. ल. सी. खेर, मेजरजनरल थोरात, श्री. माडखोलकर, श्रीमंत बामनराव कुंडईकर, कविभूषण खापर्डे, साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास, प्रा. कृ. पां. कुलकर्णी, श्री. ग. स. अळतेकर इ. अनेक आहेत. श्री. अळतेकरानीं म्हटलें होतें—" सुश्लोक-मानसाच्या द्वितीय भागाचें महाराष्ट्रीय जनतेला समर्पण परम रामभक्ताचे जन्मदिनीं व्हावें यांत भक्तिभावनेबरोबर औचित्यहि आहे–' यत्र यत्र रघुनाथकीर्तनं तत्र तत्र कृतमस्तकाञ्जलिः ।' असे मारुतिराय आहेत. त्यांना सुद्धां आपल्या जन्मदिनाच्या दिवशीं रामचरितमानसाच्या मराठींतील अवतारानें आनंद होईल. पं. महादेवशास्त्री जोशी यांच्यासारख्या विद्वान् व रसिकाच्या हस्तें हा समारंभ होत आहे ही दुधात साखरच होय. आपल्या प्रकाशनसमारंभास सुयश चिंतून पुढील पूर्ततेस हनुमंता-प्रमाणें झेप घ्याल अशी आशा व्यक्त करतो. आपला ग. स. अळतेकर ता. २८–३–५३ नवी दिल्ली " प्रकाशनसमारंभात उपस्थित असलेल्या उपकारकर्त्यांचे प्रतिनिधिच असे वयोवृद्ध श्रीमान् रामराव लाटकर याना व अध्यक्षादींना हारतुरे अर्पण करून मीं सर्वांना वंदन करून आशीर्वाद घेतले. व प्रसाद वाटण्यात येऊन हा संस्मरणीय समारंभ पूर्ण झाला. समारंभास २०० वर मंडळी उपस्थित होती.

सुश्लोकमानस काव्यात छंदोदृष्ट्या पाहिल्यास वसंततिलका, आर्या, उपजाति, अनुष्टुभ्, शिखरिणी, मालिनी, शार्दूलविक्रीडित; छंद (' रतिसुखसारे गतमभिसारे ' याचालीसारखे ), इंद्रवंशा, मंदाक्रांता, इंद्रवज्रा, शालिनी, कामदा, स्वागता, पुष्पिताग्रा, माल्यभारा, स्रग्विणी, वंशस्थ, द्रुतविलंबित, वियोगिनी, पृथ्वी, हरिणी, भुजंगप्रयात, उपेन्द्रवज्रा, पादाकुलक, स्रग्धरा, रथोद्धता अशा सव्वीस सत्ताविस प्रकारची काव्यरचना आढळते. यांतील आर्या, अनुष्टुप्, छंद, पादाकुलक अशी थोडीच सु. १% मात्रावृत्ताची रचना आहे, बाकी बहुसंख्य गणवृत्त रचना झालेली आहे.

सुव्रतादेवी यांच्या निदर्शनास सुश्लोकमानस मजकडून आणवून मला अभूतपूर्व आनंद दिला. श्रीमती सुव्रतादेवी यांचें मानसावर अतिशय प्रेम आहे. त्यांच्या तें सत्काव्य पाठांतच आहे. त्यांना मराठी समजत असल्यामुळें सुश्लोकमानसमधील रामवाल्मीकिमीलनप्रसंग, ज्ञानदीपप्रसंग इ. मनोहर भागाचे श्लोक त्यांना मी ऐकवूं शकलों व आम्हास अतिशय आनंद झाला या पुण्यशील महिलेनें प्रेरणा देऊन आपले सुपुत्र श्रीमान् शेठ राधाकृष्णजीसाहेब यांचे हस्तें सुश्लोकमानस तृतीय भागास अग्रक्रमपूर्वक उदार आश्रय दिल्यामुळेंच हा ग्रंथ संकल्पाप्रमाणें आज प्रकाशित होऊं शकत आहे. असेंच थोर साहाय्य श्रीरामचरितमानस व सुश्लोकमानस यांची एकत्र उत्तम आवृत्ति काढण्याच्या संकल्पित थोर कार्यास त्यांचेकडून लाभेल अशी सदाकांक्षा सुफलित लवकरच होईल. प्रस्तुत सुश्लोकमानस तृतीय भाग मी मोठ्या प्रेमादरानें श्रीराधाकृष्णजींना वंदन करून त्यांच्या पुण्यशील माताजी श्रीमती सुव्रतादेवी यांना सप्रणाम अर्पण करीत आहें. सर्वांसच अनंत धन्यवाद !

श्रीमान् शेठ मदनमोहन लोहिया, यांच्या साहाय्याबद्दलहि मी ऋणी आहें. कोल्हापुरचे रावसाहेब श्री. आर्. वाय्. चव्हाण, न्या. श्री. व्ही. जी. जमखंडी डिस्ट्रिक्ट जज्ज कोल्हापुर, न्या. मू. बावडेकर, न्या. मू. गजेंद्रगडकर, श्री. डी. सी. पावटे, व्हा. चॅ. कर्नाटक विश्वविद्यालय, श्रीमंत नानासाहेब साताडेकर, कालिदासव्यासंगी सॉ. शांताराम आत्माराम सवनीस, मुंबई, महोदार श्रीमान् विद्याप्रेमी श्रीप्रतापशेठजी, अमळनेर इत्यादि थोर मंडळींचें साहाय्य सुश्लोकमानस महाकाव्याच्या प्रकाशनास सानंद लाभलें हें लिहिण्यास फार संतोष वाटतो.

सुश्लोकमानस ग्रंथावर अनेक विद्वान् रसिकांनीं उत्कृष्ट समालोचनें निरनिराळ्या अनेक नियतकालिकांत लिहिलीं त्याचा मला फारच उपयोग झालेला असून मला अतिशय आनंद झालेला आहे. अशा साहित्यसमालोचकांत प्रा. भ. श्री. पंडित ( युगवाणी ), साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास ( महाराष्ट्र ), श्री. र. गो. सरदेसाई ( विविधवृत्त ), श्री. ना. ग. गोरे ( साधना ), श्री. तात्यासाहेब करंदीकर ( केसरी ), प्रा. चिं. वि.

मेघानें आतां यापुढें त्याना ' सुश्लोकमानसा 'कडे (श्रीतुलसीदासकृत रामचरितमानसाच्या अनुवादाकडे) वळविलें आहे. कारण यक्षाचा मेघदूत जसा उत्तरेकडील अलकेस जाणारा आहे तसाच, तो नैसर्गिकपणें अलकेच्या पलीकडे असलेल्या मानस सरोवराकडेहि वळणारा आहे. ही घटना लक्षांत घेतां डॉ. श्रीखंडे यांच्या सुश्लोकमेघाच्या प्रवास आतां ' सुश्लोकमानसा 'चा दिशेनें घडावा व त्या ठिकाणीं त्याच्या काव्यशक्तीनें यथेच्छ विहार करावा ही घटना जितकी नैसर्गिक तितकीच अपूर्व आहे, असें रसिकांना वाटल्यावाचून राहणार नाहीं. डॉ. श्रीखंडे यानीं या महत्त्वाच्या कार्यासाठीं हृदयस्थ रामाचें पसायदान व सज्जनाचे आशीर्वाद यांची याचना अवतरणिकेच्या शेवटीं केली आहे. आतापर्यंत 'सुश्लोकमानसा'तं जो त्यांचा 'स्वान्तःसुखाय' यशस्वी विहार झाला आहे तो मीं लक्ष्यपूर्वक पाहिला-आहे. व नवभारताच्या एका अंकीं थोडा नमुना छापला गेला आहे त्यावरून पाहतां हृदयस्थ रामाचा त्याना पूर्ण प्रसाद मिळाला आहे आणि रसिक सज्जनहि सुश्लोकमेघाकडे पाहून अंतःकरणपूर्वक—

'इष्टान् देशान् विचार जलद प्रावृषा संभृतश्रीः ।'

असेंच म्हणतील यात शंका नाहीं." (सुश्लोकमेघ परीक्षण १९५०) या सर्व मजविषयींच्या सज्जनांच्या सदिच्छा ईशकृपेनें सुफलित झाल्या आहेत! सज्जनसाहाय्यांबद्दल कितीहि लिहिलें तरी तें अपुरेंच होणार आहे म्हणूनच लेखनी कुंठित होते यांत अतिशयोक्ति मुळींच नाहीं. म्हणून मनानेंच आतां मी इतर असंख्य व्यक्तींचें साभार चिंतन करतो.

श्रीरामपंचायतन ब्लॉक्स श्रीमंत भय्यासाहेब पंत याजकडून कृपेनें लाभल्याबद्दल त्यांचे अतिशय उपकार आहेत. या चित्राची रंगीत छपाई आर्ट ब्यूरो कोल्हापुरला भूषणावह आहे. भाविक भक्त श्री. सखाराम राउळ, श्री. पु. दे. भंगाळे, डॉ. व सौ. प्रभावळकर, श्री. व. द. फणसळकर, श्री. वा. ना. फडणीस, श्री. वा. रं. अत्रे, प्रा. अद्वैत इ. च्या सदिच्छेबद्दल ऋणी आहें.

यांशिवाय अनेक रसिक सज्जनांनीं पत्रें पाठवून आपले सुश्लोकमानसविषयीं उत्तर प्रत्युद्गार कळवून मला अपरिमित आनंद दिलेला आहे. अशा मंडळींत सातारचे कै. श्री. दत्तात्रय नारायण नावर, कै.

श्रीरामदासानन्द केकावलीटीकाकार श्री. श्रीधर विष्णु परांजपे, ब्र. स्वामी केवलानन्द ( पं. नारायणशास्त्री मराठे, वाई ) यांचा उल्लेख अवश्य केला पाहिजे. 'कल्याण'चे संपादक पं. हनुमान्प्रसाद पोद्दार यांनीं मला लिहिलें,

"I congratulate on the 2nd volume of your very successful translation of Shri RamaCharitamanas. Your gift to the Marathi literature will be most precious and imperishible......" ( पत्र ५-५-५३ )

ब्र. स्वामी केवलानन्द यांनीं कळविलें ( पत्र आश्विन शु. ५ शनिवार शके १८७६ )—

" ॐ नारायणस्मरणम् । मी दिल्लीहून काल सायंकाळीं परत आलों... लहानसा अभिप्राय देत आहें... पानांत वाढलेलें श्रीखंड एकेक बोट रुचि घेत घेत रसना संपविते. एक बोट रुचकर लागल्यास आणखी आणखी खाण्याची इच्छा वाढतच जाते.

कोल्हापुरचे श्री. रा. चिं. श्रीखंडे यांनीं केलेल्या तुलसीरामायणानुवादरूप सुश्लोकमानसाच्या प्रथमसोपानाचे पहिले दाव तरंग आणि अयोध्याकांडांतील १८ पासून ४० पर्यंत तरंग वाचीत असता माझें वरीलप्रमाणेंच झालें. एक वाचल्यावर दुसरा, तो झाल्यावर तिसरा अशी वाचनाची इच्छा वाढत गेली. आधींच रामकथा गोड. ती श्रीतुलसीदासजींनीं गाइलेली आणि ती साग्रोसांग श्रीखंडे यांनीं श्लोकरूपानें अनुवादिलेली असा हा मधुरत्रययोग जमला आहे.

सुश्लोकमानसकर्त्यांचें अभिनंदन करावें तितकें थोडेंच.

स्वामी केवलानन्दसरस्वती. वाई"

कै. श्रीरामदासानन्द ( श्रीधर विष्णु परांजपे, ) हनुमानगड वर्धा यांनीं अनेक पत्रांत मजवर मयूरोक्तींचीं कवितांचीं सुंदर सुमनेंच उधळलीं आहेत. येथे ६-१०-५३ च्या पत्रांतील थोडा भाग उद्धृत करतों. त्यांच्या ८२ व्या वाढदिवसानिमित्त १० आर्या व १ अनुष्टुप् पद्यांनीं मीं त्यांचें अभिनंदन केलें त्यास त्यांचें हें उत्तर आहे:—

"सुश्लोक रामकविची सुरसंगम देत मानसा कविता ॥
रामघन मयूरेश्वर असता तरि नटुनि नाच वाकविता ॥ १ ॥

तुलसीदासही झाला रामा प्राणाधिक प्रिय ।
तुलसीमंजरी त्याला प्रिय हें काय सांगणें ! ॥ २ ॥
शंकरगुरुपूजार्थ नित्य श्रीफल ( = बिल्व ) पाहिजे ।
सुश्लोकराम म्हणुनी बेलबागांत राहतो ॥ ३ ॥

आपण केलेल्या प्रशंसेला रामा! हा जीव पात्र नाहीं तरी आपण केलेल्या पद्यात्मक स्तुतीला मी सुश्लोकांदासामणि श्रीसीतारामाचा आशीर्वाद म्हणून नम्रपणें ग्रहण करतों. 'माझी लाज तुला गुरुराया' एवढेंच म्हणतों.

आपल्या काव्यरत्नेविषयीं मला काय वाटतें तें मी वरील आर्येत सांगितलें आहे. दहा आर्यांची एक छोटी माळ त्याला अनुष्टुभ्छंदाची मेरुमणि गांठ देऊन एकादश पद्यें अर्पिलीं तीं एकादशस्वरूपी हनुमदवतारी श्रीसमर्थांना समर्पित करतों.

सीतारामचरणीं अक्षय मस्तक ठेवून येथेंच विराम पावतों.

श्रीरामदासानन्द ( परांजपे ) "

कै. कवि दत्तात्रय नारायण नाबर यांनीं बालकांडाचें परीक्षण कळविलें पत्र ११-३-५३ त्यांत पुढील आर्येनें आरंभ आहे—

" कविवर्या काय वदूं अनुभविता जाहला मला मोद ॥
सुश्लोकमानसाचा सुरतरुसुमगंधसाच आमोद ॥ १ ॥...

महाकवींचा अनुवाद निष्णात कवीनीं केला तर तो शब्दशः प्रतिशब्द अशा प्रकारचा नीरस न होता सरस अभिनव काव्याच्या रूपानेंच होतो याचें उत्कृष्ट उदाहरण आपलें प्रस्तुत काव्य हें होय. याला मी अनुवाद म्हणतच नाहीं. मूळ कवितेची ती कन्या आहे. तें स्वतंत्र प्रतिभाजनित महाकाव्य आहे. तेजस्वी शब्दरत्नांनीं भरलेलें एक विस्तीर्ण दालन आहे. व तीं रत्नें अशा अप्रतिम कौशल्यानें मांडली आहेत की त्यांचा प्रकाश एकमेकांवर पडून अवर्णनीय शोभा दृष्टीस पडते, मराठी भाषा किती समृद्ध आहे, व सुवर्णाप्रमाणें तिला पाहिजे तशी वळवून कुशल कारागीर किती सुंदर अलंकार घडवूं शकतो, हें आपण दाखवून दिलें आहे.

अलरूप, कांतिलेश, विशेष म्हणजे, म्हणजे, दिव्य, मनोहर, गति, रसना-सौष्ठव, ओज, प्रसाद, रसरता, नादमाधुर्य, सालंकारत्व आणि पावित्र्य हे होत. आपण आयुष्यभरी काळनदीला बधारा घालून तिच्या पाण्यानें दिव्य

पत्रपुष्पफलांनी समृद्ध असें चिरस्थायी मनोहर उद्यान निर्माण केलें; व तेणेंकरून आपल्या जन्माचें सार्थक केलें आहे. एवढेंच नाहीं तर समाजास पारमार्थिक कल्याणाचें कायमचें साधन करून ठेवलें आहे. आपल्या काव्यात भक्तिरस प्रधान आहे. त्या रसाची निष्पत्ति करणें हें तर कठिण काम आहे. तें आपण साध्य केलें हें *आपणांस अत्यंत भूषणावह आहे.*

आपल्या काव्यातील कांहीं उतारे मासल्याकरितां देतों ( येथें १८ श्लोक निर्देशून श्री. नावर महोदय पुढें म्हणतात )—

मी आपल्या काव्याकडे केवळ करमणुकीच्या क्षुद्रदृष्टीनें पहात नाहीं. हल्लीं जगात अधर्माचा पगडा बसत आहे. धर्मग्लानि होत आहे. त्यामुळें खून, दरवडे, अत्याचार, स्त्रियांवर बलात्कार इत्यादि भयंकर अपराधास ऊत आला आहे. जीवित आणि घरदार यांस सुरक्षितपणा राहिला नाहीं. आसुरीमताचा प्रसार जनतेंत झपाट्यानें होत आहे. सामान्य लोकास भीति आणि निराशा ग्रासून टाकीत आहे. धर्मसूर्याचें ग्रहण कसें सुटेल अशी चिंता उत्पन्न झाली आहे. अशावेळीं आपण निःस्वार्थीपणानें अश्रांत परिश्रम करून सद्धर्माच्या रक्षणास व प्रसारास उपकारक असें महत्कार्य करीत आहां हें आमचें परमभाग्य होय. परमेश्वरानें आपल्यासारखे पुष्कळसे सत्पुरुष आम्हांस द्यावे, अशी त्याजपाशीं नम्र प्रार्थना आहे.—आपला दत्तात्रेय नारायण नावर." परम रामभक्त स्वामी श्री. रामकुमारदास विरक्त, मानसमधु, श्रीराममंदिर, कुंडाळ, अहमदाबाद यांनीं तुस्लोकमानस पाहून असाच अतिशय आनंद व्यक्त केला. स्वामी श्रीराम लुधियाना, या रामचरितमानसप्रेमी सद्भक्ताचेंहि अत्यंत उत्कृष्ट अभिप्राय व आशीर्वाद मला लाभले. ज्योतिर्मठ बदरिकाश्रमचे जगद्गुरु श्रीशंकराचार्य श्रीकृष्णबोधाश्रमस्वामी यांच्या भेटीचा सुयोग आला असतां त्यांनींहि उत्तम प्रशंसोद्गारपूर्वक प्रयास अभीष्ट चिंतन केलें आहे.

मुंबईचे डॉ. शरद् रघुनाथ प्रधान, एम्. डी. या तरुण व्यासंगी सन्मित्रानीं वारंवार प्रशंसोद्गारपूर्वक माझ्या कृतीचें परिशीलन केलें, कवि डॉ. वसंतराव अवसरे, ॲश कुरु यानाहि या वाङ्मयकृति अतिशय आवडल्या. त्यांचा मी फार ऋणी आहे.

सोलापुरचे माझे रसिक स्नेही श्री. अनंत विश्वनाथ लिमये यांनीं वारंवार चिकित्सापूर्वक सर्व ग्रंथाचें अवलोकन करून प्रशंसोद्गारानीं अनेक प्रकारें सहृदयता व्यक्त केली. त्यांनीं ग्रंथांवर व मजवर अलोट प्रेम केलें. छपाईंत राहिलेले मुद्रणदोष निदर्शनास आणण्यांतहि त्यांनीं मोठें साह्य उत्साहानें केलें. त्याचे आभार कसे मानावेत हें समजत नाहीं. माझ्या सर्व ग्रंथांवर त्यांनीं कवितावद्ध रसिक अभिप्रायहि अनेक पाठविले आहेत!

पुण्याचे श्री. सी. न. साने या रसिक काव्यप्रेमी स्नेह्यांचाहि मला साभार उल्लेख करावासा वाटतो. डॉ. ना. वि. पत्से, डॉ. पु. वि. गोखले, डॉ पी. बी. भद्रे, कर्नल डॉ. व्ही. आर. दामले, श्री. शंकरराव किर्लोस्कर, श्री. रावसाहेब देशपांडे, यांच्या प्रोत्साहनाबद्दल मी ऋणी आहे. एक तरुण वाचक श्री. र. अ. कंटक, त्याचप्रमाणें सुश्लोकमानसचा व्यासंग करून आनंद लुटणारे लहानथोर आप्त, स्वकीय मित्रमंडळी चि. श्री. प्र. वि. कशाळकर, श्री. गो. शं. हुजुरबाजार इ. यांचा मी कृतज्ञ आहे. ज्यांनीं मला वारंवार प्रोत्साहन दिलें, लहानपणींच गणवृत्तांची ओळख करून दिली ते वडील बंधु कै. ती. भाऊसाहेब हुजुरबाजार यांचा चिरवियोग होऊन हा ग्रंथ पूर्ण छापलेला पाहण्यास ते नाहींत या विचारानें कंठ गहिंवरतो. या काव्यानें कार्य फारच प्रदीर्घ! न विश्वसलं जीवितम् अशी स्थिति, म्हणूनच रामचरितमानसांमधील तुलसीदासजींनीं,

'माता, पिता, गुरु मदीय, उमामहेश। आयुष्यदायक दयालु नमू तयास'॥

सुश्लोकमानस बालकांड त. ५–१५

अशी प्रार्थना केली आहे!

इचलकरंजीचे ह. भ. प. भक्तिभूषण श्री. कल्याण श्रीपाद ऊर्फ अण्णासाहेब कुलकर्णी यांनीं सुश्लोकमानस काव्यावरून श्रीरामचरितामृत प्रवचनें देण्याचा मानस प्रकट केलेला आहे याबद्दल अतिशय धन्यता वाटते. सत्कथा या साधुजनांचे मुखाम्बुजांतून ऐकण्याचें भाग्य फारच मोठें होय.

जे संत 'कल्याण'नि रामदास। वदीत मी संतत रामदास॥
प्रेमाद्रहर्षकजभक्तिभूषा। कल्याणराम् वरद सर्वतोषा॥ १॥

असें मला त्याचे वंदनपूर्वक वर्णन करावेसें वाटतें.

असो. प्रस्तुत ग्रंथविभागाचें आलोचन करून सन्मान्य विद्वद्वर्य श्री. गणेश सदाशिव ऊर्फ दादासाहेब अळतेकर, एम्. ए., एल्एल्. बी. सदस्य भारतीय लोकसभा, न्यू दिल्ली, यांच्यासारख्या रामायणव्यासंगी, सत्काव्यप्रेमी, थोर सद्भक्तानें जो अंतःकरणपूर्वक बोधक्यांत अभिप्राय दिला तोच मला शिरोधार्य वाटून उपोद्घात म्हणून किंवा या सुश्लोकमानस-विभागमंदिराचें मंगल तोरण म्हणून स्वीकारतां येत आहे याचा अत्यानंद होतो. श्री. दादासाहेबांचा मी अत्यंत ऋणी आहें.

या ग्रंथाची छपाई श्रीसिद्धेश्वर मुद्रणालयाचे श्री. बळवंतराव ठकार, त्यांचे चि. श्री. आत्माराम व रामभाऊ, त्याचप्रमाणें श्री. म. व. फडके, श्री. ल. बा. वरुटेप्रभृति कामगार मंडळी यांनीं अतिशय उत्साहानें व आपले-पणानें चांगली करून दिल्याबद्दल मला यांचा सामार निर्देश करावासा वाटतो.

सर्वांचा निरोप घेतांना हीच प्रार्थना कीं—

सज्जन सहृदय रसिकें परिसावें काव्य हें सुरस रुचिर ॥
न्यूनाधिकां सुधारुनि सेवावा रस तयांतला सुचिर ॥

सुश्लोकमानस बालकांड तरंग ११–२

या ग्रंथाचें प्रकाशन प्रथमविभागाप्रमाणेंच महामहोपाध्याय श्री. दत्तो वामन पोतदार यांनीं श्रीरामनवमीस करण्याचें मोठ्या आनंदानें स्वीकारलें त्या पत्रांत शेवटीं त्यांनीं पुढील श्लोकानें सुश्लोकमानसविषयीं आपला नितान्त आदर व्यक्त केला आहे—

महाराजस्य चरितं निर्माता च महाकविः ।
महाराष्ट्र्या तु भाषाया नीत्वा प्राप्तं महत्पदम् ॥

असेच सज्जनांचे थोर आशीर्वाद मला नित्य लाभोत व उत्कृष्ट प्रेरणा देवोत अशी प्रार्थना करून श्रीसीतारामचंद्र (सुश्लोकमानस उत्तरकांड त. ३५–२०)

यन्नामरूपी भवभेषजानें । क्षणींच तापत्रयशूळ जाणें ॥
सदानुकूल प्रभु तो कृपाळू । मला स्वभक्ता तुजलाहि पाळू ! ॥

अशी भक्तवर काकभुशुंडीच्या शब्दांत श्रीरामचरणीं सप्रणाम विनवणी करतों.

| | |
|---|---|
| श्रीतुलसीमंजरी, बेलबाग<br>मंगळवार, कोल्हापूर<br>चैत्र पाडवा शके १८७७. | रामचंद्र चिंतामण श्रीखंडे |

## कांहीं राहिलेलीं पद्यें पुढीलप्रमाणें समजावींत–

सुश्लोकमानस भाग दुसरा पृ. ३२ अयोध्याकांड पूर्वार्ध तरंग ७ श्लोकांक २४ नंतर पुढील श्लोक २४ अ समजावा–

गुरुस्वामी, माता पितर सुर बंधू निजजनें।
गणोनी स्वप्राणांसमचि सकळां योग्य भजणें ॥
जगाचाही स्वामी रघुपति सखा स्वार्थरहित।
प्रिय प्राणांऐसा सकल जगता जो करि हित ॥ २४ अ ॥

अयोध्याकांड पृ. ९३ उत्तरार्ध तरंग १२ श्लोकक्रमांक ३ नंतर पुढील श्लोक ३ अ समजावा—

रघुपतिभजकांच्या कार्यघाता कधींही।
नच अमरपते! तूं आपुल्या चित्तिं वाहीं ॥
नच जर करिशी हें हो अकीर्ती जगीं या।
असुलहि परलोकीं दुःखपंकीं अमेया! ॥ ३ अ ॥

सुश्लोकमानस पृ. ९९ अयोध्याकांड उत्तरार्ध तरंग १४ श्लोकांक ३९ नंतर पुढील श्लोक ३९ अ समजावा—

श्रीराम लक्ष्मण सजानकि, देववाणी। ऐकोनि ती सुखित होति अवर्ण्यमानीं ॥
सर्वांसमेत इकडे भरतादिकांनीं। मन्दाकिनीजलिं समाचरिलीं नहाणीं ॥३९अ

सुश्लोकमानस भाग दुसरा पृ. ११७ अयोध्याकांड उत्तरार्ध तरंग २० श्लोक २९ नंतर पुढील पंक्ति श्लोक ३० व ३०अ समजाव्यात.

जी ज्ञानवैराग्य अशा स्वकूला। पाडीत वेगें वहतां सलीला ॥
जिच्यात पूरें भरुनी मिळाले। शोकार्त घोरें नद आणि नाले ॥ ३० ॥
राजादि सारे मिथिलापुरींचे। कारुण्यवारीमधिं मग्न साचे! ॥
शोकोर्मि दुःखें बहु जे उसासे। तुफान वारे सुटलेत भासे! ॥ ३०अ ॥

सुश्लोकमानस भाग २ रा. पृ. ११९ अयोध्याकांड उत्तरार्ध तरंग २१ श्लोक १७ नंतर पुढील श्लोक १७ अ व १८ समजावेत—

फळें अनेकें दल कंदमूलें। पवित्र रम्यें अमृतें रसाळें ॥
वसिष्ठ सर्वांप्रति पाठवीती। भारे भरोनी सकलात्मतृप्ति ॥१७अ॥
पूजूनि देवांपितरां गुरूंना। संतोषवूनी अतिथींहि नाना ॥
देऊनि सर्वांप्रति थोर मान। घेती फलाहार सुधेसमान ॥१८॥

सुश्लोकमानस भाग २ रा, पृ. १४५ अरण्यकांड तरंग १ श्लोक २१ नंतर पुढील श्लोक २१ अ समजावा—

*मोहामुळें जो प्रभुचा करीत। विद्रोह त्या मृत्युचि होय युक्त ॥*
सांडीत सारा परि रोष राम। दयानिधी राघव हा असीम ॥२१अ॥

सुश्लोकमानस भाग ३ रा, पृ. ६३ लंकाकांड तरंग १३ श्लोकांक ३० नंतर पुढील श्लोक ३०अ समजावा—

स्वार्गेंचि चिरडी रागें कपींच्या कोटिकोटिही ॥
मिळवी धूळिंतें कोटी कपींना पाडुनी महीं ॥३०अ॥



## सुश्लोकमानस सुंदर-लंका-उत्तरकांडांची अनुक्रमणिका

( या भागाचीं एकूण पृष्ठें २२६ )

कृपेनें, कै. श्रीमंत राजेसाहेब औंध यांचे संग्रहांतील ] **श्रीरामपंचायतन** [ चित्रकारः– कै. भिवा सुतार



देवाधिदेव करुणानिधि रामराय । जो कीं शिरोमणिच भूपगणांत होय ॥
तो विश्ववंद्य तुलसीप्रभु पुण्यकीर्ति । सीतापती नमित मी अभिराममूर्ति ॥ २ ॥
सुंदरकांड, मंगलाचरण तरंग १, सुश्लोकमानस

श्रीगणेशाय नमः ।
श्रीभवानीकमलेश्वराभ्यां नमः । श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ।
श्रीसरस्वत्यै नमः ।

तुलसीरूपिणे श्रीमद्वाल्मीकिमुनये नमः ।
यस्य प्रसादात्सुलभं स्वर्गीयममृतं भुवि ॥ १ ॥

# ❀ सुश्लोकमानस ❀

## श्रीरामचरितमानस अर्थात् श्रीतुलसीरामायण

या महाकाव्याचा अनुवाद

## पंचम सोपान

# सुंदरकांड

### तरंग पहिला

### मंगलाचरण

जो शांत शाश्वत अमेय अपाप ईश । ज्या सेविती सतत ते विधि, शंभु, शेष ॥
वेदान्तवेद्य अतिसौख्यद विश्वनाथ । मायामनुष्य हरि राघव मी नमीत ॥१
देवाधिदेव करुणानिधि रामराय । जो कीं शिरोमणिच भूपगणांत होय ॥
जो विश्ववंद्य तुलसीप्रभु पुण्यकीर्ति । सीतापती नमित मी अभिराममूर्ति ॥२॥
नाहीं मदीय हृदयेप्सित अन्य रामा ! । नी सत्य हें वदत तूं सकलान्तरात्मा ॥
दे उत्कटा मजसि भक्ति रघूत्तमा रे ! । कामादि दोषगण चित्ति नुरोत सारे ॥
निरुपमबलतेजा स्वर्णशैलाभकाया । दनुजविपिनदावा ज्ञानिवर्यां नमूं या ॥
अखिलगुणनिधाना वानराधीशदेवा । रघुवरवरदूता वातजाता सुभावा ॥४॥

जें बोलिलें वचन सुंदर जांबुवंतें । ऐकोनि हृष्ट हनुमंत अतीव कीं तें ॥
'हे बंधुनो!' वदत तो 'मम वाट देखा। साहोनि कष्ट फलकंद मुळेंचि तों खा! ॥५
येईन शोधुनिच जों जनकात्मजेतें। होईन धन्य, जर कीं मम कार्य हो तें !'॥
बोलोनि हें नमुनि तो सकला त्वरोनी । हर्षें निघे हृदिं रघूत्तम साठवोनी॥६॥
हो सिंधुनीरिं बहुसुंदर एक शैल । तो कौतुकेंचि चढि त्यावरि चारुशील ॥
चित्तीं स्मरूनि बहुवार रघूत्तमासी । पाहे चहूंदिशिं महत्सुत शक्तिराशि॥७॥
ज्या ज्या गिरीवरि पदार्पण तो करीत । पाताळिं तो क्षणिंच लोटत सानुमंत ॥
जैसा अमोघगति सायक राघवाचा। तैसाचि तो चलत मारुतिराय साचा! ॥८॥
जाणोनि मारुति रघूत्तमदूत होय । मैनाक खेद हरण्या सुजि अब्धिराय॥
स्पर्शी करोनि नुसतें कपिराय त्यासी । उद्गारि त्यासि नमुनी निज नम्रशीर्षीं॥९॥
'नेल्याविना सकल सिद्धिस रामकाज। विश्रान्ति होय कसची मजलागिं आजी'
जातां तथा हनुमता सुरसंघ देखे। जाणावया बघति तद्बल बुद्धिलेखे ॥१०॥
धाडीति सर्पजननी सुरसाभिधाना । येऊनि ती वदलि मारुतिला सुजाणा ॥
'आहार आज मजला दिधला सुरांनीं'। तें बोलला पवननंदन आयकोनी॥११॥
'येईन मी फिरुनियां प्रभुकार्य होतां। सीतेसि शोधुनि, तसें कळवूनि नाथा॥
मी हा शिरेन वदनीं तव सत्य माय! । आतां न कोंचि अडवूं! कर हेंचि साह्य'१२
ती जाऊं दे न कवण्याहि उपायि त्यास।तोडी म्हणे 'करशि कां नच वेगिं घास!'
जों योजनावधि मुखा पसरी निजा ती। हो मारुति द्विगुणविस्तृत भव्यमूर्ति! १३
ती योजनें मग करी निज वक्त्र मोठा। वाढे कपीन्द्र मग त्रिंशति योजनांला!
ती वाढवी जसजशी सुरसा स्वतुंड। त्वाकार दुप्पट करी कपिराट् प्रचंड!॥१४॥
ती योजनें शत, मुखा पसरीत वेगें। तों मारुती स्वतनुतें तनुता अती घे!॥
जाई तयांत मग बाहिर ये पुन्हांही। मागे निरोप नमुनी तिजलागिं पायीं॥१५॥
ती बोलली "मजसि धाडियलें सुरांनीं। त्वद्बुद्धिमर्मबल ये मजला कळोनी॥
नूं रामकार्य बलसागर बुद्धिराचि। नेशील सिद्धिसि" तया अधि देइ आशी १६
गेली निघोनि सुरसा, कपिही सहर्ष। जाई पुढें अतिजवें क्रमि अंतराल ॥
त्या सागरामधि निशाचरि एक राही।ही घेइ ओढुनि बळें, उडत्या खगांही॥१७
जे जीव जंतु उडती जरि अंतराळीं। छाया तदीय धरि ती जलिं खालिं आम्ही॥
आकृष्ट ती करुनि खाइ तशा खगांना।ती मारुतीसिहि धरूं बघि युक्ति नाना१८

जाणोनि तत्क्षण मारुति तीस मारी। लंघोनि सागर रिघे कपि पैल तीरीं ॥
देखे तिथें पवननंदन वृक्षशोभा। गुंजारवा करिति भृंग मरंदलोभा ॥१९॥
पुष्पें फलें तरुवरीं बहु शोभणारीं। पक्ष्यां मृगां बघुनि हो मनिं हर्ष भारी ॥
पाहे पुढेंचि कपि एक विशाल शैल। निर्भीक त्यावरि चढे कपिराट् सलील २०
मैत्री उमे ! न कपिची गण यांत कांहीं। हें काळभक्षि विभुचें बळ सर्व पाहीं॥
त्या पर्वताग्रिं चढुनी कपि पाहि लंका। जी दुर्गमा अतिशयें सकलां, न शंका २१
उत्तुंग ती नगरि वेढिलि अब्धिनें जी। सौवर्ण कोट विलसे अतिदिव्य तेजीं
अत्यंत रम्य मणिरत्निं विराजलेला। विस्तीर्ण रुंद तट सुंदर त्या पुरीला॥२२
चौहाट, हाट पथ उत्तम शोभणारे। नानाप्रकार गजवाजि रथादि सारे॥
सेना पदाति गण या गणना असेना। नानास्वरूप रजनीचर यूथ नाना २३
बागा वनें उपवनें सर कूप वापी। शोभायमान नगरी अतुलस्वरूपी ॥
गंधर्वदेव नर नाग मनोज्ञ कन्या। ज्या मोहतील मुनिचित्तहि रूपधन्या॥२४
कोठें कुठें तनुविशाल बलाढ्य मल्ल। व्यायामशील, घनगर्जितयुक्त शैल॥!
कुस्त्या करीति बहु तर्जुनि एकमेकां। त्यांचें यथार्थपरि वर्णन शक्य हो कां?२५

नगर रक्षिती सर्व दिशीं बहुकोटि विकटतनु राक्षस ते।
दुष्टनिशाचर भक्षिति गर्दभ, महिषी अजनरधेनूंतें ॥
यास्तव तुलसीदासहि त्यांतें संकोचानें वर्णितसे।
सर्वां परि, त्यां, प्रभुशरतीर्थीं उद्धाराचें भाग्य दिसे! ॥ २६ ॥

पाहोनि ते नगररक्षक भूरिसंख्य। चित्तीं करीत सुविचार कपींद्रमुख्य ॥
घेऊन रूप अतिमात्र लघू असेच। जावें निशीं प्रविशुनी नगरांत साच २७

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने 'सुश्लोक-मानसे' सुन्दरकाण्डे श्रीहनुमद्बलबुद्धिवर्णनन्नाम प्रथमस्तरङ्गः ॥

## तरंग दुसरा

घेऊन शान मशकासम रूप जात। लंकेप्रती कपि मनीं नृहरी भरीत ॥
तैं लंकिनी निशिचरी कपिलागिं भेटे। बोले 'कसा चुकवुनी मज जाशि वाटे!॥१
मार्मे न मर्म तुज ठाउक कीं शठा रे। जे चोर ते असति मत्प्रिय भक्ष्य सारे!'॥
हाणी महाकपि तिला निजमुष्टिघातें। तैं ती पडे क्षितिशि ओकत रक्त कीं तें। २

ती लंकिनी उठत सांवरुनी पुन्हांही । जोडोनि अंजलि वदे विनयें वचें हीं ।।१
'जेव्हां विधी वितरि तो वर रावणासी । तेव्हां मलाहि वदला खुण तोचि ऐसी २
'होशील जैं विकल तूं कपिच्या प्रहारें।तेव्हां विनाशि गण राक्षस जाति सारे!'।।'
हें होय पुण्य मम थोर अतीव आजि। कीं रामदूत करि धन्यचि दृष्टि माझी।।४।।
तें स्वर्गमोक्षसुख हीं मिळुनी जरीं कीं। तोलीयलीं कुणि तुलेमधिं सर्व लोकीं।।
देतील तीं उभय ना लवही कदाही । सत्संग देत सुख जें घडिचाहि पाहीं ।।५।।
लंकेंत तूं शिरुनि रे! करि सर्व कार्या । चित्तांत बाणवुनि राघव रामराया ।।
ज्याचेवरी प्रभु दया करि त्यास होई। पीयूषसें विषहि मित्रपरी अरीही ।।६।।
श्रीराम ज्या सकृप पाहि,तयास होतो। कीं गोष्पदासमचि अब्धिहि केवढा तो!।।'
त्यातें सुमेरुहि गिरी जणुं रेणुसाच । अग्नीहि शीतळपणा धरि त्यास साच !'।।
घेऊनि तें अतिलघू हनुमान् स्वरूप। लंकेंत जाइ नमुनी प्रभुसी अपाप ।।
शोधीत तो प्रतिगृहीं फिरला अमूप । सर्वत्र त्या दिसति वीरचि मात्र रूप।।
जाई पुढें कपिहि रावणमंदिरांत । वैचित्र्यहर्म्य नच वर्णन शक्य होत।।
तें तो बघे शयनसुप्त दशाननातें । सीता न तेथ दिसली परि त्याजला तें।।९।।
प्रासाद त्यास दिसला अतिरम्य एक । ज्यामाजिं देवघर निर्मियलें सुरेख ।।
रामायुधांकित विभा करि वर्णुं याची । देखे प्रहृष्ट तुलसीतरुराजि तेवीं ।।
लंका निशाचरगणा वसती अशेषा । कैसा करील तरि सज्जन येथ वासा ?।।
ऐसा विचार कपिराय मनीं करीत । तों होय जागृत बिभीषण रामभक्त ११
'श्रीराम ! राम!' वदनीं करि तो सुघोष । जाणोनि सज्जनखुणां कपि मानि तोष।।
चित्तीं म्हणे'करुनि ओळख घ्यावि याची।ना कार्यहानि कधिं साधुमुळें असेचि'
तो विप्ररूप धरुनी करि वेदघोष । येई बिभीषण क्षणीं परिसोनि त्यास ।।
वंदोनि त्यासि कुशला पुसुनी विनीत । प्रार्थी 'द्विजा! मज कथा सगळें स्ववृत्त
आहां तुम्ही कवण कीं हरिचेच दास?। माझ्या मनीं उपजला अतिथोर हर्ष ।।
दीनानुरागि तुम्हि राघव रामराय । आलांत धन्य करण्या मजलागि काय?'।।
सांगे तदा पवननन्दन आत्मनाम । श्रीरामवृत्तहि निवेदित भक्तिधाम ।।
तें ऐकतांच पुलकांकित दोहि होती । श्रीरामसद्गुणगणीं भरि चित्तवृत्ति ।।१५
"हे मारुते! परिस मी वसतों कसा रे। जिह्वा दिचारि दशनांतरिं जेविं थारे।।
केव्हां बरें मजवरि जाणुनियां अनाथ । तो सूर्यवंशविभु हो करुणार्द्रचित्त १६

'ये तामसी मम तनू नच साधना हे। न प्रीति राघवपदांबुजि नीट राहे ॥
विश्वास आज परि हे हनुमंत! येत। भेटेल ना हरिकृपेविण साधुसंत ॥१७॥
केली कृपा रघुवरें मज आज मोठी। कीं दाविलें तव पदाब्ज मदीय दृष्टीं" ॥
'ऐकें बिभीषण! अशी प्रभुची सुरीति। कीं सेवकावरि रती अति रामचित्तीं १८
मी काय थोर कुलिंचा! कपि जन्मजात। आत्याच चंचल अमाम्यहि सर्वरीत॥
जे घेति नाम अमुचें उठुनी सकाळीं। त्यांतें उपासचि तया दिनिं ये कपाळीं!॥
ऐसा जरी अधम मी तरि देख कीं हें। माझ्यावरी रघुपती करुणाचि वाहे॥
ऐशी कृपा प्रभु करी सखया!' म्हणोनी।त्या आठवोनि विभु, लोचनिं येत पाणी॥
जाणोनिही प्रभुवरा विसरोनि चित्तीं। सर्वत्र जे भ्रमति, दुःखि न केविं होती?॥
ऐशापरीं स्तवुनि रामगुणां अनंतां। होई अनंतसुख त्या बहु भाग्यवंता॥२१॥
सांगे बिभीषण पुढें सगळेंचि वृत्त। जैशापरी जनकजा वनिं राहि तेथ॥
तेव्हां विचारि पवनात्मज 'सांग, बन्धो!। मी केविं तीप्रति बघूं शकणार साधो?'
त्यातें बिभीषण तदा सुचवीत युक्ति। घेई निरोप म्हणि मारुति ऐकुनी ती॥
घेऊनि रूप पहिल्यापरि तें फिरून। गेला अशोकवनिं मारुतिराय तूर्ण॥२३॥
चित्तांत मारुति नमी बघतांच तीतें। रात्रीं वसे प्रहर एक अशोकिं कीं तें॥
होती कृशा तनु जटा शिरिं, एकवेणी। चित्तासि जी रमवि राघवसद्गुणांनीं॥
दृष्टी जिनें निजपदावरि ठेविलेली। चित्तात रामचरणांवरि वृत्ति ठेली॥
ती जानकी परमदुःखित दीन ऐसी। साध्वी तदा दिसलि मारुति-लोचनांसी॥

॥ इति श्रीरामचरितमानसपद्यानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे सुन्दरकाण्डे श्रीहनुमद्बिभीषणसंगमवर्णनं नाम द्वितीयस्तरङ्गः ॥

## तरंग ३ रा

राहे दडून कपि तो तरुपल्लवान्तीं। 'कैसें करूं पुढतिं?' ह्याच विचार चित्तीं
तों तेवढ्यामधिंच रावण येत तेथ। संगें अनेक युवतीपरिवार होत॥ १ ॥
सीतेसि तो खल अनेकपरीं धुडावी। तो सामदाम भयभेद अनेक दावी॥
बोले "अगे सुमुखि! ऐक शहाणि होशी। मंदोदरी-प्रभृति होतिल तूज दासी॥
ऐसें करीन शपथें तुज सांगतों हें। गे! एक वार तरि तूं मजलागिं पाहें!"
हातीं तृणा धरुनि बोलति त्यासि सीता। रामा स्मरूनि हृदयीं करुणाधिनाथा॥

'हें आयकें. दशमुखा ! नलिनीस केवीं । खद्योततेज फुलवील विशुद्ध मावीं॥
ऐसा विचार करिरे!' वदली पुढेंही । 'दुष्टा ! न आठविषि रामशराचि कांहीं !
शून्याश्रमांतुनि मला हरिलेंसि चोरा !।निर्लज्जचित्त तुज खंत न या प्रकारा!'॥
खद्योत आपण, रघूत्तम भानुसाच । ऐकोनियां परुष भाषणही तसेंच॥५॥
क्रोधायमान हृदिं रावण हो अतीव । काढोनि खड्ग वदला तिज दुष्टभाव ॥
'सीते ! मला बहुपरीं अपमानिलेंस । या तीक्ष्ण खड्गिं तव कापित मीच शीर्ष
नाहीं तरी क्षणिंच मान मदीय वाणी । चंद्रानने ! मग न हो तव जीवहानि'
सीता वदे " करिकरोपम ती विशाल।नीलाब्जदामसम सुंदर चारुशील ॥७॥
ऐसी रघूत्तमभुजा मम कंठिं वैसे। किंवा तुझा असि तरी अति घोर रोषें !
हे रावणा ! मम असा पण ऐक नीट। रे चंद्रहास ! मम तूं हर तापकष्ट ॥८
श्रीरामचंद्रविरहाग्नित मी जळें ही । होईल शीतल निशा असिधार पाहीं ! ॥
ती ही हरो तव करीं मम दुःखभार "। ऐकोनि रावण तिला वधुं पाहि उग्र ॥
मंदोदरी करि तयाप्रति नीतिबोध । त्या आवरीत विनयें करुनी विरोध ॥
बोलावुनी वदत रावण राक्षसींसी । "सीतेप्रती छळ करा अतिमात्र रोषीं॥
ही होय ना वश मला जर एक मासीं।कापीन मी हिजसि या असिनें न कैसी?"
गेला गृहासि दशशीर्ष; निशाचिसंघ । सीतेसि तो बहुपरी छळि पापसंग॥११

होती त्यांत परी एक त्रिजटा नाम राक्षसी ॥
जीची रामपदीं प्रीती सुविवेकयुता अशी ॥ १२ ॥
सर्वां बोलवुनी बोले त्रिजटा " स्वप्न देखिलें ॥
सीतेसि सेवुनी साधा सख्यांनो ! हित आपुलें ! ॥ १३ ॥
स्वप्नीं मीं देखिली लंका जाळिली ही कपीश्वरें ॥
सर्व राक्षससेनाही वधिली कुपितांतरें ॥ १४ ॥
नग्नसा गर्दभारूढ दशशीर्ष वधीवला ॥
शिरें ज्याचीं छेदिलेलीं भुजाभारहि खंडिला ! ॥ १५ ॥
ऐशापरि रिघाला तो दक्षिणेप्रति रावण ॥
लंकाराज्यीं बैसवीला पाहिला म्यां बिभीषण ॥ १६ ॥
सर्वत्र रामराजाची नगरी शाहि ती फिरे ॥
सीतेप्रती बोलवूनी घेई श्रीराम सत्वरें ॥ १७ ॥

वदतें स्पष्ट हें माझें स्वप्न मी आपणां खरें ॥
होईल सत्य हें सारें त्रिचतुर्दिवसांतरें " ॥ १८ ॥
ऐकोनि वच तें भ्याल्या सर्वही राक्षसी मनीं ॥
जानकीचरणाब्जातें नमस्कारिति तत्क्षणीं !! ॥ १९ ॥
जिकडे तिकडे जातां दूर सर्व निशाचरी ।
सीता करि विचारातें चिंतामग्न निजांतरीं ॥ २० ॥
' एक मासामध्यें खास मजलागिं वधील कीं ।
नीच राक्षस हा क्रूर कपटी पापि घातकी ! ' ॥ २१ ॥

जोडोनि हात मग ती त्रिजटेस सांगे।"माते ! विपत्तिमधि आश्रय तूंच हो गे ! प्राणान्त येथ करण्या वद तूं उपाय । हा होतसे विरह कीं मजला असह्य ॥ काष्ठें चिता रचुनि तूं मज देईं माते ! । दे अग्नि तूं जननि गे ! मम या तनूतें मध्यीति सत्य करिं तूं त्रिजटे! शहाणी"।ती केविं हो श्रवणिं शूलचि सह्य वाणी ऐकोनि तें, शिरिं नमी त्रिजटा तियेसी । रामप्रतापबल ती तिज वर्णि तोषीं ॥ " रात्रीं न अग्नि मृदुले! न मिळेल येथ "। सांगोनि हें गृहपथा त्रिजटा धरीत ॥ सीता म्हणे " विधिच की प्रतिकूल मातें । अग्नीहि ना मिळतसे; नच दुःख जातें आकाशिं हे दिसति वह्निसमान तारे । ना एकही मजसि भूतलिं तो उतारे !॥ हा चन्द्र अग्नि असुनी ठिणगीहि दे ना! । तो जाणतो हृदयिं मी हतभागि पूर्ण ॥ ऐकोनि मद्विनति हा तरुही अशोक । नामासि सार्थ कर, वारु मदीय दुःख॥२६ हे अग्निसेच तव पल्लव रे ! नवीन । तूं अग्नि देचि मज आणुं नकोस विघ्न!"॥ पाहोनि ती विरहदुःखित तेविं सीता । झालाच कल्पसम तो क्षण रामभक्ता ! ॥ चित्तीं विचार करि मारुति आणि टाकी। तो स्वालतीं प्रभुकराश्रित मुद्रिका कीं 'अंगार काय दिधला मजला अशोकें!' वाटोनि हें जनकजा करिं घेत तोखें!॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोक-मानसे महाकाव्ये सुन्दरकाण्डे श्रीजानकीरावणसंवादवर्णनं नाम तृतीयस्तरङ्गः ॥

## तरंग ४ था

तों देखिली अति मनोहर मुद्रिका ती श्रीरामनामशुभमुद्रित चारुमूर्ति ॥
ती होय तेविं चकिता बघतां।चि तीतें । हो हर्ष त्यापरि विषादहि घोर चित्तें !॥

'जिंकील कोण ! रघुराज असे अजेय । ना मुद्रिकाहि कपटें अशि शक्य होय' !॥
नाना विचार करि मानसिं ऐसि सीता । तों गोड शब्दिं हनुमान् मुखसौत चित्तं
श्रीरामचंद्रगुणवर्णन तो करीत । सीता जया परिसतां मनिं होत तुष्ट ॥
बोले सती 'अमृतधारचि कर्णि ओती । जो हे कथा, नयनिं पाहिन तो सुमूर्ति !'॥
तेव्हां तिच्याजवळि मारुतिराय येई । तों शंकिता फिरवि पाठ तयाकडे ही ॥
"हे आइ जानकि ! गणीं मज रामदूत । श्रीरामरायशपथें कथि सत्य उक्त ॥४॥
म्यां आणिली जननि गे ! प्रभुमुद्रिका ही । ही खूण तो मज दयानिधि राम देई"॥
सीता विचारि 'नरवानरमैत्रि कैसी ?' । सांगे समग्र मग मारुति वृत्त तीसी ॥५॥
सप्रेम तें वचन मारुतिचें श्रवोनी । विश्वासलें जनकजामन साधुमानीं ॥
हा देहवाङ्मनिं असे करुणाब्धिदास । ऐसें तिच्या कळुनि ये झणिं मानसास ॥
जाणोनि दास हरिचा मनिं भक्ति दाटे । रोमांचली तनु,विलोचनिं अश्रु लोटे! ॥
सीता वदे "बुडत मी विरहाब्धिमाजीं । होसी, परी सुखद नावचि होशि माझी॥
ओवाळिलें तुजवरूनिच मी स्वकाय । आहेत सानुज सुखामधिं नाथ काय ? ॥
श्रीराम कोमलमना करुणानिधान । झालेत निष्ठुर कसे मज ते सुजाण ॥ ८ ॥
ज्याचा स्वभावचि सुखी करणें स्वदास । माझी स्मृतीहि नच राहिलि कां तयांस?॥
केव्हां बरें नयन हे मम शांत होती । पाहोनि ती मृदुल नील सुचारुमूर्ति ? ॥ ९ ॥
मातें कसे विसरले तरि राम ! ' ऐसें । बोले, न शब्द उमटे जल नेत्रिं वर्षे ! ॥
पाहोनियां विरहदुःखित जानकीतें । बोले विनीत कपि तो मृदुलें वदुकें ॥१०॥
"माते ! असे कुशल सानुज रामराय । कारुण्यधाम तव दुःखिं सुदुःखि होय ॥
शंकाहि ना हृदयिं तूं लवमात्र घेचि । प्रीती दुणी तुजहुनी तव ठायिं त्याची!॥
घेऊनि धैर्य हृदिं ऐकचि राघवाचा । संदेश जो कथिन मी तुज योग्य याचा"॥
बोलोनि मारुति असें उगवाच राहे । येई गळा भरुनि लोचनिं नीर वाहे ! ॥
बोले पुढें "वदत राम' तुझ्या वियोगें । सीते ! मला सकलही विपरीत हो गे!॥
वल्लीचयी गमलि पालवि कोवळी ही । कीं कालरात्र रजनी उन्ह चंद्रिकाही ॥
इंदीवरें गमति कुंतसमूह तीक्ष्ण । कीं तप्त तेल वरुणु वर्षत मेघ जाण ! ॥
दे त्रास सावलि मला सकळां तरूंची । फूत्कारसा त्रिविध वायु मनासि जाची ॥
सांगोनियां दुसरिया, जरि दुःख सोसे । सांगूं कुणां ? नच दिसे कुणि जाणि ऐसें
जें प्रेम मन्मनिं तुझ्यावरि सत्य होय । जाणे मदीय मन एकचि तें अमेय ॥

तैंहि प्रिये ! मन तुझ्यामधिं नित्य राहे। तूं यांत जाण सगळें रहस्य पाहे'" ॥
संदेश ऐकुनि असा प्रभुमानसींचा । ती प्रेममग्न विसरे तनुभाव साचा! ॥
बोले तदा पवननंदन "धैर्य घेई । सीते ! स्मरोनि विभु सेवकसौख्यदायी ॥
आणीं मनीं रघुपतिप्रभुचा प्रभाव । ऐकें मदुक्त; हृदिंचा त्यज भीतिभाव ॥
या सर्व राक्षसगणां गण तूं पतंग । श्रीरामचंद्रशरसंघ कृशानुसंग ॥
*तूं धीर सोड न मुळीं मनिं हेंचि घेई । झालेच दग्ध जणुं राक्षस मान आई!* ॥
होता जरी रघुवरा तव ठाव ठावा । ना लागता क्षण विलंब विभूसि केव्हां ॥
श्रीरामचंद्र जणुं भानुसमान मान । त्या राक्षसां समज गे ! तिमिरासमान ॥
आतांच घेउनि तुला असतों निघालों। आज्ञेसि घेउनि तशा प्रभुच्या, न आलों!
हें सत्य रामपदपद्म करुनी वंदें मी । याकारणें धीर धर कांहिं दिनानुगामी ॥२०
येईल तो कपिसमूहसमेत राम । नाशील राक्षसगणांप्रति तो निकाम ! ॥
नेईल तो परत गे ! तुजला निराधि । त्रैलोक्यिं गातिलचि तें यश नारदादि "
सीता पुसे ' असति का तुजसे कपी ते ? । हे वीर राक्षस बलोद्धत युद्धकर्ते
संदेह वास्तव मला बहु वाटताहे' । तें ऐकतां प्रकट हो कपि आत्मदेहें ॥२२
सौवर्ण भूधर विशाल शरीर तैसें । युद्धीं भयंकर, बलिष्ठ कपीन्द्र भासे ॥
सीता धरी भरवसा बघतां तयाला । तों मारुती फिरुनियां लघुरूप झाला ! ॥
सीतेसि सांगत 'जरी नसती कपी ते। बुद्ध्या विशाल बलशालि विशेष माते ॥
रामप्रताप परि होय समर्थ ऐसा । खाईल कीं अहि लघूहि पहा, खगेशा' ॥
ऐकोनि मारुति-वचा अति हृष्ट सीता । भक्ति प्रताप बल त्यांत दिसून येतां
रामप्रिया समजुनी तयिं देइ आशी। 'होशील रे ! अमितशीलबलाकराशि ॥
वत्सा ! गुणाब्धि अजरामर नादशील । होशील राघवमनीं प्रिय चारुशील ' ॥
श्रीरामचंद्र करतील कृपा अपार, । हें ऐकतांच हनुमान् मनिं हृष्ट फार २६
सीतापदाब्जि बहुवार नमी लवोनी । बोलेहि जोडुनि करांबुज गोड वाणी ॥
"झालों असे जगतिं मी कृतकृत्य माते ! । आशीवच तव अमोघ मिळालिं मातें
हें एक आइ ! मज लागलि भूक भारी । पाहोनि सुंदर फळें तरुंना समोरीं"
सीता म्हणे ' असति राक्षस राखणारे । मोठे बलाढ्य, असती बहु, ऐक बा रे!'
बोले कपीन्द्र ' मज भीति तदीय नोहे ! । तूंतें रुचेल तर काढुनि भक्षिताहें '
देखोनि बुद्धि बल मारुतिचें विशाल। सीता वदे "कपिवरा ! वनिं जा खुशाल

' चित्तांत आठवुनि रामपदारविंदां । तूं खा फळें मधुर—सत्तम सौख्यकंदा !"
वेव्हां नमूनि विनयें जनकात्मजेसी।आरामिं मारुति शिरे फलशाधि भक्षी३०
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे सुन्दरकाण्डे श्रीजानकीहनुमत्संवादवर्णनन्नाम चतुर्थस्तरङ्गः ॥

## तरंग ५ वा

मोडीहि तो तरु अनेक बळेंकरूनी । मारीहि रक्षसगणां कुद्धनी करांनीं ॥
जाती कितीक पळुनीं शर्णि रावणातें । आक्रंदती कटुरवें भयभीत की ते ॥१
'आला बलाढ्य कपि एक वनांत नाथ!। तेणें अशोकवन मोडियलें समस्त॥
खावोनि पुष्कळ फळें उपटी तरूंतें । पाडोनि राक्षस भुईवरि मर्दिले ते!' २
ऐकोनि रावण, क्षणीं भट धाडि नाना। गर्जोनि पाहि हनुमान् अति हृष्ट त्यांना
संहारि मारुति निशाचर सर्व लीलें।गेले तयांतिल पुन्हा कुणि अर्धमेले ॥३॥
तैं रावणें तनय अक्षय पाठवीला । तो चालला सहित राक्षसवीरमेळा ॥
येतां तया बघुनि मारुति वृक्षपाणि। तर्जोनि संहरि; भरी नभ गर्जनांनीं ॥४
कांहीं तयें वधियले, किति मर्दियेले। कांहीं धुळीं मिळविले, शर्णि लोळवीले!
त्यांतून जाति कुणि राक्षस रावणासी।त्या सांगती 'प्रभुवरा ! कपि शक्तिराशी!'
ऐकोनि पुनरपि रावण रुष्ट फार । तो मेघनाद बलशालि विसर्जि वीर ॥
सांगे तया 'वधुं नको कपिलागिं बांध !। आणोनि दावच कसा कपि कोण! शोध'
चाले तदा अतुल तो बलि मेघनाद । संक्रुद्ध बंधु—निधनास्तव वैरवाद ॥
जैं मारुती बघि भयंकर वीर येत । धावे तयावरि कडाडुनि खाव दांत!॥७
घेई विशाल तरु तो उपडून तूर्ण । तो मेघनादरथ मोडि, करीत चूर्ण !॥
जे त्यासमेत कुणि राक्षसवीर होते। तो लोळवी अति विमर्दुनिया तयांतें ॥
निःपात त्या करुनि गाठित मेघनादा। दोघे तदा स्मरविती गजराजयुद्धा॥
हाणोनि मुष्टि चढला कपि वृक्षशाखे । हो मेघनाद पळ मूर्च्छित त्या धडाकें
ठाके पुन्हां उठुनि दावित युद्धमाया। मानोनि मारुति अशक्यचि आकळाया
ब्रह्मास्त्र योजि अभिमंत्रुनि मेघनाद। तेव्हा विचार करि मारुति हें सुबुद्ध ॥
' ब्रह्मास्त्र-मान जर ठेविन मी न आतां। त्याचा रिघेल महिमा जगतांत अस्ता'
तो ब्रह्मबाण करि जर्जर मारुतीतें । संहारि राक्षस किती कपि आत्मपातें! ॥

पाहोनि मूर्च्छित अशा पवनात्मजासी। ने मेघनाद क्षणिं बांधुनि नागपाशीं
ऐकें भवानि! जपतांक्षणिं नाम ज्याचें। ज्ञानी करीति भवबंध विदीर्ण साचे
वहूत तो तरि कशापरि बद्ध व्हावा?। तो आत्मबंधनिंहि दावित नाथसेवा
ऐकोनि बद्ध कपि, राक्षस तूर्ण येती। सारी सभा बघत कौतुक येउनी ती॥
तो पाहि रावण सभेप्रति आजनेय। जीची विभा अतिविशाल अवर्णनीय॥
जोडोनि हस्त सुर दिक्पति नम्र जेथ। लंकेश्वरभ्रुकुटितें भिउनी बघीत॥
निःशंकचित्त कपि देखत त्या प्रतापा। जैसा खगेश्वर बघे अमितांहि सर्पां॥
हांसे दशानन कपीस तशा बघूनी। निंदीहि दुर्वचनिं त्यासि कठोरवाणी१५
तों आठवूनि निजनंदन-घात चित्तीं। होऊनि खिन्न मनिं,बोलत त्या निजोक्ति
-" हे वानरा! कवण तूं? कवण्या बळानें केलेंसि नष्ट अजि कानन द्याप्रमाणें?
तूं ऐकलेंसिहि न कीं मम नाम कर्णीं। चोरा! न ये लवहि भीति तुला दिसोनी
कां मारिलें निरपराध निशाचरांना। प्राणां तुझ्या शिवलि भीति शठा! कशी ना?
"रे रावणा! परिस यद्बलिं सर्वसृष्टि। माया सलील विरची क्षणिं विश्वकोटी
ज्याच्या बळें विधि रमेश महेश देव। निर्मीत, रक्षित, विनाशित विश्व सर्व
ज्याच्या प्रतापिं निजशीर्षिं सहस्रशीर्ष। वाहीतसे गिरिनद्यांसह विश्वकोष॥
जो देवरक्षक अनेक तनू धरोनी। तळ्यास आणि तुझियासम दुष्ट कोणी॥
जो भंजि शंकरशरासन वज्रसार। भूपालसंघमद त्यासह नाशि पार॥
नाशी खर त्रिशिर दूषण तेविं वाली। जो सर्व हे अतुल दारुण शक्तिशाली॥
ज्याच्या बलाश-लवलेशिं चराचरा या। झाडून सर्व जगता जिणलेंसि राया!॥
ज्याची सती प्रियतमा हरलीस तूं रे!। त्याचाच दूत मजला गण सत्यकारें
आहे पराक्रम तुझा मम सर्व ठावा। तूं कार्तवीर्यसह जिंकिशि युद्धि दावा
वालीसवेंदि लढुनी यश मेळवीशी!। मी जाणतों सकल रे तव कीर्ति कैशी!"॥
ऐकोनि मारुतिवचा विहसोनि कांहीं। लंकेश तो विषय तयाचि रोधुं पाही॥
बोलेहि मारुति पुढें "क्षुधितातरीं मी। तोडूनि सेविलिं फळें प्रभु! वृक्षगामी॥
खोड्या स्वभाविं कपि हा तरु मोडि कांही। सर्वांसि आवडि विशेषचि आत्मदेहीं
मारीति राक्षस मला कुमती कुमार्गी। जे मारिती मज, तयां वधि मीच वेगीं
हा इंद्रजित् सुत तुझा मग बांधि पाशीं। आणोनि ठेवित मला क्षणिं तूजपाशीं॥
लज्जा न कांहिं मज यापरि बांधिल्याची। मी स्वामिकार्य करण्यांप्रति सर्व वेंचीं॥

प्रार्थीत मी तुजसि रावण ! बद्धपाणि । टाकून गर्व धर हे उपदेशवाणी ॥
तूं आपुला कुलविचार पहा करूनी । भ्रांति त्यजून, मनि भक्तकृपाळ आणी॥
ज्याच्या भयें अतिशयें मनिं काळ भीत । जो हे चराचर सुरासुरही ग्रसीत॥
त्याच्याशिं वैर कधिंही करं तूं नकोस। दे मद्वचें परत त्याप्रति जानकीस!॥
कारुण्यधाम विभु राम खरारि तूंतें । रक्षील विस्मरुनियां अपराध ते ते ॥
तूं जाच रे ! शरण त्या प्रणताधिपाला । चित्तांत ठेव रघुनाथपदांबुजाला ॥२८
लंकेवरी अचल राज्य सुखें तुझें हो । इंदु पुलस्तियश निर्मल नित्य राहो ! ॥
होऊं नकोशचि तयावरि तूं कलंक । सोडून मोह मद चित्तिं विचार राख ॥२९
श्रीरामनामविण शोभत नाहिं वाणी । वस्त्राविना युवति भूषित भूषणांनीं ॥
रामासि जे विमुख तत्प्रभुताधनादि । नासो असो गत अनागत, तुल्य आधि
ज्यांतें मुळीं न जलनिर्झर, त्या नद्यांचें । वर्षेल तोंच जल, ना तरि शुष्क सारें !
मी निश्चयें कथितसें दशकंधरा ! हें । त्राता न रामविमुखा कधिं कोणि आहे ! ३१
जो द्रोह रामचरणां करणार त्यासी । ब्रह्मे सहस्र हरि शंभु कुणी न रक्षी ! !॥
टाकीं तमोगुणचि दुःखद मोहमूल । सोडूनि दे दुरभिमान मनामधील ॥३२

भगवान् करुणासिंधू श्रीराम पुरुषोत्तम ।
तया शरण तूं जा गा ! भक्तिभावें तयीं रम !" ॥३३॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे सुन्दरकाण्डे श्रीहनुमद्रावणसंवादवर्णननाम

पञ्चमस्तरङ्गः ॥

## तरंग ६ वा

होती जरी कपिगिरा हितदा अती ती । जेथें विवेक विरती नय थोर भक्ति ।
बोले दशानन हसोनि महाभिमानी । "तूं मर्कटा ! गुरु महाबुध लब्ध कोणी ! १
दुष्टा ! तुझ्या निकट मृत्युच पातलासे । जें देशि नीच मज तूं उपदेश पेसे"॥
'होईल हें चि उलटें !' वदतो कपी तो । 'झाला मतिभ्रम तुला; मज दृश्य होतो'
ऐकोनि हें वदत रावण फार रोषें । "माराच टार हाणि या कपिडाणि केशे !"॥

ऐकोनि धांवति निशाचर त्या वधाया । ये मंत्रिंसगत बिभीषण त्याच ठायां १
तो नम्रशीर्ष विनवी बहुतां परींनीं । "तोडा न नीति तुम्हि दूतवधा करूनी ॥
नाथा! करा उचित अन्यचि दंड कांहीं!" सारे तदा म्हणति 'गोष्ट भली खरी ही'
ऐकोनि हांसुनि वदे दशकंठ वाणी । "या अंगभंग करुनी कपितें पिटोनी!" ॥
सर्वां दशानन वदे "कपिलागिं चित्तीं । प्रीति स्वपुच्छि अतिमात्रचि वाटते ती ॥
तेलामधें भिजविल्या पटिं पुच्छ बांधा । या पेटवूनि मग त्या अनलें सबंधा ॥
जाईल तो निजगृहा परतोनि लांडा । नाथासमेत मग येइल येथ चांडा! ॥
ज्याची बडाइ बहु बोललि वानरें या । त्याच्या बघूं तरि अम्ही सुविशेष धैर्या"॥
ऐकोन रावणवचा कपि चित्ति हासे । 'वाग्देवताच मज साह्य करीत ऐसें'! ॥
तें ऐकतांच वच त्यापरि रावणाचें । ते मूर्ख राक्षस करीति तसेंच साचें ॥
लंकेंत राहि न मुळीं घृत वस्त्र तैल । जों वाढवीत कपि पुच्छ निज स्वलील८
देखावया कुतुक तें पुरवासि येती । मारीति मारुतिस ते पदिं आणि हातीं ॥
टाळ्या पिटीति किति ढोलहि वाजवीती । काढूनि फेरि पुरिं हेंपुट पेटवीती ॥
झाला ज्वलन्त बघुनी हनुमंत अग्नि । घेई क्षणांत लघुरूपतनू करूनी ॥
जाई चढून मग हेमगृहोच्चदेशीं । पाहोनि भीति अति राक्षसिणी तयासी ॥
वाहेहि त्याच समयीं अतिमात्र वात । ज्या प्रेरणा करितसे भगवंत मूर्त !१०
गर्जोनि मारुति तदा करि अट्टहास । होई महावपु कपी भरि की नभास ॥
होई विशाल हनुमंत अति त्वरेनें । धावे गृहाहुनि दुज्या गृहि या तऱ्हेनें ॥
हो दग्ध तें नगर, लोक भिऊन गेले । ते अग्निनें सकल वेढियले कराळें ॥
'हा तात! हा जननि!'फोडिति सर्व टाहो।'यातून वाचविल कोण अम्हा अतां हो!
होतोच सांगत अम्ही, "कपि हा न कोणी । हा देव येइ कुणि वानररूपवर्णी॥
साधुच्छलें फळ असेंचि मिळावयाचें! । झालें अतां यपरि हें पुर भस्म साचें!" ॥
तें जाळिलें नगर कीं निमिषांत एका । ना जाळिलें परि बिभीषणसद्म जें कां ॥
अग्नी जयें सृजियला गिरिजे! प्रभूत । तद्दूत तो म्हणुनि दग्ध तयें न होत ॥
जाळूनि सर्व नगरी इथुनी तिथूनी । मारी कपी जलधिमाजिं उडी वरूनी ॥
पुच्छास तो विझवि, घालवि शीण कांहीं । टाकी विशालतनुता, लघुरूप होई ॥
ठाके उभा जनकनंदिनिचे समोर । जोडोनि पाणियुगलांबुज भक्तिनम्र ॥१६
"मला माते! यावी कवण तरि ती खूण अपुली ।

हा दोष होय मम लालस लोचनांत । प्राणांप्रती मम हठेंचि निरोधतात ! १८
हा देहतूल विरहाग्नित दग्ध व्हावा । श्वासानिलें क्षणिंच निश्चय हा वहावा
स्वार्थामुळें स्रवति लोचन वारिधारा। हा होत भस्म विरहानलिं ना विचारा !
आहे विपत्ति अति घोरचि जानकीची।हे दीनबंधु ! कवणा कथवेल साची !
कल्पा-हुनीहि गुरु होति पळेंहि तीतें। मर्दोनि दुष्ट, तिजला झणि आणणें तें
ऐकोनि दुःख सतिचें प्रभु सौख्यराशि । राजीवलोचन भरे बहु अश्रुवर्षी ॥
'जे देहवाङ्मनिं मलाच अनन्यभक्ति।स्वप्नींहि त्यांप्रति कदा छळि का विपत्ति?'
तें मारुती वदत 'तीच विपत्ति होय । जेथें नुरे स्मरणही उरिं राघवीय ॥
ती हो कथा कितिहि या रजनीचरांची।जिंकोनियां रिपुसि जानकि आणणेंचि
श्रीराम मारुतिस सांगति 'ऐक ताता ! । नाहीं समान तुझिया उपकारकर्ता !
नाहींच देवमुनिमानविं तूजऐसा । होईन मी तव ऋणीं उतराइ कैसा ! ॥'
झाले तुझे मजवरीं अमितोपकार । त्यांचें न आकलनही मज हो समग्र ॥
त्यांची कशी परतफेड तरी करूं ती? । मी पाहतों बहुपरीं विवरूनि चित्तीं'
तो देवरक्षक दयानिधि रामराय । पाहे किती कपिसि जो करि भक्त साह्य ॥
श्रीरामचंद्रनयनाम्बुजिं अश्रु वाहे । रोमांचुनी प्रभुतनू अतिशोभताहे ! २५
ऐकोनिया प्रभुवचां हनुमान् विलोकी।तो श्रीमुखासिच तशी प्रभुमूर्ति ती कीं
तो प्रेमसद्गद पडे प्रभुपायिं हर्षे । 'भो ! रक्ष रक्ष भगवन्' करुणोक्ति घोषे।॥
त्या ऊठवूं बघत राम पुनःपुन्हांहि । तो प्रेमनिर्भरिं उठूं शकला न कांहीं ॥
तैं वायुनंदनशिरीं प्रभुपाणिपद्म । तैसें स्मरूनि शिव हो हृदिं सौख्यसद्म-॥
तैं सावधान मन शंभु करी फिरून । लागे कथूं परमरम्य कथा-निधान ॥
प्रेमें तया उचलुनी प्रभु घे उराशीं।त्या बैसवीत निजसंनिध भक्तिराशि २८
तैं मारुती बघुनि त्या प्रभुतें प्रसन्न । बोले तया निरभिमान अतीव लीन ॥
'हो हाचि थोर पुरुषार्थ अम्हां कपींचा।कीं मारणें बहु उड्या तरुशाखि शाख्या
लंघोनि सिंधु करिं दग्ध सुवर्णलंका । संहारि राक्षस, वनासहि मोडिलें कां ॥
हा हो! प्रताप तुमचा रघुनाथ! होय। ना थोरवी लवहि तेथ असे मदीय॥
ज्यातें तुम्ही प्रभुवरा ! अनुकूल व्हाल।त्यांही अशक्य न तयाप्रति कार्यजाल!
जाळील कापुसहि तो वडवानलाही । लाभे प्रभावबल ज्या तुमचेंच कांहीं'
ऐकोनि तें प्रभुसि फारचि हर्ष होय।त्या कायवाङ्मनिं गणी निजभक्तराय ॥

सांगे कपीसि विभु 'तूं वर घे इवा तो। देईन कीं तुजसि जो सुखमूल होतो'
तैं मारुती म्हणत 'भक्ति सुखात्ममूर्ति।द्यावी कृपेंकरुनि, जी अनपायिनी ती'
ऐकोनि तद्वच तसें ऋजु जें अतीव।बोले 'तथाऽस्तु' विभु गौरि! महानुभाव॥
ज्यांतें सुभाव कळला रघुनंदनाचा । ना हेतु त्यांसि भजनाविन अन्य साचा
संवाद हा गिरिसुते! स्मरती मनांत । त्यां रामपादकमलीं अति भक्ति होत॥
ऐकोनिया प्रभुवचा कपिवृंद गाती । 'श्रीराम राम जय राम कृपालुमूर्ति' ॥
'तों राम बोलवुनि सांगतसे सुकंठा।' व्हावें सुसज्ज म्हणि घेउनि सैन्य साठा ॥
आतां कशास्तव गड्या! करणें उशीर? । आदेश दे, सकल आण कपिप्रवीर
पाहूनि हेतु सुर वर्षुनि पुष्पराशि । जाती नभातुनि रहा परम महर्षी ॥३६

सुग्रीवार्शेकरुनी आले कपियूथ यूथप अनन्त ॥
नानावर्ण अतुलबल ऋक्षसमूहहि तसेच बलवंत ॥ ३७ ॥
प्रभुपदकमला वंदुनि लववुनि शिर गर्जना करिति सारे ॥
ते ऋक्षवीर वानर निरुपमबलशाली ज्यामधें थोरे ॥ ३८ ॥
सार्‍यां कपिसैन्यातें करुणासागर विलोकि निज नयनीं ॥
प्रभु पंकजाक्ष तेव्हां सारे बल पावले अतुल भुवनीं ॥ ३९ ॥
रामकृपासामर्थ्यें झाला एकेक वानर समर्थ ॥
वाटे कीं तो जणुं हो सपक्ष बलशालि शैलवर सार्थ! ॥ ४० ॥

श्रीरामचंद्र करि तो मग जैं प्रयाण । होती तया शकुन उत्तम भाग्यपूर्ण ॥
ज्याची असे सकलमंगलराशिकीर्ति । त्याच्या प्रयाणिं शकुनोत्तम हेचि नीति!
रामप्रयाण कळलें म्हणि जानकीतें । वामांगिचें स्फुरण जें तिज कीं कथी तें॥
जों जों दिला शकुन उत्तम होत जाती।तों तों घडे कुशकुनावलि रावणा ती!
सारे निघे कटक, वर्णु न ये अपार । ते गर्जती अमित वानर भालु थोर ॥
ज्यां आयुधें दिति नखें तरु शैल घेते । जाती यथेच्छ अवनीं नभिं वा त्वरें ते
ते ऋक्ष वानर निनादति सिंहसेच । चीत्कारती भिउनि दिग्गज ऐकतांच!॥
डोले मही, गिरिहि हालति त्या रवानीं।सिंधूहि दावि थरकांप अतिप्रमाणीं!
झाले महष्ट रविचंद्र मुनीश्वरादि । ते नाग किन्नरहि होति मनीं निराधि ॥
तेव्हां कपी कटकटां रुषिं दात खाती।ऐसे भयंकर असंख्याचि धांवताती ४५
ते वीर ऋक्षकपि गर्जति घोषुनीयां । 'श्रीकोसलेश जय! रे जय रामराया!
श्रीकोसलाधिप अगाध बलप्रतापी! श्रीराम राम! जय राम! खलासि दापी'

जशी देई मातें खुवरहि तो अंगठि भली " ॥
तदा सीता देई विमलमति चूडामणि निज ।
खुणेसाठीं त्यातें प्रमुदित मनें घे पवनज ॥ १७ ॥
वदेही ऐसें तो " नमन मम सांगें प्रभुवरा; ।
असे पूर्णाकाम प्रभु अखिल रीतीं, न दुसरा ॥
दयाळू दीनांचा करुच अपुलें ब्रीद सुफल, ।
हरावी नाथानीं मजवरिल आपत्ति अतुल ! ॥ १८ ॥
जयन्ताची सारी कथन कर तूं त्यांप्रति कथा ।
प्रभूंच्या बाणाचें बल अमित त्यां जाणवि, सुता ! ॥
जरी ना ते येती प्रभु इथवरीं तीस दिवसीं।
तरी ना मी त्यातें गवसिन जिती मासत मसीं ! ॥ १९ ॥
कसे मीं राखावे असु मम मला सांग सखया ! ।
' निघोनी मी जातों परत ' म्हणसी तूं हि मज या ॥
तुला देखोनीयां हृदय मम थालें किति मनीं ॥
निघोनी तूं जातां, मजसि दिन ते ! त्याच रजनी ! " ॥ २० ॥

बहुपरि समजावी मारुती जानकीतें । वदत तिजसि " सोडी ना मुळीं धैर्य कीं तें
चरणकमलिं तीच्या वंदुनी नम्रभावें । कपि निघत क्षणीं कीं राघवापाशिं यावें
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे सुन्दरकाण्डे लङ्कादाहवर्णनन्नाम षष्ठस्तरङ्गः॥

## तरंग ७ वा

गर्जोनि जें चळत मारुतिराय जाय । भीतींमुळें गळतिगर्भ निशाचरीय ! ॥
लंघोनि सिंधु क्षणि मारुति पार आला। तें आयके किलकिलाट कपींत झाला ॥
हर्षोनि सर्व बघती पवनात्मजाला । वाटे तयां फिरुनि जन्म जणूं मिळाला।
त्याचें प्रसन्नमुख तेज विराजलेलें । जें सूचवी खचित राघवकार्य झालें ! ॥
सारे कपी मिळति मारुतितें सहर्ष । कीं शुष्कमीनगणिं आगत वारिवर्ष ! ॥
हर्षे समस्त रघुनायकभेटि जातां । मार्गी कथा पुसति ऐकति कौतुकें ती ॥
तों येति ते मधुवनामधिं सर्व मोदें । खाती फळें मधुर अंगद संमती दे ॥

आरामरक्षक जधां करिती विरोध । मुष्टिप्रहारिं पळवीति तयांसि योध ॥४
उद्यानपाल झणिं धावति ते सुकंठा । आक्रंदुनी म्हणति ' अंगद माडि तंटा '
सुग्रीव तें परिसुनी अति हर्षि बोले । ' वाटे समस्त करुनि प्रभुकार्य आले ॥
त्यां शुद्धि लाभलिच निश्चित जानकीची । हे त्याविना मधुवनीं फलभुक्ति कैंची '
सुग्रीव यापरिं विचार मनीं करीत । तों येत सन्निध तया कपि ते समस्त ॥
येतांच ते नमिति तत्पदिं नम्रशीर्षे । सप्रेम भेटत तयां सकलां कपींद्र ॥
त्यांतें विचारि कुशला प्रभु हर्षधाम । 'देखोनि हे कुशलपाद सुख प्रकाम ॥
झालेंहि काज रघुराज-कृपाप्रसादीं । हें सर्व सयश महान् हनुमंत साक्षी ॥ ॥
याच्यामुळेंच कपि सर्व अम्ही जिवंत ' । ऐकोनि हें फिरुनि भेटत त्या सुकंठ
आले पुढें सकळ ते रघुरायभेटी । आनंदला कपिसि पाहुनि राम दृष्टीं ॥
केलें सुकार्य म्हणुनीं रघुराय तोषे । बंधूसवें स्फटिकसत्तमिं राम बैसे ॥१॥
दोघांसही चरणिं वंदियलें कपींनीं । कारुण्यसिंधु विभु भेटत त्यां मनींनीं ॥
प्रेमें पुसे कुशल; तैं वदती कपींद्री । 'हो पावलों कुशल देखुनि पावलें हीं' ॥
तैं जांबुवंत विनवी ' रघुराय ! ऐका । ज्याचेवरी प्रभु कृपा करितील हे का ॥
त्यातें सदा कुशल मंगल सर्वरीतीं । देवर्षि मानव तया सुख आचरीती ११
होईल तोच विजयी विनयी गुणाब्धि । सत्कीर्ति त्याचिच जगत्त्रय गाय शब्दीं
ही श्रीकृपा म्हणुनि सिद्धिस कार्य जाय । हें आमुचें जनन आज कृतार्थ होय ! ॥
हे नाथ ! केलि करणी पवनात्मजें जी । ती गावयास नच शेषहि शक्य हो जी ! '
सांगेहि मारुतिकृती परमाद्भुता ती । तैं जांबुवंत विभुलागिं विशुद्धकीर्ति ॥
ऐकें कृपानिधि मनामधिं तोष पावे । आलिंगि मारुतिसि तो अतिहृष्टभावें ॥
त्यातें पुसे प्रभु ' कशापरि जानकी ती ? । स्वप्राण रक्षि कशि ती वद भक्तिमूर्ति ! ॥
तैं मारुती वदत ' तन्मुखिं 'राम' नाम । तें पाहरा करित रात्रदिनीं निकाम ॥
ध्यानीं कपाट दृढिंचें, प्रभुपायिं डोळे । जावेत मार्गिं कवण्या? असु कोण वेळे ?
चूडामणी मज दिला निघतां तिनें हा । त्या राम वक्षिं धरुनी निववीत दाहा !
बोले पुढें पवननन्दन ' नाथ ! सीता । सांगीत साश्रुनयना परिसा तदुक्ता १६
'वन्दोनि लक्ष्मणसमेत भवत्पदाब्जा । हे दीनबन्धु नतदुःखहरा महौजा ! ॥
मी देहवाङ्मनिं असें चरणानुरागी । कां त्याग ! कोण अपराध असा मदंगीं !
मी जाणतें अवगुणा मम एकल्या कीं । प्राण हा तव वियोगिं मळा न टाकी !

हा दोष होय मम लालस लोचनांत । प्राणांप्रती मम हठेंचि निरोधतात ! १८
हा देहतूल विरहाग्नित दग्ध व्हावा । श्वासानिलें क्षणिंच निश्चय हा वहावा
स्वार्थामुळें स्रवति लोचन वारिधारा। हा होत भस्म विरहानलिं ना विचारा!
आहे विपत्ति अति घोरचि जानकीची।हे दीनबंधु! कवणा कथवेल साची!
कल्पा-हुनीहि गुरु होति पळेंहि वीतें। मर्दोनि दुष्ट, तिजला क्षणि आणणें तें
ऐकोनि दुःख सतिचें प्रभु सौख्यराशि । राजीवलोचन भरे बहु अश्रुवर्षी ॥
'जे देहवाङ्मनिं मलाच अनन्यभाक्ति।स्वप्नींहि त्यांप्रति कदा छळि का विपत्ति?'
तें मारुती वदत 'तीच विपत्ति होय । जेथें नुरे स्मरणही उरिं राघवीय ॥
ती हो कथा किविधि या रजनीचरांची।जिंकोनियां रिपुसि जानकि आणणेंचि
श्रीराम मारुतिस सांगति 'ऐक ताता! । नाहीं समान तुजसिया उपकारकर्ता!
नाहींच देवमुनिमानविं तूजऐसा । होईन मी तव ऋणीं उतराइ कैसा ! ॥
झाले तुझे मजवरी अमितोपकार । त्यांचें न आकलनही मज हो समग्र ॥
त्यांची कशी परतफेड तरी करूं ती? । मी पाहतों बहुपरीं विवरूनि चित्तीं'
तो देवरक्षक दयानिधि रामराय । पाहे किती कपिसि जो करि भक्त साह्य॥
श्रीरामचंद्रनयनाम्बुजिं अश्रु वाहे । रोमांचुनी प्रभुतनू अतिशोभताहे! २५
ऐकोनियां प्रभुवचा हनुमान् विलोकी।तो श्रीमुखासिच तशी प्रभुमूर्ति ती कीं
तो प्रेमसद्गद पडे प्रभुपायिं हर्षे । 'भो! रक्ष रक्ष भगवन्' कवणेकिं घोषें!॥
त्या ऊठवूं बघत राम पुनःपुन्हांही । तो प्रेमनिर्भरें उठूं शकला न कांहीं ॥
तें वायुनंदनाशिरीं प्रभुपाणिपद्म । तेथें स्मरूनि शिव हो हृदिं सौख्यसद्म-॥
तें सावधान मन शंभु करी फिरून । लागे कथूं परमरम्य कथा-निधान ॥
प्रेमें तया उचलुनी प्रभु घे उराशीं।त्या बैसवीत निजसन्निध भक्तिराशि २८
तें मारुती बघुनि त्या प्रभुतें प्रसन्न । बोले तया निरभिमान अतीव लीन ॥
'हो हाचि घोर पुरुषार्थ अम्हां कपींचा।कीं मारणें बहु उड्या तरुशाखिं साच्या
लंघोनि सिंधु करिं दग्ध सुवर्णलंका । संहारिं राक्षस, वनासहि मोडिलें कां ॥
हा हो! प्रताप तुमचा रघुनाथ! होय। ना थोरवी लवहि तेथ असे मदीय॥
ज्यातें तुम्ही प्रभुवरा! अनुकूल व्हाल।कांहीं असाध्य न त्याप्रति कार्यजाल!
जाळील कापुसहि तो वडवानलाही । लाभे प्रभावबल ज्या तुमचेंच कांहीं'
ऐकोनि तें प्रभुचि पार्वति हर्ष होय।त्या कायवाङ्मनिं गणी निजभक्तराय ॥

सांगे कपीसि विभु 'तूं वर घे इवा तो। देईन कीं तुजसि जो सुखमूल होतो'
तैं मारुती म्हणत 'भक्ति सुखात्ममूर्ति।द्यावी कृपेंकरुनि जी अनपायिनी ती'
ऐकोनि तद्वच तसें ऋजु जें अतीव।बोले 'तथाऽस्तु' विभु गौरी महानुभाव॥
ज्यातें सुभाव कळला रघुनंदनाचा। ना हेतु त्यासि भजनाविन अन्य साचा
संवाद हा गिरिसुते! स्मरती मनांत। त्यां रामपादकमलीं अति भक्ति होत॥
ऐकोनिया प्रभुवचा कपिवृंद गाती। 'श्रीराम राम जय राम कृपालुमूर्ति'॥
'तों राम बोलवुनि सांगतसे सुकंठा।' व्हावें सुसज्ज क्षणिं मेळउनि सैन्य सांठा॥
आतां कशास्तव गड्या! करणें उशीर?। आदेश दे, सकल आण कपिप्रवीर
पाहूनि हेतु सुर वर्षुनि पुष्पराशि। जाती नभांतुनि रहा परम प्रहर्षी॥३६

सुग्रीवाशेंकरुनी आले कपियूथ यूथप अनन्त॥
नानावर्ण अतुलबल ऋक्षसमूहहि तसेच बलवंत॥ ३७॥
प्रभुपदकमला वंदुनि लववुनि शिर गर्जना करिति सारे॥
ते ऋक्षवीर वानर निरुपमबलराशि ज्यांमधें भारे॥ ३८॥
साऱ्यां कपिसैन्यातें करुणासागर विलोकि निज नयनीं॥
प्रभु पंकजाक्ष तेव्हां सारे बल पावले अतुल भुवनीं॥ ३९॥
रामकृपासामर्थ्यें झाला एकेक वानर समर्थ॥
वाटे कीं तो जणुं हो सपक्ष बलशालि शैलवर सार्थ!॥ ४०॥

श्रीरामचंद्र करि तो मग जें प्रयाण। होती तया शकुन उत्तम भाग्यपूर्ण॥
ज्याची असे सकलमंगलराशिकीर्ति। त्याच्या प्रयाणिं शकुनोत्तम हेचि नीति!
रामप्रयाण कळलें क्षणिं जानकीतें। वामांगिचें स्फुरण जें तिज कीं कथी तें॥
जों जों तिला शकुन उत्तम होत जाती।तों तों घडे कुशकुनावलि रावणा ती!
सारें निघे कटक, वर्णु न ये अपार। ते गर्जती अमित वानर भालु घोर॥
ज्यां आयुधें दिसत नखें तरु शैल घेते। जाती यथेच्छ अवनीं नभिं वा स्वरें ते
ते ऋक्ष वानर निनादति सिंहसेच। चीत्कारती भिउनि दिग्गज ऐकतांच!॥
डोले मही, गिरिहि हालति त्या रवांनीं।सिंधूहि दावि थरकाप अतिप्रमाणीं!
झाले प्रहृष्ट रविचंद्र मुनीश्वरादि। ते नाग किन्नरहि होति मनीं निराधि॥
तेव्हां कपी कटकटा करि दांत खाती।ऐसे भयंकर असंख्यचि धांवताती ४५
ते वीर ऋक्षकपि गर्जति घोंघुनीयां। 'श्रीकोसलेश जय! रे जय रामराया!
श्रीकोसलाधिप अगाध बलप्रतापीं। श्रीराम राम! जय राम! खलांसि दापीं'

साहु शकेना उदार शेषहि भार, कितीदा मोहि पडे ।
निजदंवानीं फिरुनि फिरुनि तो कमठपृष्ठिं त्या कठिनि जडे ! ॥
रघुवीराची प्रयाणपद्धति रुचिर जाणुनी जणु खोदी ।
कमठखपरीं सर्पराज तो अविचल पावन अति मोदीं ! ॥ ४७ ॥
ऐशापरीं रिघुनि सागरतीरिं येई । श्रीरामचंद्र करुणाबुधि सैन्यवाही ॥
तेव्हा अनत कपिवीर, मिळेल तेथें ।खाती फळें विपुल वानर ऋक्ष ते तें॥४८॥
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोक-मानसे सुन्दरकाण्डे श्रीरामचन्द्रप्रस्थानवर्णनन्नाम सप्तमस्तरङ्गः ॥

## तरंग ८ वा

जेव्हापासुनि गेला कपि तो जाळून सर्वही लंका ।
रजनीचर ते इकडे भीति वहाती मनीं, सतत शंका ॥ १ ॥
आपापल्या निवासीं करिति निशाचर विचार ऐसाच ।
"कोठेंच क्षेम कुशल राक्षसवशीं उरे न तें साच ! ॥ २ ॥
ज्याच्या दूताचें बल वर्णन करणें अशक्य, तो येतां ।
चालुनि लंकानगरा होइल तरि काय आमुचें आतां !" ॥३॥
पौराच्या उद्गारां दूतिमुखें ऐकतां मनीं झाली ।
मदोदरी सचिंता एकांतीं कांतपद धरुनि वदली ॥ ४ ॥
जोडुनि अंजलि सांगे नीतीचें सार ती अमृतमधुर ।
"हे नाथ ! ना कराजी ! श्रीहरिशीं कलह सर्वनाशकर ॥५॥
मी सांगतें धरा तें हृदयामधिं वाक्य आत्महितसार ।
सर्वस्वहानि न करा घ्या ।चित्तीं वागवूनि सुविचार ! ॥ ६ ॥
ज्याच्या दूताची ती करणी चिंतूनि राक्षसी नारी ।
गर्भगलित होती, या वल्लीतें पाठवूनि सचिवकरीं ॥ ७ ॥
निजकांतगृहीं सीता धाडुनि या इच्छणें जरी स्वहितें ॥
नीतीतें नाशुनियां कवणा लाभेल सौख्य अल्पहि तें ! ॥ ८ ॥
तुमच्या कुलकमलवना शाया अति दुःसह पातली सीता ।
रजनी शिशिरर्तूची जाणों हे कमलनाशकर शीता ॥ ९ ॥

ऐका नाथ ! तुम्ही हो दिधल्यावांचून परत ती सीता ।
शंभु, ब्रह्मा हेही तुमचें हित नच करूं शकति कांता ! ॥ १० ॥
श्रीरामबाण अहिगण, राक्षससैनिकसमूहभेकांतें ।
जोंवरि न भक्षुं लागति, द्यावी तोंवरिच परत सीता ते" ॥ ११ ॥
ऐकुनि पत्नीवचना, शठ रावण जगतिं विदित अभिमानी ।
मंदोदरीस बोले " नारी अबला, स्वभावभीरु मनीं ॥ १२ ॥
मंगलमय समयींही कुदती चित्तांमधें स्त्रिया भारी ।
येतां मर्कटकटकें राक्षस खातिल तयांसि पोटभरी ! ॥ १३ ॥
ज्याच्या भयेंचि कांपति दिक्पति चित्तांत त्याचिया स्त्रीनें ।
स्यावें ऐसें कां गे ? जगही हांसेल कीं न या कृतिनें ? " ॥ १४ ॥
ऐसें म्हणोनि रावण हंसुनी हृदयीं घरी स्वल्लनेतें ।
जाई सभागृहातें अधिकचि गर्वान्ध होउनी चित्तें ! ॥ १५ ॥

मंदोदरी हृदयिं फार करीत चिंता । मार्ली असेल विपरीतचि दैव कांता ॥
आलेंचि रावणसभेमधिं वृत्त तों हें । कीं सिंधुपार रघुवीर ससैन्य आहे !
लंकेश तें उचित तें सचिवां विचारी।तें हांसुनी भजति मौनचि अल्प सारीं॥
ते बोलले 'म्हणि सुरासुर जिंकिलेत । चिंता तुम्हांसि नर वानर केविं देत ?'
मंत्री, भिषग्जन, गुरु, प्रिय बोलणारे । भीती धरूनि कथिती अयथार्थ सारे
जाण्या धुळीस मग राज्य, शरीर, धर्म। नाहीं उशीर लवमात्रहि, नीतिमर्म
झालीच रावण-दशाहि तशा प्रकारीं। त्याची स्तुतीच करिती जन तेथ सारीं॥
जाणोनि तें समय योग्य कथावयातें। आला बिभीषण रमापतिभक्त तेथें १९
शीर्षी नमूनि निज बंधुसि, त्या सभेंत।तो आसनीं बसत वंदुनि त्या विनीत॥
आज्ञा तयास मिळतां वदला निजोक्ति।'मातें पुसाल तर सांगिन कांहीं युक्ति
सागेन मी हित मथामति हें दयाळा! । कल्याण कांक्षित असाल जरी स्वतांला
सत्कीर्ति धी गति सुखादिक वांछि जो कीं। टाको रती परकलत्रिं मनेंहि लोकीं
ती चंद्रकोर जणुं कीं चवथ्या तिथीची।जाणूनि सेवन तिचें नच योग्य होचि!
हो कां जरीहि चवदा भुवनांत नाथ। ना तो तगेल छळतां कुणि भूतजात॥
जो कोणि होय गुणरत्नमहानिधान। त्या अल्प लोभहि करील सुकीर्तिहीन॥
हे सर्व होत जणुं पंथ अधोगतीचे। ज्यां क्रोध काम मद लोभ म्हणूं स्वत्वाचें

सांडूनि सर्व परि यां प्रति, चित्ति संताज्या, भक्तिनें भजति तो भज राम नाथ॥
ताता! न राम नुसता नर भूप जाण।त्रैलोक्यनाथ भुवनेश्वर आदिहीन ॥२४
जो ब्रह्म निर्गुण असा भगवान् अनंत।व्यापूनि सर्व, सुर-गो-द्विज रक्षि भक्त॥
जो कीं कृपाजलधि, मानुषरूपधारी। तो साधुरंजन विभंजुनि दुष्ट मारी २५
जो वेदधर्मपरिरक्षक भव्यकारी। त्या राघवासि नम, हो न तयासि वैरी॥
श्रीराम हो प्रणतदुःख विनाशणारा। त्या जानकी परत दे प्रभु रामचंद्रा॥
निष्काम जो हित करी भज त्याच रामा।पाळीत जो शरण, त्या भज सौख्यधामा
त्यागीत जो न कधिंही शरणागतासी। हो कां जरी त्रिभुवनच्छलनापराधी!
तापत्रयासि विनिवारित नाम ज्याचें। तो राम हा प्रकटला मनिं जाण साचें॥
हे रावणा! नच धरीं मनिं दुष्ट भाव।श्रीराघवा भजुनि सर्व सुखांसि पाव!२८
वंदोनि मी तव पदीं बहुवार नाथा!। हें प्रार्थितों दशमुखा! त्व घेइं चित्ता॥
सोडोनि मान मद मोह मनामधील।तूं कोसलाधिपतितें भज भक्तिशील॥२९
धाडी पुलस्त्य निजशिष्यकरीं निदेश।तो म्यां त्वरें कथियला तुजसि प्रभूस॥
पाहोनि योग्य समया तुज जाणवीत। हा ध्यानिं घे सदुपदेश गुरूक्त तात!"
तें माल्यवान् सचिव सुज्ञ बिभीषणोक्ति। ऐकोनि तुष्ट मनिं होय वदेहि नीति
"हा नीतिभूषण बिभीषण बंधु सान। जें सांगतो तळमळोनि तयास मान!"
"दोघेहि हे शठ करीति रिपुप्रशंसा।या हाकलून झणि, कोण इथें न कैसा!"
उद्गारि रावण, तदा निज गेहिं गेला।तो माल्यवंत हितवाग् अवमानियेला॥
बोले बिभीषण पुन्हां कर जोडुनीया।"हे नाथ! सर्वहृदिं सन्मति दुर्मती या॥
संपत्ति सर्वपरि तेथ, जिथें सुबुद्धि।जो कीं कुबुद्धि धरि त्याधि विपत्ति बाधी।
सिद्धान्त हा कथियला निगमीं पुराणीं। दुर्बुद्धि तें निजमनामधि नेच आणी
दुर्बुद्धिनेंच हित तो अरि वाटताहे। शत्रूहि मित्रपरि मानिसि चित्ति तूं हें१४
जी काळरात्र जणुं राक्षसवंशजाता। ती इच्छितोसि अति आवडिं चित्तिं सीता
वंदूनि मी चरणिं याचित एवढें हें।दे जानकी रघुपतीस, सुखात राहें"॥३५
ती ऐकतां विबुध-वेद-पुराणमान्या। वाणी बिभीषणमुखातिल नीतिधन्या॥
कोपोनियां उठुनि रावण हे म्हणाला।'दुष्टा! तुझ्यानिकट मृत्युचि आज आला!
माझ्यावरी जगुनि संतत मत्कृपेत। तूं पक्ष घेसि अरिचा अकृतज्ञ धूर्त!॥
आहे जगीं कवण सांग असा खळा रे।जो जिंकिला भुजबलें नच म्यां नरें? ३७

माझ्या पुरीं वसुनि भाविसि तापसांसी।दुष्टा!तयां मिळुनि नीति न कां कथीसी!"
ऐसें वदोनि करि त्या चरणप्रहार। तेव्हां धरी अनुज तत्पद कैकवार॥३८॥
हे गौरि! होत महती तरि हीच संतीं। दुष्टावरीहि करणें अति साधुवृत्ति ! ॥
बोले बिभीषण "पित्यासम तूं मदीय।तूं मारितोस मज हेंहि सुयोग्य होय ॥
होईल हेंचि हित नाथ! वृथा अतीव। कीं रामराय भजणें धरुनी सुभाव!"
बोलोनि हें, सचिव घेउनि आत्मसंगें।चाई नभःपथि बिभीषण सत्य सांगे॥४०

"श्रीराम सत्यसंकल्प; सभा कालवशा तव ॥
रामा शरण मी जातों; न दे दोष मला लव! " ॥ ४१ ॥

॥ इति बिभीषणस्योपदेशवर्णनन्नामाष्टमस्तरङ्गः ॥

## तरंग ९ वा

सांगोन यापरिं बिभीषण जों निघाला। तों राक्षसांवरतिं अंतककोप झाला॥
तत्काल पापफल साधुजनापमानें। कल्याण-हानि गिरिजे! अखिलार्थि होणें!
टाकीत ज्या क्षणिं बिभीषण रावणासी। श्रीहीन त्या क्षणिंच रावण जात नाशीं!
हर्षे बिभीषण निघे रघुनायकातें। जातां मनोरथ करी बहु आत्मचित्तें ॥
"देखेन जाउनि पदांबुज राघवाचें। जें भक्तसौख्यद मृदूत्तम रक्त सांचें॥
यत्स्पर्शनें तरलि ती मुनिवर्यपत्नी। जें दंडका करित पावन संचरूनी! ॥३॥
जीं श्रीपदें जनकजा हृदयाब्जिं वाही। मायाहिरण्मयमृगा धरुं धांवलींही॥
श्रीसांबहृत्सरिं सरोज अशीं पदें तीं। पाहीन मी; मम सुधन्यचि भाग्यमूर्ति!
ज्याच्या धरूनि हृदिं, पावन पादुकातें। तो राहिला भरत तन्मय भक्तिचित्तें
नेत्रीं बघीन अजि तो प्रभुवर्य राम।जाऊनि भक्तिभरिं पावन सौख्यधाम!" ५
सप्रेम यापरि विचार करीत येत। तो अब्धिपार अतित्वर बुद्धिमंत ॥
जैं पाहती कपि बिभीषण येत आहे। वाटे तयांस रिपुदूतचि येउं पाहे ॥६॥
त्यांतें उभा करुनि, येति कपी कपीशा।ते त्या निवेदिति तदीय कथा अधीशा
सुग्रीव तैं वदत "राघवराय! ऐका। भेटीस येत अजि रावणबंधु, देखा"॥७

श्रीराम तैं पुसत 'काय सख्या! करावें ?'।'ऐका' वदे सुगल 'जैं मज नाथ! ठावें
ना राक्षसी कळतसे कवणाहि माया।हा कामरूप वधुं पाहत कां बि! याया?॥८
घ्यायास भेद अमुचा शठ काय ये हा?। बांधून ठेवुं अजि यास, मदीय ईहा'
श्रीराम तैं वदत "नीति तुझी खरीच।आहे मदीय पण हा परि ऐक साच९
भीती निवारिनचि मी शरणागताची!"। होई प्रहृष्ट पवनात्मज ऐकताचि ॥
चित्तीं म्हणे 'प्रणतवत्सल रामराय। हा कोसलेश विभु दीनदयार्द्र होय' ॥
"आला कुणी शरण त्याप्रति जे त्यजीती। मानोनि तो करिल आपुलि हानि कीं ती
ते जाण पामर खरे अति पापराशि। ऐशांसि पाहुनिहि हानिच हो नरांसी॥
हो कोटिविप्रवधपापि असाहि कोणी।येतां मला शरण, देइन ना त्यजोनी ॥
कोणीहि ये शरण संमुख माझिया कीं।तत्कोटिजन्मदुरितांतुनि त्यासि राखीं १२
जे पापि तन्मनिं असा सहजस्वभाव। कीं नावडेचि मम भक्ति तयांस नांव!
तो दुष्ट होय हृदयीं जर कां खराच। येईल केविं मज तो शरणार्थ साच?॥
जो शुद्ध निर्मलमना, मज तोच पावे। ना छिद्र दंभ कपटादिक ज्यास ठावें॥
भेदार्थ त्या जर दशानन पाठवीत।नाहींच हानि भय बा! मज कांहिं त्यांत!
जे कोणि राक्षस, सख्या! असती जगांत।त्यांचा करील क्षणिं लक्ष्मण खास अंत
आला असेल भिउनी शरणार्थ मातें। मी प्राणसाच जपणार तयास चित्तें १५
दोहीं प्रकारिं, मजपाशिं तयास आणा"।हांसोनि हें कथि कृपानिधि जैं कपींना
तैं हृष्ट गर्जति कपी 'जय राममूर्ति!'। ते मारुतीसहित सादर तूर्ण जाती ॥
घालूनि सादर पुढेंचि बिभीषणास। येती कपी, प्रभु जिथें करुणानिवास ॥
ते दोन बंधु निजलोचनहर्षकारी। देखे दुरूनिच बिभीषण हर्षपूरीं ॥१७॥
रामच्छवी बघुनि ती हृदयाभिराम। राहे पहातचि बिभीषण सौख्यधाम ॥
आजानुबाहु अरुणांबुजरम्यनेत्र। माशीत जो प्रणतभी प्रभु नीलगात्र॥१८
यत्स्कन्ध केसरिपरी सुविशाल वक्ष। ती वक्त्रभा मदनकोटिविमोहदक्ष ॥
पाहे बिभीषण तदा जल नेत्रिं वाहे। त्याची तनूहि पुलकांकित शोभताहे॥
चित्तांत धैर्य धरुनी वदला मृदूक्ति। "हे नाथ! मी दशमुखानुज पापवृत्ति ॥
मी तामसी सहज राक्षसवंशजात। कीं हो उलूकमनिं आवड ती तमांत॥२०॥
ऐकोनि सयश विभो! तुमचें सुधन्य। आलों तुम्हां शरण मी सुखदा! अनन्य॥
हे आर्तिनाशन! रघूत्तम रामराय!। संसारभीशमक! रक्षक व्हा मदीय" ॥२१

॥ इति बिभीषणशरणागतवर्णनाम नवमस्तरङ्गः ॥

## तरंग १० वा

बोलोनि हें नमन त्या करतां बघून। हर्षे अतीव विभु तैं उठलाच तूर्ण ॥
दीना वचा परिसुनी प्रभुचित्त तोषें। त्यातें विशालभुजिं आकळि राम वक्षें ॥१
त्या भेटवी अनुज सन्निध बैसवी ही। तो भक्तभीतिहर बोलत या वचांहीं ॥
"लंकेश! हो कुशल कीं परिवारयुक्त। आहां तुम्ही कुटिल वासिं परी रहात ॥
रात्रंदिनीं खलगणावृत संग होतां। कैसें स्वधर्मपरिपालन येत हातां? ॥
आचार नीति तव जाणत मी अशेष। नीतिप्रिया न रुचणें कधि नीतिदोष ॥
ताता! भली वसति कीं नरकींहि होवो। ना दुष्टसंग परि दैव कधींच देवो" ॥
बोले बिभीषण "सुखी पददर्शनानें। जाणोनि दीन करुणा करणें प्रभूनें ॥४॥
स्वप्नींहि तोंवरि मनास कुठून शांति। जीवासही कुशललाभ कुठूनि होती ॥
टाकोनि काम सगळाच विपत्तिधाम। ना जोंवरी भजत हें मन गोड राम ॥५॥
हे तोंवरी हृदयिं दुष्ट करीति वास। ते मोह लोभ मद मत्सर मान रोष ॥
ना जोंवरी रघुपती शरचापहस्त। राहे उरीं, शरनिषंग कटीसि युक्त ॥६॥
रामप्रतापरविभा जंवरी नुदेली। अंधारघोररजनी तंवरीच ठेली ॥
जी द्वेषरागमय या सुख दे उलूकां। जी आशरान्ध ममतातिमिरासि देखा ॥७॥
हो आज मी कुशल; भीति नुरेचि किंची। देखोनि राम! तव पादसरोजकांति ॥
तुम्ही अशाल अनुकूल कृपालु ज्यास। न व्यापितील कधि ताप तिन्ही तयास॥
मी हो निशाचर सुनीच कुलस्वभाव। नाहीं शुभाचरण आचरिलेंहि नांव॥
ज्याचें स्वरूप न कळे मुनिंना तपेंही। सानन्द तो प्रभु मला कवळोनि घेई ॥
माझें अमेयचि अतीव सुभाग्य होय। हे राघवा! सुखकृपांबुधि रामराय!॥
कीं लोचनीं प्रभुपदांबुजयुग्म पाहिंजे की विरिंचिशिवसेव्य सदैव आहे" १०
श्रीराम तैं वदत "ऐक मदीय मित्रा!! माझा स्वभाव तुज सांगत सच्चरित्रा!
ज्यातें भुशुण्डि, गिरिजा, शिव जाणतात।कीं रक्षि मी खलहि जे शरणार्थ येत
हो कां कुणीहि सचराचरजातवैरी। आला मला शरण आकुल आर्त भारी
टाकून मोह मद मत्सर शाठ्यभाव। मी त्यां करी क्षणिंच साधुसमप्रभाव!॥
माता पिता स्वजन बंधु तसें कलत्र। ते देह गेह धन वा परिवार मित्र ॥
यांचे ममत्वमय ताग वळून चोख। बांधीं तसें स्वमन मच्चरणां सुरेख!१३

यकोनि हर्ष भय शोक समग्र काम। ठेवीं स्वचित्त समदर्शि असें निकाम॥
ऐसा मदीय हृदिं सज्जन वास लाहे।लोभ्याचिया हृदिं जसें धन सर्वथा हें१४
होती तुझ्यासम मला, प्रिय फार, संत।माझा तदर्थ अवतार, न अन्य हेत।
जे कीं उपासति मला सगुणासि भक्त। ते नीतिमंत दृढनिश्चय शुद्धचित्त॥
जे साधिती परहितें, हृदयें दयाळ। जे विप्रपादकमळीं रत साधुशीळ॥
प्राणांसमान मज आवडती अतीव। ऐसे अपाप जन मद्भजनस्वभाव॥१६
लंकेश! ऐक असती गुण हे तुझ्यांत। यासाठिं तूं असशि मत्प्रिय रे! नितांत"
ऐकोनि रामवच वानरयूथ हर्षे। उद्धारती 'जय कृपानिधि राम!' घोषें॥
ऐके विभीषण वचें प्रभुचीं सुधासीं।ना तृप्ति होइ हृदयीं मुळिंही तयासी॥
श्रीरामपादकमलां धरि कैक वेळां।न प्रेमसिंधु हृदिं मावत भावलेला! १८
बोले 'प्रभो सचराचरनाथ! ऐका। सर्वांहृदीं वसतसां शरण त्रिलोका॥
होती हृदीं प्रथम जी लव वासना ती। वाहोनि नेलि विभुभक्तिसरिज्जलान्तीं
आतां कृपाजलनिधे। निजभक्ति पुण्य। ती शंभुतोषकरणी मज द्या अगण्य'॥
तेव्हां 'तथास्तु' म्हणत प्रभु-राम वेगें। आणा समुद्रजल हो!'कपिलागिं सांगे
बोले रघूत्तम सुतुष्ट विभीषणासी।' इच्छा तुझ्या हृदयिं नाहिं जरीहि तैसी॥
नोहेच दर्शन मदीय कधींहि मोघ'। सांगोनि हें करि तया अभिषेक सांग॥
केली नभांतुनि तदा अमरीं प्रहृष्टीं। त्यांचेवरी अतुल नंदनपुष्पवृष्टि! ॥
श्वासानिळें फुलुनि रावणकोपवह्नि।ज्या जाळिता, सुखवि त्या प्रभु राज्यदानीं
संपत्ति जी दशशिरास्तव रावणातें।कैलासनाथ वितरी अति तुष्ट चित्तें॥
संकोचुनीच रघुनाथ बिभीषणासी।संपत्ति ती वितरि संतत सौख्यराशी॥२३॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे
सुन्दरकाण्डे बिभीषणस्य श्रीरामशरणगमनवर्णनन्नाम दशमस्तरङ्गः ॥

## तरंग ११ वा

ऐशा त्यजूनि विभुला, भजतो दुजांना। तो पुच्छशृंगविण जाय पशूपमाना॥
केला बिभीषण जयें अपुलाच ऐसा।त्याची करीति कपि-यूथ किती प्रशंसा!
सर्वज्ञ सर्वहृदयस्थ तरी उदासी। जो सर्वरूप सकलांहि अतीतवासी॥
जो नीतिरक्षक सशील नराकृती। तो बोलला वचन दानववंशवैरी—॥२॥

" लंकेश ! तेविं कपिवीर ! तुम्ही समग्र|सांगा कसा जलधि हा तरणें गमीर ?
जो पूर्ण मत्स्यमकरादिगणीं अगाध । हो सर्व रीतिं अति दुस्तर हें प्रसिद्ध ! "
लंकेश तैं वदत ' भो रघुनाथ ! ऐका । कोटीहि सिंधु तव सायक शोषिती कां?
आहे असें तरिहि वाटत योग्य नीति । कीं प्रार्थिजे जवळ जाउनि अब्धिमूर्ति
नाथा ! तुम्हां कुलगुरूच समुद्र होय । तो योग्य साच कथणार तुम्हां उपाय
त्रासाविनाच तुम्हि सागर हा तराल । हे ऋक्षवानरसमेत तुम्ही सलील ' ॥
बोले विभू 'कथिसि उत्तम तूं उपाय|तो आचरूं सकल हो मज दैव साह्य '॥
ना लक्ष्मणासि रुचला परि तो विचार । रामोक्तिनें गमत त्या हृदिं दुःख फार ॥
तो बोलला ' भरंवसा कसला जि ! दैवीं|शोषूनि अब्धि सुकवाचि निजप्रभावीं ॥
आधार दैव जरि एकचि कातरासी|तैसाचि आळसि पुकारित दैव, थोरीं ' ॥
ऐकोनि तें स्मितमुखीं करि राम उक्ति|'ऐसेंचि रे करूं, धरीं ल्व धीर चित्तीं' ॥
श्रीराम लक्ष्मणमना समजावि देखें । ये अब्धितीरिं रघुनायक चित्ततोषें ॥८॥

आधीं वंदोनियां राम सागरा नतमस्तक ।
तीरीं दर्भासनीं बैसे तो प्रभू विश्वनायक ॥ ९ ॥

जेधवां रामरायातें निघे याया बिभीषण ।
निजदूत तयापाठीं पाठवी बंधु रावण ॥ १० ॥

घेऊनियां कपितनू कपटात्म त्यांनीं । देखीयलें सकल वृत्त तिथें रिघानी ॥
चित्तीं प्रशंसिति किती प्रभुच्या गुणांसी । कीं जो कृपालु शरणागत भक्त रक्षी
सप्रेम ते स्तविति रामगुणस्वभावा । जैं विस्मरूनि निज मायिक रूपभावा ॥
ते शत्रुदूत म्हणुनी कळलें कपींसी । बांधूनि त्यांसि कपि नेति कपींद्रपासीं॥१२॥
सुग्रीव तैं वदत " हे कपिनों ! कराच । विद्रूप यांसि मग हे परतोत साच" ॥
भांवोनि बांधिति तयांप्रति हिंडवीती । सैन्यांत सर्वपरिं त्यां करुनी फजीती॥१३॥
त्यांतें कपी बडविती बहुरीतिं कोण ! । ना सोडिती जरिहि ते रडती सुदीन॥
'कापूं पहाल ' म्हणती 'जरि नाक कान|आहे तुम्हां रघुपतिप्रभुचीच आण!'
ऐकोनि तें जवळ लक्ष्मण बोलवीत । त्यां सोडवूनि वदला करुणार्द्रचित्त ॥
''हें पत्र रावणकरीं वितरूनि सांगा । 'या वाच लक्ष्मणवचा कुलघातक्या गा!'
तैसाच सांग मदमत्त तया विमूढा । माझा निरोप शुभदायि उदार गाढा ॥
'यावेंस तूं शरण देउनि जानकीला । हें ना तरी समज काळ समीप आला!''

वंदोनि लक्ष्मणपदीं लववूनि माथा । ते जाति दूत मुखिं वर्णित रामगाथा ॥
लंकेंत येति यश वर्णित राघवाचें । वदीति रावणपदीं नतशीर्ष साचे ॥१७॥
हांसोनि तें पुसत रावण सर्व वृत्त। "तूं आपलें कुशल सांग मला समस्त ॥
तैसें बिभीषणहि काय करीत सांग । आलाच सन्निध तयाप्रति अंतसंग १८
लंकाधिराज्य शुभ तो शठ याकि घीट । दुर्भागि कीटहि गव्हासह होय पीठ॥
तीं भालु वानरदलें मज सांग कैशीं । प्रेरीत काळाचि तदाप्रति या स्थळाशीं॥
जीवासि रक्षक वयांमति होय अब्धि।जो जाहला मृदुलचित्त दयार्द्रबुद्धि ॥
तू सांग आणखि कथा मज तापसाची।माझ्यामुळें धरकतीं हृदयें न कैचीं॥२०

भेटले ते तुला ना ! कीं गेले गा ! परतोनिया ।
ऐकोनि निज कर्णांनी सचशाप्रति माझिया ? ॥ २१ ॥
कथिसी न मला कैसा अरिसैन्य कसें असे ।
त्याच्या तेजोबलादींनीं त्वच्चित्त गळलें जसें ? " ॥ २२ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे सुन्दरकाण्डे रावणदूतागमनवर्णननामैकादशस्तरङ्गः ॥

## तरंग १२ वा

तेव्हां वदे शुक 'कृपा करणें प्रभूनीं । क्रोध त्यजून परिसा कथितों स्ववाणीं
येताच भेटि, तुमच्या अनुजा करीत। लंकाधिराज्य अभिषेकचि रामनाथ ॥
येतां कळून तुमचे अम्हि दूत ऐसें।आम्हांसि बांधुनि कपी छळिती विशेषें
कापू पहाति अमुचे झणि नाक कान । घालूनि रामशपथा सुटलों तिथून ! ॥२॥
आहे कशी पुसतसा तुम्हि रामसेना।अब्जीं मुखांनिंशहि कुणाखिहि वर्णवेना
आहेत भालु कपि, ज्याप्रति वर्ण नाना।वक्त्रें भयंकर विशाल कपूंहि येना॥
ज्यानें तुम्हा वधियला सुत, दग्ध लंका । त्यान्या कपींमधिल दुर्बळ तोच देखा
नामें अनंत भट वज्रकठोर उग्र । दुर्मेय नागबलशालि महान् समग्र ॥४॥
नलनील अंगदादि द्विविदमयदादि विकटहास्य तसे ।
दधिवदन कुमुद केसरि बलशाली जाम्बुवंत गय विलसे ॥५॥
सुग्रीवतुल्यबल वानर हे समस्त । ऐसेच कोट्यवधि ना गणती यथार्थ ॥
ज्यांचें अतुल्य बळ रामकृपाप्रसादीं । त्रैलोक्यही गणति ते तृणसेंच युद्धीं ॥

मीं रावणा! परिसले निजकर्णि सार्चे। कीं पद्म होति अठरा कपियूथपांचे ॥
नाहींच त्या कटकिं कोणि कपी असा कीं। जो रावणा! तुजहि ना रणरंगिं जिंकी!
क्रोधांत ते सकळ चोळिति हात वोटें। आज्ञा न देत रघुनाथ परंतु कोठें!॥
' शोषूंहि सिंधु सगळा सहस्रधमीन। फेकून अद्रि गुरु, काढुं तया भरून॥
मर्दूनि चूर्ण करुं सत्वर रावणासी '। ऐसे कपी म्हणति उत्कट शब्दघोषीं॥
निःशंक ते करिति तर्जुनि गर्जनाहि। लंकेसिहि गिळुं पहाति विलंब नाहीं!
आहेत ऋक्षकपि ते सहजींच शूर। श्रीराम त्यांवरि शिरीं जगदेकवीर॥
हे रावणा! गमतसे जणुं जिंकितील। ते कालकोटिसहि संगरिं ज्यां न वेळ॥
श्रीरामतेज, बल, बुद्धि, तदीय थोरगाथा न जी शकति शेषहि ते सहस्र॥
जो एकबाणिं शतसागर शोषणार। भ्रात्या तुझ्या पुसत नीतिनिधी उदार!
प्रार्थी बिभीषणवचें प्रभु सागरासी। चित्तीं दयार्द्र पथ मागत त्याजपाशीं,'
ऐकोनि हें हंसत रावण बोलताहे।' तो मंदधी म्हणुनि घे कपिसाह्य पाहें १२
जात्याच भीरु वच ऐकि बिभीषणाचें।अब्धीप्रती विनवि घेडुनि लाळ वाचें
मूढा! बढाइ मजला कथिसी तयाची। मी जाणतों सकल शत्रुबलादि साचीं
ज्याचा बिभीषण असे अतिम्याड मंत्री। त्याला न भूति, जय वा, जगतीं परत्रीं'
ऐकोनियां खलवचा मनिं रुष्ट, दूत। काढीत पत्र समया बघुनी सुयुक्त १४
सांगे 'दिलें मजसि पत्रक लक्ष्मणानें। वाचोनि नाथ, करणें उर शांत, येणें!'
तें घेइ वाम करिं रावण पत्रिका ती। वाचावयासि सचिवा कथि दुष्टमूर्ति॥
तो वाचि 'मान मनिं मोद वचें शठा गा!।ना नाश तूं स्वकुल हट्ट नको! अभागा
ना वांचशी रघुवरा बनुनी विरोधी। हो कां तुला शरण विष्णु, विधी शिवादि॥
सोडोनि मान, निजबंधुसमान होईं। श्रीरामपादकमलीं जणुं भृंग, पाहीं!॥
दुष्टा पतंगपरि रामशरानलांत। ना हो क्षणामधिंच दग्ध कुलासमेत।'॥१७
तें ऐकतांच मनिं भीत, वरीं हंसोनी।बोले दशास्य सकलां कळवी स्ववाणी॥
'भूमीं पडोनि नभ कोण धरीत हातीं। हे वाग्विलास लघुतापसि त्याच रीतीं'
तेव्हां वदे शुक ' खरीं भवदीय उक्ति। सांडूनि गर्व परि ध्या समजूनि चित्तीं
क्रोध त्यजून परिसा मम सांगणें हें।रामासि वैर तुमचें नच योग्य आहे १९
त्रैलोक्यनायक असे जरि रामराय। त्याचा स्वभाव परि कोमल फार होय॥
त्यातें मिळाल तर राम कृपा करील। ना एकही स्वदपराध हृदीं धरील॥२०

सीतेसि द्या परत हो रघुनायकातें। हें एवढेंच करणें प्रभुंनीं मदुक्तें ' ॥
'सीतेसि द्या' म्हणत तो, तव दुष्ट हाणी।लत्ताप्रहार अति रोषिं हृदीं भरोनी
तेव्हां नमूनि चरणीं, शुक ये तिथून । जेथें असे रघुपती करुणाब्धि पूर्ण ॥
रामा नमोनि कथि तो स्वकथा तयासी। त्यातें मिळे प्रभुकृपें गति पूर्व जैसी॥
होता अगस्ति ऋषिचा, अभिशाप त्यातें।होई जयें बुध मुनी परि रक्ष कीं तें॥
हे गौरि! वंदि शुक रामपदीं कितीदा। घेई निजाश्रमपथा धरुनि प्रमोदा॥
प्रार्थीयला सुविनयें त्रिदिन प्रभूनीं। मानीचना जलनिधी जडसाच कोणी॥
श्रीराम तैं म्हणति कोप धरूनि चित्तीं।प्रीतीहि भीतिविन नादत ना सुरीति।

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे सुन्दरकाण्डे शुकदूतरावणसंवादवर्णनन्नाम द्वादशस्तरङ्गः ॥

## तरंग १३ वा

' हे लक्ष्मणा ! मम झणीं शरचाप आण। बाणाग्निनें जलधि शुष्क करीन तूर्ण
हो व्यर्थ कीं विनवणी शठ जो तयाला।प्रीतीहि होय कुटिलासि न सत्फलाला
होई स्वभावकृपणा उपदेश फोल। न ज्ञानगोष्ट मनिं घेइ ममत्वशील ॥
कैंची विरक्ति कथणें अतिलोभियासी!।क्रोध्यासि शांति हरिकीर्तिहि कामुकासी
हो व्यर्थ पेरणि कृता उखरात जैसी '। ऐसें वदोनि चढवी विभु कार्मुकासी!
तें मात्र लक्ष्मणमना रुचलें अतीव। जोडीत राम शर कार्मुकिं उग्रभाव॥३॥
तों तैं उठे जलनिधींतुनि अग्निदीप्ति। नक्रोरगादिगण मीन भयार्त होती ॥
जावील जतु जळुनी बघताचि, अब्धि। ये विप्ररूप धरुनी गतगर्वबुद्धि॥४
घेऊनि हेम तबकीं मणिराशि नाना। तो येइ नम्रपणिं तोषविण्या प्रभूंना॥
कापोनि होय फळदा कदली, न आन। कोटी उपायिं जलसिंचनही करून।
हे जाण रीति गरुडा, विनयें कधींच। ना नीच तो वळतसे, दमनेंचि साच।
तैं सिंधु पाय धरि भीतमना प्रभूचे। प्रार्थी 'क्षमा अवगुणा मम' गोड वाचें
"हे नाथ! भू जल समीर नभोऽग्नि पाच।आहेत हे जडचि तत्प्रकृती तशीच
त्वत्प्रेरणाचि अधिनिर्मि तयासि माया।जी सृष्टिहेतु सकळश्रुति वर्णिती या ॥७॥
आज्ञा असे दिधलि ज्यापरि ज्यासि देवें। तेणें तसें विचरुनी सुख मेळवावें॥
शिक्षा दिली प्रभुवरें मज चांगलें हें। मर्यादिलेंहि मजला प्रभुनेंचि आहे॥८

स्त्री, ढोल, गांवढळ, शूद्र, पशु, समान। हे ताडणा सकळ पात्रचि होति पूर्ण।
स्वामिप्रताप मजला सुकवील, पार। जाईल सैन्य; मज यांत न कीर्ति थोरा॥
ना लंघनीय जगतीं भवदीय आज्ञा। सांगे श्रुती मत तसें करणेंजि! सुज्ञा'॥
ऐकोनियां जलधिवाक्य विनीत तैसें। सांगे सुहास करुणाकर राम ऐसें १०
'ताता! मला वद उपाय असा उदार। जाई जयें कपिचमू जलराशिपार'।
सांगीत सागर '[विभो! नल नील दोन। बंधू बलाढ्य कपिवीर अतीव सुज्ञ॥
त्यांना ल्हानपणिं दे मुनिवर्य आशी। स्पर्शे तदीय गिरिभारहि थोर राशि-
अब्धीमधेंहि तरतील भवत्प्रतापीं। मीही यथाबल तुम्हां मम साह्य अर्पी॥१२
मी जाणतों निजमनीं प्रभुवर्यशक्ति। बांधा तुम्ही जलनिधीप्रति बांध युक्ती॥
गातील तें सुयश आवडिं लोक तीनी। जातील तूर्ण भवसागर संतरोनी॥१३
नाथा! धरें तुमचिया मम उत्तरेचे। तीरस्थ दुष्ट नर संहरिं पाप साचे!'॥
ऐकोनि सागरमनातिल शल्य, दूर। श्रीराम तें करितसे रणरंगधीर॥ १४॥
देखोनि रामबल पौरुष त्यापरी ते। होई पयोनिधि अतीवचि तुष्ट चित्तें॥
सांगे प्रभूसि सगळें खललोकवृत्त। वंदोनि रामपदपंकज अब्धि जात॥१५॥

सागर जाई निजभवनातें तन्मत मानी श्रीराम।
कलिमलहारी तुलसि गात हें चरित यथामति सुखधाम॥
रघुपतिगुणगण संशयवारण शोकविनाशन सदन मुदा।
त्यजुनी आशा सकल भरंवसा शठहृदया! गा परिस सदा॥१६॥
सर्वसुमंगलदायक रघुनायकसुगुणगान आयकिती॥
जे सादरचित्तें तें तरती भवसिंधु त्यां नको तरि ती!॥ १७॥
आवडो 'राम' हृदया श्रीरामगुणगायन॥
त्या विना जीवनामध्यें बावा क्षणहि वाय न!॥ १८॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुंदरकाण्डे सेतुबन्धसम्मतिवर्णनं नाम त्रयोदशस्तरङ्गः॥

॥ इति 'ज्ञानसंपादनो' नाम पंचमः सोपानः॥

॥ इति श्रीमुश्लोकमानसे सुन्दरकाण्डः श्रीसीतारामचन्द्रकृपया संपूर्णः॥

श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तु।

श्रीगणेशाय नमः ।

श्रीभवानीशंकराभ्यां नमः । श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ।

श्रीसरस्वत्यै नमः ।

तुलसीरूपिणे श्रीमद्वाल्मीकिमुनये नमः ।
यस्य प्रसादात्सुलभं स्वर्गीयमनृतं भुवि ॥ १ ॥

# ❀ सुश्लोकमानस ❀

## श्रीरामचरितमानस अर्थात् श्रीतुलसीरामायण,

या महाकाव्याचा अनुवाद

## षष्ठ सोपान

# लंकाकांड

तरंग १ ला

मंगलाचरण

श्रीराम जो शंकरसेव्य होय । हरीत जो सद्गतिभी अमेय ॥
*जो सिंह हो कालमतंगजाला । ज्ञानेंचि योग्यांप्रति गम्य झाला ॥१॥*
गुणाब्धिही निर्गुण निर्विकार । अतीत मायेसि, अजिंक्यवीर ॥
सुरेश ज्या दुष्टवधांत हर्ष । जो ब्रह्मवृंदा प्रभु हो विशेष ॥ २ ॥
*जो मेघनीलोत्पलकायकांति । जो पद्मनेत्रीं दिसते सुमूर्ति ॥*
जो देव भूमीपतिरूपधारी । श्रीराम तो मी नमि भक्तिपूर्ती ॥ ३ ॥

अत्यंत सुंदरतनू शशिशंखकान्ति । शार्दूलचर्मवसन प्रभु भव्यमूर्ति ॥
जो कालसर्पमयभीषणभूषणांसी । गंगा शशांक अति ज्या प्रिय शीर्षसंगी ॥
जो काशिनाथ कलिपातक नाशिणार । कल्याणकल्पतरु भक्तमनोविहार॥
गौरीश शंकर मनोजविनाशकारी । मी वंदिं सद्गुणनिधी भवतापहारी ॥५

कैवल्यही दुर्लभ देत सज्जना । जो दुर्जना योग्य करीत दंडना ॥
तो विश्ववंद्य प्रभु शंभु शंकर । होवो मला संतत सौख्यसागर॥ ६ ॥
परमाणू, निमिषें, लव, युगवर्षें, कल्प हे प्रचंड शर ॥
कोदंड काल ज्याचें, त्या रामा भजनिं कां मना ! उशिर ? ॥ ७ ॥

ऐकोनि सिंधुवच, बोलवि रामराय । तो आपुले सचिव त्यां कथि कार्य काय
'आतां विलंब न करा; क्षणि सेतु कीजे । अंभोधिपार उतरो कपिसैन्य हें जे'
जोडोनि हात वदला तयिं जाम्बवंत । "हे नाथ ! सूर्यकुलकेतु तुम्ही अनंत
आहे सुनाम अपुलें जणुं सेतुसेंच । जेणें तरे नर भवांबुनिधीस साच ! ॥९
हा तों लघूच जलधी, तरण्या न वेळ"। ऐकोनि हें वदत मारुति भक्तिशील
' स्वामिप्रताप वडवानल जो प्रचंड। शोषी पयोनिधिजला जरि तें उदंड॥
शत्रुस्त्रिया तुमचिया रडतां जलांनीं । नेत्रांश्रुंच्या जलधि खारट हो मरोनी!'
अत्युक्ति आयकुनि यापरि मारुतीचा । आनंद सर्व कपि पाहति रामराया!॥
तें जांबुवंत निजसन्निध बोलवीत । ते बंधु नीलनल, सांगत त्यांसि वृत्त ॥
बोले ' स्मरोनि मनिं राममहाप्रताप । बांधाचि सेतु लवही न तुम्हांसि ताप'
त्यान्या कपींसि मग बोलवुनी कथीतो।' विज्ञापना मम तुम्हां परिसा असे ती
ध्याऊनि चित्ति रघुनाथपदांबुजातें । हें एक ऋक्षकपिनो! करणें समस्तें ॥
आणा समर्थ तुम्हि वानरयूथ वेगें । नाना महाविटप शैल तसे निजांगें '॥
ऐकोनि ऋक्षकपि ते निघती सुघोष। ' हू हा हु हा! जय रघुत्तम! विक्रमेश!'
अत्यंत तुंग तरु शैलगणां सलील । ते आणिती उपटुनी अति दक्षशील॥
त्यांचा रचीति नलनील महाब्धिसेतु।श्रीरामचंद्रयश त्यामति मुख्य हेतु! १५
आणूनि देति कपि शैल विशाल तेथ। जे चेंडुसेच नलनीलहि क्षेपितात!॥
श्रीराम सेतुरचना अतिरम्य तैशी । देखूनि हांसत वदे करुणांबुराशी॥१६॥
'भूमी अतीव रमणीय अनुत्तमा ही। जीचा अनंत महिमा मज वर्ण्य नाहीं
ये कल्पना परमसुंदर मन्मनांत । कीं स्थापणें शिवहर प्रभु शंभु येथ ! ' ॥

तें ऐकुनी कपिपती बहु धाडि दूत । आमंत्रुनी मुनिवरांप्रति आणवीत ॥
त्यापोनि लिंग विधिवत् करि राम पूजा।बोले 'मला शिवसम प्रिय नाहिं दूजा
द्रोही शिवा मम असा म्हणवीत भक्त। स्वप्नींहि तो नर मला नच पाविजेत
जो शंकरा विमुख, भक्ति मदीय कांक्षी।तो मूढधी नरकगामिच पापराशि।१९
जे शंभुभक्त परि शत्रु मदीय होती। मद्भक वा करिति जे शिववैर चित्तीं॥
ते सर्व घोरनरकीं पचतील लोक। कल्पान्त होय तंवरी सहतील दुःख!॥२०

घेतील रामेश्वरपुण्यदर्शन । ते विष्णुलोका रिघतील सज्जन ॥
गंगाजला आणुनि घालती, तयां। सायुज्य मुक्ती मिळते निरामया॥२१
- निर्दंभ निष्काम भजेल, त्याप्रति। श्रीशंभु मद्भक्ति तयासि दे अति॥
हा सेतु जो मत्कृत पाहि मानव । तरेल तो सागर अश्रमें भव!'॥२२
रामोक्तिनें सर्व सुतुष्ट होउनी। आपापल्या आश्रमिं जाति सन्मुनि॥
अशी उमे! राघवरीति सुंदर । कीं प्रीति भक्तीं करणें निरंतर'।॥२३॥
उत्कृष्ट सेतू नलनीलिं बांधिला । कीर्ती भरे रामकृपें नसे तुला ॥
बुडोनि जाती बुडवीति दुसऱ्यां। शिला अशा अंभित आहल्या तऱ्या!
माहात्म्य हें ना जलराशिचें लव। न वा कपीचें, नच वा शिलोद्भव॥
श्रीराघवाचाच असे प्रताप हा । ऐशासि ना वंदिति, मंद ते पहा!

श्रीरामचंद्ररघुवीरविभुप्रतापें। पाषाण सागरजलीं तरले अपापें!॥
रामा अशा त्यजुनि अन्य कुणा प्रभूसी।जे ध्याति ते खचित मूढचि मौर्ख्यराशि
पाहोनि सेतु अति तो दृढ बांधियेला । श्रीरामचंद्र करुणानिधि तुष्ट झाला॥
सेना तयावरुनि चाललि वानरेना । ते गर्जतात कपिवीर समूह नाना।२७
तैं सेतुबंधिं रघुराय चढे कृपाळ। सर्वत्र पाहि जलराशि अपार लोल॥
पाहावयास करुणार्द्र रघूत्तमाला। आल्या अनंत जलजीवसमूहमाला!॥२८

नाना मत्स्य असंख्य नक्र मकरव्यालादि मोठे अति।
आकारें शत योजनेंहि अपुरी किंवा न ज्यांना मिति॥
अन्योन्यांप्रति भक्षणारहि तसे जे भीति अन्यांप्रति।
ना भीतां प्रभुसी पहाति, हृदयीं संतोष हो त्यां किती!!!॥२९॥

ते प्राणि तेथ भरले इतुके अनंत । कीं वारिपृष्ठहि तदा न दिसोनि येत॥
श्रीरामरूप बघुनी तयिं लीन चित्त । ती धन्यता कवण वर्णुं शके यथार्थ!

सेतुवरून चलतां कपिसैन्य तेथें । विस्तार तो कवण वर्णु शके विशेषें ? ।।
संमर्द सेतुवरि हो इतुका तदीय । कीं कोण कोण गगनीं उडुनीच जाय ।
कित्येक वारिचरपृष्ठतलावरूनी । केलीं तदा त्वरित आक्रमणें कपींनीं । ।।
तें रामलक्ष्मण विलोकिति कौतुकातें। हांसे कृपालु रघुराय मनीं किती तें। ।।१२

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने लङ्काकाण्डे सेतुबन्धवर्णनं नाम प्रथमस्तरङ्गः ॥

## तरंग २ रा

सेनेसमेत उतरे प्रभु अब्धिपार । कोणास मेय कपियूथपती समग्र । ।।
डेरे दिले प्रभुवरें मग पैलतीरीं । आज्ञापिले सकल वानर या प्रकारीं ।।१।।
"जा, खा फलें मधुर सुंदर कंदजात" । ऐकोनि ऋक्ष कपि धांवति जेथ तेथ
सारे तरू फळति रामहिता विशेषें । ना त्यां ऋतू अऋतु कालअकाल जैसें ।
खाती कपी मधुफलें, तरु हालवीती । लंकेवरी गिरि शिला किति फेंकताती !
कोठें कुठें जर निशाचर ये मिळोनि । ते नाच नाचविति त्यांप्रति वेष्टितांनीं ।।
नासा श्रुती दशनिं चावुनि खंडिताती । सोडूनि देति, जर रामयशास गाती !
जे होति राक्षस विखंडितकर्णनास । येवोनि ते रडत सांगति रावणास ।।
'वारिधी बांधिला !' ऐसें पडतां श्रवणांवरी ।।
अत्यार्त उठुनी बोले दशतुंड अशापरीं-।। ५ ।।
'कीं बांधिला जलधि, सागर, वारिराशि। अंभोधि,तोयनिधि, कंपति अप्रयासीं
अब्धी, सरित्पति, अपांपति, तो समुद्र। हें काय आयकत मी श्रवणीं अभद्र!'
तो व्याकुलत्व निज जाणुनि अंतरींचें । तें लोपवूनि वरि दावित हास्य साचें
गेला परी भिउनि रावण मंदिरांत । मंदोदरीहि परिसे तंवरी यथार्थ ।।७।।
बांधीयला प्रभुवरें उदधी सलील । हें ऐकुनी पतिकरा धरि ती सुशील ।।
आणूनि त्यासि निजमंदिरिं वंदुनीयां। जोडी करां, पदरही पसरीत जाया।८
मंदोदरी वदत सत्य मनोज्ञ बोल । 'ऐका प्रिया ! वच न व्हा मनिं रोषशील!
नाथा ! तशांचि भलें करणें जि। वैर । ज्यां जिंकण्यास बलबुद्धि शकेल थोर
तुम्हांत आणखि रघूत्तमि तुल्य काय?। खद्योत केविं रविशा कधिं काळिं होय
जेणें बलाढ्य मधु-कैटभ मारियेले। जे वीर उग्र दितिवंशज पूर्विं झाले ।।१०।।

नांधीत जो बलिशि, मारित कार्तवीर्या । जो भूवरी अवतरे खलनाशकार्या ॥
त्याशीं करा नच विरोध कदापि कांता॥ जो काल कर्म असुयां प्रभु हो समस्तां
श्रीरामपादकमलांप्रति वंदुनीयां । सीता समर्पण करा प्रभुला अमेया ॥
हें राज्यही सुतकरामधिं सोंपवोनी । जावें वनीं रमुनि रामगुणानुगानीं ! ॥
आहेत नाथ ! रघुराय दयाळ दीनीं । जातां तया शरण व्यापहि दे न हानि !॥
होतें मनीं सकल तें तुम्हि पूर्ण केलें । तुम्हीं सुरासुर चराचर जिंकियेले ! ॥
हे संत सांगति दशानन ! ऐशि नीति । जावें नृपें निशुनि वार्धकिं काननांतीं
जाऊनि तेथ भजणें प्रभुलागिं ज्या हो । तो हाच राम शरणागतरक्षिता हो॥
निर्मीत, पाळित, विनाशित जो जगातें । त्यागूनि सर्व ममता भजणें जि ! नाथें
यत्प्राप्तिसाठिं करितो मुनिवर्य यत्न । राज्य त्यजूनि नृप होति विरक्तिपूर्ण ॥
तो रामराय विभु कोसलनाथ येत । तुम्हांवरी करिल तो करुणार्द्र चित्त ॥
मत्प्रार्थना जर तुम्ही परिसाल कांत ! । त्रैलोक्यिंही तुम्हिच व्हाल सुकीर्तिमंत"
हें बोलतां नयनिं अश्रु भरोनि येती । ती कांतपाद धरि कंपितगात्रमूर्ति ॥
बोले "भजाल जर कां करुणार्द्र रामा । सौभाग्य राहिल मदीय, जया न सीमा !"
तेव्हां दशानन तिला उठवून घेई । वर्णीत तो खल तिला अपुली बढाई ॥
'ऐकें प्रिये उगिच कां मनिं घेशि भीति ? । माझ्यासमान न जगीं कुणि वीर होती
दिक्पाल मीं भुजबलीं जिणले सलील । वायू कुबेर यम काल जलाधिपाल ॥
ते देव दानव नरादि मदीय दास । मंदोदरि ! प्रियतमे ! मग भी कशास ?' ॥१९
मंदोदरी समजली मनिं हा विचार । 'हा हट्ट नाथहृदिं कालचि निर्मि घोर'
लंकेश येउनि सभे सचिवां विचारी । शत्रूशिं युद्ध करणें कवण्या प्रकारीं ॥
तें बोलती सचिव 'राक्षसनाथ ! केशी । पृच्छा अशी करितसां असकृत् अम्हांसी!
हो कोणतें भय तरी ? कसला विचार ? । आम्हांस खाद्य नर वानर ऋक्ष थोर' ॥
ऐकोनि तें सचिव-भाषण त्या प्रकारीं । बोले प्रहस्त कर जोडुनि शुद्धिचारी॥२२
"हे नाथ ! नीतिसि विरोध करूं नका हो। ही मंत्रिबुद्धि अति कोति सुदुःखदा हो
हीं तोंडदेखलि वचें सचिवोक्ति होत । याहीं न काहिंच निभाव पडेल नाथ !
लंघोनि अब्धि, कपि एकचि येथ येई । त्याची कृती सकल वानिति चित्तिं पाहीं
तेव्हां तुम्हांस नव्हती काहिहो बुभुक्षा!। जाळोनि जैं नगरि तो करि पूर्ण रक्षा ।।
हे मंत्रि सांगति तुम्हां मत जें स्वकीय । तें ऐकतां सुखद, दुःखद अंतिं होय ॥
नांधीत जो सकळ वारिधितें सलील । यांटीत सैन्यसमवेत गिरी सुवेल ॥२५॥

तो सांगतां नर तया अभिद्द खाउं ऐसें। हे बोलतां फुगवुनी तुम्हि गाल कैसे!
हे तात! सादर तुम्ही मम बोल ऐका। मातें गणा नच तुम्ही सुत भीरु देखा
जे ऐकती मधुर भाषण बोलतीही। ऐसेच होति जन या जगिं फार पाहीं।।
अत्यंत भव्यकर, मात्र कठोर काना। वक्ते तसे परिसते नर अल्प माना ।।२७
घाडूनि शिष्ट, अजि उत्तम हेचि नीति,। सीतेसि द्या परत, ध्या मनिं रामभक्ति
रामाखवें उचित सामचि सौख्यदायी। तें आचरा, प्रभु जयें मनिं तुष्ट होई ।।

घेउनि सीते जाती अरि ते तरि वादवा न वैरातें ।।
ना तरि संमुख लढुनी मर्दावे करुनि घोर समरा तें ।।२९।।
प्रभो! मानवलें तुम्हां जर कां मम हें मत ।।
दोंहीं परिं तुम्ही व्हाल जगतीतलिं कीर्तित " ।।३०।।

बोले सुताप्रति तदा दशकंठ रुष्ट। "कोठें शठा! शिकशि हीं तव बुद्धि दुष्ट?।।
हो आजपासुनिच कां तव चित्तिं भीति? तूं वंशमूळिं जणुं घातक कीटमूर्ति"।।
ऐकोनि त्या पितृवचा परुषातिघोरा। जाई प्रहस्त गृहिं बोलुनि वाक् कठोरा
'तुम्हां रुचे न हितकारिहि वाक्य तेसें। हो कालवश्य जनिं औषधहीं नकोसें'
संध्यागमा बघुनि रावण जाय गेहीं। तो आपुल्या विश भुजां निरखोनि पाही
लंकेचिया शिखरिं मंदिर रम्य एक। वैचित्र्यपूर्ण अति कौशलिं बद्धरेख ।।३१
जेथें अनेक गुणि गायकवृंद होती। ये तेथ रावण विलास धरूनि चित्तीं ।।
चाले मनोहरण किन्नरगान गोड। वीणामृदंगमृदुवादन ज्या न पाड ।।
रम्याप्सरा करिति नर्तन नित्य जेथ। तेथें विलासरत रावण हर्षित होत ।।
इंद्राहुनी शतगुणी रमला विलासीं। चित्तीं न भीति जरि शत्रु बलाढ्य शीर्षीं

।। इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने
' सुश्लोकमानसे ' लङ्काकाण्डे मंदोदरीरावणसंवादवर्णनं नाम
द्वितीयस्तरङ्गः ।।

## तरंग ३ रा

सुवेलशैलीं इकडे रघूत्तम। सेनेसवें वास करी मनोरम ।।
उत्तुंगशृंगा अभिराम देखुनी। स्वच्छा समा भू रुचली तयां मनीं ।।१।।
तेथें तदा लक्ष्मण आपुल्या करीं। शय्या सुमें पल्लव आणुनी करी ।।
आच्छादि ती रम्य मृदू मृगाजिनीं। कृपाल त्या बैसत राम आसनीं ।।

हो रोमराजि सम ज्यास वनस्पतीही । हे शैल अस्थि, सरिता नस रक्तवाही
नीचेन्द्रियें नरक, ज्या प्रति पोट अब्धि।हा विश्वरूपि विभु कल्पियला अनादि
ज्याचा अहंकाराचें होय शंकर । बुद्धी विधाता, मन हें सुधाकर ।।
। यच्चित्त विष्णु भरि जो चराचरा । नराकृति तो प्रभु राम हा खरा ! ९
ऐसा विचार हृदयीं करुनी प्रभूचीं । वैर त्यजूनि भजणें प्रभु सौख्यराशि ।।
श्रीरामपाद-कमलीं निजचित्त ठेवा । प्राणेश्वरा ! मज अहेवपणा रहावा !' ।।
स्त्रीवाक्य तें परिसुनी दशकंठ सांगे।"आश्चर्य! मोहमहिमा बलवान् किती गे!।।
नारीस्वभाव कविवर्णित सत्य होय । कीं अष्ट दोष असती हृदयीं तदीय ।।
चांचल्य साहस असत्य अशौच माया।भीरुत्व निर्दयपणा अविवेक हो यां ।।
त्वां गाइलेंस रिपुरूप समग्र भार्ये ! । जें कीं विशाल भय वर्णिसि जें मला ये
आहे प्रिये! सकल मत्करिं ईशभाव। केला प्रसादाचि तुवां कळवूनि सर्व ।।
कौशल्य हें प्रियतमे! तव जाणताहें । माझें प्रभुत्व मज वानुनि सांगशी हें।।
गूढार्थभाषण मृगाक्षि! तुझें मनासी। दे सौख्य,जें परिसतां भय सर्व नाशी!"
मंदोदरी मनिं म्हणे अजि निश्चयें हे।धीभ्रांति कांतमनिं कालवशत्वि आहे!
ऐशापरी बहुपरीं करता विनोद । झाली प्रभात दशकंधर तो मदांध ।।
लंकापती विगतशंक सभेंत येत । होऊनि निष्फल तया उपदेशजात ।।११।।
वेतासि येत फल पुष्प न वा कदापि । पीयूषवृष्टि जरि मेघ तयास ओपी।।
तैसें न मूर्खहृदयीं कधि ये प्रकाश।लाभोनिही गुरु तया विधि वा महेश !

।। इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे लंकाकांडे रावणमन्दोदरीसंवादे विराट्रूपवर्णनं नाम चतुर्थस्तरङ्गः ।।

## तरंग ५ वा

झाले प्रभातिं इकडे रघुराय जागे । मंत्र्यांसि बोलवुनि तन्मत घेत सांगे–।।
" सांगा त्वरें अजि कसा करणें उपाय " । तें जांबुवंत कथि वंदुनि रामपाय ।।१।।
"सर्वत्र हे प्रभुवरा ! हृदयाधिवासी । हो धर्मबुद्धि बलकांति गुणाढ्यराशि ।।
सांगूं तुम्हांप्रति यथामति मंत्र हाच। कीं पाठवा जि! अजि अंगद शिष्टसाच" ।।
तें बोलणें बहु रुचे सकलांस चित्तीं । बोले कृपाल विभु वालिसुतासि उक्ति–
"श्रीमान् बलिष्ठ गुणसागर अंगदा रे !। लंकेसि जाउनि करीं मम कार्य सारें।। २।।

तूं सुरवर्य तुज बोलुं विशेष काय ?। मी जाणतों चतुरता तव हो अमेय ॥
साधेल काज मम, त्यासहि जें हितार्ते। ऐसेंचि तूं रिपुसवें वद वाक्य सार्ते।"
आज्ञापितां प्रभुवरें नमुनी पदांसी । तो उक्ति अंगद करीत उठोनि ऐशी-॥
"हे राम! आपलि कृपा मिळणार ज्यास । होईल तोच गुणसागर तोच ईश
आहेच कार्य तुमचें स्वयमेव सिद्ध । हें आदरें मजसि गौरवितां विशुद्ध"॥
उद्गारतां वच असें युवराज चित्तीं । आनंदला पुलकमंडित धन्यकीर्ति ॥६॥
श्रीरामपादकमलीं नमुनी महत्त्व । चित्तीं धरूनि सकलां नमि शुद्धसत्त्व ॥
जात्याच वालिसुत धीर बलाढ्यवीर। रामप्रताप धरि त्यात हृदीं उदार! ॥७॥
लंकेंत येत, तंव रावणपुत्र त्याला । खेळांत दंग दिसला सह मित्रमेळा ॥
अन्योन्य ते वदति रोषभरें मिळाले । दोघे अतुल्यबळ यौवन ज्यांत खेळे ॥८
तो अंगदावरि उगारित लाथ येत । तो तीं धरी भ्रमवि भूमति आपटीत ॥
तें सर्व राक्षस बघोनि तशा सुवीरा । गेले चहूंदिशि पळोनि न शब्द वक्त्रा!
तें सांगती न घडलें कवणांहि वृत्त । पाहूनिही वध, समस्तचि मौनवंत ! ॥
कोलाहलें भरलि ती भयभीत लंका। 'जो जाळि, तोच कपि ये फिरुनी न शंका?
'घात्या! करील अजि वानर काय आतां?'। ऐसें विचारिति समस्त भयार्तचेता
त्या वाट दाविति, तयें न विचारताही । ज्या वालिसूनु वधि तो मुकुनीच जाई!
चिंतूनि चित्तिं रघुनायकपादकंज । तो जाय अंगद सभेमधिं शक्तिपुंज ॥
तो सिंहसाच जणुं सर्व दिशीं पहात । तो धैर्यवीर्यबलशालि पराक्रमार्थ ॥१२
धाडूनि देत झणिं एक निशाचराला । जो रावणा कळवि 'वानर तेथ आला' ॥
ऐकोनि हासत दशानन त्यास सांगे । 'कोठूनि येइ कपि? पाठवि येथ वेगें!'॥
आज्ञापिले बहुत धावुनि जाति दूत । त्या अंगदासि झणिं घेउनि येत तेथ॥
तो वालिपुत्र वघि रावण बैसलेला । सप्राण कज्जलगिरी जणुं तेथ ठेला!॥१४॥
ज्या वृक्षसे भुज, शिरें जणुं शृंगसीं तीं । नाना लताच जणुं वाढत रोमपंक्ति ॥
त्या नासिका-नयन-वक्त्र-समूह कान। होती अनंत गिरिकंदर-भासमान॥
गेला सभेंत, मन लेश न भीतियुक्त । तें वालिनंदन महाबल बुद्धिमंत ॥
सारी सभा उठुनि राहि बघोनि त्यासी। ये क्रोध रावणहृदंतरिं तें विशेषीं!
सिंहें जसें बहु मतंगजयूथिं जावें । तैसा प्रवेश करि अंगद धीरभावें ॥
रामप्रताप हृदयामधिं आठवीत । बैसे सभेंत शिर वांकवुनी विनीत ॥१७॥

सुग्रीवाच्या अंकि टेकूनि शीर्ष । डाव्या बाजू ठेविलें कार्मुकाप ॥
माता देवी दक्षिणांगी कडेला । दों हस्तांनीं बाण सांभाळियेला ॥३॥

कानीं सांगे मंत्र लंकेश कांहीं । पादांभोजें चेपिती भक्त दोही ॥
नानारीतीं मारुती, वालिसूनू । भक्तिप्रीती तद्वदीं केविं वानूं ? ॥४॥

वीरासना घालुनि वीर लक्ष्मण । प्रभूपदीं सख्यचि राहि बैसून ॥
हस्तांबुजीं बाण तसें शरासन । निषंगशोभा कटिभाग-भूषण ॥५॥

ऐशापरी सद्गुणधाम राघव । नवांबुदश्याम अशा दयार्णव ॥
ध्यानीं अशा यन्मन लीन संतत । ते धन्य होती नर भक्तिभूषित ॥६॥

पूर्व दिशेसि विलोकी प्रभु जों देखे शशांक हो उदित ॥
" निःशंक सिंहसा हा चंद्र पहा ! " रामचंद्र हें वदत ॥७॥

पूर्वेन्दिया गिरिगुहेमधिं वासकारी । प्रौढी प्रताप बल तेज जयास भारी ॥
मत्तेभ-कुंभतिमिरासि विदारि मूर्त । हा केसरी गगनकाननिं संचरीत ॥
मुक्तावली विखुरली जणुं तारका या । ही सुंदरी जणुं निशा सजवी स्वकाया ॥
बोले प्रभु शशिमधें अशि कृष्णता कां? आरापल्या मति तुम्ही निरसा जि! शंका
सुग्रीव तें वदत 'मी कथितों विभो ! हें । छायाच ही धरणिची शशिमाजि आहे'
कोणी म्हणे 'शशिसि जो करि राहु घाय । तें श्यामलत्व उरिं वाहत चंद्र काय ?'
कोणी तदा म्हणति "घेउनि सारभाग । चंद्रांतुनी रचि विधी रतिचें मुखांग ॥
त छिद्र हें प्रकट भासत इंदुवक्षीं । छाया तयाचरि कृता जणुं अंतरिक्षीं!"॥११
बोले प्रभू "गरल बंधुच इंदुचें हो । दे त्यासि ठाव हृदि तो अपुल्या प्रिया हो ॥
तेणेंचि इंदु विषसंयुत अंशुजालीं । नारीनरा प्रियवियोगिं मनांसि जाळी!" ॥
सांगे तदा पवननंदन " नाथ ऐका । हा चंद्र होय निजदास तुम्हांस एका ॥
ही तद्धृदीं प्रभुवरा ! तुमची सुमूर्ति।ती श्यामला निवसती करि भास तो ती" ॥
ऐकोनि मारुतिवचासि सुजाण राम । हासे सुचिस्मित विभू हृदयाभिराम ॥
पाहूनि दक्षिणदिशे करुणानिधान । बोले "बिभीषण ! पहा तरि दिग्वितान ॥
ह्या देख दक्षिणदिशे, घनदाट मेघा । सौदामिनी विलसती द्युतिमन्त रेघा ॥
माधुर्यपूर्ण घन गर्जतसे गभीर । चाटे जणों उपलवृष्टिच हो कठोर!" ॥१५॥
तेव्हां बिभीषण वदे "परिसा कृपाळा । या दामिनी न,न म्हणा घनपंक्ति यांला ॥
*लंकेचिया शिखरिं सुंदर मंदिरांत । हा रावणास्तव असे ध्वनि गीतजात ॥१६॥*

जे मेघडंबर परी शिरिं त्यांचिया तें । हो छत्र त्या घनघटाहि सुनील त्यातें ॥
मंदोदरीश्रवणभूषण कुंडलें तीं । ज्या दामिनीपरि दिसो अतिमात्र कांति ॥
जे वाजती बहु मृदंग सताल तेथ । त्यांचाच हा मधुर सुंदर नाद होत" ॥
हांहि प्रभू वधुनि रावणगर्वस्फूर्ति । घेऊनि चापशर जोडित, सोडि हस्तीं ॥
तों तत्क्षणींच पडलीं धरणीं समस्त । तें छत्र कुंडल, तसें मुकुटांसमेत ॥
सारे पहाति परि मर्म न कोणि जाणे । ऐशी चमत्कृति करी प्रभु एकबाणें ॥
ऐसें करून अति अद्‌भुत कृत्य तेथ । तो रामबाण परतोनि निषंगिं येत ॥
सारीच रावणसभा हृदयांत भीता । देखोनि उत्सविं तसा रसभंग होतां ॥२०॥
ना कंप भूमिति, न मारुत वा विशेष । ना अस्त्र शस्त्र दिसलें कसलें कुणास॥
अन्यांसि वाटत परी हृदयातरांत । 'झालाच हा शकुन दुष्ट अतीव येथ!'
जेव्हां दिसे दशमुखा स्वसभा भियाली।हासोनि तो वदत भाषण युक्तिशाली॥
'हो! शीर्षपातहि जया शुभकारि साचा।त्याचा कसा मुकुटपात अमंगलाचा?
आपापल्या गृहिं रिघूनि निजा सुखांत'।सारे तदा नमुनि त्या, निजगेहिं जात
मंदोदरी निजउरीं धरि घोर चिंता । कीं कुंडलें श्रवणिंचीं गळलीं पहातां ॥
डोळे भरूनि, कर जोडुनि बोलली ती।'हे प्राणनाथ! परिसा मम नम्र उक्ति
कांता! विरोध न करा तुम्हि रामराया।हट्ट त्यजा! नच गणा नरमात्र हो! या॥
हो विश्वरूप रघुवंशमणी! गणा हा । विश्वास आत्महृदयीं मम वाक्यिं वाहा
प्रत्यंगि लोकवसती श्रुति सांगतात। ज्या तो रघूत्तम गणा अजि! विश्वनाथ

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे लङ्काकाण्डे सुवेलपर्वतोपरि रामचन्द्रस्य चन्द्रव्याजेन विरहवर्णनंनाम तृतीयस्तरङ्गः ॥

## तरंग ४ था

पाताल, पादतल, मस्तक धातृलोक । अंगांगिंही अपर लोक जया अनेक ॥
यद्‌भ्रूविलास जणुं भीषण काल झाला । यन्नेत्र भास्कर, कचावलि मेघमाला ॥
ते अश्विनीतनय होत जयास नासा । जे कां निशादिवस त्यां तुलणें निमेषां ॥
दाही दिशा श्रवण, ज्यामति वेदगाती।यच्छ्वास तो पवन ही श्रुतिची सदुक्ति
जो लोभ तो अधर, जो यम घोर दांत।मायाच हास्य, दशदिक्पति बाहु होत
यत्कन्न अग्नि, जणुं सागर जीभ लोल। उत्पत्ति पाल्न विनाश जयास खेळ२

त्यातें दशानन पुसे 'कपि कोण! तूं रे !' । 'मी रामदूत' कपि सांगत 'जाण सारें॥
माझ्या पित्यासह असे तव मैत्र नातें । त्यासाठि मी तव हितास्तव येत येथें॥
तूं जात उत्तम कुळांत, पुलस्तिनातू । पूजीयले शिव विरंचि बहू परीं तूं ॥
तूं मेळवीशि वर सर्व करीशि काज । जिंकूनि लोकपति होशि समस्तराज !
झाला नृपत्वमद वा मतिमोह तूंतें । सीतेसि नेशि हरुनी जगदंबिका ते !
आतां कथीन परिसें शुभ जें करील । सारे क्षमील अपराध दयार्द्रशील॥२०॥

( आतां शुभ तुझें व्हाया सांगतों ऐक मद्वच ॥
सान्या त्वदपराधातें क्षमा प्रभु करीलच ॥२०॥ )

दांतीं धरीं तृण, गळ्यांवरि घे कुठार । सांगातिं घे जन तुझे ललनादि सार॥
सर्वांपुढें करुनि सादर जानकीस । ऐशा प्रकारिं चल टाकुनि भीतिलेश ॥२१॥
प्रार्थीहि हें "प्रणतपाल रघूत्तमा गा ! । तूं रक्ष रक्ष मज दावुनियां सुमार्गा"॥
ऐकोनियां प्रभु तुझी अशि आर्त वाणी । देईल तो अभय रे! तुजला द्रवोनी"॥
तेव्हां दशास्य वदला कपिबालका रे ! । संभाळुनीच कर तूं मज बोल सारे॥
मूढा! न जाणसि मला सुरशत्रुरूपा । तूं सांग नांव तव, जें तव नांव बापा॥
कैसा असेल तव तात मदीय मित्र ? । सारेंच रे! कथ मला तुमचें चरित्र"॥
बोले कपी 'मजसि अंगद नाम जाण । मत्तात वालि, कधिं तो तुज भेटला न ?'
तें अंगदोक्त लव मीवचि राक्षसेशा । तो सांगि "हो ! मज न ठाउक वालि कैसा ?
हे अंगदा ! असासि तूं सुत वालिजात । वंशाग्नि तूं स्वकुल-घातक दुष्टमत्त ॥
गर्भांतुनीच न कसा गळलास ? नीचा ! । 'हो दूत' आपणचि सांगसि तापसांचा
आतां वदें 'कुशल वालि' कुठें असे तो ?" । हासोनि उत्तर तया कपि हेंचि देतो
"जाशील तूं दशदिनातचि वालिपाशीं । त्या क्षेम तूं पुस धरोनि तया उराशीं॥
रामा विरोध करतां, कुशलासि जैसी । तो ती स्वतांच तुज सांगिल त्या क्षणासी !

शठा ! ऐक तयाचेची भेदाला मिळतें स्थल ॥
जयाच्या हृदयीं नोहे श्रीरघूत्तम निर्मल ! ॥२८॥

म्हणसी मज कुलघातक, असशी तूं स्वकुलदीप ना विसरें ॥
ना अंध, ना बधिरही, सागिल तुज नयन कान विस विस रे॥२९॥
विधि-हर सुर-मुनि सारे पाहति सेवावयास यच्चरण ॥
तद्दूत होत कुल मी नाशीं, म्हणतां न ये तुला मरण ? " ॥३०॥

ऐकोनि वाक् अति कठोर अशी कपीची। डोळे तरारुनि वदे दशवक्त्र दैचि॥
"दुष्टा! तुझी सद्दल मी कठिनोक्ति सारी। कीं धर्म नीति मज आवडते विचारी"
सांगे कपीहि "तव जाणत धर्मशीला। तूं चोरली परिसतों परकीय बाला॥
मी दूरखणि बघें तव नीतिपोषा। धर्मव्रतीं बुडुनि तूं मरसी न कैसा? ॥३२॥
पाहूनही भगिनितें श्रुतिकर्णहीना। तूं तत्क्षमा करिशि धर्मविचारपूर्णा॥
आहे प्रसिद्ध जगतीं तव धर्मराशि। मद्भाग्य थोर मज भेटशि लोचनांशी!"
क्रोधें दशानन वदे "कपिकीटका रे!। कां जल्पतोस मतिमंद! अयोग्य सारें॥
उद्दण्ड चंड मम देख समर्थ बाहू। जो लोकपालबलपूर्णशशीसि राहू॥ ३४॥
आकाश हेंच सर, पाणिसमूह सारा। हा पद्मराशि मम, ज्यावरि शोभणारा॥
कैलास शंभुसह निर्मि सुचारु भास। कीं होय सुंदर असा जणुं राजहंस!॥३५
रे ऐक वालिसुत! सांग मशीं ल्हदेशा। सैन्यामधें तुमाचिया! तरि कोण ऐसा?
नारीवियोगिं बलशून्यचि नाथ तूझा। तद्दुःखि दुःखितमना लघुभाउ दूजा॥
सुग्रीव तूंहि तरु कूलजसेच दोन। माझाहि तो अनुज भीरु अतीव जाण॥
तो जांबुवंत अति वृद्धचि मंत्रि होय। साधेल संगरिं पराक्रम त्यास काय?॥
ते शिल्प-कर्म-पटु कीं नल नील साच!। आहे महाबलि असा कपि एकलाच॥
येवोनि आधिं करि जो नगरीस दग्ध"। तैं देइ वालिसुत उत्तर हें विदग्ध—॥
"हे राक्षसेश! वदसी मज सत्य सारें। ही जाळलीच कपिनें नगरी तुझी रे!॥
जाळीत रावणपुरी कपि अल्प एक। मानील सत्य तरि हें वच कोण देख॥
ज्याची बलिष्ठ म्हणुनी करिशी प्रशंसा। सुग्रीवसेवकचि पायपिट्या लघूसा!॥
जो चालतो बहुत तो नच वीर होत। धाडीयेले अम्हि तया कळण्यास वृत्त॥
आज्ञा न तो मिळवितांचि तशी प्रभूची। जाळी पुरीस कपि वास्तव भीति घेचि
सुग्रीवसंनिधहि तो अजुनी न येई। वाटे कुठेंतरि भयें लपुनीच राही४१
जें बोलसी दशमुखा! वच तें न खोटें।त्याचा मुळींच मजलागिं न कोप वाटे
ना व्यक्ति कोणि अमुच्या कटकांत ऐसी।शोभेल जी तुज रणांगणि झुंजण्यासी
प्रीती, विरोधहि तसा करणें समाशीं। सर्वत्र ही दिसतसे मज नीति ऐसी॥
मारील की मृगपती जर बेडकांना। वाटेल तो मग भला जगतात कोणा?
तूंतें वधूनि जरि लाघव येत रामा। मोठाच दोषहि जडेल तदीय नामा॥
हे रावणा! जरि खरें तरि जाण चित्तीं। की क्षात्रजातिसि अनावर रोष होती"
वक्रोक्तिचापिं शर-भाषण जोडुनीयां। सोडीत शत्रुहृदिं अंगद दुःख द्याया
प्रत्युक्ति सांडस जणूं गमली मना ते।जीनें दशानन वधी शर काढण्यातें॥

हांसोनि बोलत दशानन ' हो तुम्हांत । मोठाच एक गुण वानरजातिजात॥
जो कीं तुम्हां करितसे प्रतिपाल त्यांचें।धान्या उपायिं करिता हित तेंचि साचें
आहांत धन्य कपिहो ! निजनायकाजा। कोठेंहि नाच करतां दवडूनि लाजा !
नाचून मागुनि रंजविता जनांना।सेवीतसां निजधन्यां चतुराई नाना॥४७
हो स्वामिभक्त जगिं अंगद ! जात तूंही।गाशील ना मग कसा प्रभुसद्गुणा जी।
मी सुज्ञ तेविं अति सद्गुण जाणणारा।तूझ्या कटूक्ति नच आणित मी विचारा।
तेव्हां वदे कपि ' तुझी गुणलालसा रे ! । सांगी मला पवननंदन सत्य सारें।।
मोडोनि बाग, वधिला सुत, दग्ध लंका।तूं त्या तथापि नच देखि विशेष दुःखा
जाणोनियां तव असा प्रकृतिस्वभाव । केली धिटाइ दशकंधर मीहि सर्व ॥
तों बोलला सकल तें वधण्यास ये मी। नाहींच लाज नच रोष तुला न गुर्मी'
'हे मर्कटा ! मति तुझी अधि, खाशि बाधी !'।बोलोनि हें हंसत रावण पापराशि
तैं वालिनंदन वदे अति धैर्यशील । धीमान् रघूत्तमपदीं मन भावलोल ५१
'तातासि खाइं, अजि मी तुजलाहि खातों।आला परी मम हृदीं सुविचार हा तों
तूं वालिनिर्मलयशा स्मरवीसि, मत्ता ! ।नीचा अशाहि तुज मी न वधीत आतां
झाले जगांत किति रावण, रावणा रे !।तें सांग, मी परिसिलें कथितोंचि सारें।।
पातालिं एक रिघला बलितें जिणाया।त्या ठेविती शिशुच बांधुनि अश्वठायां।।
त्या बालकें छळिति ताडिति जें बघोन।सोडीत त्यासि कनवाळु बळी तिथून।
एका पुन्हां बधित तो नृप कार्तवीर्य । साश्चर्य त्या धरित वाडुनि जंतु काय।
तो कौतुकेंचि गृहिं घेउनि त्यासि येत।।झाला पुलस्ति मुनि तेधुनि सोडवीता
संकोच वाटत मना, कथितां तृतीय । जो वालिनें कवाळिला निजकक्षिं होय।।

या तीन रावणांतूनी तूं रे ! कवण ! तें मला ।
खरें सांग, त्यजोनीयां दिमाख हृदयातला ! " ॥ ५६ ॥

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे 'सुश्लोकमानसे' सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकाण्डे अंगदरावणसंवादो नाम पंचमस्तरङ्गः ॥

## तरंग ६ वा

लंकेश तैं म्हणत ' ऐक शठा ! जयासें।तो मी असे प्रबळ रावण रे विशेषें।।
ज्याच्या भुजांतिल बला हरचैल जाणे।ज्याचा पराक्रमहि जाणत शंभु तेणें १

पूजीयलें निजशिरःकुसुमावलीनें । काढोनि शीर्षकमलें निज हातिं जेणें ॥
पूजीयलें अमितवार जयें हरातें । केलें प्रसन्न गिरिजारमणांतरातें ॥ २ ॥
दिक्पाल मद्भुजपराक्रम जाणतात । ज्यांच्या उरीं अजुनही अति आर्ति होत
दिक्कुंजरांसहि तदा समजून आलें। काठिन्य मद्धृदयिं जें अतिमात्र ठेलें॥
ज्या ज्या क्षणीं भिडत मी बलशालि त्यातें।त्यांचीं कराल दशनें फुटलीं समस्तें
बावेत ज्यापरिं मुळें तुटुनी सलील । वक्षांवरी धडकतां मम वज्रशील॥४॥
जो चालुं लागत तदा धरणी डुलावी । जैसी मतंगजभरें लघु नाव व्हावी॥.
विख्यात तो जगतिं रावण विश्वजेता । त्यां ऐकलाहि न कधींच कपे ! प्रमत्ता!
त्या रावणा समजसी तृणसेंच कैसा?। क्षुद्रा नरा स्तवुनि तूं करिशी प्रशंसा!
रे नीच, मर्कट, खला ! मकसी असत्य।आलीं कळून तव धी, बल आणि कृत्य'
ऐकोनि अंगद सकोप वदे तयासी ।'संभाळ जीभ अधमा! बहु माजलासी !
ज्याच्या कुठारिं अनलासम घोरमूर्ति । होळी सहस्रभुजबाहुवना करीती॥७॥
ज्याच्या जणों परशुसागरतीक्ष्णधारा । नाशीति कीं बुडवुनी सहजीं अपारा
भूपालसंहति मदोद्धत कैकवेळां । त्याचाहि गर्व बघतांक्षणिं ज्या निमाला८
तो काय मानवचि मानिसि रे अभागा!। दुष्टा ! कसें नराचि तर्किसि विश्वरंगा!
गंगा कशी समजतोस नदीच एक। धन्वीच मन्मथ ? पशू सुरधेनु नीक? ॥
सामान्य दानसम होइल अन्नदान ?। साधेंच पेय कधिं होय सुधेसमान ?
साधा विहंग गणशील किं वैनतेय ? । शेषासही म्हणसि केवळ सर्प काय ?॥
चिंतामणीस गणना दगडांत त्या कीं ?। वैकुंठ तो समजणें जणुं एक लोकीं॥
श्रीरामभक्ति गणणें जणुं लाभ साधा !'रे रावणा ! दशमुखा ! वद बुद्धिमंदा
सेनेसमेतहि तुझा मद हारवीता । उध्वस्त जो करि वना तुझिया समस्ता ॥
लंकेसि जाळि, तव पुत्र वधोनि जाया।तो मारुती कपिच केवळ काय होय ?
हे रावणा ! परिस, टाकुनि धूर्ततेतें । तूं ना जरी भजसि राघवराय चित्तें ॥
होशील तूं जर खळा! जगिं रामवैरी।ना शंभु, ना विधिहि वा! तुजलागिं तारी!"
मूढा ! वृथा करुं नको मुळिं वल्गना या।तूं रामवैर करणें, स्थिति ऐशि व्हाया
लागोनि रामशर, पात तुझ्या शिरांना।होईल, भूवरि कपी बघतील नाना॥
ती वाटतील पदकंदुकसीच त्यांसी । ते खेळतील कपि ऋक्ष समस्त शीर्षी॥
श्रीराम जैं हृदयिं कोप करून घोर।सोडील सायक भयंकर तीक्ष्ण उग्र॥१५

चाखेल काय जिमली तव ही तदा रे!।ऐसा विचारें भज राम मल्या प्रकारें
हें ऐकतांच सवळे दशवक्त्र चित्तीं। वाटे घृताहुतिच कीं ज्वलनीं पडे ती।
सांगेहि तो 'मम सहोदर 'कुंभकर्ण',।'शक्रारि' तेवि मम नंदन शौर्यपूर्ण।।
माझा पराक्रम कधीं नच ऐकलास ?।मीं जिंकिले बलि चराचर विश्वकोष !।।
घे शक्तचानरसहाय्य तुझा धनी हें। बांधूनि सिंधु जल लंघुनि येत आहे ।।
कित्येक पक्षिहि समुद्र उडोनि जाती। मंदा कपे! नच तयां पारे शूरकीर्ति!
माझे भुजाब्धि बलवारिनितान्तपूर्ण। ज्यामाजि शूर नर देव किती निमग्न।।
हें कीं अगाध जलराशि अपार वीस। लंघील पार तरि कोण सुवीर यास !।।
मी लाविं दिक्पतिसही भरण्यास नीर। दुष्टा मला कथिसि भूपतिकीर्ति फार।।
ऐसा जर प्रभु तुझा रणशूर आहे। ज्याचें करीसि गुणगान पुन्हां पुन्हां हें
कां पाठवीत मजला तुज आत्मदूत। शत्रूप्रती विनविता नच त्यासि खंत!।।
मद्बाहु देख, शिव-शैल करीत शैल। माझ्यापुढें निज धनी किति वानशील!।।
रे रावणासम असे तरि कोण शूर ?। शीर्षासि कापि अपुल्या करिं जो सुधीर।।
त्या आहुतीहि अनलीं बहुवार देत। या साक्ष होय गिरिजापति मूर्तिमत!२२
ती शीर्षपंक्ति अनलामधि दग्ध होतां। मी वाचिं लेख लिहि जे मम भालिं धाता।।
वाचोनि मन्मरण मानवहस्ति तैसें। जाणोनि खोटि विधिवाक् किति मीच हांसें!
चिंतूनि तें मजसि भीति न लेश चित्तीं। कीं अक्षरें जरठधीविधि-हस्तिचीं तीं!
तूं वानिसी मजपुढें किति अन्यवीरां। दुष्टा! फिरूनि फिरुनी, नच लाजणारा!"
तैं वालिसून वदला "जगतीं सलज्ज। हे रावणा! तुजसमान न कोणि आज।।
तूं लाजरा विनत रे सहजस्वभावें। या साठिं आत्मगुणगान तुला न ठावें।।
रे! आठवे तुजसि मस्तक आणि शैल। जें बोललास अजि तूं मज वीस वेळ।।
तूं आपल्या भुजबला उरिं लोपवीसी। जेणें सहस्त्रभुज, वालि, बली, जिणीसी।।
रे मंदधी! मजसि उत्तर दे समग्र। क्रापोनि शीर्ष कुणि होइल काय शूर ?
तो इंद्रजालि, मच वीर कथीति लोकीं। कापीतसे निजकरें निजदेह जो कीं!।।
होऊनि मोहवश जाळुनि वे पतंग। भारासि वाहि किति गर्दभवृंद साग।।
त्यांना न कोणिहि गणी जगिं शूर ऐसें। रे बुद्धिमंद! मनिं वागविसी न कैसें?
दुष्टा! न जास्त वद कांहिं! कथीन ऐक। सोडूनि दे सकल मान, मदुक्ति देख।।
मी पातलों दशमुखा! नच सामकाम। तो पाठवीत मज राघवराय राम।।२३।।
सांगे कृपानिधि मला बहुवार हें चि। 'नाहीं शृगालवधिं केसरिकीर्ति साची'।।
आदेश राममुखिंचा धरुनीच चित्तीं। दुष्टा! तुझ्या सहन मी करिं दर्पितोक्ति।।

नाहीं तरी करुनियां मुखभंग तूझा । नेतोंचि मी जनकजेसि बळें स्वतेजां ! ॥
नीचा ! तुझें बल मला कळलें सुरारे ! । तूं आणिली परिसतों परनार कीं रे ! ॥
तूं राक्षसाधिपति थोरचि गर्वराशी । मी दूत, दास अवघा रघुनायकाशीं ॥
रामापमान करण्या जर मी न भीतों । दृष्टीसमोर तव कौतक हें करीतों ॥३२॥
चारूनि धूळ तुज सैन्य तुझें वधोनी । जाळोनि गांव तव घेउनि सर्व राशी ॥
जातोंचि मी जनकजेसहि घेउनीयां । दुष्टा ! नसेचि परि हे महती मदीया ॥
मेल्यास मारुनि असे पुरुषार्थ कोण ? । प्राणीहि केवळ शवें, चवदाहि जाण ॥
जे कौल, कामवश, कंजुष मूढचेत । अत्यंत दीन अयशी अतिवृद्ध सात ॥
रोगी सदा, सतत कोपि, हरीसि वैरी । साधुश्रुतींप्रति विरोधक, पापकारी ॥
निंदा करी, स्वतनुपोषि-असेहि सात । हे प्राणवंत तरिही शवसेच होत ! ॥३५॥
ऐशा विचारिं न खळा ? तुज मी वधीत । आतां न रोष मम तूं कर वृद्धिमंत" ॥
तेव्हां सकोप अति राक्षसनाथ सांगे । चावून ओठ अधरा कर चोळि रागें ॥
"रे नीच वानर ! दवा तुज मृत्यु आतां । छोट्या मुखीं करिसि तूं बहु थोर वार्ता ॥
ज्याच्या बळें कटुक हें वच जल्पतोसी । नोहे प्रताप बलधी तुलि रे ! तयासी ॥
जाणोनि त्या अगुण मानविहीन, ऐसा । धाडीतसे वडिल त्यासि अरण्यवासा ॥
तो दुःख भोगि, युवतीविरहार्त दीन । माझाहि धाक दिनरात तयास पूर्ण ॥
ज्याच्या बळें करुनि गर्व वहासि थोर । तैसे मनुष्यगण या जगतीं अपार ॥
आहार होति दिवसा निशिं राक्षसांना । जाणून, मूर्ख कपि रे ! मदमत्त हो ना"
जेव्हां करीत अशि रावण रामनिंदा । संक्रुद्ध होत कपिराट् न करीत वादा ॥
खाई किती करकरा कपिसिंह दांत । आघात दोंहि भुजिं भूमिवरी करीत ॥
कांपे धरा पडति खालिं सभासदादि । भी-मारुतें पळति धावति सैर वृंदीं ॥
तै सांवरीत उठला दशशीर्ष काय । देदीप्यमान मुकुटां क्षिति पात होय ॥४१॥
घेऊनि काहिं निजमस्तकिं बैसवीत । फेंकीत अंगद किती प्रभुराज जेथ ॥
येतां बघूनि मुकुटां, कपि धांव घेती । "उल्का कशा पडति भूमिं दिसां सुकांति !
कीं क्रुद्ध रावणचि फेंकित चार हीं कां । वज्रेंच, येति अति वेगिं न यांत शंका !"
हांसोनियां प्रभु वदे "नच व्हाजि ! भीत । नोल्का न वज्र,नच राहु न केतु होत

तेजस्वी असती देखा रावणाचें किरीट हे ।
माझ्याकडे फेंकियेले अंगदें शत्रुगर्वहें ! " ॥४४॥

मारूनियां आणि उडी पवनात्मजें ते । आमियले प्रभुकडे धरुनि स्वहस्तें ॥
सूर्यापरी द्युति अतीवचि देखतां ती । साश्चर्यचित्त कपि ऋक्ष समस्त होती!
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंककांडे अंगदेन रावणमुकुटरामसमीपप्रेषणं नाम षष्ठस्तरङ्गः ॥

## तरंग ७ वा

इकडे चिडोनि रावण, सर्वां सांगे सरोष " या वेगें ।
धरुनी वधा कपीतें, " ऐकुनि अंगद सहास वदुं लागे॥ १॥
सांगे पुढें " तुम्हि अपापारें सर्व धांवा । वेगेंचि शूर रजनीचर सिद्ध हो! व्हा
जेथें जिथें दिसति वानर ऋक्ष, त्या ते । पृथ्वी करा सकल मर्कटशून्य की ते !२
आणा जिते धरुनि तापस बंधु दोनी"। त्यातें पुन्हां वदत अंगद रोषवाणी ॥
"रे बोलसी किति! नसे तुज लेश लाज । घे कापुनी निज गळे, मर तूं आज
माझे बघोनि बळ, भीसि न तूं अजूनी । ऐसा कुलघ्न गतलज्ज नसेचि कोणी॥
स्त्रीचोर दुष्ट अपराधि कुमार्गगामी । तूं मंदधी भकसि सैर मदांध कामी॥४॥
तूं ग्रस्त कीं मनुजभक्षक सन्निपातें। होवास कालवश आज खला! स्वहस्तें ॥
देतील ऋक्ष कपि जैं तुजला चपेटे । तेव्हांच कर्मफल तूज समग्र भेटे!! ॥५॥
तूं बोलसी मनुज केवळ राम होय । तेव्हांच जीभ झडुनी जरि ती न जाय॥
शीर्षोसमेतचि गळेल रणांगणीं तीं । यामाजि संशय खला ! न धरींच चित्तीं
एक्या शरेंच वधि जो बलशालि वाली । रे रावणा ! नरचि त्या म्हणतोस बोली
धिःकार रे ! तुज असो, नच शील छेद्य । तूं आंधळाच गमसी, जरि नेत्र वीस७
प्यायास शोणित तुझें अति लाहलेले । श्रीरामचंद्रशरसंघ खरेंच झाले ! ॥
त्यां दुःख होइल म्हणोनिच सोडिं तूंतें । हे निंदका ! निशिचरा अधमाधमातें
आहे समर्थ जरि मी तव दंतभंगा । आज्ञा न देत मज राघव या प्रसंगा ॥
तोडूं शिरें दशहि रोष मला असा ये । लंका समुद्रिं बुडवावि बळें अमेयें !॥९
ही होय उंबर फळासम मात्र लंका । जंतूंपरीच तुम्हि त्यांत मुळीं न शंका! ॥
हे खावयास फल नाहिं मला उशीर। आज्ञा परी न मज दे रघुवीर धीर "१०
ऐकोनि युक्तिवच ते दशकंठ हांसे । बोले "कुठें शिकासि रे ! वदण्यास ऐसें"॥
माझी कधीं न वदला असल्या वदाया। त्वांतीं तापस लबाड तुला पढाया !"

'मी हों लवाहचि खरोखर विश्व-हर्ता॥कीं ना तुझ्या उपटिं मीच जिमा समस्ता'
रोषें वदोन हृदिं आणुनि रामकीर्ति। रोवी धरेवरति पाय वदे पणोक्ति॥१२
'माझे पदा शकशि तूं हटवूं शठारे!। सीतेसि हारविन, राम इथें न थारे!'॥
सर्वांसि सांगत दशानन 'वीर ऐका!। पाया धरूनि कपि हा धरणीसि फेका'
तेव्हां बलिष्ठ अति इंद्रजिदादि सर्व। जेथें तिथें उठति हर्षुनि शौर्यगर्व॥
नानापरीं करिति यत्न पदा धरूनी। ना तें हटे लवहि तैं बसले लवोनी!॥
कांहीं पुन्हांहि उठुनी झटले पदास। ना तें हले लवहि देवरिपूंसि लेश!॥
जैसे कुयोगि जन ना शकती खगेशा!। पाडावयास भवि मोहतरूसि ऐशा॥
ते मेघनादसम राक्षसवीर कोटी। येती उठोनि झटती चरणासि कष्टीं॥
रोले फिरूनि बसले लववूनि शीर्ष। ना त्या हले चरण तो कपिचा लवांश!
सोडी न पाय कपिचा लवही धरेला। तत्काळ शत्रुमद तो सगळा विराला॥
संतांसि आलि जरि संकटकोटि लोकीं। नीतीसि न त्यजित तन्मन येवढें कीं!
देखोनि शक्ति कपिची थिजले समस्त। लंकेश तैं उठत ज्या कपि बोलवीत–!
घेऊं वघे करिं पदा, तंव अंगदानें। सांगीतलें "मम पदा धरुनी न होणें॥१८
मूर्खा! जरी धरशि तूं पद राघवाचें। त्वत्प्राण रे दशमुखा! तर मात्र वांचे"
संकोचुनी परतला परिसोनि ऐसें। निस्तेजता शशि जसा दिनमध्यि भासे
सिंहासनीं नतशिरा दशकंठ बैसे। संपत्तिमान सगळा हरलाच जैसें!॥
आत्मा जगासि रघुनायक जीवितेश। त्या शत्रुता धरुनि केविं सुखासि लेश!
रामाचिया गिरिसुते! भृकुटीविलासें। हें विश्व जन्मत, तसेंचि फिरूनि नाशे
वज्रा करी तृण, तृणाप्रति वज्र जो कीं। तद्दूतवाक्य कधि होय असत्य लोकीं!
त्यावें पुन्हा वदत नीति कपी किती तें। मानी दशास्य न परी धृत काळहस्तें॥
तद्गर्व हारवि, तया प्रभुकीर्ति वानी॥तो जाय वालिसुत त्याप्रति हें वदोनी!–
'मी जों रणीं तुजसि खेळुनि युद्ध केलि। हाणीत ना तुजसि तों वदुं काय बोली!'
आधींच कीं यमपुरा तनया कपी ने। तद्वाक्य ऐकुनि दशास्य भरे भयानें॥२३

देखिलें अंगदपणा त्यापरीं दशकंधरें॥
भयें व्याकुळ तैं झालीं, सगळ्यांचीच अंतरें!॥ २४॥

धर्षोनियां रिपुबळा अति हर्ष पावे। तो वालिपुत्र बळपुंज कपि स्वभावें॥
येवोनियां परत रामपदांबुजाशी। रोमांचकाय जललोचन नम्र शीर्षी!॥२५

हो सांजवेळ, दशकंधर जाय गेही । अत्यंत दुःखित भयाकुलचित्त होई ॥
मंदोदरी बहुपरी समजावि कांता ।"नाथा! त्यजा कुमति, घ्या सुविचार चित्तां

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुष-
विध्वंसने लंकाकांडे रावणसमासद्भंगवर्णनं नाम सप्तमस्तरङ्गः ॥

## तरंग ८ वा

"ना.युद्ध शोभत तुम्हां रघुरायसंगें । रामानुजें अवनिं ओढियल्याहि रेघे ॥
उल्लंघवे नच तुम्हांप्रति सर्वथा जें । जिंकाल काय समरांगणिं त्यांसि तेंव्हें ?
जिंकाल काय तुम्हि त्यासि रणांगणांत। यद्यपि अति पराक्रमशालि होत ॥
कीं, कौतुकें जलधि लंघुनि येइ लंके । ना येत चित्तिं लवही कपिचिंह शंके ॥
आरामपालक समस्त विनष्ट केले । विध्वंसिलें उपवनासि अगम्य लीलें ॥
जेणें समक्ष तुमच्या वधिलेंचि अक्षा । जाळोनियां नगरि केलि समस्त रक्षा ?

गेले होते कुठें तेव्हां बलगर्व तुम्हांतले ? ॥
आतां नाथा ! मृषा बोलें कार्य काय जि ! निष्फळें ? ॥४॥
सांगतें मी करा त्याचा विचार हृदयीं लव ॥
न माना रामरायातें राजा केवळ मानव ! ॥ ५ ॥
तो हो चराचरस्वामी तुलना नाहिं तद्बला ॥
त्याच्या बाणप्रतापातें जाणें मारीच तो भला ! ॥ ६ ॥
कांता ! न मानिलें तुम्हीं मारीचाचेंहि सांगणें ॥
मानिलें नीच तद्वाक्य भरलें जरि सद्गुणें ॥ ७ ॥
सीतास्वयंवरासाठीं जनकाच्या सभेमधीं ॥
आले असंख्य भूपाल ज्यामधें तुम्हिही सुधी ॥ ८ ॥
विशाल बलगर्वाढ्य होतां त्यात तुम्ही जरी ॥
रामेंच भंजुनी चाप सीता वरिलि सुंदरी ॥ ९ ॥
तेव्हां करुनि संग्राम कां न रामासि जिंकिलें ? ॥
सुरेन्द्रतनयातेंही अल्प तद्बल वाटलें ! ॥ १० ॥
धरोनि फोडिला डोळा, रामें तत्प्राण राखिले ॥
भोगी शूर्पणखा काय तेंहि तुम्हींच देखिलें ! ॥ ११ ॥

तरीहि न विशेषत्वें लावलें तुमचें मन ॥
विराध वधिला लीलें, कबंध, खर, दूषण ! ॥ १२ ॥
वाली एक शरें जेणें मारिला त्यास ओळखा ॥
कांता ! चित्तामधें जाणा राघवा विश्वपालका ॥ १३ ॥
नाथा ! पहा जगन्नाथें लीलें हो बद्ध सागर ॥
सेने-समेतही आला सुवेले जगदीश्वर ॥ १४ ॥

कारुण्यराशि रविवंशमनोज्ञकेतु । तो दूत पाठवि तुम्हांप्रति भव्यहेतु ॥
जो कीं सभेंत तुमचें बल मंथि सर्व । जैसा हरी मृगपती बहुदन्ति-गर्व ॥१५॥
ज्या दास होति रणधीर बलाढ्य खासे । ते शूरवीरमणि अंगद–मारुतीसे ॥
त्यांतें प्रिया ! म्हणतसां नर लाखवार । हा व्यर्थ मान, ममता मदगर्वभार !
हा ! हाय ! कांत ! तुम्हि राघववैर केलें । कालप्रभाव ! मनिं राहि न बोधियेलें॥
घेऊनि दंड नच मारि कुणाहि काल । तो धर्मबुद्धि हरि शक्ति विचार शील१७
हे नाथ! ज्यां जवळि ये जगिं कालपाश । त्यांना मतिभ्रमचि होय जसा तुम्हांस !
दों मारिले तनय, दग्ध पुरी, अजूनी । या जी ! तुम्ही परस्तीं प्रभुला भजूनी १८
श्रीरामराय करुणाबुधि पुण्यमूर्ति । नाथा ! तया शरण जाउनि घ्या सुकीर्ति "॥
नारीवचें परिसुनी दशतीश ऐशीं । येई प्रभाति उठुनी अपुल्या सभेशी ॥१९
सिंहासनीं बसत तो अभिमानपूरीं । चित्तांतली विसरुनी निज भीति सारी ॥
पाचारि राम इकडे प्रिय वालिजाता । तो येउनी प्रभुपदांबुजिं ठेवि माथा२०
अत्यादरें बसत रामसमीप भक्त । बोले कृपालु खरशत्रु सुहास्ययुक्त ॥
"हे अंगदा ! नवल हें मज फार चित्ता । मी जें विचारिं तुज साग खरेंचि ताता!
आहेच रावण निशाचर-वंशहीर । ज्याचा प्रताप जगतीतलिं फार थोर ।
त्याचे तुवां मुकुट फेकियलेसि चार । तूं कवि ते मिळविलेसि वदें समग्र २२
वैं अंगदें कथियलें 'प्रणतार्तिनाशा ! । सर्वज्ञ आपण कथा पुसतां जि ! कैशा !
ऐका प्रभो ! मुकुट ते नव्हतीच चार । ते होत भूपगुण चार महा उदार २३
जे साम दाम गुण दंड, तसाच भद । राजामधें वसति गाति जयांस वेद ॥
ते नीतिधर्ममय या चरणां उदारां । जाणोनि येति तुमच्याच तयास थारा !॥
जो धर्महीन विमुख प्रभुपादपद्मा । जा जायचा निशिचराधिप, कालछद्मा
त्या रावणा त्यजुन ते गुण येथ आले । जागा, तुम्हां रघुपतिप्रति आणि घाले !'

ऐकोनी ती परम चतुरा अंगदाची सदुक्ति ।
श्रीरामाची प्रमुदित अती जाहली चित्तवृत्ति ॥
सांगे रामा सकल, घडलें वृत्त लंकापुरीं जें ।
वालीचा तो तनय, भगवद्भक्ति चित्तीं विराजे ॥ २६ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकांडे अंगदस्य लंकासकाशाद्रामसमीपागमनवर्णनं नामाष्टमस्तरङ्गः ॥



## तरंग ९ वा

तें शत्रुवृत्त सगळें समजोनि येतां । श्रीराम बोलवुनि घे सचिवां समस्तां ॥
लंकेचिया अति सुसज्जचि चारि वेशी । ते सर्व चिंतिति कसें रिघणें प्रवेशीं १
तेव्हां बिभीषण कपीश सजांबुवंत । चित्तीं स्मरूनि रघुवंशकुलाधिनाथ ॥
ते सर्व रीतिं करिती सुविचार हाच । कीं चार मार्गिं करणें कपिसैन्य साच॥
केले नियुक्त कटकाधिपति प्रभावी । बोलाविले सकल यूथपतीहि तेवीं ॥
रामप्रताप सकलांसि निवेदियेले । तें सिंहनाद करुनी कपिही निघाले ! ॥२
हर्षोनि रामचरणीं लवुनी शिरांतें । घेवोनि अद्रिशिखरें कपि धांवती ते ॥
ते गर्जती सकल ऋक्ष कपी सुघोष । 'श्रीरामराम जय राघव कोसलेश !' ४
जाणोनिही परमदुर्ग अशोच लंका । रामप्रतापिं कपि घेति न लेश शंका ॥
घेरीयली चहुंदिशीं नगरी कपींनीं । भेरी निशाणरव वाजविती मुखानीं !! ५
'श्रीरामराय जय लक्ष्मणराय !' घोष । 'सुग्रीवराय ! जय राघव कोसलेश'!
हे सिंहनाद कपि ऋक्ष करीति वीर । ज्यांच्या बलद्युतिसि नाहिं कुठेंचि पार! ६
कोलाहलें भरुनि जाय समस्त लंका । गर्विष्ठ रावण म्हणे परिसोनि "देखा!
हो काय वानरगणा सुचली धिटाई !" । बोलावि राक्षसचमूपति त्याच ठायीं ७
सांगे 'इथें सकल वानर कालयोगें । आलेत, राक्षसगणांसहि भूक लागे!' ॥
ऐसें म्हणोनि करि तो शठ अट्टहास।बोले 'विधीच गृहिं धाडित खाद्य घास !
सारे सुवीर तुम्हि चारि दिशां मिळा हो । हे ऋक्ष वानर धरा, सगळ्यां गिळा हो'
हो रावणास अतिगर्व उमे! शहाणे ! कीं वाहि टिट्टिभ नभा मिळुनी उताणे !

आज्ञा मिळोनि रजनीचर वीर जाती।ते भिंदिपाल, बरच्या कीं शक्ति घेती
चंडा तसे परिघमुद्गरतोमरांतें । शस्त्रें कृपाण परशू गिरि शूल घेते ॥ १० ॥
जैसें बघोनि अरुणोपलराशि त्यांतें।धांवोनि हिंस्र खग हाणिति चोंच कीं ते॥
मूढांस त्यां न समजे निजचंचुभंग।तैसे कपींवरि निशाचर युद्धिं दंग॥११॥
घेऊनि चापशर आयुधराशि नाना।आले बलाढ्य रजनीचर ज्यां तुला ना॥
ते दुर्गकोटिं चढती क्षणिं कोटिकोटी। युद्धार्थ ज्यांस बहु आवडि होय पोटीं।

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकांडे युद्धार्थमुभयसैन्यसमागमवर्णनं नाम नवमस्तरङ्गः ॥



## तरंग १० वा

ते दुर्गकोटिं दिसले गण राक्षसांचे । कीं मेरुशृंगिं चढले घन कृष्ण साचे ! ॥
तैं वाजुं लागति रणार्थ निपाण ढोल । ऐकोनि चेव चढला हृदयीं अमोल॥१॥
तैं वाजुं लागति अपार नभींहि भेरी। भीरुप्रती परिसतांक्षणिं येत घेरी ! ॥
चेष्टा तदा कपिकृताहि न कोण पाही। ते ऋक्षवीर तरि फार विशालदेही ॥२
त्यांना न त्या किंतिहि दुर्गम घाट वाटा । फोडूनि पर्वत नव्या करितीहि वाटा॥
ते गर्जती कटकटां रव वीरकोटी। उड्डाणही करिति रोवुनि दांत ओठीं॥३॥
दाहीहि एकिं 'जय रावण!' ऐशि होई। अन्यत्र घोष 'जय राम विभो!' असाही॥
सर्वत्र शब्द 'जय हो!' 'जय हो!' असा दे। आपापलीं जय-वचें करिती अमेयें॥
लोटीति राक्षस कपींवरि अद्रिशृंगें। जीं झेलिती वरि वरींच कपीहि रागें ॥
फेकूनि देति फिरुनी वरतीं विशालें। ज्यांहीं निशाचर किती तरि ते निमाले।॥

करीं घेउनी पर्वतखंडां प्रचंडतनु ते ऋक्ष कपी ।
लंकादुर्गावरी फेकिती लीला वर्णुं ती त्यां सोपी ! ॥
ओढिति चरणां धरुनि राक्षसां आपटिती ते धरणिवरी ।
पळतां त्यांतें पुन्हां बोलविति युद्ध कराया बरोबरी ॥ ६ ॥
चपल तरुण ते निजप्रतापें चढति गडावरि किती तरी ।
मंदिरशिखरीं चढुनि ऋक्षकपि राघवकीर्ती गाति खरी ॥

एका एका धरुनि राक्षसा कपिभट परतति पळव किती ।
धरतीं आपण तळीं राक्षसां घालुनि मारिति उड्या छितीं । ॥७॥

रामप्रतापबळिं ते कपियूथ सारे । मर्दीति राक्षसगणाप्रति शक्तिवारें ॥
दुर्गावरी चढति वानर जेथ तेथ । रामप्रतापरविचा जय गर्वतात । ॥८॥
आई निशाचर-समूह तदा पळोनी । जावेत मेघ पवनें अति विस्कळोनी ॥
कल्लोळ सर्व नगरांत भरून जात । बाळें स्त्रिया रडति शोकभरें नितान्त ॥९॥
देती शिव्या सकळ निंदुनि रावणास । 'राज्यांत आणित निमंत्रुनि मृत्युपाश' ॥
सेना स्वकीय विचलत परिसोनि कानीं । लंकेश त्या परतवोनि वदे स्ववाणी ॥
"जाईल जो विमुख होउनि या रणातें । तीक्ष्णीं कृपाणिं अजि मीच वधीन त्यातें ॥
सर्वस्व लाउनि यथेच्छहि भोग नाना । स्वप्राणिं कीं समरिं वल्लभता सुजेना !" ॥
ऐकोनि उग्र वचना सगळेच भ्याले । वाटोनि लाज, परि, वीर फिरूनि आले ॥
वीरासि होय रणि सन्मुख मृत्यु शोभा । या निश्चयें त्यजिति चेवुनि जीवलोभा ॥
नानायुधें धरुनि ते लढती समस्त । आह्वान देति रिपुतें अतिरोषयुक्त ॥
शस्त्रेंचि शूळ परिघादिक हाणनीया । ते छेदतीति अति श्रक्ष-कपीसि कीं या ॥
सारे भयाकुल कपी पळु लागले ते । होणार गैरि ! जरि शेवटिं तेच जेते ! ॥
कोणी तरी पुसत अंगद, वायुसुनु । कोठें वसी द्विविद नीळनलादि? मेणूं ! ॥१४॥
जाणे मरुत्सुत टिके नच आत्मसेना । तो द्वारि पश्चिमिं असे रणरंगराणा ॥
तेथें करीत अति संगर मेघनाद । भंगे न वेदा कठिना नच शक्य भेद ॥१५॥
संक्रुद्ध होय पवनात्मज फार चित्तीं । गर्जे बलाढ्य जणु कालचि योधमूर्ति ॥
लंकातटावरि चढोनि सुवीर धावे । तो मेघनादिं गिरिखंड धरोनि धावे ॥१६॥
केला विभग्न रथ, सारथि संहरीला । लत्ताप्रहार हृदयावरि हाणियेला ॥
जाणोनि त्या विकल, सारथि अन्य कोणी । घालोनियां रथिं क्षणीं सदनात आणी ॥
जें अंगदें परिसिलें तदिं एकलाच । गेला असे चढुनि मारुति वीर साच ! ॥
तें जाय वालिसुतही वरतीं चढून । लीलेंचि तो समरवीर अतीव तूर्ण ॥१८॥
ते क्रुद्ध युद्धपटु वैरि-विरुद्ध दोन । रामप्रताप हृदयामधिं संस्मरून ।
धावोनिया चढति रावण-सद्म-माथां । द्वाहीहि गर्जति रघूत्तम-कीर्ति-सत्ता
तें सद्म त्यांहिं कळसासह भग्न केलें । पाहोनि रावणमनीं भय निर्मियेलें ! ॥
नारीसमूह उर ताडुनि बोलताती 'उत्पातकारि कपि हे अजि दोन येती !'

चेष्टा करीत कपि त्यां भिववीति दोनी। श्रीरामचंद्रयश उत्तम गाति गानीं॥
ते स्तंभ कांचनि करीं उपटोनि घेती।सर्वत्र हाणुनि विनाश तयें करीती! २१
गर्जोनि ते प्रविशले रिपुसैनिकांत । मर्दीति त्यासि भुजशक्तिवलें नितान्त ॥
लत्ता कुणास वितरीति कुणां चपाटे। 'घ्या रामवैरफल हें तुम्हि हो! करंटे!'
एका एका राक्षसां मर्दुनी ते । त्यान्च्या शीर्षां कापिती क्रुद्धचित्तें ॥
फेकोनी त्यां रावणापास देती । भग्नें होती कीं दहींहंडिशीं तीं! ॥२३॥
जे मुख्य मुख्य रजनीचर कीं विशेष । त्यांतें धरूनि पदिं फेकिति रामपास
सांगे बिभीषण तिथें अभिधान त्यांचें। दे राम त्यास निजधाम अनंत साचें!
जे मानवाद खल जे द्विजमासभक्षी।पावे तयाहि गति जी मनिं योगि कांक्षी
मानी उमे! मृदुमना करुणाब्धि राम।'वैरेंहि राक्षस मला स्मरतो निकाम'
दे त्या अनुत्तम गतां प्रभु जाणुनी हें।ऐसा कृपाळु गिरिजे! जगिं कोण आहे?
भ्रांति त्यजूनि विमुखा भजती न जे कीं । दुर्भागि ते परममंद मनुष्यलोकीं
' दुर्गी प्रविष्ट जणुं अंगद मारुतीही '। श्रीरामचंद्र म्हणती वच तर्कवाही॥
लंकेंत दोन कपि ते सजतात कैसे ?। मंथीति सिंधुजल मंदर दोन जैसे !॥२७॥
भुजबलें अरिसैन्य विमर्दुनी । वधुनि ये दिन जाउनि, यामिनी ।
उभय ते विगतश्रम राघवा । जवळि येउनि वंदिति सोत्सवा ॥२८॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकाडे राक्षसवानरयुद्धवर्णनं नाम दशमस्तरङ्गः ॥

—:o:—

## तरंग ११ वा

माया तयीं लवविला प्रभुपादपद्मीं । श्रीरामचित्त विहरे अतिसौख्यसद्मीं ॥
पाहे कृपानिधि तया युगला सुवीरा । सौख्यासि सेविति गतश्रम ते अपारा॥
पाहोनि अंगद, मरुत्सुत दोहि गेले। ते ऋक्ष वानरहि वीर तसे निघाले ॥
संध्याप्रदोषबल पाहुनि राक्षसांनीं । हाही पुकारली दशाननकीर्तिगानीं ॥२॥
पाहोनि राक्षसचमू फिरले कपीही ।_चावोनि दात रुटती अति शौर्यवाही॥
दोहीं वलें प्रबल, वीरहि एकमेकां । आह्वान देति लढती न धरून शंका ॥

ते कृष्णवर्ण रजनीचर वीर घोर । वर्णें अनेक परि वानरवीर शूर ॥
योद्धे समानबल दोंहि दलांतले जे । क्रोधें भरून लढती अतिशौर्यतेजें ॥ ४ ॥

प्रावृड्घनावलिसि शारदमेघराशि । जाणों लढे, पवन लोटि जवें जयांशी!
संग्राम भीषण महान् घनघोर ऐसा । ज्याचें यथार्थ करि वर्णन कोण कैसा!
देखे अकंपन तसें अनिपातिकाय । म्याली असे निजचमू नच राहि धैर्य।
माया सृजीति निमिषीं तम त्यांहि केलें । रक्तोपलांसहित भस्मचि वर्षियेलें !
दाही दिशां तिमिर दाट भरोनि येतां। कोणास कोण न कळे कपिंना समस्तां
नालोचतां कुणि कुणां करिती मुखांनीं। आवाज घोर रचि ते किति आरडोनी!

मायादि मर्म कळताक्षणिं राघवातें । घे बोलवोनि क्षणिं सांगद मारुतीतें ॥
त्यातें निवेदित रघूत्तम सर्व वृत्त । जें आयकोनि कपिसत्तम रुष्ट होत ॥ ८
तेव्हां कृपानिधि रघूत्तम चाप जोडी । अग्न्यस्त्र सायकवरा अति तूर्ण सोडी
होतां प्रकाश क्षणिं, ना तम राहि कोठें। ज्ञानोदयें तुरत संशय, हें न खोटें!
ते ऋक्ष वानर तदा मिळतां प्रकाश। त्रास–श्रमा चुकविती हृदिं घेति हर्ष॥
हो गर्जना इतुकिं अंगद–मारुतींची । गेले पळोनि रजनीचर ते त्वरेंचि॥१०

त्यां धांवतां धरणिं पाडिति ते धरोनी । अत्यद्भुता करणि दाखविली करोनी॥
ते राक्षसां भिरकवीति समुद्रिं लीलें। नक्रादिमत्स्यगणिं त्यां क्षणिं गट्ट केलें!॥

मारीयले किति, तोडियले कितीक । गेले गडीं पळुनि राक्षस ते अनेक॥
सैना अशी करुनि राक्षस–सैनिकांत । ते ऋक्ष वानर रणांगणिं गर्जतात ॥१२
जाणोन रात्र अजुनी, कपिसैन्यभाग । चारीहि ते परतले प्रभुतें शुभांग॥
श्रीराम त्यां करुणदृष्टि विलोकताच । अक्लेशचित्त कपि सर्वहि होति साच!॥

इकडे दशाननानें सचिवां अपुल्या निमंत्रुनी सकलां ।
केला विचार समरीं, अपुला सैनिकविभाग किति टिकला ॥ १४ ॥
सांगे रावण सचिवां, "सैन्यार्धा मर्दिलें कपींनीं कीं!।
आतां वेगें सांगा काय करावें अम्हीं कशानीकीं?!" ॥ १५ ॥

तैं माल्यवंत नामक मातामह रावणास नात्यानें ।
अतिवृद्ध मंत्रिनायक राक्षस जो, कथियलें तदा त्यानें ॥ १६ ॥
त्याच्या उक्ति पवित्रा, मुनीविपथ दाविल्या परम हितदा ।
" ताता! ऐक मदीया उपदेशालागिं, तूं वहा न मदा ॥ १७ ॥

सीतेतें तूं जेव्हांपासुनि आणीयलेसि रे। हरुनी।
तेव्हांपासुनि होती, अशकुन जे वर्णुं काय मी किरुनी? ॥ १८ ॥
वेदपुराणें ज्याचीं गाति यशें आवडीं अमृतमधुरें।
त्या श्रीरामप्रभुला विमुखपणा धरुनि वोग हो सुखि रे!?॥ १९ ॥

जेणें हिरण्याक्ष सबंधु मारिला। विनाशियेलें मधुकैटभां खला॥
तो हा कृपाब्धी अवतीर्ण होउनी। आला असे कीं भगवान् बुधाग्रणी॥
जो कालरूप खलकानन दाहणारा। जो सद्गुणायतन, बोधजलास थारा॥
त्यातें महेश्वर विरिंचिहि सेवितात। त्याशीं विरोध करुनी हित केंविं, तात!?
दे वैदेही त्यासि, टाकूनि वैर। सेवावा तूं तो कृपाळू उदार" ॥
ऐसे त्याचे शब्द बाणासमान। लागोनी तो बोलला क्रोधपूर्ण ॥ २२ ॥
"हे दुर्भगा! वदन कां करिसी न काळें?। आहेस वृद्ध म्हणुनी तुज ना वधीलें॥
तूं जा इथून मम दृष्टिपथींहि ये न"। ऐसें तया दशमुखें छळिलें वदोन॥२३
तैं माल्यवंत हृदयीं करि हा विचार। यातें वधू वधत राम दयासमुद्र॥
तेव्हां तयास हृष्टून शिव्या अनंत। गेलाच तो निघुनि तत्क्षणि माल्यवंत
तों मेघनाद अतिरोषभरें वदे हें-। "उद्यां प्रभाति मम कौतुक तात! पाहें॥
बोलेन मी किति? करूनचि दाखवीन"। ऐकोन विश्वसत त्यावरि तात पूर्ण २५
प्रेमें तयास निज अंकिं दशास्य घेत। ऐशा विचारिं उजडूनि घडे प्रभात॥
तों वेढिती कपि सुदुर्गम दुर्गसारा। कोलाहलें भरलि ती नगरी अपारा॥२६

घेऊनि विविधें शस्त्रें किती राक्षस धावती!।
शिखरें पर्वतांचीं ते फेंकिती खालतीं किती!॥ २७ ॥
कोट्यवधी गिरि शिखरें लोटिलि, गोळे सुटले कितीतरी॥
प्रलयकालच्या मेघा ऐसे गर्जुनि अशनिच पडे वरी।
विकट वीर ते मर्कट लढती एकवटोनी जर्जर ही॥
शैल घेउनी चढति गडावरि, राक्षस वधिले किति त्याहीं!॥२८॥

जैं मेघनाद परिसे गड वानरांनीं। वेढीयला स्वकटकाहि चहूंकडोनी॥
दुर्गावरूनि उतरे तळिं मेघनाद। शत्रूवरी चलत, वाजत वाद्यवृंद ॥२९॥
"ते बंधु युगवर कोसलनाथ कोठें?। त्रैलोक्यविश्रुत धनुर्धर वीर मोठे?॥
सुग्रीव नील, नळ, ते द्विविदादि कोठें?। तो श्रेष्ठ अंगद कुठें हनुमंत भेटे? ३०

विद्रोहि बंधुसि विभीषण तो कुठें हो? । दुष्टास निश्चयिं वधोनाचें आज मी हो!"
बोलून यापरि शरासनिं उग्र बाण । जोडूनि ओढि अतिरोषिं नितान्त ताण ॥
संक्रुद्ध तो शरसमूह असंख्य सोडी । कीं पक्षयुक्त अहि धावति ते धडाडी!॥
सर्वत्र भूवरि कपी पडले विदीर्ण । त्याचेपुढें टिकत त्यासमयीं न कोण ॥ ३२ ॥
जाती पळून कपि ऋक्ष रण त्यजून । इच्छाच युद्ध करण्या लवही उरे न! ॥
क्षोणी रणीं न दिसला कवि ऋक्ष ऐसा । ज्या कीं लढूं आदि उरे लवमात्र आशा!
तें मेघनाद कपिवीरगणां रणात । पाडीत मारुनि दहा शर तीव्रघात ॥
गर्जेहि धीर बलवीर अतीव नादें । जो सिंहनाद रिपुदन्तिमना भया दे ॥३४॥
तेव्हा बघे पवननंदन सैन्य भीत । तो धावला जणुं करालचि काल मूर्त ! ॥
घेई त्वरें उपटुनी करिं थोर शैल । तो मेघनादिं क्षणिं फेकित कोपशील॥३५॥
येत्या गिरीस बघुनी, नभि तो उडाला । टाकूनि अश्व-रथ-सारथि त्या स्थलाला!
आह्वान देत जरि मारुति त्या किरीटा । ना येत तो निकट,जाणुनि मर्मबोधा॥
रामापुढें मग सरे घननाद युद्धा । नानाप्रकारिं करि तो प्रभुरामनिंदा ॥
शस्त्रास्त्रसंहति रघूत्तमिं सोडि सारी । श्रीराम कौतुकिंच तोडुनि ती निवारी ॥
रामप्रताप बघुनी चिडलाच मूढ । मायाप्रयोग करु पाहत तो निगूढ ॥
जैसा कुणी गरुडसंगतिं खेळुं पाहे । दावूनि साप लघुसा तशि गोष्ट कीं हे ! ॥

प्रबला मायाशक्तिस ज्याच्या वश शिवविरिंचि लघुथोर ॥
त्या हा निशिचर दावी निजमाया मंदबुद्धि कुविचार ॥३९॥

आकाशिं तो चढुनि वर्षित अग्निराशि । क्षोणींतुनी प्रकटवी जल धारवर्षी ॥
नानाप्रकारिंहि पिशाच्च-पिशाचनींना । 'मारा पिटा!' म्हणुनि नाचवि घोरवर्णां
विष्ठास्थि-केश-रुधिरासि सपूय वर्षी । कोठें कुठें पृथु शिलाहि तशा विनाशी ॥
वर्षोनि धूळि करि तो तिमिरा अशा कीं! हातासही पसरिल्या नच कोणि देखी ॥
माया-प्रकार बघुनी कपि होति भीत । आन्यासि तें गमत कीं क्षणिं मृत्यु येत ! ॥
ते कौतुकें परि बघे स्मितयुक्त राम । सारे कपी सभय होत रणीं निकाम ! ॥४२॥
तो एक बाण परि सोडुनि नाशि माया । जैसा रवी क्षणिंच त्यावि तमा निमाया॥
श्रीराम पाहि कपि ऋक्षगणां दयेनें । होती बलिष्ठ न रुचे परतूनि येणें! ॥४३॥
आज्ञा तशी मिळवि ची रघुराय देत । ते अंगदादि कपिवीरहि सर्व घेत ॥
संक्रुद्ध लक्ष्मण निघे सरसावुनीयां । हातात सायकशरासन घेत साह्या ॥४४॥

आरक्त नेत्र, उर, बाहु विशालशोभी। शैलेंद्रकान्तिसम ती तनु नेत्रलोभी ॥
किंचित् सुरक्त सुषमा वरि शोभणारी। कीं धीर वीररस लक्ष्मण तो शरीरी!॥४५
तैं वीर पाठवि दशाननही अनेक। शस्त्रास्त्रधारि सरसावति ते अशंक ॥
अद्री नखें विटप घेउनि आयुधाली। श्रीरामघोषि कपिवीरचमूहि आली॥४६॥
ते जोडिजोडिं भिडले सगळेहि योध। इच्छा जयीं उभयिंही अतुला अमंद!
चावीति हाणिति रिपूंप्रति मुष्टि लाथा। ऐसे कपी विजयि ताडिति त्यां समस्तां॥
"मारा! धरा! अजि धरा! सकलांस मारा!॥तोडा शिरा! कर धरा! उपटा चरारा!"
ऐशा रवीं भरुनि राहिलि भूमि सारी। रुंडें प्रचण्ड समरांगणि नर्तणारीं! ॥
तें युद्धकौतुक नभांतुनि पाहतात। सारे विमानिं बसुनी सुरवृंद तेथ ॥
साश्चर्य युद्ध बघता कधिं ते उदासी। दखोनियां कपिजया कधिं वा प्रहर्षी ॥
रुधिरें भरती गर्त त्यावरी धूळ साटली ॥
अंगारराशि कीं छन्ना प्रेतधूमेंचि दाटली ! ॥ ५० ॥
घायाळ वीर रणिं शोभति रक्त कैसे?। कीं ते पलाशतरु पुष्पसुशोभि जैसे!॥
ते दोन वीरवर लक्ष्मण मेघनाद। जे एकमेक लढती हृदिं वैरबद्ध ॥५१॥
कोणासि कोण नच ते रणिं जाति हारी। मायावि युद्ध करि राक्षस नीतिवैरी॥
संक्रुद्ध होत हृदिं फारचि तैं अनंत। मोडी ससारथिरथा अरिच्या क्षणात ! ॥
क्षणीं अनंतपरि त्याप्रति तेथ शेष। होई निशाचर तयें जणुं जीवशेष ! ॥
तेव्हां विचार करि रावणपुत्र ऐसा। घेणार जीव अजि संकटिं मार्ग कैसा ?
तो वीर घातकरि सोडित शक्ति त्यासी। जी लक्ष्मणोरिं घडके द्युतिपूर्ण राशि
शक्तिप्रहार करि मूर्च्छित लक्ष्मणाला। ये मेघनाद मग त्या, गतभीति झाला।
तैं मेघनादसम कोटि सुवीर तेथें। ते लागती उचलण्यास्तव लक्ष्मणातें ॥
आधार सर्व जगतां प्रति जो अनंत।तो त्यास केविं उचले! मग घेति खेत!५५
॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे 'सुश्लोकमानसे' सकलकालिकलुपविध्वंसने लंकाकाण्डे मेघनादशक्तितो लक्ष्मणमूर्च्छागमनंवर्णनं नामैकादशस्तरङ्गः ॥



## तरंग १२ वा

यत्क्रोधवह्नि गिरिजे! करणार दग्ध। चौदाहि विश्वभुवनें नच ज्यास बंध
सेवीति ज्या सुरनरादि चराचरादि। त्या जिंकणार तरि कोण रणात युद्धीं ?

रामप्रभाव परि चिंतुनि तो विचारें। वंदी पदाब्जि भरता अति भक्तिभारें॥
बोलेहि अंजलि जुडूनि "तव प्रताप। चित्तीं धरूनि क्षणिं जाइन मी अपाप!"॥
बोलोनि हें, मिळवुनीहि निदेश तैसा। जाई त्वरें पवननंदन रामहर्षा॥
जातां मनीं करित तो कुतर्के विचार—। 'कैसें अमेय भरतीं बल शील थोर!!
श्रीरामपादकमलीं किति गाढ भक्ति!'। ऐसें प्रशंसि हनुमान् भरता स्वचित्तीं॥
पाहोनि लक्ष्मणदशा इकडे प्रभूही। लीलामनुष्यतनु बोलत या वचाहीं॥३२॥
"ही मध्यरात्र उलटे, कपि कां न येई?"। ऐशा विलापिं अनुजा उरिं राम घेई
बोलेहि "दुःख मम तूं कधिं साहशी न। बंधो! स्वभाविं तव रे! मृदुताच पूर्ण
माझ्या हितास्तवचि टाकुनि मायबापां। तूं सोशिलेंसि विपिनीं हिम, वात-तापां
माझ्यावरील ममता तव ती कुठें गा!। कां आर्त वाक् परिसुनी नच होशि जागा?
मी जाणतों जर वनीं तव हो वियोग। मी मानितों न पितृवाक्यहि तें अमोघ!
स्त्री, पुत्र, वित्त, परिवार, गृहादि सारें। होतीहि जातिहि जगीं बहु वेळ हे रे!
ऐसा विचार करुनी तरि ऊठ बाळ!। बंधू न सोदर जगीं तुजसा मिळेल!॥
पंखाविना खग जसा अति होय दीन। जैसा फणी मणिविना गज हस्तहीन।३६
बंधो! तुझ्याविण तसा मम होय जीव! ठेवील कीं जर जिवंत मला कुदैव॥
कोण्या मुखें स्वनगराप्रति म्यां रिघावें?। स्त्रीसाठिं बंधुसिच मी जर हारवावें!
लोकीं अकीर्ति सहणें बरवें गमे तें। स्त्रीहानिची क्षिति न तेवढि मन्मनातें!॥
आतां अकीर्तिसह हा तव तात! शोक। साहेल कीं मदुर निष्ठुर कीं विलोक
आधार आत्मजननीस कुमार एक। तो तूं तिनें मज दिलास करें सुरेख॥
जाणोनि मी सुखद होइन त्या मुखींतीं। जाऊनि मी समजवूं जननी कशी ती?!
तूं सांग कीं झगि उठोनि मला सुबंधो!। हे लाडक्या! जिवलगा गुणरत्नसिंधो!"
ऐशा प्रकारि करि शोक वियोककारी। राजीवनेत्र विभुचे सृजितात वारि॥ ४०
ऐसा उभे! रचित ईश्वर जो अखंड। भक्तीं कृपाळु नरवृत्त करीं उदंड!॥
ऐकोनियां श्रवणिं तो प्रभुचा विलाप। झाले मनीं विकल सर्व कपी उमाप॥४१
तों त्यात पोंहचत येउनि वायुसूनु। कारुण्यपूर्ण रचि तो रस 'वीर' मानूं!॥
श्रीराम मारुतिसि भेटत हर्षराशि। सुश्र प्रभू अति कृतज्ञ धरी उराशीं!! ४२

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकांडे हनुमदौषधानयनवर्णनं नाम द्वादशस्तरङ्गः॥

—:०:—

## तरंग १३ वा

केला उपाय अति सत्वर वैद्यरावें । वैसे उठून झणि लक्ष्मण, हर्ष पावे ॥
भ्रात्यासि भेटत विभू कवळूनि वक्षीं । तैं ऋक्षवानरचमूहि भरे प्रहर्षी ! ॥१॥
वैद्यासि पोंचवित मारुति तेवि तेथ । जेथूनि घेउनि तयाप्रति जेवि येत ॥
वृत्तांत हा दशमुखा कळताच सारा । दुःखें शिरें बडवि तो बहुत प्रकारां २
ये व्याकुलत्व धरुनी मग कुंभकर्णा । जागे तया करित तो विविधप्रयत्नां ॥
जागा निशाचर दिसे नयनास कैसा ? । कीं काल मूर्त बसला तनुधारि जैसा!
बंधूसि तैं पुसत यापरि कुंभकर्ण । "कां कांति रे तव मुखीं दिसते विलीन ?"॥
त्यातें मदान्ध दशकंठ निवेदि सारें ! सीतेसि आणिलि हरून कशा प्रकारें॥४॥
"मारीयले सकळ राक्षस या ! कपींनीं । ते धीर वीर मम योध नुरेचि कोणी ॥
ते देवशत्रु नरभक्षक दुर्मुखादि । तैसे सुवीर अतिकाय, अकंपनादि ॥५॥
जे अन्य वीरहि महोदर मुख्य शूर । संहारिले समरधीर रणीं समग्र " ॥
ऐकोनि रावणवचा अति दुःखपूर्ण । बोले यथार्थवच यापरि कुंभकर्ण ॥६॥
"आणूनिया हरुनि ती जगदंबिका रे । कल्याण काशिसि शठा ! कवण्या प्रकारें ?
ना तूं निशाचरपते ! भलि गोष्ट केली । आतां मला उठविशी, नुठवूनि वेळीं ।७
ताता ! अजून तरि तूं अभिमान टाक । श्रीराम तो भज, घडेल नुरेल देख !॥
हे रावणा ! मनुज कीं रघुनाथ होय । ज्या दास मारुतिसमान असे अमेय ८
केली तुवां अहह ! केवढि चूक ही रे !। आलास ना कळविण्या मज आधिं सारें
ज्याचे विरिंचि-हरसे सुर दास सर्व । त्या तूं प्रभूसि करितोसि विरोधभाव ९
श्रीनारदें मुनिवरें कथिलें मला तें । तें सांगतों तुजहि, वेळ परी न मातें !! ॥
आतां मदंगभरिं भेटचि गाढ ताता ! । जाऊनि मी सुफल नेत्र करीन आतां !१०
तो श्यामलांग सरसीरुहलोचनांचा । तापत्रयातुनि विमोचन पाहुं साचा !" ॥
त्या रामरूपगुण आठवुनी मनांत । तल्लीन तो क्षणभरीं अतिमात्र होत! ॥११॥
तों त्याजसाठिं दशकंधर मागवीत । रेडे अनेक, मदिरा-घटकोटियुक्त ॥
खाऊनियां महिष तो कृतमद्यपान । तो वज्रपातसम गर्जत कुंभकर्ण ! ॥१२॥
ऐसा मदांध रणधुंद, न संगिं कोण । दुर्ग त्यजून निघला रणिं कुंभकर्ण ॥
भेटे बिभीषण तयापुढतीं सरून । सांगे नमून पदिं त्या निजनाम पूर्ण ॥१३॥

लीलेसि या जगतिं जाणिल तोच लीलें। श्रीराम ज्यावरि कृपा करि शैल-वालें!
होतां निशा फिरलिं दोंहि दळें स्वठाया। सैन्यस्थिती दल-पती सरले वधाया
जो व्यापक प्रभु अजिंक्य, जगत्त्रयेश। तो तैं पुसे 'करि न लक्ष्मण कां प्रवेश?'
ये वायुनंदन तयाप्रति घेउनी तो। त्या पाहतां प्रभु दयानिधि आर्त होतो!
तैं जांबुवंत कथि 'वैद्य सुषेणनामा। लंकेमधें वसत बोलवुं त्यासि रामा!'
तैं मारुती धरुनि रूप लघूत्व जाया। त्या आणिता त्वरित गेहसमेत होय! ४
येतां सुषेण नमि राघवपादपद्मा। शीर्षासि वांकवुनि सांगित सौख्यधामा॥
कीं कोणता गिरि, जयावरि औषधी ती। 'जा मारुते! त्वरित घेउन ये स्वहस्तीं!'
श्रीरामचंद्रचरणांबुज राखि चित्तीं। चाले प्रभंजनसुत स्वबलाहि चिंती॥
हें रावणा कळवि सर्वहि वृत्त दूत। ये कालनेमिगृहिं रावण दुष्ट हेत॥६॥
सांगे दशानन तयाप्रति मर्म सारें। तैं कालनेमि शिर हालवि कीं, 'वृथा रे!
जो कीं समक्षचि तुझ्या नगरीस जाळी। मार्गी तया अडवि कोण बलीं विशाली
श्रीराघवा भजुनि तूं हित घे करून। नाथा! त्यजून कटुवाद फुका अजाण
इंदीवरामतनु सुंदर नीलकांति। नेत्राभिरान निज वागवि तूं हृदंतीं ॥८॥
टाकून गर्व ममतादि अहंकृतीला। घ्या घोर मोहरजनींतुनि जागृतीला॥
भक्षीत जो सहजि कालकरालसर्पा। स्वप्नींहि त्यास परि जिंकिल कोण बापा!"
ऐकोनि रुष्ट अति रावण तो बघोनी। हा कालनेमि हृदयांत विचार आणी
कीं रामदूतकरिं मृत्यु बरा अतीव। पापात्म हा खल दशानन दुष्टभाव १०
चिंतूनि हें निघत तो, रचि मार्गि माया। उद्यान मंदिर सरस्तटिं निर्मि ठाया.
तैं मारुती बघुनि आश्रम चारु मानी। देखूं मुनी, जल पिऊं श्रम घालवोनी
राहे तिथें कपटवेषिच कालनेमी। मायेशदूत मन मोहवुं पाहि धामीं॥
जाऊन मारुति तया नमवीत माथा। लागे कथूं मुनि रघूत्तमकीर्तिगाथा १२
'हें हो महत्तमचि रावण-राम-युद्ध। जिंकील राघव खरोखर कीर्तिशुद्ध॥
मी येथुनीच बघतों रण सर्व तात। हो ज्ञानदृष्टिबल सिद्ध मला समस्त'१३
तैं मागता जल कमंडलु दे मुनी तो। सांगे कपी 'लव जलें नच तोष होतो'
बोले मुनी "सरिं निमज्जन ये करून। ज्ञानोपदेश तुज मी विधिनें करीन!"
जाई सरी, तव पदा मकरी धरीत। होऊनि आकुल कपी तिजला वधीत॥
ती जाय दिव्य तनु घेउनि देवलोका। बोले कपीस "अजि मी सरि निष्कलंका

त्वद्दर्शनें शमत रे। मुनिवर्य-शाप। तूं जाण हा मुनि न, राक्षस घोर पाप !" ॥
ती अप्सरा वदुनि हें वच दूर जाय। ये राक्षसाजवळ मारुति तो अमेय ॥१६
सांगे कपी 'प्रथम घ्या गुरुदक्षिणा ही। द्या मागुनी मज मुने। गुरुमंत्र तोही!'
लांगूल तच्छिरिं लपेटुनि आपटीत। तें मृत्युकालि ततुतें प्रकटी यथार्थ। ॥१७
तो 'राम राम' म्हणुनी असुतें त्यजीत। ऐकोनि तुष्ट मनि मारुति तूर्ण जात ॥
तो शैलि येत परि औषधि नोळखेचि। तें पर्वता उपटुनी करिं घे सुखेंचि।

पर्वता घेउनी रात्रीं नभीं मारुति धावतां।
अयोध्यानगरीच्या तो वरतीं ये नभःपथा ॥ १९ ॥

देखोनियां नभिं विशाल अशा तयासी। चिंतीतसे भरत ' राक्षस तो प्रवासी' ॥
तैं त्यावरी नभिं फळाविण सोडि बाण। आकर्ण ओढुन धरूनहि नेम पूर्ण॥२०
तो लागतां शर विमूर्च्छित वायुपुत्र। खालीं पडे स्मरत 'राघव'नाम मात्र ॥
ऐकोनि त्या प्रियवचा भरतें उठोनी। धावोनि आतुर अती कपिसंनिधानीं
त्या व्याकुळा कपिसि लावित तो उराशीं। त्या शुद्धि आणुं बघि तो बहुत प्रयासीं
आगा न होत कपि तैं भरतें सशोकें। बोलीयलें वचन लोचनिं अश्रुसेकें ॥२२॥
"जो कीं विधी मजसि रामवियोगिं लोटी। लोटीत तोचि मज याहि सुतीव्र कष्टीं
वाक्कायचित्तिं जर मद्रति रामपायीं। पुण्या खरोखर असेल जरी अमायी॥
होवोचि हा कपि गतश्रमशूल तूर्ण। श्रीराम हो जर मला अनुकूल पूर्ण।" ॥
तैं ऐकतां उठुनियां बसला कपीश। बोलोनि 'राम जय। राघव। कोसलेश।' २४
घेऊनि मारुतिसि गाढ धरी उराशीं। रोमांचकाय नयनांबुजि बिंदु वर्षी ॥
प्रीती न माय हृदयीं भरताचिया ती। श्रीरामचंद्रविमुखा स्मरुनी स्वचित्तीं २५
त्याला पुसे 'कुशल कीं सुखधाम रामा। भ्रात्यासवें जनकजेसिहि, माय आम्हा?'
तैं थोडक्यांत कथि मारुति सर्ववृत्त। दुःखी तयें भरत हो अनुतापयुक्त ॥२६
उद्गारि तो "अहह! मी किति हा करंटा!। झालों कशास जगतीतलिं रामकंटा?
एकाहि कार्यिं घडली प्रभुची न सेवा। हा व्यर्थ जन्म मम काय दिलास देवा!"
जाणोनि वेळ कठिना, मनिं धीर घेई। बोले पुन्हां भरत वीर कपीसि हेंही॥
"ताता! विलंब तुज होइल जावयातें। नासेल काज जर पोंचशि तूं प्रभातें२८
शैलासमेत मम सायकिं तूं चढावें। धाडीन जेथ विभु कारुणिक स्वभावें" ॥
ऐकोनि तें म्हणत मारुति साभिमान। 'माझ्या भरें कुढुनि जाउं शकेल बाण?'

बंधूसि तो उठवुनी ह्रदयीं धरीत । संतुष्ट होत ह्रदिं जाणुनि रामभक्त ॥
सांगे बिभीषण "हितप्रद रावणासी । मी बोलतां मजसि हाणित लाथ शिर्षी!॥
दुःखेंचि त्या, रघुवराश्रय मीच घेई । दीनावरी प्रभु कृपाळुच नित्य होई"॥
तैं कुंभकर्ण कथि "रावण नायकील । तो होय कालवश, त्या उपदेश फोल! ॥

तूं धन्य निश्चित बिभीषण! धन्य धन्य। तूं तात! राक्षसकुलासि ललाम, नान्य॥
उद्धारिलास निजवंश तुवां सख्यारे!। सौंदर्यसौख्यनिधितें भजसी विचारें ॥
टाकूनियां कपट वाक्तनु-चित्त यांनीं। तूं रामरायचरणां भज सर्वमानी ॥
जा तूं दुरीं मज कळे न पर स्वकीय। मीही असें रिघत कालमुखीं अवार्य!" ॥
बंधूक्त ऐकुनि बिभीषण येत मागें। त्रैलोक्यभूषण रघूत्तमपादिं लागे ॥
सांगे "विभो! गिरिसमानशरीर वीर। ये कुंभकर्ण इकडे रणरंगधीर" ॥१८॥

तें सांगतां परिसती कपि जों स्वकर्णीं। ते त्यावरी रिघति धावत गर्जनांनीं॥
घेती करीं उचलुनी गिरि वृक्ष तैसे। फेकीति त्यावरति चावुनि दांत रोषें॥१९॥
त्यावें प्रहार करिती गिरिशृंगकोटी। एकाच वेळि कपि ऋक्ष असंख्यदाटी ॥
ना तो ढुजे, हटविला तरि तो हटे न। मारोनि अर्कफळि कुंजर हो नें खिन्न!॥
मुष्टिप्रहार तंव मारुति त्या करीत। जेणें पडे धरणिं तत्क्षणिं वेदनार्त! ॥
ताडीत मारुतिसि तो फिरुनी उठोनी। तो खालती पडत मारुति वेदनांनीं ॥
पाडीत तो क्षितितळीं नलनील यांना। जेथें तिथें क्षितिसि लोळति वीर नाना॥
झाले बळीहि कपिवीर तशा प्रहारीं। माघारि येति कपि ऋक्ष अशा प्रकारीं॥

तो अंगदादी कपिंना विमूर्च्छित। करुनि सुग्रीवहि त्यापरि रियत ॥
घेऊनि काखें कपिराजया चाले। अमेय सामर्थ्य तयांत संचलें। ॥२३॥

लीला अशा करि उमे! नरतुल्य राम। जैशा करी गरुड सर्पगणीं निकाम॥
जो आपुल्या भृकुटिभंगिंहि नाशि काल। शोभावि त्याप्रति अशी कशि युद्धलीला
विस्तारि विश्वविभु पावन आत्मकीर्ति। जी गाउनी नर तरुन भवाब्धि जाती॥
मूर्च्छा सरोनि हनुमान् रणिं होय जागा। कोठें सुकंठ? म्हणुनी बहु शोधि जागा॥
मूर्च्छा सरोनि सुगला, जंव जाग आली!। तो मारवूनि मृतवा निसटेहि खाली॥
तो नासिका श्रवण काढुनि टाकि दंतीं। गर्जे नभीं म्हणुनि त्या कळली कथा ती!॥
त्या कुंभकर्ण धरुनी पदिं, पाडि भूसी। सुग्रीव तैं झणिं उठे, चपलाइ ऐसी!॥
ये तो प्रभूजवळ तूर्ण बलाढ्य वीर। गर्जे 'कृपाळु जय हे जयवीर धीर' ॥२७॥

त्या तोडिले जंव कळे निज नाक कान। होई विषण्ण पळ, हो अति रोषि मग्न ॥
ये तो फिरून लढण्या; श्रुतिनासहीना। पाहून भीति भरली सकलां कपींना! ॥

'जय जय जय जय रामा रघुकुलरत्ना!' म्हणूनि कपि सारे! ॥
धांवति त्यावरि गर्जुनि ताडुनियां शैलपादपाधारें! ॥ २९ ॥

तैं कुंभकर्ण रणरंगि चले अरींतें। कीं क्रुद्ध कालचि असे गमलें मनातें ॥
तो कोटि कोटि कपिंलागि धरूनि खात। कीं टोळ ते शिरति पर्वतकंदरांत! ३०
नासा मुख श्रवण या फिरुनी त्रिमार्गीं। जाती पळूनि कपि ऋक्ष असंख्य संघीं॥
तो युद्धदर्प मदमस्त निशाचरांचा। विश्वासही ग्रसिलसा गमलाच साचा! ॥
कोणीहि वीर नच त्या टिकती रणांत। त्यां रेटले तरिहि दाखविती च पाठ ॥
अंघेरि येइ सुभटां नच ऐकवेही। ऐशी स्थिती कपिसमूहचमूत होई! ॥३२॥

देखोनि कुंभकर्णाचें कपिसैन्यविमर्दन ॥
राक्षसाच्या नव्या सेना येति आणखि धावुन! ॥ ३३ ॥
पाहे राम स्वसैन्याची स्थिति ती विकला अति ॥
पथकेंहि नवीं आलीं राक्षसांचीं तयांत तीं ॥ ३४ ॥
राजीवलोचन वदे "ऐका सुग्रीव! लक्ष्मण! ॥
हे बिभीषण! रक्षा हो तुम्ही आपापले जन ॥ ३५ ॥
मीच जाऊन बघतों दुष्टसैन्यगणांप्रति!" ॥
चाप-पाणि असे राम, मातें कटिस साजती ॥ ३६ ॥
शत्रुसैन्यविनाशार्थ असे राघव चालले ॥
टणत्कारेंचि करित आर्षी बधिर तीं दलें! ॥ ३७ ॥
सोडी लक्षावधी बाण सत्यवाक् रघुनायक ॥
सपक्ष जणुं ते जाती कालसर्पचि सायक! ॥ ३८ ॥
जिकडे तिकडे जाती अनंत प्रभुबाणही ॥
पडती मृत होवोनी विद्ध राक्षसही महीं ॥ ३९ ॥
कोणाचे तुटले पाय, शीर्ष, वक्ष, भुजादिक ॥
कित्येकांच्या शरीरांचे खंड होती शताधिक! ॥ ४० ॥
कित्येक पडले वीर घायाळ होउनी क्षितीं ॥
उठोनिहि पुन्हां कोणी लढती वीर ते किति! ॥ ४१ ॥

लागतां बाण ते तीक्ष्ण मेघसे किति गर्जती ! ॥
बघूनीच तशा बाणां भागती बहु मागुतीं ! ॥ ४२ ॥
रुंडें प्रचंड वीरांचीं विनामुंडचि धांवुनी ॥
'मारा ! धरा ! धरा !' ऐसे मोठ्यानें कादिती ध्वनी ! ॥४३॥

क्षणांत ऐसें प्रभुसायकांनीं । रणांत ते राक्षस लोळवोनी ॥
श्रीराघवाच्या फिरुनी निषंगीं । प्रवेश केला तधिं लागवेगीं ! ॥ ४४ ॥
जैं कुंभकर्णे मनिं जाणियेलें । क्षणींच कीं राक्षस नष्ट झाले ॥
संक्रुद्ध तो दारुण वीर होई । सिंहापरी गर्जत राहि कांहीं ॥ ४५ ॥
कोपें करीं घे उपटोनि शैला । यकीत जेथें कपिवीरमेळा ॥
येत्या बघोनी प्रभु त्या गिरीसी । शरें तया मेळवि तो धुळीसी ! ॥४६॥
रोषेंचि ओढूनि पुन्हा धनूसी । श्रीराम सोडी बहुबाणराशि ॥
तनूंत त्याच्या शिरुनी पुन्हां ते । श्रीरामभात्यांतचि होति येते ! ॥४७॥

सौदामिनी चमकुनी घनिं होति गुप्त । तैसेच रामशरसंघ निषंगिं होत ! ॥
रक्तप्रवाहिं किति शोभत कुंभकर्ण । कीं गेरुलोटिं जणुं कज्जलशैल पूर्ण ! ॥
तो कुंभकर्ण अति आर्त बघोनि येती । त्याचे समोर कपिऋक्षचमू तदा ती
हांसे तयां बघुनि, गर्जुनि कोटि कोटि । नेऊनि ऋक्षकपि भूतलिं त्यांचि लोटी !
मारी तयांसि गजराजवलोपमान । घे रावणावरुनि तो शपथ प्रमाण ॥
जाती तदा पळुनि ऋक्षकपी अनंत । जैसे वृका बघुनि मेषवरूथ भीत ५०
क्रंदोनि आर्त रविं ऋक्षकपी भिऊनी । जाती पळोनि वदती मुखिं हें, भवानि !
"दुष्काळसाच जणुं राक्षस घोर ये हा। नष्टांश हा कपिकुला करि काय हा ! हा!
श्रीराम हे खररिपो ! करुणासमुद्रा ! तारा अम्हां प्रभुवरा ! प्रणतार्ति वारा " ॥
ती ऐकतां करुणवाक् भगवान् महौजा । घेऊन चाप शर धांवत भक्तकाजा ॥
घालून पाठिसि चमू निज जी भयार्त । येई सरोष रघुनायक तो त्वरेंत ॥
जोडूनि बाणशत कार्मुक खेंचुनीयां । सोडीत जे घुसुनि पीडिति शत्रुकाया ॥५३
ते लागताच शर कोपत कुंभकर्ण । धावे तदा गिरि सकंप धरा हलोन ! ॥
घे तो महान् उपटुनी गिरि एक हातीं । तो राम तोडित समूल शरें भुजा ती ५४
घेऊनि वाम करिं तो गिरि, कुंभकर्ण । धावे तदा करि रघूत्तम तीहि दीर्ण ! ॥
कैसा सजे उभय हस्तहि तोडियेला ! । कीं पक्षहीन जणुं मंदरशैल केला ! ५५

तो उग्रदृष्टि अवलोकत राघवाधी । ग्रासूं बघे जणुं जगत्रितयासि रोषीं ! ॥
चित्कार घोर करुनी पसरूनि तोंड । तो धांवला रघुवरावरती प्रचंड ॥५६॥
तेव्हां नभीं भयभरें सुरसिद्ध सारे । 'हा ! हा !' करीति अति आकुल ते बिचारे ।
भ्याल्या सुरां बघुनि तो करुणानिधान । आकर्ण ओढुनि शरासन सोडि बाण ।
ते बाण राक्षसमुखीं भरती अनन्त । ना तो पडे धरणिसी तरि शक्तिमंत ॥
आला समोर, शरसंघ मुखांत ऐसा । जाणों निषंगचि सजीव कृतान्त जैसा !
कोपें तदा प्रभुवरें अति उग्र बाणें । केले शिराहुन धडाप्रति भिन्न तेणें ॥
तें रावणापुढति शीर्ष पडे उडून । तो आर्त होय, मणिहीन फणीच दीन ॥
धावे प्रचण्ड धड तें, धरणीहि खाचे । तेव्हां दुखंड करि रावण त्या धडाचे ॥
ते अद्रिसे क्षितिवरीं पडती वरून । ज्यांखालिं ऋक्षकपि राक्षस होति चूर्ण ! ।
तत्तेज जाय शिरुनी प्रभुच्या मुखाब्जीं । साश्चर्य देवमुनि पाहति तत्प्रभा जी ॥
हर्षोनि देव नभिं दुंदुभि वाजवीती । वर्षोनि पुष्पतति राघवकीर्ति गाती ॥६१

स्तवोनियां देव निघोनि गेले । देवर्षि तों नारद तेथ आले ॥
नभींहुनी रामगुणौघ गाती । देखोनि ती वीररसात्म मूर्ति ॥ ६२ ॥
प्रसन्नतेनें मुनि हें कथीत । 'वेगें वधा हो ! खळ हे समस्त !' ॥
गेले मुनी वंदुनि राघवातें । रणांगणीं शोभत राम होते ॥ ६३ ॥

राम विराजे संग्रामाजिरिं कोसलेश तो अतुलबली ।
घर्मबिंदु मुखिं कमलनयन तनु अरुण शोणितीं अति नटली ! ॥
भुजयुगिं चाळा चापशरांशी चहुंदिशिं वानर, ऋक्ष उभे ।
तुलसि वदे, नच शकत शेषही गाया प्रभुच्या द्युतिशोभे ! ६४

अधमा अति पापि राक्षसा । प्रभु देई निजधामसौरसा ॥
गिरिजे ! नर मंद ते किती ! । भजती जे न रघूत्तमाप्रति ! ॥६५॥

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकांडे कुम्भकर्णवधवर्णनं नाम त्रयोदशस्तरङ्गः ॥



## तरंग १४ वा

जाती दिनान्ति निघुनी उभयें दळें तीं । सारेच वीर अतिमात्र दमून जाती ॥
वाढेच रामकृपया कपिसैन्यशक्ति । जैसें मिळोनि तृण, वाढत अग्निमूर्ति ॥१॥

यत्नादिनीं खिजत राक्षसशक्ति जाय। जैसें स्वता वधुनि पुष्पहि शून्य होय!
केला विलाप अतिमात्र दशाननानें। तो वधुशोर्यें कवळी हृदिं आर्ततेनें २
आक्रंदिली बडवुनी निजवक्ष नारी। वाखाणुनी अमित तद्बलशक्ति सारी॥
ये तेथ त्या समयिं राक्षस मेघनाद। ताता कथा बहु कथोनि करीत बोध॥३॥
'उद्या मदीय बल शौर्य तुम्हीं पहावें। आताच तें कथुनि क्या किति शाखवावें
जो इष्ट देव मज दे रथ आणि शक्ति। ना दाखवीन अजि तात! तुम्हास मी ती'
ऐसी 'करि बढाई तो, सपली तोंवरी निशा॥
चारी वेशींवरीं आल्या कपिसेना अनन्तशा ॥ ५ ॥
एकीं कृतान्तसम ते कपि–ऋक्ष शूर। दूजे निशाचर रणांगणयुद्धवीर॥
ते व्हावया विजयि, युद्ध करीति घोर। जें वर्णवे न गरुडा! कधिंही समग्र॥६॥
मायामयीं स्वरथिं तें चढि मेघनाद। आकाशिं जाय बहु गर्जत उग्र शब्द॥
जें आयकोनि कपिसैन्य अतीव भीत। शस्त्रास्त्रवृष्टि करि तो वरुनी नितान्त॥७
वर्षी कृपाण तरवारि, सशक्ति शूल। वज्रायुधें, विविध अस्त्रनती विशाल॥
पाषाण, तशिं परशू, परिघादि फेंकी। तो तीक्ष्ण बाणहि तसे अरिच्या अनीकीं ८
झाकोनि जाय नभ दाहि दिशा शरांनीं। कीं मेघमंडल मधें तिल वर्षि पाणी!॥
'मारा! धरा!' श्रवणिं ये ध्वनि हाचि सारा। मारी कुणा कवण जाणत ना प्रकारा!
आकाशिं धावति कपी गिरि वृक्ष पाणि। देखोनि ना अरिसि, येतिहि खिन्न मानीं
सोरहि दुर्ग गिरिकंदर घाट वाटा। मायाबळें शरिं भरे अरि उग्र मोठा! ॥१०॥
सर्वत्र होति कपि आकुल बाणवर्षी। कीं मंदरादि पडले जणु इंद्रवर्षी!॥
तें सर्ववीर बलशालि मरुत्सुतादि। ते वालिसूनु नलनील भयातबुद्धि॥११॥
सुग्रीव, लक्ष्मण, बिभीषण मेघनाद। केले शरार्ततनु जर्जर मायियुद्धें॥
तो राघवासह करी समरप्रसंग। तद्बाण त्या छळिति होउनि उग्रनाग॥१२॥
तो व्यालपाशवश होय खरारि राम। जो की स्वतंत्र अविकारि अनन्तनाम!॥
नाना परी नरसमान चरित्र राम। लीलावतारपटु दाखवि जानकीश!॥१३॥
रणशोभा म्हणोनीया प्रभूही होय बद्धसा॥
पावले भीतितें देव बघोनी तशि तद्दशा! ॥ १४ ॥
यन्नामही जपुनि हो भवपाशनाश। हे वेवसे अनुभवा मुनिमानसाश॥
तो पाशबद्ध तरि होइल कवि गोरी!। श्रीरामचंद्रविभु विश्वनिवासकारी!॥
सगुणचरित्र जें हें राघवाचें नवानि!। अगम्यचि मानवकां कुठले शक्तिवाणी॥
समजुनि मनिं एसें तज्ज्ञ शुद्धा विरक्त। रमवुनि सकल तर्का होति यत्नादि भक्त॥

सान्यांसि मूर्च्छित करी ह्मणिं मेघनाद। होऊनि तो प्रकट देइ शिव्या मदांध ॥
तें जांबुवंत वदला "क्षण थांब चोरा!"। ऐकोनि तें भरत कोप निशाचरोरा॥

"म्हातारा तुज जाणुनी अजि शठा! मीं सोडियेलें तुला।
देशी तूं अधमा! शिव्या परि मला घे तूर्ण रे! तत्फला!" ॥
ऐसें बोलुनि मेघनाद अपुला फेंकी त्रिशूल क्षणीं।
घेई झेलुनि जांबुवंत परि तो हाणीहि त्या घाउनी! ॥ १८ ॥

वक्षीं त्रिशूल बहु लागुनि मेघनाद। तो वीरि येउनि पडे धरणीं सशब्द ॥
त्या जांबुवंत अति रोषभरें धरीत। पायीं, तसे भ्रमवुनी भुइं आदळीत!!
त्या दावुनी बल असें निज जांबुवंतें। लंकेवरी फिरकवूनि दिलें तयातें ॥
होता तयास पहिलाच वरप्रसाद। तो यामुळेंचि न मरे तइं मेघनाद ॥२०॥
देवर्षि नारद मुनी ह्मणि पाठवीत। रामाप्रती गरुड येत तदा क्षणांत ॥
मायास्त्र नाग सगळे खगराय खाय। मायाविमुक्त कपिसैन्य सहर्ष होय!॥
घेऊनि शैल, तरु तेविं शिला नखांना। तें धावली कपिचमू अति रोषपूर्णा
दुर्गांत तें सकळ राक्षस ते चढोनी।गेले पळोनि भिउनी अति दीनवाणी २२
मूर्च्छेतुनी उठत तोंवरि मेघनाद। हो पाहुनी स्वपितया,अति खंत खेद ॥
जाई पुढें त्वरित तो गिरिकंदरांत। चित्तीं जयार्थ, मख एक करूं पहात ॥
तेव्हां बिभीषण विवेकि विभूस बोले।"ऐका उदारतम राघव! चित्तिं आलें-
हा मेघनाद करि यज्ञ अपुण्यकारी।"मायावि देवपरिपीडन दुष्ट भारी॥२४
जाईल तो जर विभो! परिपूर्णतेस। येईल ना विजय युद्धिं तुम्हांस लेश!"
तें आयकोनि रघुनायक सौख्यपूर्ण। तो अंगदप्रभृतिलागिं निमंत्रि तूर्ण ॥
"जा लक्ष्मणासह तुम्ही सगळे कपी हो!।तो मेघनादमख नष्ट तुम्हाकरीं हो!
हे लक्ष्मणा! समरिं तूं वध मेघनाद। देखोनि हे सभय देव मला न मोद!
जेणें समस्त रजनीचर नष्ट होती। ऐसेंचि तूं कर उपाय सुबुद्धिमूर्ति ॥
सुग्रीव आणिक बिभीषण जांबुवंत। राहा तिघेहि तुजिह सज्ज चमूसमेत" ॥२७
आज्ञा तशी मिळविताच रघूत्तमाची। भाते कटीस शरचाप करांत घेचि ॥
चित्तीं स्मरून रघुनाथयशःप्रताप। गंभीर वाग् वदत लक्ष्मण मेघकल्प ॥२८॥
"मी मारल्याविण तया जर यें फिरून। मी रामसेवक असें म्हणवीन हो न!॥
त्या साध्य होय जरि शंभर शंकरांचें। मारीन रामशपथें अजि त्यास साचें!"२९

घदोनि रामपदपङ्कजि नम्रग्रीवं । जाई त्वरेंचि रणि लक्ष्मण मूर्त कोप ॥
त्यासगर्ती निघति अंगद नील वीर । ते मारुती नल मयंद बलें अपार ॥ ३०॥
जाऊनि पाहति कपी, तव त्या दिसे तो । जो रक्तमांसमय आहुति वन्हिं देतो ॥
विध्वसिला सकलही मख तैं कपींनीं । जों तो उठे तवर हासिति त्या मुखाणी॥३१॥
तो ना तरीहि उठता कपि तत्क्षणाही । ओढीति ताडिति करें पदिंही विशेषीं ॥
जातां पळोनि दुरि त्यावर मेघनाद । धावे त्रिशूळ करि घेउनि आर्तशब्द ॥३२
तें लक्ष्मणाजवळ वानरवीर येती । ये मेघनादहि तयावरि कोपमूर्ति ! ॥
हाणी त्रिशूळ अति गर्जत घोरनादें । तैं वायुनंदन सहांगद ये विरोधें ! ॥३३॥
हाणी त्रिशूल उरिं त्याप्रति मेघनाद । त भूमिसी पडति मूर्च्छित नष्टबोध ॥
फेकी त्रिशूल अरि लक्ष्मणिं तो प्रचंड । ज्या तोडि लक्ष्मण शरें करुनी दुखंड ॥
मूर्च्छेतुनी उठुनि मारुति, वालिसूनु । त्व र अरीसि किति ताडिति काय वानूं !
मारीयला तरि मरे न च मेघनाद । ते येति तो परत,-धावत तो सशब्द॥३५॥
येत्या बघोनि कुपिता जणु मूर्त काला । सोडीत लक्ष्मण तया विशिखा कराला ॥
येता बघोनि परि वज्रसमान बाणा । हो मघनाद म्हणि गुप्त दिसे न कोणा ॥३६॥
नाना स्वरूपिं मग तो करि युद्ध ऐसें । केव्हां दिसे प्रकट, लोपत ही त्वरेंसें ॥
म्याले कपी, म्हणुनि शत्रु अजिंक्य ऐसा । व लक्ष्मणा परम कोप हृदीं अहीसा ॥
सौमित्र चिंत 'अरि म्या बहु खेळवीला। आता करूंचि म्हणि अंत अशा खळाला'
चिंतूंनि चित्तिं गुण कोसलनाथकीर्ति । जोडोनि बाण म्हणि सोडित वीरमूर्ति

मेघनादाचिया वक्षीं बाण तो तीक्ष्ण लागत ॥
त्यजोनी सर्वही माया होय तत्क्षणि तो मृत ! ॥ ३९ ॥
'रामानुज कोठें हो ! राम कुठें ?' वदुनि टाकि तो प्राण ॥
'तव धन्य धन्य जननी !' उद्गारिति वालिपुत हनुमान ॥४०॥
उचलूनि तयालागीं लीलया वायुनन्दन ॥
लकाद्वारात ठेवोनी परते कपिभूषण ॥ ४१ ॥

तन्मृत्यू कळताक्षणिं येती गंधर्व, देव गगनांत ॥
आपापल्या विमानीं बैसोनी धन्यवाद देतात ॥ ४२ ॥
सुमनें अनन्त वर्षति दुंदुभिही वाजवीति मोदभरें ॥
विमल श्रीरामयशा गाती सगळे निजस्वरें मधुरें ॥ ४३ ॥

" जगदाधार अनंता ! जयजयकारहि अनन्त तव करितो ॥
देवांस सर्वपरिं तुम्हि तारियले नाथ ! हर्ष मनिं भरतो !! " ॥४४॥
ऐसी स्तुती करोनी जाती सुर सिद्ध आपुल्या स्थाना ॥
लक्ष्मण भेटाया ये करुणेच्या विश्वभूषण निधाना ! ॥ ४५ ॥
सुतवध जंव कानीं पातला रावणासी । अवनिवरि पडे तो जाउनी शुद्धि नाशी
रुदन करित शोकाक्रान्त मन्दोदरीही । निज उरिं बडवोनी घे किती ती कराहीं !
तैसेच सर्वही पौर होती व्याकुल अंतरीं ॥
' अधमा रावणा ! नीचा ! ' निंदिती सर्वतोपरीं ॥ ४७ ॥
सान्या स्त्रियांना समजावि रावण । करीत त्याचें ऋजु शब्दिं सांत्वन ॥
म्हणे ' अहो ! चित्तिं विचार हा करा । सारीच सृष्टी समजा विनश्वरा ! '
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने
लंकाकांडे मेघनादवधवर्णनं नाम चतुर्दशस्तरङ्गः ॥



## तरंग १५ वा

ज्ञानोपदेशा कथि त्यांसि रावण । तत्त्वें भलीं सांगत मंद आपण ॥
परोपदेशीं सगळेच पंडित । जे आचरीती नर ते परी मित ॥ १ ॥
संपोनि रात्र जंव होत असे प्रभात । चारीहि वेशिंवरि ऋक्ष कपीहि येत ॥
तेव्हां दशाननहि बोलवि आत्मवीरा । सांगे तयां समजवूनि अशा विचारा-
"जाऊनियां रणिं पुन्हां मनिं घेति भीति।आतांच ते स्वपद मागुतिं कां न घेती?
युद्धांतुनी परतणें नच चारु रीति। मातें गमे सुभट हो ! जगतीतलीं ती ।॥३॥
मी वादवीं भुजबलें मम शत्रुवैरा।आल्या रिपू चढुनि त्यासि लढेन शूर " ॥
ऐसें म्हणोनि रथ साजवि वायुवेगी । वाद्यें रणोचितहि वाजति त्या प्रसंगीं ॥४॥
सारे अतुल्यबल वीर रणां निघाले । कीं कज्जलें भरुनि वादळ काय आलें !॥
होई तया कुशकुनावलि त्याच काळीं।मानी बळीं न परि गर्वभरीं त्रिशाली॥
अतिगर्वे ना शकुनाशकुनां गणि तो, गळती करायुधें ।
पडति रथी भट हयगज सैरा पळति कंदत कटु नादें ॥
गृध्र भयंकर शृगाल खरस्वर रडति श्वानें भयस्वनें ।
कालदूत जणु उलूक जे म्हणुं काढिति वचनें भीषणें ! ॥ ६ ॥

रामास जे विमुख कामुक मोहलुब्ध । द्रोही सदैव जगिं भूति जयां विरोध॥
कोठून त्यां शकुनवैभव मंगलांचें ?। स्वप्नींहि शांतिसुख त्याप्रति होय कैचें!
चाले निशाचरचमू महती अनन्ता । मोठीं असंख्य पथकें चतुरंगयुक्ता ॥
नानाप्रकारिं रथवाहनयानपूर्णा । नानाविधा ध्वजनिशाणिं अनेकवर्णा
जाती गजालि मदमत्त असंख्य जींत । प्रावृट्-पयोद-ततिला जणु वायु नेतां
रथीं अनेक सजले जयिं दैत्य वीर । योद्धे रणांगणिं तसे कपटींहि शूर ॥ ९
शोभे विचित्र अशि राक्षसवाहिनी ती । सेना जणों सजवि वीर वसतमूर्ति!
जाता तसें कटक, दिग्गज कंपमान ! क्षोभे पयोधि, गिरि डोलति कंपपूर्ण ॥
रेणू उडोनि रवि त्यात जणों विलुप्त । थाबे मरुद्गति, धरा व्यथिताचि होतां
वाजे निशाणपणवादिक घोरनाद । कीं गर्जती प्रलयमेघाचि ते अमद !॥११॥
भेरी नफीरि सनया बहु वाजतात । वीरांतराप्रति सुखप्रद कीं मिताल ! ॥
ते सिंहनाद करती सगळेचि वीर । उच्चारुनी प्रकटती बलराशि थोर ! १२
वीरांसि बोलत दशानन या प्रकारें-।" ते ऋक्ष वानर कुटा अपल्या मुखारें
भूपाल-पुत्रयुग बधुसि ठार मारें " । ऐसें वदोनि चमुच्या मुखभागिं थारे

कळे हा वानरालागीं सर्व वृत्तांत जेधवा ।
तेव्हां धावति गर्जोनी ' जय ! श्रीराम राघवा ' ॥१४॥

विशाल धावति ऋक्षकपी ते कराल कालासम जेव्हां ।
अद्रिवृंद कीं पक्षयुक्त ते उडती वाटे मनिं तेव्हां ॥
त्यास आयुधें नखदंतादिक अद्रिमहाद्रुम नि.शंक ।
रावण-वारण-सिंह रघूत्तम-कीर्ति वानिती प्रत्येक ! ॥ १५ ॥

आपापली जोडि बघोनि वीर । दोहींकडे हो जयघोष थोर ॥
एकीकडे राघवरायकीर्ति । दुजीकडे रावणगान गाती ! ॥ १६ ॥
पाहून रावण रथी विरथीच राम । झाला बिभीषण अधीर मनीं निकाम ॥
प्रीती अती उपजवीत मनात भीति। स्नेहें नमूनि पदपद्मिं वदे निजोक्ति ॥१७
'हे नाथ! ना रथ तुम्हा अनवाणि पाय। कैशाप्रकारिं बलवान् अरि जिंक्य होय?'
तेव्हा वदे विभु तयास कृपानिधान। ' ये ज्या रथें विजय तो रथ अन्य जाण!
ज्या शौर्यधैर्यमय दोन, रथास चाकें। ज्या सत्यशीलमय हें ध्वजयुग्म ठाके॥
घोडे जया बल-विवेकदमोपकार । ज्याला क्षमा, गुणदया समतादि दोर ॥१९॥

ज्या ईश्वभक्तिमय सारथि सुज्ञ ऐसा । वैराग्य ढाल, जणुं खड्ग तुतोष जैसा ।
ज्या ज्ञान हें परशु, शक्ति उदंड बुद्धि । विज्ञान तेंच वरकार्मुक ज्या त्रिशुद्धि ।।
भाता विशुद्ध मन सुस्थिर होय ज्यास । त्या बाण आण नियमांस शमा-यमांस
ज्या विप्रसद्गुरुसमर्चन हें सुवर्म । ऐसें दुजें न विजया सदुपायमर्म ।।२१।।
सद्धर्मरूप रथ यापरि ज्यास होय । जिंकील कोण अरि त्या, जगिं तो अजेय ।।
जिंकील तोच भवरूप महाखळाला । मित्रा ! जयास रथ यापरि हा मिळाला ।।
संसाररूप अरि दुर्जय जिंकिणारा । तो जाण वीर सखया ! मतिमान् सुधीरा !"
ऐसें प्रभूक्त परिसोनि बिभीषणानें । वंदीयलें प्रभुपदांबुज हर्षपूर्णें ।।२३।।

'कृपा थोर प्रभू मातें या मिषें उपदेशित ।।
सौख्यसागर हे राम' हें बिभीषणसन्मत ।।२४।।
इकडे प्रोत्साहन दे दशमुख, हनुमंत वालिसुत तिकडे ।।
राक्षस ऋक्षकपी ते, लढती, गाती निजप्रभुसि कोडें ।। २५ ।।

।। इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकांडे श्रीरामकथितविजयरथवर्णनं नाम पंचदशस्तरङ्गः ।।



## तरंग १६ वा

विधिमुख निर्जर सारे सिद्ध मुनी विविध कौतुकें बघती ।।
समरा त्या अतुल अशा चढुनि विमानीं नभीं असंख्य कृती ।।१।।
त्यांच्याच संगतिं उमे ! कुतुकान्तरंग । मी ही असें बघत राघवयुद्धरंग ।।
ते वीर युद्धिं रमले दुहिं बाजुं धुंद । होती कपी विजयि रामबलानुबंध ।।२।।
आह्वान देति भट ते रणिं एकमेकां । एकास एक परिमर्दिति त्या न शंका ।।
पाडीति भूवरति, तोडिति, आपटीती । छेदीति शीर्ष किति शीर्षिं दुजा बधीती।।
फाडीति पोट, उपटीति भुजा कितीक । पाया धरोनि भिरकाविति एकमेक ।।
ते ऋक्ष राक्षसभटां क्षिति गाडिताती । गाडोनि त्यांवरति वाळु किती भरीति !
ते वीर वानर अतीवचि कोपलेले । कीं चंडकालपुतळे आविरुष्ट झाले ! ।।
त्याची तनू स्रवत शोणित शोभणारी । सान्या निशाचरगणासि विमर्दणारी ५

ते गर्जतात घनसे वळ्याळि नीर। ठोंब अरींसि वितरीति करें अपार!॥
दंतीहि दंशति अरीप्रति देति लाथा। चित्कारनी करिति ऋक्षकपी खलान्ता॥
ते राक्षसां धरुनि फाडिति तत्कपोलां। घेती गळा उदर फाडुनि आत्रमाला॥
प्रह्लादनाथ जणुं नैकतनू धरूनी। खेळे रणांगणि गमे विविधा तनूंनीं!॥ ७॥
"मारा धरा, तनु चिरा विखरा" गिरा या। येती अघोरतर, भूमि नभा भराया॥
श्रीराम वज्र तृणसें तृण वज्रसें वा। जो लीलया करि, तया जय नित्य व्हावा!
पाहोनिया स्वदल तें चळतें भिऊन। येई दशानन पुढें स्वरथीं निषण्ण॥
ज्या वीस हस्ति असती दश चाप चंड। सांगे, 'फिरा, रण करा, अरिचीं उदंडा'

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकांडे रावणवानरादियुद्धवर्णनं नाम षोडशस्तरङ्गः ॥

## तरंग १७ वा

अत्यंत क्रुद्ध होऊनी धावला दशकंधर ॥
आले त्याच्यापुढें तों ते 'हा हू' करित वानर!! ॥१॥
ज्याच्या हातामध्यें शस्त्रे वृक्ष-शैलशिलामय ॥
तुटून पडले सारे रावणावरि निर्भय ॥२॥
लागतां शैल ते तेव्हां वज्रदेही दशानना ॥
फुटून पडती क्षोणीं पिष्टिलें कीं कणाकणां! ॥३॥
राहे रावण तैसाच रथावरतिं सुस्थिर ॥
रणदुर्मद तो योद्धा अति कोपोनि अतर ॥४॥
सोडपी आपुले रोपें कपिवीरांसि रावण ॥
अत्यन्त विपमारानें करी तो अरिमर्दन ॥५॥
भिऊनि पळती तेव्हां सांगती ऋक्षवानर ॥
"अंगदा! हनुमंता रे! रक्षा हे दास पामर!" ॥६॥
"दयाळो! स्वामि हे रामा! वांचवा दीन सत्वर!॥
हा नूतं काळसा आम्हां भक्षी आज निशाचर!" ॥७॥
करीना पाहुनी तैशा पळत्या सोडुनी रण ॥
दशचापींहि तो बाण सोडी सक्रुद्ध रावण! ॥८॥

जोडुनि धनु शर सरसर सोडी जातां जणुं ते उरग जसे।
धरणीं गगनीं दशदिशिं भरुनी कपि तरि पळती कुठें कसे! ॥
कोलाहलमय ऋक्षकपी ते आकुल होउनि ओरडती।
"आर्त बाधवा करुणासिंधो! रक्षक रघुपति तूं जगतीं!" ॥९॥

पाहोनि आकुल चमू अति आपुली ती। संक्रुद्ध लक्ष्मण करी धनु सज्ज हातीं॥
भाते कटीस कसुनी, नमुनी विनीत। श्रीरामपायिं, झणि धावत रक्षणार्थ॥१०॥
बोले "खला! वधिसि का कपिऋक्ष दीन।मातें विलोक, तव काळ मलाच जाण!"
उद्गारि रावण "सुता वधि या तुला मी।छोर्वी, तुला वधुनि जाइन शांतिधामीं"॥
ऐसें वदोनि अति चंड शरांसि सोडी।सौमित्र त्यांसि शतशां निमिषात खंडी॥
शस्त्रें अनन्तपरिं लक्ष्मणि रावणानें। टाकीयलीं परि निवारिलिं तूर्ण तेणें॥१२॥
त्याच्यावरी अमित लक्ष्मण बाण सोडी। मारूनि सारथि, रथासहि पूर्ण मोडी॥
मारी सहस्र शर तो दशभालदेशीं। कीं व्याल ते प्रविशती गिरिशृंगशीर्षी।॥
मारी फिरूनि शतबाण उरांत त्यासी। तो क्षोणिसी पडत, जाउनि शुद्धि नाशीं।॥
मूर्च्छेतुनी प्रबळ तो उठला सरोष। तो ब्रह्मदत्त वरशक्तिसि सोडि त्यास॥१४॥

ब्रह्मदत्त ती प्रचंड शक्ती अनन्तवक्षीं पडतांच।
पडे वीर तो विकल उचलतां रावणबलमद गत साच! ॥
एका मस्तकिं ज्याच्या शोभे विश्व पदर्दे अवधि कणी।
शेषा उचलूं बघे दशानन मूर्ख नुमजुनी जगद्धनी!! ॥१५॥

तें पाहुनी मारुति येत वेगें। दशानना बोलत थोर रागें॥
येतांच तैशापरि मारुतीतें। ताडीतसे रावण मुष्टिघातें! ॥१६॥

टेकीत जानु हनुमंत, पडे न भूमीं। संभाळुनी उठि पुन्हां मनिं रोषगामी॥
मुष्टिप्रहार करि नेोहि दशाननासी। वज्रप्रहार गिरिसा पडला न नेोसी! ॥
मूर्च्छा सरोनि मग जागृत हो पुन्हांही।लागे प्रशंसुं कपिशक्तिसि सद्रचांहीं॥
तें मारुती म्हणत 'धिग् बल शक्ति माझी।।धिक् पौरुषा मम,उठे सुरशत्रु कीं जी!'
जें पाहुनी कपित रावण विस्मयासी। हो थक्क रावण तसें बघुनी विशेषीं॥
सौमित्रितें वदत राघव रामराय। "तूं मृत्युभक्षक सुपावनकारि होय"॥१९॥
सौमित्र तें उठुनि बैसत आयकोनी। शक्ती कराल लपली गगनीं रिघोनी॥
घेऊनि चापशर धावत तो पुन्हाही। शत्रूसि संमुख रणांगणिं धीर होई॥२०॥

त्वेपात रावणरथा करि भग्न तूर्ण । तत्सारथ्या करुनि मूर्च्छित पाडि पूर्ण ॥
तो रावणा हृदिं असह्य शरांहिं वेधी । क्षोणीतळीं पडत रावण,जाय शुद्धी!
घालूनि अन्यरथि सारथि अन्य त्यासी । लंकेत ने त्वरित वाचवुनि प्रयासीं ॥
तेव्हा 'प्रतापनिधि लक्ष्मण रामबंधु । वंदी रघूत्तमपदांबुज सौख्यसिंधु !॥२२॥

तिकडे रावण मूर्च्छा सरता करि एक लागला यज्ञ ।
रामविरोधी विजयाकांक्षी शठ आग्रही परम अज्ञ ! ।॥ २३ ॥

जेव्हा कळे सकल वृत्त बिभीषणासी । रामाप्रती कळवि, जाउनि त्याजपाशीं ॥
"आपभि, नाथ ! दशकधर एक याग । सिद्धीस जाय तर तो न मरे अभाग
धाडा विभो ! त्वरित वानरवीर तेथें । विध्वसिता मख रिपुलचि तो रणातें '॥
जें आत्मवीर विभु पाठवित प्रभातीं । ते मारुति प्रभृति अगदयुक्त जाती ॥२५॥
लंकेत ते चढति मारुनिया उड्याच । आले दशास्यभवनीं गतभीति साच!
जैं देखती करित यज्ञ दशाननाला । त्यांच्या कपीसि हृदिं फारचि कोप आला ॥
ते रावणा म्हणति 'लाज न कीं ! पळोनी।येथें रणातुनि इथें बक होशि मौनी ॥
निर्लज्ज, टाकुनि रणा, सदनीं शिरोनी । ध्यानात मग्न बकसा बसलास मौनी!'॥
उद्गारोनि असें त्यातें लत्ता अगद हाणित ।स्वार्थात दग लंकेश लक्ष दे नच तीव्रत

बघेचना तों कुपित कपी त्या चावति मारिति त्याथाही ।
केशीं धरुनी कर्षिति नारिस रडत दीन रवि ती राही ॥
तोंच दशानन रुष्ट काळसम कपिंना फेकी धरुनि पदीं ।
मखविध्वसन मधेंच केलें कपिनीं हृदि तो अति खेदी ॥ २९ ॥

विध्वंसुनी मख असा कपि ते खुशाल । आले समस्त विभु जेथ दयार्द्रशील ॥
सक्रुद्ध तोंच दशकंठहि ये लढाया । आशा समग्र निज जीवनिं टाकुनीयां ॥

॥ इति श्रीसुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकांडे
रावणयज्ञविध्वंसवर्णनं नाम सप्तदशस्तरङ्ग. ॥

—.०.—

## तरंग १८ वा

चिह्नें अनेक अशुभें अतिभीतिदायीं । होतीं तथाव निघता लढण्या पुन्हाही—
माथ्यावरी उडुनि त्या बसती गिधाडें । मानी न काळवश, हट्ट तदीय वाढे ! १
तो घोरवीर रणमर्द रणाग्रराजी । चाले अनन्त रजनीचरवाहिनी जी ॥
तेथें पदाति,रथ, भूरि करी, सवार । सेना चले अधि, जिला गणना न पार ! २

ते धावले प्रभुवरी खलसंघ कैसे। वह्नीवरी शलभ धावुनि जाति जैसे!!॥
तैं देव सर्व इकडे प्रभुला स्तवीती। "आम्हां दिल्या बहु खलें प्रखरा विपत्ति!
आतां नका अधिक खेळवुं याजलागीं!। सीताहि दुःख हृदयीं अतिमात्र भोगी!"
ऐकोनि देववच सस्मित होय राम। हातांत सज्ज करि बाण विभू निकाम॥४॥
बांधी जटाजूट शिरीं रघूत्तम। ज्यामाजि पुष्पें दिसती मनोरम॥
रक्ताब्जसे लोचन, मेघकांति ती, । त्रैलोक्यनेत्रांस विमोहवी अती!॥५॥
निषंग होती कसिले कटीं कसे?। हस्तांबुजीं शार्ङ्गधनुर्लता वसे॥
अत्यंत शोभे प्रभुमूर्ति वीर ती। विलोचनाना अभिराम भारती!॥६॥
शार्ङ्ग करीं धृत, निषंग कटिशीं कसले शोभति शरिं भरुनी।
दंड सुभग बलशाली शोभति वक्षीं लांछन भृगुचरणीं॥
तुलसि म्हणे, प्रभु जेव्हा करि शर कार्मुक सांवरि सरसरुनी।
ब्रह्मांडकूर्म, दिग्गज, अहि, महि, गिरि, सर्वचि कंपित होत क्षणीं!!॥
झाले प्रभूसि बघुनी अति हृष्ट देव। ते पुष्पवृष्टि करिती चरुनी अपूर्व!॥
"हे ज्ञानसद्गुणनिधान दयासमुद्रा!। हे शक्तिमान् त्रिभुवरा! जय रामचंद्रा!
हे भूमिभारहरणा! जय कोसलेशा!"। ऐशा करीति सुर राघवकीर्तिघोषा॥
आल्याच तेथ अति घोर रवा करीत। सेना अनंत रजनीचरसंघजात॥९॥
पाहून जाति कपिवीर समोर त्यांसी। मेघालि कीं प्रलयकालभवा विनाशी!॥
जे शक्तिशूल तलवारि विशेष तेजी। विद्युल्लता चमकली जणु त्यांतली जी!
चित्कार घोर रथवाजिगजादिकांचा!। तो गर्जनारव जणों घनजात साचा!॥
आच्छन्न होय नभ वानरपुच्छकोटीं। कीं इंद्रचाप विलसे अतिरम्य दृष्टीं!॥
जी धूळ उंच रिघली म्हणुं मेघधारा!। ती बाणवृष्टि जणुं बिंदुमयी अपारा!॥
दोहीं दिशीं गमत पर्वत, ज्यां प्रहार। ते वज्रपात करतात अनेक वार!॥१२॥
संक्रुद्ध राघव करी शरवृष्टि मोठी। घायाळ होति रजनीचरयोधकोटी॥
ते लागतांच शर विह्वल वीर होती। भूमीवरी पडति जाउन तोल अंतीं!॥१३॥

शैलांतुनि जणों येती अनंतपरिं निर्झर॥
भीरूंसि भीववीती ते रक्तस्रोत भयंकर!!॥ १४॥
भयद कातरा रुधिरवाहिनी परम अपावन वहति किती!।
सैन्यें दोनीं हे तट कोणी, चूर्ण रथादिक रेती तीं॥

रे। वैरनिष्कृति अशीं सगळीं करीन। जाशील ना जर रणातुनि तू पळून!
देईन आज तुज निश्चित अंतकासी। आलास रावणकरीं मम वज्रपाशीं!"॥
जाणोनि कालवश त्या, परिसे दुरुक्ति। हासोनि बोलत कृपा-करुणाधिमूर्ति
"हो सत्य सत्य तव हीं प्रभुता अतीव।का जल्पशी उगिच ! पौरुष आजि दाव!

वृथा जल्पना नको करू तू ऐक सांगतों नीति जरा।
त्रिविध परींच जन संसारीं पाटल, अंबा, फणस तन्हा॥
एक सुमन दे, सुम फल दे पर, तिसरा केवळ फल देई।
" एक वदे, पर वदतो करतो, तिसरा करतो, न वदुनिही! " ॥६॥

रामोक्ति ऐकुनि दशानन हासुनीयां। बोले "मला शिकवु पाहसि गोष्टि कायां
तू वैर आधि करता नच भीति घेसी।स्वप्राणि मात्र अति लालस केविं होसी!"
दुष्टोक्ति हे वदुनि रावण रोषयुक्त।सोडी अनेक शर जे जणु वज्रशक्त॥
नानाप्रकार शर ते घनदाट येती।दाही दिशा, उपदिशा, नभ, भू भरीती
श्रीराम त्यावरति सोडुनि अग्निबाण। जाळी क्षणामधिंच राक्षसबाण पूर्ण॥
त्वेषेंचि रावण रघूत्तमिं फेंकि शक्ति। बाणेंचि राम फिरवीत तयावरी ती!
चक्रें त्रिशूल मग रावण फेंकि कोटी। कष्टाविनाचि रघुनायक त्यासि काटी
ते व्यर्थ होति दशकंधरबाण कैसे?। जाती लया खलमनोरथ सर्व जैसे!
तो ताडि बाणशतिं मातलिसारथ्यासी। भूमी पडे म्हणत तो 'जय राम' घोषीं
सूताप्रती उठवि राम दया करूनी। संक्रुद्ध होत अति राघव शार्ङ्गपाणि११

होता युद्धीं क्रुद्ध रघुपती निषंगिं सळसळ शर करती॥
कोदंडाच्या चड ध्वनिनें राक्षस उडती जणु वातीं!॥
मंदोदरिच्या उरीं कंप ये, अब्धि, द्रुम, भू, गिरि भीती॥
क्षितिमधिं दिग्गज दशन रोविती, चित्कारति! परि सुर हसती!!

आकर्ण ताणुनि धनुष्यगुणा अमेय। सोडी भयंकर शर प्रभु रामराय॥
श्रीरामनार्गणसमूह असंख्य जाती। ते व्याल सळसळोनि करालमूर्ति ११
ते बाण वाटति जणों अहि पक्षवाही। संहारिती प्रथम सारथितें हयाही॥
केल्या विमग्न रथ मोडियली पताका। गर्जे दशानन परी हृदिं येइ धाका॥
आणोनि तूर्ण रथ अन्य, चढे तयांत। तो अस्त्रशस्त्रगण सोडितसे अनन्त॥
त्याचे प्रयत्न परि सर्वचि जाति वाया। सद्द्रोहहेतु नच शक्त कि सिद्ध व्हाया

तेव्हां दशानन जयें दश शूल फेकी । चारीहि रामरथवाजिचि मारि तो कीं
त्यांना त्वरें रघुवरें परि जीववून । खेंचूनि चाप किति सोडियले स्वबाण !॥
लंकेशशीर्षकमलोपवनावरी ती । चाले रघूत्तम—शिलीमुखधारवृष्टि ॥
दाहीहि भालि शर हाणि दहादहा ते । तें जाहले रुधिरपाट किती वहाते !!
तो वाहतां रुधिर धावत रावणासी । तेव्हां प्रभूहि निज चापिं शरासि वर्षी
सोडूनि तीस शर पाडित राम तेथ । त्याचीं शिरें दशहि वीस भुजांसमेत !
तीं तोडिलीं तंवर आलि पुन्हां नवीन । तोडी तयां भुजशिरां प्रभुराय तूर्ण॥
तीं काटिलीं तरि फिरूनि नवीन येतीं । श्रीराम तोडित अशीं कितिदां तरी तीं
शीर्षें भुजा प्रभु फिरूनि फिरूनि तोडी । तो कोसलाधिपति कौतुक थोर माडी !
गेलें भरूनि नभ बाहुशिरोवितानीं । कीं केतु राहु जणुं ते अमितप्रमाणीं ! २०

राहु केतु कीं अनंत गगनीं धावति शोणित वर्षीत !।
रघुवीराचे प्रचंड तीरहि, लागुनि भूवरि ना पडत ॥
एक एक शिरिं शर किति शिरतीं तेव्हां शोभा दिसलि अशी ।
कुपित रवी कीं असंख्य निजकरिं ओवित राहू चहूं दिशीं !!!॥२१

जशीं जशीं छेदित राम तीं शिरें । तशीं तशीं वाढतिं तीं अतित्वरें ॥
जैशापरी कीं विषयासि सेविता । नवा नवा वाढत काम तत्त्वतां ! ॥ २२॥
जेव्हां दशानन बघे निज शीर्षि वाढ । मानी न मृत्युसि, धरी हृदिं रोष गाढ
तो मूढ गर्जत मदांध महाभिमानी । घांव दहाहि धनुलागिं करीं कसूनी ! २३
झाला सकोप दशकंधर तें रणांत । वर्षोनि बाण करि रामरथासि गुप्त !॥
ना दृष्टिसीहि घटकाभर तो दिसेचि । जाणों धुक्यामधिं लपे रविमूर्ति साची !
तेव्हां करीति सगळे सुर 'हाय हाय'! । संक्रुद्ध तों करिं धरी धनु रामराय !!
चालूनि शत्रुशर, काटि शिरें तदीय । सान्या दिशा नभ, धरा भरलीच होय !
शीर्षावली गगनमार्गिं उडोनि जातां । घोरे जयध्वनि, जयें भय येइ चित्ता ॥
'कोठें कपीश हनुमान्? रघुनाथ कोठें?। साकेतनाथ सहलक्ष्मण?'घोष मोठे!!

शिरोगणांचा 'कुठें राम?' रव ऐकुनि पळती कपि भीत ।
राम करी तें हंसुनि सज्ज धनु शिरें शरीं निक भेदीत ॥
शिरोमालिका धरिति कालिका वृंद वृंद बहु नभिं मिळती ।
रुधिरसरींमधिं मज्जन करुनी रणवट पूजन करुं पळती ! ॥२७॥

चक्रें भोरे गज हय पद्चर स्वर नक्र गणती यानांना ।
अहि शर, तोमर शक्ति शरासनवींचि चर्म तें कमठ म्हणा ! ॥ १५
वीर पडति जे उलथुनि तरु ते, मज्जा गमली फेन मना ।
कातरचित्तां भिववी सरिता परि ती सुखवी सुभटांना ॥
भूत पिशाचें वेतालादिक मज्जन करिती त्या सरितीं ।
प्रमथ महाझोटिंग भयंकर डुंबति आनंदें भरती ॥१६॥
छिन्न भुजांना घेउनि उडती काक कंक खग किति गगनीं ।
एकाकडुनी एक काढुनी घेती खाती हिसकोनी ॥
एकमेकां म्हणती कोणी ' कां हो इतुकी ही घाई ! ।
शठ हो ! तुम्ही जन्मदरिद्री अहो ! किती ही मरपाई ! !' ॥१७॥
पडले योद्धे कण्हत किती ते दोहिं बाजुंना घायाळ ।
जिकडे तिकडे धारेमध्यें सांपडले जणुं नष्टबळ ॥
गृध्र ओढिती आंतडिं दूरीं तटीं बसोनी, जें बघुनी ।
वाटे कोळी गळ लावोनी बसले असती दक्ष कुणी ! ॥१८॥
किती वाहती रुधिरीं प्रेतें ज्यांवरि बसले खगसंघ ।
वाटे नौकेमधें बसोनी क्रीडा करण्यामधिं दंग ! ॥
कवट्यामध्यें रक्तमांस किति जोगिणि घेती भरभरुनी ।
भूत पिशाची स्त्रिया नाचती आनंदानें किति गगनीं ! ॥१९॥
वीरकपालें घेउनि हातीं करतालापरि वाजविती ।
चामुंडागण बहुप्रकारीं गाती आनंदांत अति ! ॥
जंबुक कोल्हे कटकट दातीं खाती प्रेतें पोटभरी ।
एकामेकांसवें भांडती गुरगुर करुनी अंतरीं ॥ २० ॥
कोट्यवधी तरि मुंडाविहीनें रुंडें नाचति त्या समयीं ।
पडलिहि मुंडें करिति गर्जना जय जय जय जय शब्दमयी ॥
प्रचंड रुंडें मुंडावांचुनि धावुं लागतीं चहूंवरी ।
समरभूमिवरि जे भट झुंजति मरतां, रिघनी अमरपुरीं ॥२१॥
अगणित राक्षसवीरां मर्दुनि पर्वति दर्पित ऋक्ष कपी ।
रामशरहत भट समरांगणिं गेले वायंति जणुं सोपी ! ॥

रावण हृदयीं करी विचारा, 'राक्षस सैन्यें संहरलीं ।
एकाकी मी, अमित ऋक्षकपि अपार माया करुं अपुली' ॥२२॥
श्रीराम युद्ध करि चालत, हें बघोन । होती मनांत सगळे सुर ते विपण्ण ॥
तैं पाठवी स्वरथ इंद्र तयास तूर्ण । इंद्रेंचि मातलि निघे रथ सिद्धपूर्ण ॥२३॥
तेजस्वि दिव्य रथ ज्या तुलनाच नाहीं । श्रीराम त्यांत चढले अति हर्षवाही ॥
ज्याचे तुरंग अति चंचल रम्य चारी । मोठे युवे अमरचित्तगतानुसारी ॥
आरूढ दिव्यरथि पाहुनि रामराया । झाले प्रहृष्ट कपि ते समरा कराया ॥
होतां असह्यकपिशक्ति दशाननासीं । मायाविलास करि रावण शत्रुनाशी ॥२५॥
बाधे न ती रघुवराप्रति मात्र माया । रामाविना सकलही फसतीच ठायां ॥
सान्या कपींस अरिसैन्य दिसोनि येती । सर्वत्र राम अनुजासह वीरमूर्ति ! ॥
श्रीरामलक्ष्मणां बघुनि अनेकां ऋक्ष कपी अति चकित मनीं ।
चित्रलिखित जणुं लक्ष्मणसह ते जियल्या तेथें स्थित बघुनी ॥
निज चमु तैशी चकित बघूनी हासे राघव सज्जधनू ।
क्षणांत माया सारी निरसी हर्षित हो कपिसैन्य जणूं ! ॥ २७ ॥
सांगेहि राम मग त्या सकलां बघूनी । गंभीर धीर वदुनी निजवाक्यवाणी ॥
"हो द्वंद्वयुद्ध अमुचें निरखा जि! वीर! विश्राति घ्या लव अजीं ! दमलां समग्र!"

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुष-
विध्वंसने लंकाकांडे रावणस्य प्रबल-माया-विध्वंसवर्णनं
नामाष्टादशस्तरङ्गः ॥

## तरंग १९ वा

सांगोनि हें लवतुनी शिर विप्रपाद-पद्मीं, रघूत्तम रथा रणि ने अबाध ॥
संक्रुद्ध चित्तिं तंव रावण ये समोर । गर्जीत तर्जन करीत सघोष उग्र ॥१॥
"रे तापसा ! समरिं जे भट जिंकिलेसा त्यांत मत्सम तुला मिळलाच नास
मी होय रावण, यशीं मम विश्व जाणे । लोकेश बंदिमधिं टाकियले जयानें ॥२
तूं तो कबंध-खरदूषण नाशणारा । तूं व्याधसा वधिंधि वालिहि तो बिचारा ॥
संहारिलेसि जर राक्षसवीरराशि । तूं कुंभकर्ण, घननादहि ते वधीसी ॥३॥

तेव्हां दशानन पुन्हा अति कोपयुक्त। शक्ति प्रचंड अधि सोडित दीप्तिमन्त ॥
कीं दंड कालकरिंचा अधि उग्रमूर्ति। आली सुभीषण बिभीषणसंमुखी ती!
येतां बघोनि तशि शक्ति सुतीक्ष्णधारा। स्वब्रीद पाळि निजदास सुरक्षिणारा ॥
पाठीस घालुनि क्षणींच बिभीषणासी। शक्तिप्रहार विभुवय निजांगि सोसी! २९
मूर्च्छाहि येत लव लागुनि शक्ति रामा। लीलाचि ती प्रभुकृता सुश्लोकधामा ॥
पाहे बिभीषण जसें प्रभु दुःख साहे। तो क्रुद्ध, घेउनि गदा करिं, धांवताहे ३०
बोले "अभाग्य शठ मंदमते! खला रे!। तूं जें विरुद्ध नर नाग मुनींद्र सारे॥
तूं अर्पिली शशिधरा निजमस्तकाली। एकैकमस्तकिं अजीं शत कोटि झाली! ॥
या कारणेंचि अजि वांचशि तूं अजून। नाचेल आज तव मस्तकिं काल जाण!
तूं रामवैरि मिळवूं म्हणसी श्रियेसी"। मारी गदा तदुरिं बोलुनि उक्ति ऐसी ३२

उरावरिल त्या गदाप्रहारें घोर कठोरें धरणि पडे।
रावण दशमुखिं वाहे शोणित फिरुनि सांवरुनि रुपें लढे! ॥
अतिबल दोघे मल्ल लढति ते, एकामेकां हाणोनी।
प्रभुबलगर्वित बिभीषणानें रावण गणिला लव न मनीं! ॥ ३३॥

हे गौरि! रावणमुखासहि देखण्याचें। व्हावें न धैर्य लवही हृदिं ज्यास साचें!
तो हा बिभीषण लढे जणुं काळ ऐसा। श्रीरामचंद्रमहिमा करि धैर्यपोषा ॥
जेव्हां बिभीषण दिसे श्रमला अतीव। साह्यार्थ शैलधर मारुति घेत धाव॥
नाशोनि सारथि रथा तुरगादि सारीं। लत्ताप्रहार करि कोपुनि रावणोरीं ३५
तेणें सकंप दशकंधर होय भारी। तों ये बिभीषण जिथें प्रणतार्तिहारी ॥
आह्वान मारुतिस रावण दे फिरूनी। तो जाय पुच्छ पसरून नभीं उडूनी ॥
पुच्छा धरून नभिं रावण जाइ मागें।तों मारुतीहि लढुं लागत त्याजसंगें ॥
तें वीरयुग्म करि संगर अंतराळीं। संक्रुद्ध हाणिति परस्पर युद्धमेळीं ॥३७॥
आकाशिं युद्ध बलिलाघवि चालवीता। येती सुमेरुगिरि कज्जलशैल चित्तां!
केलें कितीहि परि रावण आवरेना। तेव्हां स्मरे पवननंदन राघवांना! ३८

स्मरुनि राघवां, वदुनि दशमुखा त्वेषें हाणी पवनसुत।
लढतां लढतां महीं पडति तारे उठति पुन्हां त्यां सुर गात ॥
पाहुनि संकटिं हनुमंतातें धावति साह्या ऋक्षकपी।
[illegible] त्यां रणीं रावण प्रमत्तबळि तो बहु दापी ! ॥ ३९ ॥

प्रेरीत राम जंव, धांवति ते प्रचंड । सारे कपी रणमदें भरले उदंड ॥
तैसें बलाढ्य कपिसैन्य रणीं बघोनी । माया निजा प्रकटि रावण सर्वमानीं ॥
तो गुप्त हो क्षणिं, असा प्रकटेहि कोठें । नानाप्रकारिं दिसतो, दिसतो न, वाटे ॥
श्रीरामसैन्य कपि ते तितुके तयांना । भासे–दशानन पुढें लढतात नाना ! ॥
जाती पळून कपिऋक्षहि थोर थोर । ते वीरही, परि तयां धरवे न धीर ! ॥
आक्रंदती 'शरण व्हा तुम्हि दोनि आम्हां॥ हे लक्ष्मणा ! रघुवरा ! रणधीर रामा !'
दाहीं दिशा धावति कोटि रावण । जे गर्जती दारुण घोर भीषण ॥
पळोनि जाती सुर भीतिविव्हल । जयीं नुरे त्यां मनिं आस ती लव ! ॥४३॥
'तो एक रावणचि सर्व सुरांसि दापि । हे तों अनंत, गिरिकंदरिं जाउं लोपीं!'
ब्रह्मा महेश मुनि साधु जयास ठावा । रामप्रताप, न तयां मतिलोप व्हावा !
प्रताप जाणति रामाचा ते निर्भय; कपि परि गणिति खरे ।
होति भयाकुल रटति " कृपाला ! तार अम्हांप्रति तूंच बरें ! " ॥
मारुति अंगद नीलनलादिक लढती निर्भय रणकुशल ।
कोटि कोटि ते नकली रावण नाशिति कपि ते अमितबल ! ॥४५॥
सुरां, वानरां, विकलां पाहुनि सस्मित राघव कुतुकानें ।
धनुष्य जोडुनि एक शरानें रावणमाया विलया नें ॥
प्रभु क्षणामधि सकलहि नाशी माया, निर्मल सकल करी ।
उदय पावुनी दिनकर लोपवि तिमिरा जगतीं सकलपरीं ॥४६॥
हर्षले देव पाहोनी होय रावण एकच ।
हर्षोनि वर्षती देव पुष्पाचा केवढा खच ! ॥ ४७ ॥
उभारुनि भुजा राम फिरवी सर्व वानरां ।
एकमेकां पुकारूनी तेही फिरति सत्वरां ॥ ४८ ॥
लाभोनिया प्रभुबला कपि ऋक्ष शूर । आले त्वरें समरभूमिमधीं सुवीर ॥
तैं देव सर्व भजती प्रभुला स्तुतींनीं । पाहूनि रावण मनांमधि कोप आणी ४९
बोले 'मला समजला तुम्हि एक काय !। तुम्हांस मारुं तरि मी किति वेळ जाय?'
ऐसें वदोनि गगनीं सुर धावतात । तों तो म्हणे पळुनि जाल कुठें समस्त ?॥
तों धावलाच झणिं अंगद रावणासी । पायीं धरुनि भिरकावि बळें क्षितीसी ! ॥
पाडोनियां बहुत ताडित त्या पदानीं । जाई प्रभूप्रति सकौतुक तो तिथूनि ॥
तेव्हां उठोनि दशकंधर घोरनाद । दाहीं धनुष्य करि कौशलें बाणवेध ॥
घायाळ तो करित सर्वहि युद्धवीरां । होई प्रहृष्ट भिववूनि जनां समग्रां ॥५२॥

जोडूनि दाहिं करिं चापलता दहाही । सोडीत रावण असंख्य शरां प्रवाहीं
दुःखी करीत सगळे निज शत्रुवीर । चित्तीं धरीत परितोष तदा अपार ।।
तेव्हां रघूत्तम दशानन–शीर्षहस्तां । काटी त्वरें सशरचाप जरी समस्तां ।।
ते वाढतो परि अनंत पटीं अपाप । तीर्थी समाचरियलें परिवृद्ध पाप ! ।।५४।।
तीं वाढतां भुजशिरें बघुनी अतीव । संक्रुद्ध होति कपि ऋक्ष विशेषभाव ।।
कापूनिही भुजशिरें न मरे अरी हा । याकारणें करिति सर्व कपीहि 'हा ! हा !' ।।
तैं वालिसूनु नलनील मरुत्सुतादि । तैसे कपी द्विविद ते पनस प्रमोदी ।।
हाणीति वृक्ष गिरि ते दशकंधरातें । घेऊनि तेच करि रावण फेकि हस्तें ! ।।
एकीं नखीं रिपुतनू अति दीर्ण केली । लत्ताप्रहारिं अपरें तशि हाणियेली ।।
जाती चढूनि शिरिं तैं नलनील दोघे । तोडीति ते नखिं भरे शिर शोणितौघें ।।
पाहूनि रक्त सुरशत्रु सकोप भारी । त्यांतें धरूं बघत हस्त निज प्रहारी ।।
ते नाकळोनि, फिरतीच करांवरूनी । की भृंगयुग्म कमलोपवनीं भ्रमूनी ।।५८।।
क्रोधें उडोनि धरि रावण त्या द्वयासी । पाडोनि त्यासि महिं आपटि फार रोषीं ।।
तो घेइ शेवटिं दशाकरिं कार्मुकांना । जोडूनि बाण करि भीत तयें कपींना ।।५९।।
होती विमूर्च्छित कपी पवनात्मजादि । येतां प्रदोषघडि रावण हो प्रमोदी ।।
पाहोनि वानरगडी पडले विमूढ । ये जांबुवंत बहुसाह्यद वीर गाढ ।।६०।।
त्याच्या समेत किति ऋक्ष सशस्त्रपाणि । ते रावणासि बहु ताडिति त्या तरूंनीं ।
संक्रुद्ध होय दशकंधर शक्तिशाली । पादा धरूनि अपटी कपिवीर खालीं ।।
जें जांबुवत चषि तो निजसैन्यघात । तो रावणासि उरिं मारित घोर लाथ ।।
जेणें पडे धरणिं रावण तो रथींचा । हातीं धरी सकल ऋक्षगणांस साचा ।।
त्या वीस हस्तिं धरिता खगि ऋक्ष तेसे । यांटे निर्धी मधुप ते कमलांत जैसे ।।
तेव्हां प्रहार करि त्याप्रति जांबुवंत । मूर्च्छान्विता बनुनि तो प्रभुपार्श्वि येत ! ।।

पाहोनि पातली रात्र सारथी ने दशानना ।
मूर्च्छा जावोनि ऋक्षादि येती प्रभुसि सन्मना ।। ६४ ।।
सारे राक्षस तैं भीत रावणाप्रति घेरिती
त्यांच्या हर्षि जो प्राप्त जाहला त्या नसे मिति ।। ६५ ।।

।। इति श्रीरामचरितमानसानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने सुश्लोकमानसे लंकाकांडे श्रीरामरावणयुद्धवर्णनं नामैकोनविंशस्तरङ्गः ।।

—★—

## तरंग २० वा

सीतेसंनिध त्या रात्रीं त्रिजटा येइ राक्षसी ॥
सीतेसि कळवी सारें वृत्त ती बोलुनी असी ॥ १ ॥
रावणाचीं शिरें हस्त वाढताहेत ऐकुनी ॥
त्रासली अंतरीं सीता क्लेश होउनियां मनीं ॥ २ ॥
मुख म्लान मनीं चिंता दारुणा ताप दे तिज ॥
त्रिजटेतें वदे वाणी सीता हृदयिंचें गुज ! ॥ ३ ॥

"होणार काय पुढतीं मज सांग आई ! हा विश्वदुःखकर कां मृत होत नाहीं ? ॥
त्या वेधिती जरिहि सायक राघवाचे । ना तो मरे ! खचित दुर्घट दैव साचें !॥
माझें अभाग्य म्हणुनीच जगें अजूनी । झाली मला हरिपदांबुजसंगहानि ॥
केला जयें कनककंकु उगाच खोटा । तें दैव आजहि मला करि रोष मोठा! ॥
जें दैव दाखवि मला बहु आर्ति ऐसी । जें बोलवी मम मुखीं कटु देवरासी ॥
तें सोसवीत मज सायक हे विषारी । ज्यां मार्जि रामविरहार्ति असह्य भारी ॥
ऐशाहि दुःखिं मम जीवन रक्षणारें । दुर्दैव हेंचि मम होय कटु प्रकारें ॥
शत्रूसही करित रक्षण जें मदीय । त्यातें न अन्य कुणि रक्षणकारि होय !" ॥७॥
ऐशापरी अति विलाप करीत सीता । आणोनि रामपदकंजयुग स्वचित्ता ॥
बोले तिला वचन तें त्रिजटा अशी ती। "गे ऐक राजतनये ! मम ही ऋजूक्ति ॥
लागेल वक्षि शर तो क्षणि तो मरेल । मारीत राम परि त्याप्रति ना सलील ॥
आहे किं तद्धृदिं तुझा परि वास सीते!। या साठिं राघव शरें नच वेधि की तें !॥

" त्याच्या हृदयीं सीता राहे सीताहृदयीं मम वास ।
माझ्या उदरीं अनन्तभुवनें; बाण लागतां त्यां नाश ! " ॥
राघवमत हें त्रिजटा वदतां हर्ष-विषादां धरि सीता ।
त्रिजटा तेव्हां समजावी तिज " मरेल अरि, ना कर चिंता ! ॥१०॥

छेदील रावणशिरें प्रभुराम जेव्हां । तो ध्यान टाकिल तुझें अति आर्त तेव्हां ॥
श्रीराम सुशरवर ते शरिं रावणाची । वेधूनि तद्धृदयि नेइल त्यासि नाशीं" ॥११॥
सांगोनि यापरि बहू समजावुनीयां । गेली निघोनि सदना त्रिजटा स्वठायां ॥
येवोनि चित्तिं रघुनायसुभाव साचा । सीतेसि होय विरहार्ति हृदीं अपार ॥

' मारा धरा, सोडुं नका ' पुकार । करिति उंचावुनि पुच्छमार ॥
लांगूलसंघीं रघुवीर साजे । अवर्णनीया सुषमा विराजे ! ॥ २७ ॥
त्यांच्यामध्यें कोसलेश बहु शोभत मेघश्यामतनू ।
इंद्रधनू कीं असंख्य वेढिति तुंग तमालच्छविसि जणूं ! ॥
प्रभुसि देखुनी हर्षविषादीं सुर भरले ' जय जय ' म्हणती !
एकचि तीरें राघववीरें नाशिलि माया निर्मिलि ती ! ! ॥२८॥
माया सरतां ऋक्षकपी मुदिं परतति घेउनि गिरितरुंना ।
शरवृष्टीनें राघव पाडी रावण-मस्तक-हस्त पुन्हा ॥
श्रीरघुपति-दशकंधर-संगर गातिल जरि कां कल्पभरीं ।
शेष-शारदा-निगम-कविशतें पावति ना ते पार तरी ! ! ! ॥२९॥
प्रभुचें गुणगण करि लव वर्णन जडधी तुलसीदास ।
मशक ज्यापरी निजबलमानें उड्डं पहातो आकाश ! ॥
छेदियले कर-शिरें कितीदा लंकापति तरि तो न मरे ।
क्रीडा प्रभुची सिद्ध-मुनि-सुरां व्याकुळवी परि, ती न सरे ! ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकाडे श्रीरामरावणसमरवर्णनं नाम विंशतितरङ्गः ॥

—o—

## तरंग २१ वा

छेदीयली तरिहि वाढत शीर्षराजि । प्रत्येक लाभिं जशि वाढत लुब्धता जी ॥
केले किति श्रम परी रिपु तो मरे न । तेव्हां पहे विभु विभीषणभाव कोण ॥ १ ॥
कालासही करित नष्ट यदीय काम । तो भक्तभक्तिसि परीक्षि उमे ! निकाम ॥
सांगे विभीषण विमृस "चराचरेशा ! । भक्तावना ! सुरमुनीप्रति सौख्यपोषा !
हो नाभिकुंडिं अधिवास सुधे तदीय । यास्तव नाथ ! नच रावण नष्ट होय"
ऐके कृपाळ वच साग्र विभीषणोक्त । घेई कराल मग बाण विभू करात ! ॥२॥
होउं लागले नानापरिंचे बहुंपरिं तेव्हां दुःशकुन ।
कंदति भीतिद शृगाल किति ते श्वान गर्दभें कडुस्वन ॥
विश्वदुःखकर खगकुलपशुगण ओरडती अति आर्त रवें ।
आकाशांतरिं भयकर सकलां धूमकेतुगण किति उगवे ! ॥४॥

चंद्रासि तेवि रजनीसहि बोल लावी। झाली निशा युगसमा सरणार केवीं?॥
चित्तांत ती करि विलाप अतीव सीता। श्रीरामचंद्रविरहें अति होत आर्ता॥
अत्यंत होय तिज जों मनि शोकताप। तों वाम बाहु नयन स्फुरले अपाप॥
जाणोनि तो शकुन उत्तम धैर्य घे ती। 'आतां दयाळु मिळणारचि राममूर्ति!'॥
हो अर्धरात्रि इकडे दशकंठ जागा। तो सारथ्यास अपुल्या अति येत रागा॥
'तूं आणिलेसि मज सांडुनि युद्धभूसी॥धिग् धिग् शठा! अधम रे! मतिमंद होसी'
तेव्हां पदा नमुनि त्या समजूत पाडी। होतां प्रभात रथिं वाहि पुन्हां धडाडी!
ऐकोनि 'ये पुनरपी दशकंठ' ऐसें। झाले कपी सकळ फार अधीर तैसे ॥१६॥
चोहींकडे उपटती कपि वृक्ष शैल। ते दांत खात रणिं धावति त्या सलील॥
हाणीत राक्षसगणांप्रति ते प्रहार। जाती पळून रजनीचर ज्यां न धीर!॥१७॥
त्यां ऋक्षवानरिं दशानन घेरियेला। दातीं नखीं सुनिशितीं बहु दीर्ण केला॥
हाणीयले कपिभटीं किति त्या चपाटे। तैं रावणा गमत 'मी अजि राहुं कोठें!'॥
पाहोनि मर्कटचमू प्रबला अती ती। ये रावणासि अशि ऊर्मि विचार चित्तीं॥
होऊनि गुप्त निमिषामधि तो लढाया। लागे, रणीं पसरुनी निज गूढ माया!॥

निर्मीत जेव्हां रणिं तो स्वमाया। प्रचंड जंतू सुजिले लढाया॥
पिशाच्च वेताळ अनेक भूतें। चापीं शरीं जे सजले स्वहस्तें॥ २०॥
सखड्ग तैं जोगिणि संचरीती। एका करीं लेति कपाळ अस्थि॥
करीति जे आवडि रक्तपान। जे नर्तती गात मदान्ध गान!॥ २१॥
'मारा! धरा!' शब्द चहूंकडे हे। व्योमा भरुनी रव तोच राहे!॥
श्वानें किती भुंकति धावतीही। पळूनि जाती कपि दूर कांहीं!॥२२॥
जाती जिथें मर्कट ते पळोनी। तेथेंहि त्यां पाठिशि येत अग्नी॥
संत्रस्त झाले कपि ऋक्ष सारे। तैं वालुका वर्षति त्यांत वारे!॥२३॥
निस्तब्ध केले कपि रावणानें। गर्जे तदा विश्वहि हें दणाणे!॥
सौमित्र तैसा कपिराज वीर। सारेच तैं सोडिति आत्मधीर॥ २४॥
'हा राम! हा राघव!' आर्त हांका। मारीत सारे कपिवीर जे कां॥
ऐशापरी सर्वच शक्तिहीन। करून माया सुजि तो नवीन॥ २५॥
अनन्त केले हनुमन्त तेणें। घेती शिळा धावति घोरमानें॥
रामादिही वेढिले त्यांनी। अनेक पेळ्या अतुल्या करूनी॥ २६॥

' मारा धरा, सोडुं नका ' पुकार । करीति उंचावुनि पुच्छभार ॥
लांगूलसंधीं रघुवीर साजे । अवर्णनीया सुषमा विराजे ! ॥ २७ ॥

त्यांच्यामध्यें कोसलेश बहु शोभत मेघश्यामतनू ।
इंद्रधनू कीं असंख्य वेदिति तुंग तमालच्छविसि जणूं ! ॥
प्रभुसि देखुनी हर्षविषादीं सुर भरले ' जय जय ' म्हणती !
एकचि तीरें राघववीरें नाशिलि माया निर्मिली ती ! ! ॥२८॥

माया सरतां ऋक्षकपी मुदिं पततति घेउनि गिरितरुंना ।
शरवृष्टीनें राघव पाडी रावण-मस्तक-हस्त पुन्हा ॥
श्रीरघुपति-दशकंधर-संगर गातिल जरि कां कल्पभरीं ।
शेष-शारदा-निगम-कविशतें पावति ना ते पार तरी ! ! ! ॥२९॥

प्रभुचें गुणगण करि लव वर्णन जडधी तुलसीदास ।
मशक ज्यापरी निजबलमानें उडूं पहातो आकाश ! ॥
छेदियले कर-शिरें कितीदां लंकापति तरि तो न मरे ।
क्रीडा प्रभुची सिद्ध-मुनि-सुरां व्याकुळवी परि, ती न सरे ! ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकाडे श्रीरामरावणसमरवर्णनं नाम विंशतिस्तरङ्गः ॥

—o—

## तरंग २१ वा

छेदीयली तरिहि वाढत शीर्षराजि । प्रत्येक लाभि जशि वाढत लुब्धता जी ॥
केले किति श्रम परी रिपु तो मरे न । तेव्हां बघे विभु बिभीषणभाव कोण ॥१॥

कालासही करित नष्ट यदीय काम । तो भक्तभक्तिस परीक्षि उमे ! निकाम ॥
सांगे बिभीषण विभूस "चराचरेशा ! । भक्तावना ! सुरमुनीप्रति सौख्यपोषा !
हो नाभिकुंडिं अधिवास सुधे तदीय । यासाठिं नाथ ! नच रावण नष्ट होय"
ऐके कृपाळ वच साम बिभीषणोक्त । घेई कराल मग बाण विभू करांत ! ॥३॥

होऊं लागले नानापरिचे चहुंवरि तेव्हां दुःशकुन ।
क्रंदति भीतिद शृगाल किति ते श्वान गर्दभे कटुस्वन ॥
विश्वदुःखकर उलूकसमखग ओरडती अति आर्त रवें ।
आकाशांतरिं भयकर सकलां धूमकेतुगण किति उगवे ! ॥४॥

दाही दिशां दाहचि होउं लागला । हो ग्रासला पर्वविना रवी भला ॥
मंदोदरी जाहलि कंपिता मनीं । ये मूर्तिनेत्रांतुनि वारि वाहुनी ! ॥५॥

प्रतिमा नेत्रीं, स्रवती, विद्युत् घडति पवन भूकंप मरी ।
मेघ वर्षती रक्तकेशरज अशुभ वर्णु ये केविं तरी ? ॥
अनन्त बघुनी उत्पातां सुर भ्याले नभि 'जय जय' म्हणती ।
समय सुरांना पाहुनि चापीं शर जोडी प्रभु सदयमती ॥६॥

आकर्ण ओढुनि शरासन सोडि राम । तो एकतीस शर रावणमृत्युकाम ॥
ते रामसायक तसे गमले मनास । की नाशकारक कृतान्त असे फणीश॥७॥
शोषीत एक शर नाभिसुधासरासी । ते शेष लागति करांप्रति आणि शीर्षी ॥
तोडोनियां परतती शर शीघ्र मागे । तें रुंड, मुंडकरहीनचि नाचुं लागे ! ॥
तें नर्तनेंहि धड दाखळि भूमि चंड । तेव्हां करीत विभु सायकिं त्या दुखंड ॥
तो घोर नाद करि रावण मृत्यु होतां । 'कोठें रघूत्तम ? रणीं वधितोंच आतां !'
जेव्हां दशानन पडे क्षिति साब्धि कांपे । क्षुब्धा नद्या, अचल दिग्गज अब्धि कोपे
भूमीं दुखंड पडला दशकंठ जेथ । त्या खालि तैं चिरडले कपि ऋक्ष यूथ ! १०
मंदोदरीपुढतिं टाकुनि शीर्षहस्त । श्रीरामबाण रिघती जगदीश जेथ ॥
त्याच्या निषंगिं वसती करिती फिरून । तैं देव दुंदुभि निनादति हर्षपूर्ण !
सामावली प्रभुमुखीं दशकंठदीप्ति । ब्रह्मा महेश अति हृष्ट बघूनिया ती ॥
ब्रह्माण्डही भरुनिया 'जय' शब्द राहे ! " श्रीरामराय ! जयराम ! रघूत्तमा हे "
त्या पुष्पवृष्टि करिती मुनिदेववृंद । उद्घोषती 'जय कृपाळ ! विभो ! मुकुंद ! ॥
हे विश्वनाथ ! जय राघव ! रामराया !। सीतापते ! जय जयाजि ! विभो अमेया !

जय करुणाब्धे, द्वंद्वविनाशा ! शरणागतसुखवितरण रे ! ।
खलदलदारण आदिकारणा ! करुणायतना नाथ हरे ! ' ॥
सहर्ष वर्षति कुसुमें सुरगण दुंदुभि निनदुनि बहु गगनीं ।
संग्रामांगणिं रघुकुलमणि तो शोभे मनसिज–कोटिंहुनी ! ॥१४॥
जयमुकुटिं शिरिं शोभति सुंदर मधें मधें सुमराजि कशा ? ।
नीलगिरीवरि तडिल्लतासह उडुगणकांती सजुनि जशा ! ॥
भुजदंडीं शर चाप फिरविता तनुवरि सजले रुधिरकण ।
तमालतरुवरी सुरी बैसले रामसुभीत चातक गण ! ॥१५॥

कृपादृष्टिवृष्टी अमूपा करूनी । सुखी वृंद केले सुरांचे प्रभूंनी ॥
कपी ऋक्ष सारे प्रहर्षोनि चित्तीं । मुखें गर्जती सौख्यदा रामकीर्ति ! ॥

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकाण्डे रावणवधवर्णनं नामैकविंशतितमस्तरङ्गः ॥

—:o:o:—

## तरंग २२ वा

मंदोदरी पतिशिरें बघुनी समोर । होवोनि मूर्च्छित पडे धरणीसि शीघ्र ॥
आक्रंदती युवति धावति ऊठवीती।नेती तिला मृत पतीपशिं शोकमूर्ति ! १
आक्रांत ती करि पतिस्थिति पाहुनीयां। वेणी सुटे तनुहि ये नच सांवराया॥
वक्षःस्थळां पिटुनि थोर करी विलाप । वाखाणुनी बहुपरी पतिचा प्रताप॥२
"नाथा! प्रताप तव भूप्रति कापवीता।सूर्या शशीसि अनला नच तेज, कांता!
जीचा न भार सहवे कमठा, न शेषा।ती आपुली तनु भरें धुळिनें अशेषा!
तुम्हांपुढें रणि न ठाकति धैर्यलेशें । नाथा ! कुबेर, वरुणेन्द्र, समीर ऐसे ॥
काला स्वबाहुबलि जिंकियलेत तेजें।ते आज तुम्हि पडलांत अनाथ सेजे !॥
विख्यात सर्व जगिं हो तुमचा दरारा । होता अवर्ण्य परिवार सुतादि सारा
रामा तुम्ही विमुख त्या स्थिति हीच लोकीं।राहे न कोणि कुलिं या रडण्यासही कीं
सृष्टि प्रपंच सगळा तुमच्या अधीन । दिक्पाल ते सभय नित्य तुम्हां नमून
स्वदस्तशीर्ष अजि जंबुकखाद्य होय । हें रामरायविमुखा नच हो अयोग्य ॥
ना ऐकिलें वचन कालवशत्वि माझें । मानीयले मनुज विश्वपती पती! जें॥
दानवकाननदहनपावका हरिसि मानिलें तुम्हि मनुज ।
दयाघना ज्या शिवविधिसुरगण नमिति न नमिलें तुम्हि सहज॥
परद्रोहरत जन्मभरी तुम्हि निजतनु केली पापमयी ।
अशा तुम्हां निजधाम राम दे तो प्रभु मी नमि मम हृदयीं ॥७॥
हे नाथ! नाहिं रघुनाथ-समान अन्य । जो की कृपाळ करुणाबुधि विश्वधन्य
देई तुम्हांस परमा गतितें अहाहा !।श्रीरामराय भगवान् अतुल प्रभू हा!"
मंदोदरीवचनांतें त्या ऐकोनी तुष्ट जाहले ।
सुरसिद्धमुनी सर्व हृदयें शुद्धकोमलें ॥ ९ ॥

ब्रह्मा महेश सनकादिक नारदादि । जे की मुनींद्र जगतीं परमार्थबोधी ।
ते लोचनीं मरुनि पाहति राघवातें । प्रेमार्द्र सौख्यभरमग्न कृतार्थचित्तें ॥
शोकार्त सर्व बघुनी दशकंठनारी । जाई बिभीषण तयां अतिदुःखभारीं॥
बंधुस्थिती बघुनि त्यासहि शोक होय । दे त्या निदेश अनुजासह रामराय॥
जाऊन लक्ष्मण तदा समजावि त्यासि।येई बिभीषण पुन्हां प्रभुच्या पदांसी॥
पाहोनियां सकृप राम वदे तया कीं ।'सारी क्रिया उचित तूं कर गा! अशोकीं'
सारी क्रिया करित तो प्रभुच्या निदेशीं।जी देशकालविधियुक्त अशी विशेषीं
मंदोदरीप्रभृति देति तिलांजली त्या । जाती गृहीं हृदिं रघूत्तमकीर्ति गात्या॥
येई बिभीषण पुन्हां प्रभुतें नमीत । कारुण्यसिंधु निजबंधुसि सांगतात :– ॥
"तूं, वानराधिपति, अंगद, जांबुवंत,। नीतिज्ञ नील नल मारुति हे समस्त १४
जावें बिभीषणसमेत मिळून सारे । राज्याभिषेक करुनी तुम्हि त्यासि या रे।"
श्रीराम सांगति तसेंच बिभीषणा हें–। "तातोक्तिपालनिंच मीं नित वर्ततांहे
यास्तव इथें चि नच मी नगरांत जाण। मी पाठवीन कपि, लक्ष्मण मत्समान।"॥
होतां निदेश विभुचा कपि तूर्ण जाती । राज्याभिषेकरचना करिती सुरीतीं १६
सिंहासनीं बसवितो अति आदरानें । केला तयासि अभिषेक विधिप्रमाणें ॥
त्या साजली नमिति सर्व बिभीषणातें। येती तयासह पुन्हां प्रभु राम जेथें॥१७
तों घेत बोलवुनि राम कपी समग्र । सप्रेम बोलुनि तयां सुखवी उदार ॥
वाणी सुधेसम वदे प्रभु त्या सुभक्तां । "साहाय्य हें तुमचियां रिपु मी वधीता॥
हा राज्य मेळवि बिभीषण पुण्यकीर्ति । लोकत्रयींत तुमची स्थिर नूतना ती ॥
माझ्यासमेत तुमचें यश हें पवित्र । गातील आवडि अनुत्तम सच्चरित्र १९
संसारसागर अपार विनाप्रयास । जातील ते तरुनि संशय नाहिं लेश।"॥
ऐकोनि रामवच तृप्ति न हो कपींना। वंदिती प्रभुसि तत्पद सोडिती ना।२०
बोलावि तें रघुपती पवनात्मजातें। "लंकेसि जा" वदत राघव त्या निजोक्तें॥
"सांगेसि जाउनि तिला कळवी सुवृत्त। तत्क्षेमही कळवि तूं मजलागिं येथ"
लंकेंत येत मग मारुतिराय तूर्ण । त्या राक्षसी-सहित राक्षस देति मान ॥
नानापरीं तयिं तयाप्रति पूजियेलें । सीतादि होय कवण्यास्थलिं दाखवीलें २२
दूरूनचि प्रणति तो विजला करीत । सीताहि जाणत तया रघुपदूत ॥
ती बोलली "वद सख्या! कुशल प्रभूचें। आहे किं बंधुकपि-सैन्य-समेत साचें!"

"सर्वोपरी कुशलि कोशलराय आहे। केला दशानन तयें रणिं नष्ट पाहें! ॥
पावे बिभीषण चिरंतन राज्य माते!"। ऐकोनि मारुतिवचा अति हर्षली ते।२४

हृष्ट मानसीं पुलकित सीता साश्रु बोलली पुनःपुन्हा।
"अतुला वाणी कपे! त्रिलोकीं देउं तरी तव काय गुणा?"॥
मारुति सांगे "त्रैलोक्याचें राज्य गमे मज जणुं मिळलें।
कीं अरि जिंकुनि, बंधुबलान्वित राम पाहि मी युत कुशलें!" २५

सीता वदे "परिस बाळ! तुझ्या हृदब्जीं। नांदो सदा अखिल सद्गुणरत्नराजि
श्रीरामचंद्र विभु नित्य अनन्तयुक्त। राहोत रे! तुजवरी अनुरक्तचित्त!॥२६
आतां प्रयत्न कर तात! असे जयें मीं। ठेवीन दृष्टि मम त्या मृदु नील रामीं"
ये राघराजवळि मारुति तत्क्षणींच। श्रीजानकीकुशल त्यासि निवेदि साच॥२७
ऐकोनि वृत्त रघुराय बिभीषणातें। तो अंगदासहित बोलवि सागिही तें॥
'जाऊनि मारुतिसमेत तुम्ही त्वरेनें। या घेउनी जनकजेप्रति थोर मानें' २८
ते जाति सत्वर जया स्थळिं होति सीता। सेवीति जीस किति राक्षसि नम्रभूता
सांगे बिभीषण तयांप्रति वेगिं सारें। सीतेसि नाहविति सादर सत्प्रकारें॥२९॥
त्या लेववीति तिज उत्तम सर्व भूषा। आणीवलीहि शिबिका अति सन्निवेशा
जीच्यामधें चढुनि बैसलि हृष्ट सीता। चिंतूनि चित्तिं सुखधाम अशा स्वकान्ता
तैं सर्व बाजुं परिरक्षक वेत्रपाणि। सोल्हास चालति तिच्यासह गौरवोनी॥
आलोकनार्थ कपि ऋक्ष समस्त येती। तों त्यास रक्षक सरोष निवारताती ३१
तेव्हां रघूत्तम वदे "करणें मदुक्ति। आणा इथें जनकजा अनवाणि हो! ती॥
पाहोत सर्व कपि ती जननीसमान"। ऐसें वदे रघुपती हृदयीं हंसून ॥३२॥
ऐकोनि रामवच ऋक्षकपीस हर्ष। स्वर्गांतुनी करिति देवहि पुष्पवर्ष!॥
जी ठेविली प्रथम अग्निमधें सुगुप्त। ती सर्वसाक्षि विभु तो प्रकटूं पहात ३३
त्याकारणें वदत दुर्वच तो दयाब्धि। ज्या ऐकतां मरति राक्षसही विषादीं!!॥
तैं मस्तकीं धरुनि शब्द रघूत्तमाचा। बोले सती शुचितमा मनिं देहि वाचा ३४
'व्हा धर्मदायक तुम्ही मज भावुजी हो!। अग्नि प्रदीप्त तुमच्या करिं शीघ्र कीं हो'
ती शोकयुक्त शुभधर्मविवेकपूर्ण। ऐकोनि उक्ति मनिं लक्ष्मण होय दीन!॥३५॥
तो साश्रुलोचन कराब्जयुग्म जोडी। ना तो प्रभूपुढतिं काढि निजोक्ति मोडी॥
जाणोनि राममन लक्ष्मण काष्ठभार। धावूनि आणि, करि अग्नि समिद्ध थोर ३६

पाहे महाग्नि जंव तो पुढतीच सीता। हर्षे भरे हृदयिं, भीति न लेश चिंता ॥
बोले " मनोवचनदेहिं उरीं मदीय। रामाविना जर न अन्य गर्तीच होय ॥३७॥
तर हे भगवन् अग्ने! सर्वान्तर्याम जाणका।
पावका! स्वप्रभावानें श्रीखण्डासम होशि कां "॥३८॥
श्रीखण्डापरिं पावकिं शिरली प्रभुतें ध्याउनि जानकी।
नित्य यत्पदा ' जय जय रामा!' म्हणुनि वंदितो शिवहर कीं॥
प्रचंड पावकिं तदा जळे प्रतिबिंब, कलंकहि लौकिक तो।
अगम्य हेतु प्रभुचा, गगनीं चकित सिद्धमुनि सुर करितो! ॥३९॥
अग्नि प्रकटुनि निजपाणीं श्री, वेदस्तुत जगिं विदित अशी।
घेउनि अर्पी रामा, लक्ष्मी क्षीराब्धी जशि विष्णूसी! ॥
वामविभागीं श्रीरामाच्या शोभत रुचिरा अतिशय ती।
नवनीलाब्जानिकट वाटली काचनपंकजकलिद्युती!!! ॥ ४० ॥
तेव्हां चढोनि सुर हर्षभरें विमानीं। वाद्यध्वनी करिति वर्षुनि सत्प्रसूनीं! ॥
गाती मनोज्ञ रवि, किंनर रामकीर्ति। देवांगना करिति नर्तन रम्यमूर्ति! ॥४१॥
श्रीजानकीसहित राम अतीव शोभे। सौख्यें अपार मन त्यावर फार लोभे ॥
देखोनि हर्षति हृदीं कपि ऋक्ष सारे। ते गर्जती 'रघुपते! जय' सौख्यसारें॥ ४२॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे कलिकलुषविध्वंसने लंकाकांडे श्रीजानकीरामसमागमवर्णनं नाम द्वाविंशतितमस्तरङ्गः ॥



## तरंग २३ वा

आज्ञा रघूत्तम करी, शिरिं घेउनी ती। तो जाय मातलि नमूनि पदांसि माथीं ॥
आले तदा सुर निजार्थि अतीव लोभी। रामा स्तवीति वचनीं परमार्थशोभी
" हे दीनबंधुरघुनाथ! दयार्द्रशीला। केली तुवां सुरगणीं करुणा स्वलीला ॥
हा विश्वशत्रु खल रावण पापकामी। मेला कुमार्गरुचि आपलिया कुकर्मी ॥
तूं ब्रह्म नित्य अविनाशि समस्वरूप। आनन्दचिन्मय उदास विभू अरूप॥
जो कीं अनामय अगम्य अनादि होय। जो हो अजिक्य गुणहीन अमोघवीर्य
जो मत्स्य, कूर्म, वपु सूकर नारसिंह। जो वामन प्रबल भार्गव शत्रुदाह ॥
ये संकटांत अमरांसि जधां जधां कीं। नाना तनू धरुनि नाशिसि तूंच लोकीं॥

हा पापमूल सुरशत्रु मदांध कामी । लोभी खलाग्रणि अतीवचि कोपगामी ॥
त्या रावणाहि निजधाम कृपाळ देत । येणें अम्हास हृदिं विस्मय हो ! अनन्त !॥
आहोंत देव अम्हि हे परमाधिकारी । स्वार्थांध भक्ति तव विस्मरुनीच सारी ॥
तेणेंच नित्य बुडलोंत भवप्रवाहीं ! । आलों तुला शरण रक्षण तूंच वाहीं "॥६॥

ऐसें स्तवीती सुरसिद्ध सर्व । सर्वत्र बद्धांजलि नम्रभाव ॥
प्रेमें सरोमांच करी विधाता । स्तुती प्रभूची मधुरा यथार्था ॥७॥

"जय जय जय रामा सर्वदा सौख्यधामा । रघुवर गुणसीमा सुंदरा पूर्णकामा ॥
करधृतशरचापा नष्टसंसारतापा । दलितसकलपापा नाथ विश्वस्वरूपा ! ॥८॥
अनुपमतनुशोभा कोटिकामस्तुताभा । गुणगण मुनि गाती सत्कवी सिद्ध जे या !॥
दशमुख जणुं भासे जो महा नागसाच । खगपतिसम रोषें मारिला त्यां तुनीच ॥
निवडुनि भय शोकां रंजवीशी स्वभक्तां । प्रभुवर गतकोपा सर्वदा बोधयुक्ता ॥
अवनिभरविनाशा ज्ञानमेघा उदारा । अवतरसि सुकार्यां सद्गुणांहीं अपारा ! १०
असशि तरि अजन्मा व्यापकत्वें अनन्त । रघुवर करुणाब्धे मी तुम्हातें नमीत ॥
असशि रघुकुलाना तूं अलंकाररूप । करिशि तरि वि-पूर्वां मीपणालागिं भूप ॥
सुमतिगुणनिधाना पावना हे अमाना । नमन तुज अजा रे ! नीरजा पुण्यगाना॥
अतुलितबलदंडा ! हे प्रचंडप्रतापा । असशि कुशल नाशीं तूं खलाच्या अमूपा ॥
हित करिशि दयाळा ! कारणावीण दीनीं । अतिशय रमणीया मी नमीं बद्धपाणि
भवनिरसन ईशा ! चित्तदोषप्रणाशा । जय सकलपरा रे वंदनीया रमेशा ! १३
करिं शर धनु शोभे स्कंध शोभे निषंगीं । अरुणकमलनेत्रा शोभसी नीलरंगीं ॥
अमितसुखनिवासा सुंदरा इंदिरेशा । शमविसि मद–कामा दूषणा पापक्षोपां॥
विलससि अनवद्या, वागतीता, अखंडा । सकलहि भरुनी तूं राहसी श्रीमुकुंदा !
श्रुति गुण तव गाती वर्णनें सत्य सारीं । श्रुति जरि रवितुल्या हो रवी थोर भारी !
कपि सकलहि झाले सर्वथा हे कृतार्थ । बघति तव मुखेन्दू लोचनीं सौख्य मूर्त॥
सुरतनु परि माझी व्यर्थ वाटे मला ही । भवपतित असोनी ना तुझी भक्ति कांहीं
आजि करिचि दया तूं दीनबंधो दयाळा । विषममति मदीया न्यावि तूं रे लयाला
सुखचि गणुनि दुःखा सेवतों सर्वकाला । करितचि विपरीता सर्व मी कर्मजाला
निवडुनि खल सारे शोभसी सुक्षमेनें । अनिश भवभवानी त्वत्पदीं हृष्ट होणें॥
अखिलनृपतिरत्ना, द्या वरा एवढ्याच । तव शुभपदिं वाढो मद्रती नित्य साच"

स्तुति करीत अशी चतुरानन । पुलकितांग मुदें भरलें मन ॥
बघुनि राघव तो सुषमांबुधि । नयनि, तृप्ति न होतचि त्या हृदीं ॥१९॥

येई त्यासमयीं तेथें राजा दशरथ स्वयें ।
तनयां पाहुनी त्याच्या नेत्रीं जळ भरूनि ये ॥ २० ॥

वंदी तयास विभु सानुज रामराय । आशीर्वचें वितरि तात तयां अमेय ॥
"पुण्यप्रभाव तुमचाच समग्र ताता ! ।कीं जिंकिला अजय राक्षसराज आतां"
प्रेमें अती भरत ऐकुनि नंदनोक्त । ये अश्रु नेत्रिं पुलकावृतगात्र होत ॥
वात्सल्यपूर्ण पितया कृपया विलोकी । दे ज्ञान त्यासि दृढ दीनदयाळ तो कीं
हे गौरि! तें दशरथा नच मोक्ष आशा।कीं भेदभक्तिवरि तो निज ठेवि चित्त॥
जे भक्त होति सगुणा, नच मोक्ष घेती।श्रीराम अर्पिति तयां निजपुण्यभक्ति! '

प्रणाम करुनी रामा वारंवार प्रभूप्रति ॥
स्वर्गीं दशरथें हर्षें केलें गमन मागुतीं ॥ २४ ॥

श्रीकोसलाधीश रघूत्तमाप्रति । सौमित्र सीता बघुनी।हे संगतीं ॥
शोभा बघोनी अति हृष्टमानसीं । स्तुती करी इंद्र मनोहरा अशी– ॥२५॥

"जयजय रामा! शोभाधामा । देशी प्रणतां तूं विश्रामा ॥
निषंग–सायक–चापीं शोभसि । अमेयबलभुजदंड देसशी ॥ २६ ॥
जय खर–दूषण–नाशन रामा ! । राक्षस–खलगण–मर्दन–नामा ॥
मारिलात खल हाहि दाडगा । केलें निर्भय देवखंड गा ! ॥ २७ ॥
जय धरणीभरहरण उदारा । अपार महिमा तव रघुवीरा ! ॥
रावणनाशन जय करुणाकर । केले राक्षस तूं अभयंकर ॥ २८ ॥
बलगर्वित तो रावण, देवां— । गंधर्वांतें जिंकित सर्वां ॥
सिद्ध मुनीश्वर खग नर नागहि। हठें लावि तो निजकार्यां महिं २९
परद्रोहरत जो अति दुष्ट । सेवी निजफल तो पापिष्ठ ॥
दीनदयाळा तुम्हां प्रार्थना । कमलदलोपमदीर्घलोचना ! ॥३०॥
होता मातें हा अभिमान । कोणि न जगतीं मजसि समान ॥
आज पाहुनी प्रभुपदकमलें । गर्वमान मम दुःखहि शमलें ॥३१॥
गाती श्रुति ज्या अव्यक्तातें । ध्यावोत तया जे ध्याउं पहावे ॥
प्रीति परी मम कोसलभूपीं । श्रीरामाच्या सगुणसुरूपीं ! ॥३२॥

सीता लक्ष्मण यांसह रामा । माझ्या हृदयीं कर विश्रामा ॥
जाणुनि मातें दास आपुला । रमापते दे ! भक्तिच मजला ॥३३॥
दुःखनाशना दीनदयाळा । नमित असे मी परमकृपाळा ॥
तुलसिदासविभुराधवचरणीं । ' राम ' वंदितो अन्तःकरणीं ॥

रमानिवासा हरशी त्रासा कृतशरणागतसंतोषा !
या सुखधामा मी नमिं रामा मदनशताहुनि रम्य अशा ॥
विश्वरंजना, शत्रुभंजना नरतनुधर्त्या अमितबला ।
विधि-हर-देवा नमन राघवा करुणार्द्रा अतिकोमला ३५

कृपाकटाक्षीं मज पाहुनीयां । आज्ञा करावी मज काहिं कार्या " ॥
ऐकोनिया तें प्रियवाक्य त्याचें । वदे तया राम दयार्द्र वाचें-॥३६

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकाण्डे देवस्तुतिवर्णनं नाम त्रयोविंशतितमस्तरङ्गः ॥

—:o:—

## तरंग २४ वा

"ऐकें सुरेश्वर अगा ! कपि ऋक्ष माझे । झाले रणीं मृत निशाचरहस्तिं कीं जे
माझ्याच कारणिं तयीं असु सांडियेले । तूं त्यां जिवंत कर सुज्ञ सुरेन्द्र ! लीलें" १
ऐकें खगेश ! रघुरायसरस्वती ती । होती अगाध मुनि-पंडितमान्य अर्थी ॥
मारूं शके जग विभू जिववूं शकेही । इंद्रासि केवळ महत्त्व समर्पु पाही ! ॥२॥
तैं वर्षतां अमृत, ऋक्ष कपी जिवंत । होती, सहर्ष उठती प्रभुपार्शि येत ! ॥
दोनी दलांवरि सुधा जरि वर्षियेली । झाले जिवंत कपि ऋक्ष, न राक्षसाली ३
होऊन राममय तन्मन मृत्युकालीं । त्यां मोक्ष लाभत नुरे भवबंधनाली ! ॥
जे कीं सुराशक असे कपि ऋक्ष सारे । झाले जिवंत रघुनाथमतानुसारें ! ॥४
रामापरीं कवण दीनहितार्थकारी । जो सर्व राक्षस करूनि विमुक्त तारी ॥
जो दुष्ट पापखनि रावण कामचारी । तो पावला गति मुनींसि न पावणारी ! ५
वर्षोनि पुष्पततिं जाति सहर्ष देव । आपापल्या चढुनि रम्य विमानिं सर्व ॥
पाहोनि योग्य समया मतिमान् महेश । श्रीराघवाजवळि येत मुदें विशेष ॥६

अत्यंत भक्तिभरिं जोडुनियां करांतें । तें अश्रुबिंदु नयनांबुरुहीं वहाते ! ॥
रोमांचकाय हर गद्गदकंठ गाई । श्रीराघवा अतिमधु स्तवनप्रवाहीं– ॥ ७ ।

"रघुकुलाधिपा ! रक्षणें मला । कर सजे शरीं कार्मुकीं भला ॥
पटल जें महा मोहमेघसें । पवनसें तुम्हीं वारितां कसें ! ॥ ८ ॥ .
अनल कीं वना संशयात्मका । अमररंजना विश्वपालका ! ॥
सगुणनिर्गुणा ! सुगुणमंदिरा । विजयिं शोभता विश्वसुंदरा ! ॥९॥
भ्रम–तमाप्रती वारिता रवी । अशि तुम्हां असे पुण्य थोरवी ॥
मदमतंगजक्रोधकाम यां । दमक सिंहसे तुम्हि दयामया ! ॥ १० ॥
जनमनोवनीं संचरूनियां । करितसा तया नित्य निर्भया ॥
विषयकल्पनाकमलिनीवना । हिमतुषारसे शीघ्रनाशना ! ॥११॥
सदय इंद्रियातीत राघवा ! । भवनिवारका जानकीधवा ! ॥
भवमहाब्धिच्या मंदरोपमा । शमविं संसृती, हे मनोरमा ! ॥१२॥
कमललोचना दुःखमोचना । प्रणततोषणा दीनतारणा ॥
अनुजजानकीयुक्त मन्मनीं । वस रघूत्तमा ! तूं निरीदिनीं ॥ १३ ॥
त्रिभुवनोत्तमा श्यामसुंदरा । मुनिमनोहरा तापसंहरा ॥
तुलसिदासहृन्नाथ सौख्यदा ! । हृदयिं मी नमीं राघवा सदा ॥१४॥

हे नाथ ! कोसलपुरीमधिं होय जेव्हां । राज्याभिषेक तुमचा बघणार तेव्हां ॥
पाहीन उत्सव मनोहर तो अनन्य । होईल चित्त मम हें अतिमात्र धन्य !"१५
ऐसी स्तुती करुनि शंभु निघून जात । येई बिभीषण तिथें प्रभुदर्शनार्थ ॥
वंदोनियां प्रभुपदीं वदला मृदूक्ति । "ऐका जि ! शार्ङ्गधर ! जें मम होय चित्तीं
मारी प्रभू दशमुखा सकुला ससेना । विस्तारिलें त्रिभुवनीं यश पुण्य नाना ॥
मी दीन हा मलिन हीनमती कुजाति । माझ्या शिरीं करि कृपा प्रभु कैक रीतीं
येऊनि दासगृहिं पावन तें करावें । स्नाना करून श्रमरश्रम घालवावे ॥
पाहोनि राक्षसगृहांतिल संपदा ती । द्यावी कपींसि विभुनें मुदितस्वचित्तीं ॥
सर्वोपरी मजसि मानुनि आपलासा । जावें सवें मज, पुरा निज, कोसलेशा ! "
ऐकोनि तें मृदुल दीनदयाळ राम । होई जलार्द्रनयनांबुज तो निकाम १६
सांगे प्रभू "गृह तसें तव कोशराशि । माझेंचि होय सगळा ! नच भिन्न होयी !
मातें परंतु भरतस्थिति आठवूनी । हो कल्पतुल्य निमिषकहि सत्यवाणी ! ॥

वेषें तपस्वी, कृश देह ऐसा । सदैव मन्नामजपाभिलाषा ॥
ऐशा तया बंधिच मीं पहावें । तूं यत्न ऐसे कर सर्वभावें । २१
तूं सर्व राज्य कर कल्पमर प्रसन्न । चित्तीं मम स्मृति परोपरि जागवून ॥
तूं पावशील मम धाम अनन्त अंतीं।जे कीं अशें मिळविलें जगतांत संतीं।"

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे मुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने लंकाकांडे शिवस्तुति-बिभीषणसंवादवर्णनं नाम चतुर्विंशतितमस्तरङ्गः॥

— :X: —

## तरंग २५ वा

रामोक्ति ऐकुनि बिभीषण हर्षपूर्ण । वंदी कृपालु विभुचें पदपद्म लीन ॥
वेव्हां समस्त कपि ऋक्ष सहर्ष रामा।वंदोनि वानिति तदीय सुकीर्तिधामा। १
येई बिभीषण पुढें निजमंदिरांत । रत्नादिकीं वसनिं पुष्पक तो भरीत ॥
नेऊनि तें प्रभुपुढें सुविमान ठेवी । हांसे कृपाब्धि विभुराम वदेहि तवीं-२
" तूं बैस यात, नभिं जाइं बिभीषणा रिहें वस्त्रभूषण नभांतुनि वर्ष सारें"
जाई बिभीषण नभीं चढुनी विमानें । सद्रत्नवस्त्रतति वर्षत त्याप्रमाणें ३
जें ज्यांस आवडत तें कपि घेति सारेघालोनिया वदनिं फेंकिति कीं असारें।
सीतेसमेत सहलक्ष्मण राम हासे । अत्यंतकौतुकिं विभू स्वकृपाविलासें ॥४॥
ध्यानेंहि जो लाभत ना मुनींना । ज्या वर्णिती वेदहि कीं 'कळेना ! '॥
करी कृपासागर तो अनेक । विनोद गोष्टी कपिसीं सुरेख।।॥ ५ ॥
नाना तपें, जप, मख, व्रत, नेम यांना। मानीतसे सकृप रामहि एवढें ना॥
तो प्रेम निर्मळचि केवळ एक पाही।।श्रीराम त्यावरिच तुष्ट अतीव होई । ६
तीं भूषणें सुवसनें कपि अंगिं लेती । येती जिथें रघुवर प्रभु चारुमूर्ती ॥
पाहोनियां कपिगणीं बहुवर्ण भूषा। येई फिरूनि फिरुनि स्मित कोसलेशा ।॥
देखे दयार्द्र नयनीं प्रभु त्या कपींना । बोले वचें मृदुल गौरवयुक्त नाना॥
"म्यां मारिलें दशमुखा तुमच्याच तेजें।राज्यीं बिभीषणहि बैसविला असा जे
आपापल्या गृहिं फिरा तुम्हि सर्व आतां।मातें स्मरा लवहि चित्तिं धरा न चिंता"
तें प्रेमविव्हळ कपीहि समस्त होती । जोडोनि पाणि वदले सुविनीत उक्ति॥ ९

## तरंग २६ वा

आलेंचि सत्वर विमान तया स्थलासी । ज्या नाम दंडक, मनोहर जें विशेषीं ॥
जेथें अगस्ति, मुनिवर्य अनेक त्यांतें । भेटावयास रघुनायक जाय तेथें ॥१॥
सन्मान्या करींकडुनि मेळवुनी सदाशी । ये चित्रकूटिं जगदीश्वर सौख्यराशि ॥
संतोषवूनि मुनिंना तिथल्या, प्रभूनीं । केला प्रवास पुढतीं अति शीघ्रमानीं ॥
मार्गी पुढें जनकजेप्रति दावि राम । सुश्यामवर्ण यमुना अघहा निकाम ॥
देखे पुढें सुरनदी अति पुण्यकारी । "सीते! प्रणाम कर हीस" वदे खरारि॥३॥
"हा देख तीर्थपति पावन गे! प्रयाग । जो दर्शनें करित जन्मशताघभंग ॥
शोकापहा तशि पहा शुभ ही त्रिवेणी । श्रेणीच विष्णुनिलया, स्तुत वेदवाणीं ॥
पहा अयोध्या अति पावनी पुरी । त्रितापहारी भवरोग संहरी " ॥
वंदीत सीतेसह राम तीप्रती । रोमांचहर्षान्वित होउनी अती ॥५॥

सीतेसमेत राघव करित अयोध्येसि वंदन कृपाल ॥
लोचन भरले सलिलीं तनु पुलकीं हृदय हर्षभरिं लोल ॥६॥
मग रामचंद्र करिती हृष्ट मनें मज्जन त्रिवेणींत ॥
कपिकरवीं विप्रांतें दानें दे विविध आपण पुनीत ॥ ७ ॥

सांगे प्रभू समजवूनि मरुत्सुताला । "साकेतिं जाइं धरुनी बटुरूप बाळा!॥
तूं क्षेम सांग भरता अमुचें समग्र । तत्क्षेमवृत्त मज घेउनि येचि शीघ्र" ॥८॥

तेव्हां जाता झाला भरतातें मारुति प्रकामबल ॥
आले राघव तीवरि तेथ भरद्वाजदर्शना विमल ॥ ९ ॥
नानाप्रकारिं पूजन करिता झाला मुनीश रामाचें ॥
स्तुति करुनि राघवाची आशीर्वचनें वदे मुनी वाचें ॥१०॥
वंदुनि मुनिपदकमलां जोडुनि करयुग्म राघव मुनीश ॥
बसले चढुनि विमानीं चालु लागलें त्वरें अयोध्येश ॥११॥
इकडे निषाद ऐके ' आले प्रभु रामराय परतोनी ॥ ! '
तो स्वजना बोलावी "नावा! नावा!" करोनि निजवाणीं!॥१२॥
ओलांडुनि गंगेतें येतां उत्तरतटासि तें यान ॥
आज्ञेनें प्रभुच्या तें उतरवितां उतरले सकल तूर्ण ॥१३॥

गंगेसि तों पूजित जानकी तिथें । बहु प्रकारीं चरणीं पडोनि तें ॥
आशीसि गंगा मुदिं दे मनोहर । "सौभाग्य नान्दो तव गे निरंतर!"॥
ऐकोनि येई गुह भक्तिभावन । येई प्रभूपाशिं अतीव हर्षुन ॥
पाहूनि रामासह जानकीसती । भूमीं पडे शुद्धि न राहिलीच ती ! ॥१५॥
घेऊनि हृदिं निज कृपानिधानें त्यासि बसविलें निजनिकट ।
क्षेम विचारी त्या प्रभुराघव, वदला गुह तैं निष्कपट ॥
"विरिंचि शंकर सेविति ज्यातें तें पद–पंकज बघिं अपुलें ।
हे सुखधामा! पूर्णकाम विभु पदकंजा मीं तव नमिलें!" ॥१६॥
सर्वपरीं जो अधम असा गुह त्यासि भरतसम उरिं कवळी ! ।
हे मतिमंदा तुलशीदासा! मोहें विसरसि विभु जवळीं ! ॥
रावणारिचें चरित्र पावन सिद्धमुनी, सुर नित गाती ।
राघवपदरति वाढुन चित्तीं स्मरादि नाशुनि सुखवीती ॥ १७ ॥
जे सुज्ञ कीं वाचति राघवाचें । चरित्र युद्धीं विजयी प्रभूचें ॥
करील त्यांला भगवान् अनन्त । विवेकलक्ष्मीजयभूतिमन्त ॥१८॥
जाणोनियां मलिन हा कलिकाल सारा । हे मन्मना! लवकरीं कर सद्विचारा॥
श्रीरामचंद्रविभुचें त्यजुनी सुनाम। आधार अन्य नच लभ्य कुठें निकाम!॥
'लंकाकांडा'चें हें गायन मज निष्कलंक नित्य रुचो ॥
श्रीरामचंद्रयश कलिमलिना सतत मन्मनास सुचो! ॥ २० ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुष-
विध्वंसने लंकाकांडे श्रीरामचन्द्रस्य मार्गे निषादसमागम-
वर्णनं नाम षड्विंशतितमस्तरङ्गः॥

इति श्रीरामचरितमानसानुवादे श्रीखण्डेकुलचिन्तामणितनुज-
रामचन्द्रकविरचिते सुश्लोकमानसे महाकाव्ये लंकाकाण्डः
'विमलविज्ञानसंपादनो'नाम षष्ठः सोपानः
श्रीसीतारामचन्द्रकृपाप्रसादेन संपूर्णः ।

॥ शुभं भवतु ॥

॥ श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तु ॥

श्रीगणेशाय नमः ।
श्रीभवानीशंकरेश्वराभ्यां नमः । श्रीसीतारामचंद्राभ्यां नमः ।
श्रीसरस्वत्यै नमः ।

तुलसीरूपिणे श्रीमद्वाल्मीकिमुनये नमः ।
यस्य प्रसादात्सुलभं स्वर्गीयममृतं भुवि ॥ १ ॥

# ❀ सुश्लोकमानस ❀

## रामचरितमानस अर्थात् श्रीतुलसीरामायण

या महाकाव्याचा अनुवाद

### सप्तम सोपान

# उत्तरकांड

तरंग १ ला

### मंगलाचरण

मयूरकण्ठच्छविनील यत्तनू । जो श्रेष्ठ हो देवगणांमध्यें प्रभू ॥
ज्या विप्रपादाम्बुजचिह्न हो उरीं । मी तो नमीं राम रमापती हरी ॥१॥
पीतांबरें शोभत जो सुशोभन । जो सुप्रसन्न प्रभु पद्मलोचन ॥
करीं सजे चापशरादि संतत । संवेष्टिला जो कपियूथिं सद्धित ॥२॥
जो लक्ष्मणें सेवियला सदोदित । त्या जानकीशा मम वंदनें नित ॥
जो पुष्पकारूढ विराजला अती । त्या रामरायीं मम हो सदा रति ॥३॥

श्रीराघवाचें पदकंज मंजुल । महेश्वरें वंदित जें सुकोमल ॥
संवाहि ज्यातें करपद्मिं जानकी । जें मोहवी चित्तकचित्तभृंग कीं ! ॥४॥
कुन्देन्दुशंखोज्ज्वलगौरसुन्दर । गौरीपती इष्टद जो महेश्वर ॥
कारुण्यपूर्णांबुजलोचना नमीं । श्रीशंकरा त्या स्मरनाशनास मी ॥५॥
वर्षे सराया चवदा वनावधि । राहे उणा वासर एकला मधीं ॥
साकेति नारीनर पौर दुर्बल । चोहींकडे रामवियोगिं आकुल ॥६॥
जो कीं जणों शकुन सुंदर भव्यकारी । झालीं प्रसन्न हृदयें सगळींच भारी ॥
वाटे सुरम्य नगरी सकलप्रकारीं । जें सूचवी रघुवरागम नाहिं दूरीं ॥७॥
कौसल्यादी सर्व माता प्रहृष्ट । झाल्या ऐशा कीं गमे, त्यांस इष्ट ॥
वार्ता कोणी सांगणारे मिळाले । कीं, ये राम श्रीसवें बंधुमेळें ! ॥८॥
भरताचा उजवा भुज, लोचन हे स्फुरण पावले बहुदा ॥
शुभ शकुन जाणुनी मन करत विचारा, भरोनि पूर्ण मुदा ॥९॥
आधार जो अवधि, एक दिनीं सरेल । जाणोनि होत हृदिं तो अति खेदशील ॥
"हो काय कारण ? अजून न येति नाथ । मानोनि हा कुटिल, ते मज नाठवीत !
तो भाग्यवान् खचित लक्ष्मण होत धन्य । जो रामपादकमलीं रमला अनन्य ॥
जाणे प्रभू कुटिल मी कपटी असाच । याकारणें मजसि संगतिं घे न साच ! ११
झालें असेल जर तन्मत निश्चयें हें । कल्पांतिंही करण निस्तरणार आहे ! ॥
माझे प्रभू परि न पाहति दोष दासीं । ते दीनबन्धु मृदुचित्त, सुभावराशि !
विश्वास या मम जिवा दृढ हाच होय । भेटेनि राम, शकुना शुभ ये अमेय ॥
संपोनियां अवधि ही जर मी जिवंत । माझ्यापरी अधम कोणि न या जगात !"
श्रीरामचंद्रविरहाब्धित मग्नचित्त । जों होय तो भरत कोमल रामभक्त ॥
तों विप्ररूप हनुमन्त समोर येई । नौकाचं त्या पडतया जणु येत कायी ! १४
दिसला भरत तयातें कृशतनु, दर्भासनीं जटामुकुट ॥
'श्रीराम राम राघव !' जपता नयनांबुनीं स्रवत लोट ! ॥१५॥
हो हृष्ट त्या बघुनियां हनुमन्त चित्तीं । रोमांचकाय, नयनाश्रुहि ज्या वहाती ॥
मानी अतीव सुख तो बहुता परीनीं । बोले सुधेसम अशी श्रुतिरम्य वाणी–१६
"ज्याच्या वियोगिं अतिदुःखित सर्वयाम । ज्याच्या गुणांसतत यांनिशि तूं निकाम
जो सज्जना सुखद राघववंशदीप । तो राम देवमुनिपालक ये समीप ! ॥१७॥
जिंकी रणीं रिपुस, यशास देव गाती । सीतानुजांसहित ये नगरा सुमूर्ति !"
तें ऐकतांचि वच, दुःख समस्त लुप्त । तृष्णातुरा अमृतलाभचि काय होत !

'आहांत कोण तुम्हि तात! कुठून आलां? ऐकीवलीं प्रियवचें तुम्हि मन्मनाला'
" मी वायुनन्दन कपी हनुमन्त होय! ऐका कृपाजलनिधे! मम नामधेय
मी दीनबंधु-विभु-राघवदास होय " । हें ऐकतां भरत भेटत त्या अमेय ॥
तो प्रेमभाव हृदिं केविं वरं समावे! नेत्र स्त्रवे भरुनिं, हर्षित गात्र व्हावें! २०
उद्गारला भरत " दुःख न लेश चित्तीं कीं पाहिली कपिवरा! तव भक्तिमूर्ति ॥
भासे मदीय हृदयप्रिय रामराय । हा भेटला तव मनोहररूपिं काय ! ! " ॥
त्यातें पुढें भरत तैं कुशलें कितीदा बोले " तुला वितरुं तें वद काय मोदा!
या वृत्ततुल्य जगतीतलिं काय आहे ? चित्तीं विचार करुनी नच कांहिं लाहें!
केव्हां न तात फिटती उपकार तुझे । तूं रामवृत्त मज ऐकविं गा ! असें जें!"
तेव्हां नमूनि भरता हनुमंत वर्णी । श्रीरामकीर्तिगुणगान यथार्थवाणी ॥२३॥
बोले तदा भरत "सांग कपे! मला कीं स्वामी कृपाळ रघुनायक धन्य लोकीं
दासास या स्मरतसे हृदिं कायं राम !" ऐकोनि तैं पवननंदन हर्षधाम २४
" निजदासाचें रघुकुलभूषण करि स्मरण का मम सार्चे ? "
भरतोक्तीच्या आर्तिभरें त्या पुलकित नमि कपि, वदत वचें—॥
" रघुवर निजमुखिं गुणगण गाई चराचराधिप नित ज्याचे ।
परमपुण्य तो सद्गुणसिंधू नवल न त्याचे विनयाचें ! ॥ २५ ॥
तूं प्राणसा दयित नाथचि राघवाशी! हें सत्य मी वदत रे! तुज सौख्यवर्षी!"
ऐकोनि तैं भरत मारुतितें कितीदा । आलिंगि गाढ, उर त्या पुरलें न मोदा
तो नम्रशीर्ष चरणीं भरता नमोनी । आला त्वरें कपि रघूत्तमसन्निधानीं॥
सांगे तदा कुशल सर्व सहर्ष राम । चाले विमानिं पुढतीं विभु सौख्यधाम॥
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने
उत्तरकांडे हनुमदागमनवर्णनं नाम प्रथमस्तरङ्गः ॥

—०—

## तरंग २ रा

महर्षांनें येई भरत मग तो कोसलपुरा ।
वसिष्ठातें सांगे ' परत विभु ये आत्मनगरा '
निवेदी वार्ता ती सुमधुर अशी मंदिरिं निज
' प्रभु श्रीरामाचे कुशल अजि देखूं पदरज ।

ऐकोनि वृत्त तें सान्या माता उठुनि धावती ॥
रामक्षेम निवेदूनी भरतें शान्विल्या अती ! ॥ २ ॥
दधि, दूर्वा, गोरोचन, पुष्पफलें, सर्व मंगलनिदानें ॥
तुलसीदलें नवीनें सुवर्णताटीं भरूनि मोदानें ॥ ३ ॥
गजगामिनी निघाल्या ललना मधुरस्वरीं म्हणत गानें ॥
जे जे होते जैसे तैसे ते धावले प्रहर्षानें ! ॥ ४ ॥

येती न ते सगतिं बालवृन्दाप्रति । वृद्धासही घेति न तेवि संगतीं ॥
परस्परातें पुसती कुतूहलें । "तुम्हीं दयाब्धी रघुराय देखिले ?" ॥ ५ ॥
'येत प्रभू ' हें कळताच, पावनी । झाली अयोध्यानगरी सुखा खनी ! ॥
वाहे नदी श्रीसरयू मुनिर्मला । सुगंध मंदानिल शीत वाहिला ! ॥ ६ ॥

घेउनी गुरु तसा अनुजातें । ब्रह्मवृन्द निजसेवकही ते ॥
सर्व हृष्ट अति आदरिं जात । राघवा भरत सन्मुख भक्त ॥ ७ ॥

सज्जावरी चढुनि तें बहुसख्य रामा । येतां विमान बघती हृदिं हर्षधामा॥
अत्यंत सुंदरस्वरें म्हणतात गाणी । जीं पूर्ण मंगल अशीं भरलीं कथानीं ॥८
तो पौर्णिमेन्दु जणु सुंदर रामचंद्र । त्या पाहताच पुर हर्षित हो समुद्र ॥
कोलाहला भरति पाहुनि यइ चित्तीं।आनन्दपूर्ण ललना जणु वीचि होती।
श्रीराम भानुकुलवारिजभानुराय । दावी कपींस इकड पुर तें अमेय ॥
"लंकेश ! अंगद ! कपीश ! पहा पुरी ही। अ यत पुण्यतम, देशांचि रम्य होई !॥
वैकुण्ठवर्णन जरी सगळे करीती । आहे पुराण निगमीं जरि थोर कीर्ति–॥
साकेततुल्य मज आवडतें न तेंही । हे जाणणार जगतीं जन फार नाहीं।
हे जन्मभूमि नगरी मम रम्यरूपा । दिग्भागि उत्तरिं वहे सरयू अपापा ॥
जीच्यात मज्जन करून विनाप्रयास । माझ्यासमीप नर पावत पुण्यवास !
मातें अति प्रिय हिच्यामधि वासकारी।ही सौख्यकारि नगरी मम धामदात्री"
सारे प्रहृष्ट कपि ऐकुनिया प्रभूक्ति । "तू धन्य धन्य पुरि ! यशास राम गाती।"

पाहोनिया लोक समस्त येत । कृपाबुधि श्रीभगवान् अनन्त ॥
आज्ञापुनी उत्तम त्या विमाना । तें धाववी तो पुरसन्निधाना ॥ १४ ॥
उतरूनि प्रभु त्या कपि पुष्पका । " अजि कुबेरगृहाप्रति जाइ का।"
प्रभुनिदेशिं सहर्षाचि तें चले । परि वियोगिहि दुःखित जाहलें। ॥ १५॥

आले तदा भरतसंगति सर्व लोक । जे की कृशांग रघुवीरवियोगशोक ॥
तेव्हां वसिष्ठ मुनिनायक वामदेव । देखोनि राम धनु, सायक ठेवि सर्व ॥
घांवोनि तो धरितसे गुरुच्या पदाब्जां । रोमांचकाय अनुजासह हो महौजा !
भेटोनि त्या कुशल तें पुसती मुनीशासागे विभू "करि कृपा तुमची अशेष !"
सर्वां द्विजां नमित राम विनम्रशापि । धर्मी धुरंधर रघूत्तम पुण्यपोषी ॥
हस्ताब्जि घे भरत रामपदांबुजातें । वंदीति देव मुनि शाम्भमहेश ज्यातें ॥
भूमीं पडे भरत तें उठतां उठे न । घे त्या उरीं निज दयानिधि ऊचलून !
तो श्यामलाग पुलकीं भरला दयार्द्र । नेत्रीं नवांबुजसमीं जलबिन्दु सान्द्र ॥१९॥

अंबुजलोचनिं जलधाराभर सुंदर तनुवरि पुलक भरे ।
प्रेमातिशयें अनुजा, हृदयें भिळत त्रिभुवनविभु त्वरें ॥
अनुज प्रभुशीं मिळता सुषमा तिजला उपमा मज न सुचे ।
जणुं प्रेमरसशृंगारांचे पुतळे शोभति ते साचे ! ! ॥ २० ॥
क्षेम कृपानिधि विचारि भरता, परि वेगें ना उत्तर ये ।
गौरि ! ऐक तें अगम वाङ्मना, सुख अनुभवणें तें हृदयें ! ॥
" कुशलचि आतां कोशलनाथा ! आर्त पुसवितां दर्शनिं या ।
वियोगाब्धिमधि बुडतां मज कर दिधला प्रभुंनीं करुनि दया ! "

भेटे शत्रुघ्नातें राम प्रभुराय हृदयिं कवळून ।
परमप्रेमळ बंधुद्वय भेटे भरतलक्ष्मण मिळून ! ॥ २२ ॥
शत्रुघ्न लक्ष्मण तसे भेटुनि मग विरहदुःख शमवीती ॥
सानुज भरतें वंदुनि सीतापद सौख्य सेविलें चित्तीं ॥ २३ ॥
पुरवासी लोकाप्रति प्रभुवर हर्षें विलोकिता झाला ॥
सर्व विपत्ती नेई वियोगजनिता क्षणार्धिं लयाला ! ॥ २४ ॥
प्रेमातुर सर्वजना प्रभु पाहुनि करित कौतुक कृपाल ॥
प्रकटुनि अनंतरूपें भेटे सर्वां यथोचित नृपाल ! ॥ २५ ॥

सर्वांचि पाहत विभू सदयावलोकीं । नारीनरां करित तो सकला विशोकी ॥
सर्वांस भेटत असे भगवान् क्षणात । हें मर्म गौरि ! कवणां न कळोनि येत !

येशाप्रकारें सकला सुखवूनि रघूत्तम ॥
चालले पुढतीं मार्गी गुणशील–मनोरम ॥ २७ ॥

सोत्कण्ठ सकला माता कोसल्यादिक धांवुनी ॥
आल्या देखुनियां वत्सा वेगें धेनूच्या कुणी ! ॥ २८ ॥

तान्ह्या वत्सा त्यजुनि गृहीं, वनिं धेनु चराया नेलेली ।
सांजे नगरा हुंबरत धावे फुट्टनी पान्हा त्याजवळीं ॥
भेटति सकला माता प्रेमें प्रभुसि बोलुनी लडिवाळ ।
विरहविपत्ती लुप्त होउनी अमित हर्षसुख ये जवळ ! ! ! ॥२९॥

भेटे सुमित्राजननी स्वनन्दना । जाणोनि त्या रामपदाब्जमोदना ॥
संकोचुनी फारचि चित्ति कैकयी । श्रीरामचन्द्राप्रति भेटली तई ॥३०॥
सौमित्र सान्या जननीसि भेटत । आशीर्वचें घेत मनीं प्रहर्षित ॥
पुनःपुन्हां भेटत कैकयीप्रत । तरी मनःक्षोभ न सर्व लोपत ! ॥३१॥
श्वश्रूंप्रती सकल भेटलि हृष्ट सीता । लागोनियां चरणिं भक्तिभरें पुनीता ॥
आशीर्वचें वदति त्या कुशला पुसोनी। सौभाग्य गे! तव असो ध्रुव सत्यवाणी
सान्या पहाति रघुरायमुखांबुजातें । जाणोनि मंगल उदश्रु न होति चित्तें ॥
त्या आरती कनकताटिं तयां करांती। न्याहाळिती प्रभुतनू कितिदा तरी ती॥
ओवाळिती कितिक वस्तु तयावरूनी । चित्तामधें परमहर्षभरें भरूनी ॥
पुत्रा विलोकि कितिदा तरि राममाता । स्नेहार्द्रशील रणधीर दयार्द्रचित्ता॥

ती माउली कितिकदा हृदयी विचारी । 'लंकापतीस वधि हा कवण्याप्रकारीं!
दोनी नितान्त सुकुमार कुमार माझे । कोठें महाबल निशाचर वीर ते जे !' ॥
सीतेसमेत·विभुतें सहलक्ष्मणातें । माता विलोकिति महोत्सवपूर्ण चित्तें ॥
आनंदसागर अमेयचि तन्मनींचा । रोमाञ्चती कितिकदां; वदवे न वाचा ! ॥
सुग्रीव नील नल अंगद जांबुवत । लंकापती पवननंदन शीलयुक्त ॥
तैसेच सर्व कपिवीर मनोज्ञवेष । होती धरून नररूप उणें न लेश ! ॥३७॥

भरताचें शील व्रत नियम रघूत्तमपदांबुजिं रती ती ॥
सादर वर्णिति सारे प्रेमभरें भरतसंस्तवीं रमती ॥ ३८ ॥
देखुनि नागरिकांची रीति मनोज्ञा सुशील-भाव कृति ॥
प्रीति श्रीरामपदीं उत्कट सारे प्रशंसुनी गाती ॥ ३९ ॥

सान्या सख्यांस मग बोलति रामराया। लावी वसिष्ठपदिं वदन त्यां कराया ॥
सांगेहि "हे कुलगुरू अमुचे वसिष्ठ । यांच्या कृपें दनुज सर्व रणांत नष्ट" ॥४०॥

वागे गुरुसि विभु "हे मम मित्र सारे। नौकाच कीं रणसमुद्रिं विराजणारे॥
माझ्या हितार्थ निज जन्मचि वाहती हे।मातें मुने! भरतही प्रिय तेविं नोहे!"
आनंदमग्न ते होती ऐकोनी प्रभुभाषित ॥
क्षणोक्षणीं हृदीं होती सौख्यानें सर्व हर्षित ॥ ४२ ॥
कौसल्यापदकमलीं नमिती मग ते शिरासि लववूनी ॥
हर्षे आशी दे ती " आहां मज रामसे प्रिय" म्हणूनी ॥४३॥
सुमनवृष्टि नभींहुनि वर्षली। प्रभु निघे भवना सुखसागर ॥
चढुनि सौधतलीं बघती किती। युवतिवृंद विभूषि मनोहर ॥४४॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे भरतसमागमवर्णनं नाम द्वितीयस्तरङ्गः ॥

## तरंग ३ रा

द्वारीं द्वारीं रम्य सौवर्ण कुंभ। सर्वांनींही ठेवियेले सुशोम ॥
गेहा गेहा तोरणें सत्पताका। लावीयेल्या मंगलार्थी अनेका ॥ १ ॥
मार्गी मार्गीं सिंचिलें चारु वारि। सद्गंधानें होय जें चित्तहारी ॥
चौकीं चौकीं हास्तिमुक्ताफलानीं। केली शोभा वर्णणें केविं कोणीं! ॥२॥
नानारीती शोभलीं मंगलें तीं। वाद्यें नाना मंगलें वाजताती ॥
ओवाळाया सिद्ध सर्वत्र नारी। आशीर्वादा हर्षुनी देति सारीं ॥ ३ ॥
घेऊनीयां आरत्या स्वर्ण तार्टीं। ओवाळीती अंगना रामभेटीं ॥
गाणीं गाती सुस्वना हर्षपूर्ण। मांगल्याला ना तुला अन्य कोण! ॥४॥
त्या आरती आर्तिहरा करोनी। श्रीभानुवंशांबुजभानु तें ती ॥
उत्साह सर्वत्र अतीव नादे। आनंद-मांगल्य जनात कोंदे ॥ ५ ॥
साकेतशोभा–शुभसंपदा ती। श्रीशारदा, वेद, अहीश गाती ॥
यथार्थगानीं नच शक्ति त्याही। कैचें उमे! शक्य नरास होई!! ॥६॥
गमे अयोध्या सरसीच विस्तृत। नारी जणों कैरविणी विकारुत ॥
श्रीराघवाचा विरहार्क लोपता। पूर्णेन्दुसा राम तथा विलोकता! ॥ ७ ॥
झाल्या अनेक शकुनावलि पुण्यदायी। आकाशिं दुंदुभि निनादति हर्षवाही॥
नारीनरां नगरिच्या अति सौख्य देत। श्रीरामचंद्र भगवान् भवनांत येत॥८॥

बाणोनि लज्जितमती अति कैकयी ती । आई प्रभू प्रथम तद्गृहिं सौख्यमूर्ति ॥
तीतें प्रबोध करुनी सुखवूनि चित्ता । ये रामराय निजमंदिरिं हृष्टचेता ॥९॥
मंदिरीं आपुल्या ये जों कृपासागर राघव ॥
सर्व नारीनरा झालें सौख्य ज्या न्यून ना लव ! ॥१०॥
बोले वसिष्ठ गुरु बोल्वुनी द्विजांसी । "हो आज उत्तम घडी, दिन पुण्यराशि
आज्ञा तुम्हीं सकलविप्रगणीं करावी । सिंहासनीं प्रभु बसे रघुनाथ जेवीं" ११
ती आयकोनि अतिरम्य वसिष्ठवाणी । झाले प्रहृष्ट हृदयीं द्विज सर्वमानीं ॥
कित्येक विप्र वदले अति मधुरोक्तीं । "रामाभिषेक जगतीं अभिरामकीर्ति १२
आता नकोचि मुनिनाथ! विलंब यास। राज्याभिषिक्त झणिं हो ! प्रभु जानकीश"
आज्ञापिला मग सुमंत झणीं मुनीशें । तो एकताक्षणिं निघे तिथुनी प्रहर्षे १३
केले सुसिद्ध रथवाजि मतंगजादि । प्रेषूनि दूत झणिं मंगलवस्तु साधी ॥
सर्वांसमेत परतोन सुमंत येत । वंदी वसिष्ठ मुनिवर्यपदीं विनीत ॥१४॥
झाली अयोध्यानगरी सुशोभना । देवीं कृता संतत पुष्पवर्षणा ॥
सांगे प्रभू बोलवुनी स्वसेवकां । 'स्नानें सख्यांतें करवाल आधिं कां!' ॥१५॥
आज्ञापिता चहुंकडे जन धांवले ते । स्नानें स्वैर करविती सुग्रलादिकांतें ॥
कारुण्यसिंधु भरता मग बोल्वूनी । त्याच्या जटासि उगवी प्रभु आत्मपाणीं
स्नानें तिघांहि निजबंधुसि घालवीत । तो भक्तवत्सल कृपानिधि रामनाथ ॥
वानील कोण भरतोत्तमभक्तिराशि । तें कोमलत्व विभुचेंहि तसें विशेषीं ॥१७॥
जें कोटि शेषशतही शकती न वानूं । तें शक्य होइल इथें मज केविं मानूं ! ॥
श्रीराम घे विवरुनी अपुल्या जटांसी । स्नानासि आचरि तसें गुरुसन्निदेशीं ॥
स्नान समाचरुनि प्रभु भूषिततनु शोभले किती राम ! ॥
कोटि अनंगासम ती कांति तदीया नितान्त अभिराम !! ॥१९॥
अन्यादरें सादर सासवांनीं । श्रीनेसही उत्तम नाहवोनि ॥
दिव्यांबरीं भूषणिं सर्व अंगीं । ती भूषवीली शुभ त्या प्रसंगीं ॥२०॥
रामाचिया वामदिशीं विराजे । लक्ष्मीस्वरूपा गुणखाणि की जे ।
दृष्टा तिला देखुनि सर्व माता । ये जन्मत्याचें फलपुण्य हातां ! ॥२१॥
एकें सवेंचा ! विधि शंभु देव ते । आले विमानांतुनि उतरले तिथें ॥
बघावया त्या सुखकंद राघवा । सानंद सारे मुनिवृंद तेधवां ॥२२॥
रामा बघोनिच भरे मुनि भक्तिभारें । सिंहासनास झणिं मागवि हर्षपूरें ॥
तें दिव्य भानुसम तेज अवर्णनीय । विप्रांसि वंदुनि बसे वरि रामराय ॥२३

श्रीजानकीसहित राम बघोनि तैसे । प्रेमें अतीव भरले मुनिवृंद हर्षें ॥
गाईयले द्विजवरीं श्रुतिमंत्र घोषें । देवर्षि गर्जति नभीं जयघोष तोषें । २४
आरंभिला तिलक आधि वसिष्ठहस्तें । सारे मुनीहि कथितां करिती पुन्हां तें
पुत्रा विलोकुनि भरे मुदिं राममाता । ओवाळि ती रघुवरा कितिदां स्वहस्तां
दानें दिलीं द्विजगणा विविधप्रकारीं । केली अयाचकचि याचकराजि सारी
सिंहासनीं त्रिभुवनेश्वर बैसलेले । पाहोनि देवगणिं दुंदुभि वाजवीले ॥२६॥

नभीं दुंदुभी विपुल वाजती गाती किन्नर गंधर्व ।
दंग अप्सरोवृंद नर्तनीं आनंदित मुनि सुर सर्व ॥
भरतादिक ते बंधु बिभीषण अंगद मारुतिसह सारे ।
छत्र, चामर, व्यजन, शरासन, शक्तिचर्म अधि धरणारे ॥२७
श्रीसीतेसह रविकुलभूषण अनन्तकामच्छवि विलसे ।
नवमेघद्युति पीतांबरधर भुलवित मुनिवरमानसें ॥
मुकुटांगदसम सुरम्यभूषा प्रत्यंगीं अति कांतिमती ।
कमलविलोचन विशाल उर भुज; धन्यचि नर त्या जे बघती ! २८

अत्यंत शोभा-सुख, तो समाज । न वर्णवे रे ! मज पक्षिराज ! ॥
वर्णोत सारे श्रुति-शेष-वेद । शंभूच जाणे रस सत्यशुद्ध ॥ २९ ॥
करोनि रामस्तुति भिन्न भिन्न । गेले स्वधामा सुर ते निघून ॥
तों बंदिवेषांसि धरूनि येती । श्रीरामरायाप्रति वेदमूर्ति ॥ ३० ॥
अत्यादरें त्यांस कृपालु राम । करीतसे स्वागत सौख्यधाम ॥
कोणासही तें कळलें न मर्म । स्तवीति ते राघवजन्मकर्म-॥ ३१ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे कलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे रामराज्याभिषेकवर्णनं नाम तृतीयस्तरङ्गः ॥

— :o: —

## तरंग ४ था

" सगुण निर्गुणा जय ! जय ! रामा ! निरुपमरूपा भूपवरा !
प्रबल खलांतें निजबलिं वधिसी रावणराक्षसनाशकरा ॥
नरावतारें संसृतिभारा नाशुनि हरिसी दुःखगण ।
प्रभो ! दयाळा ! शक्तिसयुता प्रणतरक्षणा तुज नमन ॥ १ ॥

अगम्य तुझिया मायापाशीं हरे ! सुरासुर चराचर ।
भ्रमती भवपथिं नागनरादिक कालकर्मगुणिं निरंतर ॥
ज्यावरिं करुणाकटाक्षि बघसी त्रिविध तयांचें दुःख सरे ।
भवमयनाशनदक्षा रामा ! रक्ष अम्हां गा ! तुज नमुं रे ! ॥ २॥
ज्ञानें मानें मत्तपणें जे तुज भवहरणा विस्मरती ।
ते सुरदुर्लभ पदाहुनीही पडति बघतसूं अम्हि जगतीं ॥
इढविश्वासें त्यजुनि दुराशा तव दास्यीं जे रममाण ।
श्रमाविणें तव नामस्मरणें तरति भवा त्या स्मरत मन ॥ ३ ॥
यत्पद पूजिति शिवविधि, यद्रज लागुनि तरली मुनिगृहिणी ।
यत्पदनखभव विश्वपावनी वंद्य मुनिगणां सुरतटिनी ॥
ध्वजवज्रांकुशकंजचिह्नितें कंटककिणयुत वनगमनें ।
तीं पदकमलें सीतानाथा ! भजतों आम्ही सतत मनें ॥ ४ ॥
व्यक्त मूळ नच अनादि तरु जो निगमागमिं मत चतुस्त्वची ।
स्कन्ध सहा ज्या पंचाधिक विस शाखा बहु सुमदल सुरुचि ॥
कटुमधु ऐशीं द्विविध फलें ज्या एकलि वल्ली आश्रयिणी ।
पुष्पपल्लवीं नवललिता तुज भवतरुरूपा लवुं नमुनी ॥ ५ ॥
अज अद्वैत ब्रह्म अनुभवें गम्य मनाहुनि पर म्हणते ।
ध्याते त्यातें जाणोतचि परि आम्हि गाऊं तुज सगुणातें ॥
करुणायतना प्रभो ! गुणनिधे ! दे तूं आम्हा वर हाच ।
मनोवचनकृतिं अविकृत तव पदिं व्हावें आम्ही रत साच !"

सर्वांचिया देखत या प्रकारीं । केली उदार स्तुति वेदिं चारीं ।
होती पुन्हां गुप्त लगेचि ते कीं । जाती निघोनी ब्रह्मिं धातृलोकीं ॥७॥
हे वैनतेय ! परिसें, इतुक्यांत तेथें । येई उमारमण संनिध राघवातें ॥
रामा स्तवीत अति भक्तिभरें महेश । दाटे गळा, तनु वहे पुलकप्रहर्ष॥८॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकालिकलुषविध्वंसने उत्तरकांडे वेदस्तुतिवर्णनं नाम चतुर्थस्तरङ्गः ॥

—०७-७७—

## तरंग ५ वा

" प्रभो मेघश्यामा ! जय जय रमाचित्तरमणा ! ।
त्रितापां वारोनी कर अभय भक्तां स्वशरणां ॥
अयोध्येशा रामा ! खल दशमुखा संहरुनिया ।
अशोका त्वां केली सकल अवनी, पाळ सदया ! ॥ १ ॥
तुझ्या बाणाग्नीच्या प्रखरतर तेजांत पडुन ।
पतंगाऐसे ते रजनिचर गेलेचि जळुन ॥
धराभूपा रम्या अतिशय उदारा रघुवरा ! ।
करीं माता शोभे, शर धनु तुझ्या साजति करां ॥ २ ॥
मदाची मोहाची अमित ममतारूप रजनी ।
तिच्या अंधारा तूं निवटिसि जणूं वासरमणि ॥
जणों व्याधा ऐसा मदन बहु पीडी जनमृगां ।
कुभोगांच्या बाणीं अशरण जना रक्ष शर्णि गा ! ॥ ३ ॥
सदा हा अज्ञानें विषयवनिं जीव भ्रमतसे ।
अनेकां रोगाहीं कटुतर वियोगीं सुख नसे ॥
तुझ्या पादाभोजा विसरणिच हें दुःखफळ ये ।
म्हणोनी श्रीरामा ! तुजसि कधिही विस्मरुं नये ! ॥ ४ ॥

जे ना करीति तव पादसरोजभक्ति । ते या अगाध बुडती भवसागरान्तीं ॥
ते दीन दुःखि नित पापमलांत लिप्त । ज्यांची रती नच तुझ्या पदपंकजांत ॥
ज्यांच्या मनीं तव कथा अवलंब नित्य । त्यांनाच आवडति संत, अनंत सत्य ॥
त्यांना न राग, मद, मान न लोभ ऐसे । त्यांनाच वैभव विपत्ति, समान भासे॥
याकारणेंचि तव सेवक होति हर्षे । योगादिका त्यजुनि, सन्मुनि सुज्ञ ऐसे ॥
नेमेंचि ते तव निरंतर भक्त होती । सेवीति पादसरसीरुह शुद्धचित्तीं ! ॥७॥
मानोनि मान अपमान समानमान । सारेच संत सुखि संचरती अदीन ॥
तूं नांदसी मुनिमनोऽम्बुजभृंगसाच । हे राघवा ! समरधीर अनादि तूंच ॥८॥
त्वन्नाम संतत जपें, तुज मी नमीत । संसाररोगमदमानरिपो ! अनन्त ! ॥
हे सद्गुणांबुधिसुशील ! कृपानिधाना ! । सीतापते ! नमित मी पदपंकजांना ॥

नाहीं मदीय रघुनन्दन भेदबुद्धि । हे भूपते ! बघ सुदीनजना कृपाब्धि ॥
मी प्रार्थितों फिरफिरूनि सहर्ष हेंचि । दे साधुसग, तव भक्ति शुभाढ्य साची !"
वर्णोनि रामगुण उत्तम, शभु ऐसे । कैलासिं जाय निघुनी हृदयप्रहर्षे ॥
श्रीरामराय कपिलागिं अनेक देई । राहावयास सुरवास समृद्धिवाही ॥११॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे महाकाव्ये
कलिकलुषविध्वसने उत्तरकाण्डे महादेवस्तुतिवर्णन
नाम पञ्चमस्तरङ्गः ॥

—:•:—

## तरग ६ वा

ऐकें खगवर गरुडा ! रामकथा ही जगात पुण्यतमा ॥
ताप त्रिविध विनाशी भवभयवन करित दग्ध दावसमा ! ॥१॥
अभिषेकमहोत्सव हा श्रीरामाचा नितान्तसुखकारी ॥
याच्या श्रवणें लाभे विरतिविवेकादि सपदा भारी ॥ २ ॥
जे ऐकतील नर गातिल या सकाम । सपत्ति सौख्य फल पावत ते निकाम ॥
लाभोनि त्यास सुरदुर्लभ सौख्यराशि । ते जाति अति रघुराजपदाबुजासी ॥३॥
जे कीं विमुक्त विषयी अथवा विरक्त । ते ऐकतील जर वर्णन हें समस्त ॥
लाभेल त्यांस सगळ्यासचि निश्चयानें । सपत्ति नित्यनव भक्ति गति क्रमानें ॥
मीं वर्णिली खगपते ! रघुनाथगाथा । माझ्या विलास मतिचा तशि ही यथार्था ॥
ही त्रासदु:खहरणी तरणी विमोहीं । वैराग्य भक्ति सुविवेक दृढत्वदा ही ॥५॥
ऐशीं अयोध्येमधिं नित्यमगलें । सारेच ते पौरसमूह रगले ॥
श्रीरामपादाबुजिं नित्य सद्रति । ज्या शभु धाता मुनिवृद वदिती ॥६॥
वस्त्रादिकीं याचकवृद तुष्टले । दानें द्विजा लाभ असख्य चागले ॥
महोत्सवीं सर्वहि जाति मानव । निमग्न होती सुख त्यां सदा नव ॥७॥
ब्रह्मानन्दीं मग्न सारे कपी ते । ज्याची प्रीती रामपादाब्जि चित्तें ॥
राहे त्या ना भान गेल्या दिनाचें । ऐसें अर्धे लोटलें वर्ष साचें ! ॥८॥
स्वप्नींहि त्यास नुरलें निजगेहमान । सताचिया हृदयिं ज्यापरि वैर तें न ॥
त्यान्या सख्यास मग राघव बोल्वीत । येवोनि सर्व नमिती प्रभुतें विनीत ९

अत्यादरें बसवि त्यांस समीप राम । तो भक्तसौख्यद वदे मृदु पूर्णकाम ॥
"तुम्हीं अतीव मम केलि असेचि सेवा । तोंडावरी तुमचिया स्तव काय गावा!
आहांत सर्व अति आवडते मला हो!। मत्कारणें त्यजियला गृहसौख्यसाहो
हे बंधु राज्य धनवैभव जानकीही । या देह गेह परिवार सुहृज्जनें हीं॥११॥
वैसीं न आवडति जेविं तुम्ही मला हे। खोटें न यांत लवमात्रहि कांहि आहे!
सर्वांधि आवडति सेवक हें दिसेचि । दासीं परी मम हृदीं अति भक्ति साची।
आतां गृहा अपुलिया तुम्हि सर्व जा हो । नेमें मदीय दृढ भक्ति तुम्हांत राहो!
जाणोनि सर्वगत सर्वहितार्थ मी हो । मत्प्रेम चित्त तुमचें बहुरीतिं वाहो!"
ऐकोनि त्या प्रभुवचा सगळेच मग्न । आहोंत कोण कवण्यास्थळिं! हें न भान!॥
पाहाति एकटक, जोडुनि हात रामा । प्रेमातिपूरिं शकले न वदूंचि कामा१४
तत्प्रेम तें प्रभु बघोनि तसें अतीव । सांगे तयां करुनि बोध सुरम्यभाव ॥
ते रामसंमुख वदूं शकती न कांहीं । पाहाति रामपदकंज पुनःपुन्हांही! १५
तों भूषणें सुवसन प्रभु मागवीत । जीं दिव्य सुंदर अनुत्तम शोभिवंत ॥
सुग्रीव तैं प्रथम भूषविला तयांनीं । घालोनि तत्तनुवरी भरतें स्वपाणीं ॥१६
आदेशितां रघुवरें मग आवडीनें । लंकापती सजविला बहु लक्ष्मणानें ॥
निस्तब्ध अंगद तिथें बसला समौन । तत्प्रीति पाहुनि विभूसहि बोलवे न!
ते जांबुवंत, नल, नील, समस्त वीर । रामें विभूषवियले करुनी अहेर ॥
चित्तांत साठवुनि गोजिरि राममूर्ति । वंदूनि राघवपदांबुज, सर्व जाती १८
तैं अंगदें उठुनि वंदन आचरोनी । डोळे भरूनि सलिलीं, पुटिल्या करानीं॥
अत्यंत नम्रपणिं बोलियली निजोक्ती । प्रेमें पुढेंच दिधलीं जणुं जीव होतीं १९

"प्रभुवरा! कृपा-सौख्य-सागरा! । शरणवत्सला हे दयाकरा! ॥
मजसि वालिनें मृत्युचे क्षणीं । तुमचिया दिलें पदरिं बांधुनी ॥२०॥
शरण आलिया रक्षणें भलें! बिरुद आपुलें नित्य शोभलें! ॥
मजसि न त्यजा भक्तपालना! । गुरु पिता तुम्ही माय मन्मना ॥२१॥
प्रभुपदांबुजा त्यजुनि उत्तमा । रिघुं कुठें तरी मी रघूत्तमा! ॥
प्रभुवरें जरा चिंतणें मनी । घरि तुम्हांविणें काय जाउनी?!!॥२२॥
घिगुणि नेणता, शक्ति-धीविण । शरण रक्षणें दीन जाणुन ॥
प्रभुपदीं करूं हलकि या कर्मी । सकल कामना आपुल्या घरीं ॥२३॥

चरणवारिजें वधुनि आपुलीं । भव तरीन मी हा धरातलीं ! " ॥
म्हणुनि हें, पडे प्रभुपदावरी । 'नच वदा ! विभो ! जा असें घरीं !'॥
ऐकोनि अंगदवचा अति त्या विनीता । कारुण्यसागर विभू करुणार्द्रचेता ॥
घे अंगदा उठवुनी कवळीत वक्षीं । अश्रु स्त्रवे रघुकुलोत्तमपंकजाक्षीं ! ॥२५॥
काढोनि माळ अपुल्या उरिंची कराब्जीं । घालीत अंगदगळा प्रभु रत्नराजि ॥
वस्त्रादिकीं सजवुनी समजावि चित्तीं । नाना प्रकारिं, मग बोळवि त्या सुकीर्ति ॥
[भक्तार्थकारि भगवान् निज तीनि बंधु । घेऊनि संगतिं निघे करुणैकसिंधु ॥
त्या सर्व भक्तसुहृदासि निरोप द्याया । सद्भाव तो कवण होइल शक्त गाया ! ॥]

शत्रुघ्नभरत लक्ष्मण यासह रघुराय भक्तसुखकारी ॥
सुहृदा निरोप द्याया निघता प्रेमें भरूनि ये भारी ! ॥ २७ ॥
अंगदहृदयीं येई प्रेमाचा अंबुधी उचंबळुनी ॥
कितिदां तो श्रीरामा अवलोकी फिरुनि फिरुनि कीं वळुनी ! ॥२८॥
दंडप्रमाण घाली वारंवार प्रभूचिया चरणीं ॥
आशा मनिं त्या ऐशी म्हणतिल का राम मज 'रहा !' म्हणुनी ! ॥२९॥
श्रीरामाचें बघणें वदणें ऋजु चालणें, हंसत मिळणें ॥
स्मरुनि स्मरुनी हृदयीं भरला तो कितिकदा कसें कळणें ! ! ॥३०॥
पाहोनि भाव विशुद्धा विनवुनि बहु नम्रवचनिं भक्तिभरें ॥
गेला अंगद, हृदयीं धरुनि प्रभुपादसारसें मधुरें ! ॥ ३१ ॥

साऱ्या कपींस अति सादर पोंचवून । ये राम बंधुहि तसे भरतादि तीन ॥
सुग्रीवपाद नमुनी मग मारुतीनें । प्रार्थीयलें बहुपरीं सुविनीततेनें ॥३२॥
" थोड तरी दिन रघूत्तमपादसेवा । येईन मी करुनिया तुजपाशिं देवा !"
"तू पुण्यपुंज पवनात्मज धन्य जा गा !।सेवावयास विभुला करुणान्तरंगा"
जाई पुढें कपिपती वच हें वदोनी । तों सांगि अंगद मरुत्तनया स्ववाणीं ॥
" मी हात जोडुनि वदें हनुमंत ! तूतें । मांझे प्रभूस वद वदन बद्धहस्तें ॥
तूं नित्य आठवण दे मम रामराया।माझ्या फिरुनि फिरुनी विनती तुला या "॥
सांगोनि हें निघत अंगद तो स्वमार्गे । ये वायुनंदन रघूत्तमपास वेगें ॥३५॥
प्रीती तदीय कथि तो प्रभुलागिं जेव्हां । होई सगद्गद हृदीं भगवंत तेव्हां ॥
[सांगोनि हें वदत काकभुशुंडि सार । जें रामवार्तिविषयिं साजत सद्विचार]३६

वज्राहुनीहि अति मानि कठोर उग्र । किंवा हवें तर सुमाहुनि कोमलाग्र ॥
श्रीरामचित्त गरुडा ! असलें अमेय । त्याचा कळेल कवणा तरि ठाव काय ? ॥
बोलावि तो मग कृपाल गुहा निषादा । त्या वस्त्रभूषण समर्पि महाप्रसादा ! ॥
सांगे "गुहा! निजगृहाप्रति जाइं आतां॥माझी स्मृती सतत वागवुनि स्वचित्तां
तूं कायवाङ्मनसिं आचर धर्म नित्य । माझा सखा भरततुल्यचि होशि सत्य ! ॥
तूं येत जा सतत या ! नगरास येथें । ( प्राणप्रिया ! सतत भेटत जाचि मातें ) " ॥
ऐकोनियां प्रभुवचां सुख पार होय । पायां पडे प्रभुसि नेत्रिं वहात तोय ! ॥
ये तो गृहीं धरुनि रामपदाब्ज चित्तीं॥रामस्वभाव किति वानित तो जनान्तीं
श्रीरामचंद्रचरिता बघुनी जनांनीं । केली स्तुती कितिकदां तयिं धन्यवाणीं ॥
नो सौख्यधाम विभुराम यदा नृपाल॥झाले सुखी सकल लोक अशोकशील॥
ोणीहि वैर न करी कवणासवेंही । रामप्रतापिं विषमत्व लयास जाई ! ॥
ापापली करिति लोकहि धर्मकर्मे । श्रुत्युक्तमार्गिं चलती सगळे स्वधर्में ! ॥
र्वांस सौख्यभर, दुःखि कुणीच नाहीं । सारेच निर्भय, न रोग कुणास पाही॥
ीरामराज्यिं कवणाहि नसेचि ताप । ज्या देह–दैवभव भौतिक वा स्वरूप॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने
उत्तरकांडे रामराज्यवर्णनं नाम षष्ठस्तरङ्गः ॥



## तरंग ७ वा

सुप्रीति नांदत परस्पर सर्व लोकीं । श्रुत्युक्तरीति निजधर्मि रती तया कीं ॥
सद्धर्म पूर्ण जगिं चालत चारि पायीं । कीं सत्य-शौच-सदयत्व-सुदातृतांहीं ॥१॥
स्वप्नांतही अघ नसे लवलेश कोठें । श्रीरामभक्तिरत लोक लहान मोठे ॥
नारीनरां घडतसे परमार्थ थोर । सारेच पात्र परमागतिलागिं पोर ॥२॥
अल्पायु कोणि न, नुरे कसलीहि पीडा । सारेचि सुंदर अरोगपणाहि गाढा ॥
नोहे दरिद्रि कुणि, दुःखि न, दीन वा न । कोणी अज्ञाणि न,न लक्षणहीन कोण !
निर्दंभ सर्व जन, पुण्य–सुधर्ममग्न । नारी तसे नर गुणी चतुराइपूर्ण ॥
ज्ञानी गुणज्ञमति पंडित सर्व रीतीं । सारे कृतज्ञ, कपटी बुध नैव होती ॥४॥

सान्या चराचरजगीं परिसें खगेशा ।। श्रीरामराज्यिं नच संभव दुःखलेशा ॥
कर्म–स्वभाव–गुण–काल–भवा विपत्ति । होती न अल्पहि कुठें अवनीतलीं ती
काची जिला गमत सप्तहि सागराची । पृथ्वी अशी रघुपति प्रतिपाळि साची ।।
यद्रोमि रोमि भुवनें वसती अनन्त । तो हो धरापति, विशेष न काहिं यात !! ६
माहात्म्य जाणुनिहि तें प्रभुचें मनाशीं । तो 'भूप एक' म्हणणें लघुतार्थदर्शी !
जे जाणती खगवरा ! महिमा प्रभूचा । ते ही अशा चरितिं भाव धरीति साचा !
लीलाशरी रुचि अशा प्रभुच्या असावी । हें ज्ञान–सत्फल असें मुनिवर्यभावीं ॥
जी रामराज्यिं सुखवैभवराशि होई । ती वर्णु ना शकति शेषहि शारदाही !
सारे उदार, सगळे उपकारशील । नारीनर द्विजपदाबुजभक्तिलोल ॥
सारेच आचरिति सद्व्रत एकपत्नी । नारीहि भर्तृसुहिता तनुवाङ्मनानीं ९

श्रीरामचद्रराज्यीं 'दड ' यतींच्या करींच ऐकों ये ।
नर्तकनृत्यसमूहीं ' भेद ', तसें ' जिकणें ' मनोविजयें !! ॥१०॥

पुष्पीं फलीं सतत वृक्षवनें प्रपूर्ण । एकत्र सिंह गज नादति वैरहीन ।।
तैसेच पक्षिमृग राहति मित्रभावें । प्रीतिप्रमाण नित वृद्धचि होत जावें ११
नाना विहगगण काननिं कूजतात । आनदती हरिणवृंद अभीतिचित्त ॥
वाहातसे सुरभि शीतल मद वात । गुंजारवात अलिवृंद मरद नेत ! १२ ॥
देती यथेच्छ मधुसद्रस नववल्ली । धेनूहि देति पय काक्षित सर्व वेळीं ॥
सपन्न सस्यभरिं सतत भूमि झाली । त्रेतायुगीं कृतयुगासम कीर्ति आली ! १३
जाणोनि भूप जगिं तो जगदात्म रामा । रत्नांचिया खनि गिरी प्रकटी निकाम
सान्या नद्या वहति सुदर वारिपूरीं । जें स्वादु शीतल सुनिर्मल सौख्यकारी
अब्धी समग्र परिरक्षिति आत्मवेला । रत्नें तटीं विखुरती, नर घेति ज्याला
सारे तडाग भरले सरसीरुहाहीं । झाल्या प्रसन्न अतिमात्र दिशा दहाही ॥
श्रीरामराज्यिं घन वर्षति योग्यमानीं । देई रवी उन्हहि काक्षियलें जनानीं।।
दे चद्र शीतलपणाहि यथेच्छ लोकां । सत्कारणा उचित होय जगात जो कां!

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे सुश्लोकमानसे सकलकालिकलुषविध्वसने उत्तरकाडे श्रीरामराज्यवर्णनं नाम सप्तमस्तरङ्ग. ॥

~卐~

## तरंग ८ वा

श्रीराम कोटि हयमेध करीत लोकीं । दानें द्विजां वितरिलीं गणना न ज्यां कीं,
जो रक्षितो श्रुतिपथा अतिधर्मशीलात्रैगुण्यपारग तसा हरिभोगलील ॥ १ ॥
राहे सदैव शुचि पत्न्यनुकूल सीता । जी शीलधाम सुषमाखनि सद्विनीता ॥
माहात्म्य जाणुनि कृपाम्बुधिचें अनन्तासेवीत कान्तपदपंकज शुद्धचित्त ॥२॥
होते गृहांत जरि सेवक दासदासी । सेवेमधें निपुण सद्गुणरत्नराशि ॥
सेवा करी निजकरीं गृहिं ती स्वतांत्र । आज्ञाविलें रघुवरें परिसोनि साच ! । ३
जेणें प्रकारिं सुख होय कृपाब्धिरामा । तैसेंच ती करितसे सुविनीत रामा ॥
ज्या सासवा सदनिं राघवमातृकादि । सेवीत त्यां जनकजा, अति वृत्ति साधी ।
ना मान, ना मद तिला लवलेश चित्तीं । जी वंदिली विधिरमा-गिरिजादिकीं ती
जी कीं अनिन्दित सदा जगदंबिकाच।ती जानकी निजगृहीं करि कार्य साच।
पाहो अम्हांसि नित ही स्वकृपावलोकीं।ऐसें जिच्याविषयिं कांक्षिति देव ते कीं
श्रीरामपादकमलीं रममाण होती । सीता स्वभाव अपुला विसरूनियां ती ।
सेवीति बन्धु सगळे अनुकूल चित्तीं । श्रीरामपादरति वाढति नित्य होती ॥
पाहात राममुखपंकजिं सावधान । 'सांगेल कां मजसि कांहिं कृपानिधान।?' ७
प्रीती करीत विभु बंधुवरीं सुरीतीं । नानाप्रकारिं शिकवीत तयास नीति ॥
राहाति नागरिक लोकहि हर्षमग्न । त्यां देवदुर्लभहि भोग सुलभ्य पूर्ण ॥८॥
त्यांची अहर्निश मनीं विनती विधात्या।'श्रीरामचंद्रपदिं रे! रतुं दे अम्हां त्यां'
(श्रीरामराज्यसुखवर्णन-सद्रसाला । गाऊनियां कवनिं 'राम'हि धन्य झाला !)

झाले पुत्र अतीव सुंदर असे सीतेप्रती दोन ते ।
ज्यां नामें लव आणखी कुश अशीं वेदीं पुराणीं नुतें ॥
दोघेही विजयी तसेच विनयी, जे सद्गुणां मंदिर ।
वाटे कीं प्रतिबिंबयुग्म विभुचें त्रैलोक्यि जें सुंदर ! ॥ १० ॥
सान्या भ्रात्यांप्रती झाले दोन दोन सुनन्दन ।
शीलरूपगुणांहीं जे होते अत्यंत शोभन ! ॥ ११ ॥
ज्ञानवागिन्द्रियातीत मायाचिद्गुणां पर ॥
अजन्मा सच्चिदानन्द दावी मानव्य सुंदर ॥१२॥

स्नानास जाय सरयूस विभु प्रभातीं । बैसे सभेत सदय द्विजसाधुयुक्तीं ॥
सांगे वसिष्ठ मुनि वेदपुराणसार । सर्वज्ञही श्रवण राम करी उदार ॥१३॥
बंधूसमेत करि भोजन रामराय । मातांस होय सुख पाहुनि त्यां अमेय ॥
शत्रुघ्न आणि भरत प्रभुबंधु दोन । बागेंत जाति हनुमंतसमेत मुज्ञ ॥ १४॥
बैसोनि त्या पुसति ते रघुनाथगाथा । त्या तो कथीत हनुमान् मतिमान् सुगीता
ऐकोनि ते विमल सद्गुण हृष्टचित्त । त्यांतें फिरून फिरुनी पुसती विनीत १५
सान्यांचिया गृहिं गृहीं घडतीं पुराणें । श्रीरामचन्द्रचरितें भरलीं रसानें ॥
नारी तसे नर रघूत्तमकीर्ति गाती । तें नेणती सुखि निशादिन केविं जाती ॥
अयोध्यापुरीवासियां सौख्याराशि । तशीं वैभवें लाभलीं जीं तयांसी ॥
न तीं वर्णु येतीं सहस्राहि शेषां । रुचे यत्पुरी रामराया निवासा । १७
श्रीनारदादि सनकादि मुनीश येती । देखावया मधुर कोसलरायमूर्ति ॥
साकेतिं जे प्रतिदिनीं, बघतां पुरी ती । वैराग्यही विसरती मुनि ते स्वचित्तीं १८
सौवर्णरत्नखचिता नगराट्टमाला । गच्च्या सुरंगि विविधा रुचिरा विशाला ॥
होता सुरम्य अति कोटहि भोंवतालीं । रंगीं अनेक कठडे रचले सुशैली ॥१९॥
गेहें नवग्रह–मणीं खचितें अशीं तीं । शोभा धरीति अमरावतितुल्य–कान्ति ॥
रत्नांचिता विविधवर्णि गृहांत भूमी । ज्या पाहुनी मुनिवरांतरिं मोहनोर्मी ।
तीं शुभ्रधामशिखरें नभ चुंबणारीं । विद्योतती कलश सूर्यशशिप्रकारीं ॥
वातायनेंहि मणिरत्नि विराजतात । प्रत्येक गेहिं मणिदीप सुशोभतात ॥२१॥

माणिदीपांनीं शोभति भवनें विद्रुमरचितां द्वारविभा ।
स्तंभ हिऱ्यांचे विधि रचि जणुं हे कनकनीलमणिभित्तिस भा ॥
स्फटिकशिलायत रम्य अंगणें सुंदर–मंदिर–शोभन जीं ।
हेमकपाटें द्वारां द्वारां वज्रजडित जणुं बल्पुंजी ! ॥२२॥

मनोहरा उत्तम चित्रशाला । गृहीं गृहीं शोभति ज्या विशाला ॥
रेखीयल्या रामचरित्रलीला । ज्या मोहवीती मुनिमंडलीला ! ॥ २३ ॥

सुमनवाटिका शोभना अशी । सकल मंदिरीं अंगणीं किती ! ॥
विविध निर्मिल्या यत्नि सुंदर । सुखविती मना ज्या निरंतर ॥२४॥
बहुत जातिच्या ललित वल्लरी । अति मनोहरा पुष्पनिर्भरीं ॥
जणु वसंत त्यां वर्षहीमधें । सुखद शोभिन्या ज्या परोपरीं । ॥ २५ ॥

मधुर गुंजनीं भृंग रंगले । विविध वाहतीं वायु चांगले ॥
सतत मंद सद्गन्ध शीतल । हृदयहारिता रम्य त्यांतिल ॥२६॥

पाळीयले खग मनोहर बालकानीं । ते कूजती मधुर, सुंदर बागडोनी ! ॥
ते हंस सारस कपोत तसे मयूर । शोभा वहाति भवनांप्रति अत्युदार॥२७॥
छाया बघून अपुल्याच मनोज्ञ लोल । सर्वत्र ते करिति कूजन नृत्यशील ॥
चाळें किती शिकविती शुकसारिकांना । 'श्रीरामराघवरघूत्तम !'शब्द नाना॥२८

राजद्वारा होय शोभा अतीव । सर्वोरीतीं वर्णणें शक्य नैव ॥
वीथीवाटा चौहटा चारुरूपा । बाजाराची योजनाही अमूपा ॥ २९ ॥

बाजारांचें वर्णन कैसें ? मूल्यावांचुनि वस्तु मिळे ।
रामनिवास प्रभु जेथींचा तेथिल लक्ष्मी कैसि कळे ? ।
कुबेर जणुं ते तेथें बसले वणिक् सराफ व्यापारी ।
सुखी सकल सच्चरित मनोहर नारीनर शिशु म्हातारीं ! ॥३०॥

पुरीचिया उत्तरभागीं वाहे गंभीरतोया सरयू विनिर्मला ।
तीरास अत्यंत मनोज्ञ घाट बाधीयलेले नच पंक ज्या स्थला ! ॥३१॥
दूरावरीं रम्य विशाल घाट पाणी पिती जेथ गजाश्व-संघ ते ॥
पाणी पिण्याचेहि सुरम्य घाट स्नाना न कोणी नर आचरी तिथें ॥३२॥
तीरीं, तटीं पुष्कळ देवमंदिरें । सर्वत्र नेत्रोत्सवकारि सुंदरें ॥
सभोंवतीं पुष्पवनें मनोहरें । देखोनि आनंद हृदयुर्जी भरे ॥ ३३ ॥
कोठें कुठें श्रीसरयूसरित्तटीं । उदासि-सन्यासि मुनीश-सत्कुटी ॥
जे ज्ञानसौख्यामधि मग्न सतत । श्रीसच्चिदानन्दरघूत्तमीं रत ! ॥३४॥
सर्वत्र तीरीं मुनिवृंदि लाविल्या । मुनीलवणां तुलसी विराजल्या ॥
सन्मंजरी गन्धवती विराजती । रामप्रिया तोषविती मनाप्रती ॥३५॥
ती राजधानीसुपमा न वानवे । बाहेरि सौंदर्यहि हो नवें नवें ॥
तद्दर्शनेंही अघ तें उरेहि न । वापी तडागोपवनादि पावन ॥३६॥

तडाग वापी अनुपम सुदर कूप मनोहर भव्य किती ।
निर्मल-जलयुत सोपानोद्भव शोभा मुनिसिद्धि मोहवि ती ॥
अनेक रंगीं अरविंदें; खग कूजति गुंजति भृंगतती ।
रम्यारामीं पिकादि खग जणुं पथिका निजरवें बोलविती ! ॥३७॥

राहे रमानायक जेथ भूपती । न कांति त्यांची वंदवे यथार्थ ती ॥
सौख्यान्विता त्या अणिमादि संपदा । आल्या अयोध्येमधि नांदण्या सदा ॥

येथें तेथें करिती राघवगुणगान सर्वही जन ते ॥
पैलुनि परस्परांवें शिकवण देतां असेंचि ते म्हणते— ॥ ३९ ॥
"प्रणतप्रतिपाल जो करी । भजणें तो प्रभुराम अंतरीं ॥
अति शोभनशील सुंदर । गुणगणांचें जणुं भव्यमंदिर ! ॥४०॥
जलजायत–चारु–लोचन । प्रभु जो श्यामल, दुःखमोचन ॥
नयनां परिरक्षि पापणी । रत तैसा निजदासरक्षणीं ॥ ४१ ॥
धृतबाण–मनोज्ञ–कार्मुक । धरि तूणीरहि भक्तरक्षक ॥
रणधीर, खलांसि संहरी । रवि तो सज्जन–पंकजा हरि ! ॥४२॥
जणुं काळ अही भयानक । खगराजोपम त्यासि नाशक ॥
प्रभु राघव जो दयानिधि । ममता प्रकुनि, ध्या मनामधीं ! ॥

जो लोभ-मोह-मृग-यूथ-किरात होय । की काम मत्त करि त्या हरिसाच काय ! ॥
वारी तमा रविच, संशयदोषरूपा । जो भक्तसौख्यद, न त्या तुलना अनूपा ॥४४॥
जो घोर दानव-वना यणवाच नाशा । संसारभीतिहरणा प्रभुजानकीशा ॥
कां हो तुम्ही भजतसां न अशा दयाळा ! । सीतेसमेत विभुला भुवनैकपाळा ॥
आशाच ज्या विपुलसंख्य अनेक माशा । जो नाशकारि हिमराशिच त्या अघौघां ॥
स्वानन्दराशि अज जो अविनाशि होय । तो कां न हो भजतसां प्रभुरामराय ! ॥

मुनिमानसपूर्णरंजन । महिभाराप्रति जो विभंजन ॥
तुलसी–प्रभु तो रघूत्तम । भजतां कां न तुम्ही मनोरम ! ॥४७॥
[सकल-सन्मुनि-मानस-रंजना । अवनिभार-समग्र-विभंजना ॥
तुलसिदासविभू रघुनायका । हृदिं उदारतमा भजता न कां ! " ४७]

येशापरी करीती नारीनरपौर रामगुणगान ॥
करुणानिधान राघव सर्वां दे सानुकूल अवधान ॥ ४८ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे रामराज्यवर्णनं नामाष्टमस्तरङ्गः ॥

—★—

## तरंग ९ वा

रामप्रतापरवि चंड निजप्रभेनें । जेव्हां जगीं उगवला कथिल्याप्रमाणें ॥
राहे प्रकाश भरुनी गरुडा ! त्रिलोकीं।झाले सुखी बहुत; होतिहि कोणि शोकी !! ॥
झाले उद्योक अति, वर्णुनि सांगतों ते । अज्ञानरात्रि सरली प्रथम प्रभावें ॥
जेथें तिथें लपलि सर्व उलूक-पापें । तीं क्रोधकामकुमुदें मिटलीं प्रतापें ! २
कालस्वभावगुणकर्म चकोर जे हे । त्यांना कुठेंच न मिळे सुखलाभ पाहें ॥
जे मोह मान मद मत्सर चोर लाठे।उद्योग त्यांस उरला नच काहिं कोठें! ३
सद्धर्मरूप महनीय सरोवरांत । विज्ञान-बोध-कमलें फुलली अनन्त ॥
संतोष सौख्य सुविवेक विराग कोक । झाले विशोक जगतीतलि हे अनेक !
राम-प्रताप-रवि हा जर हृदयीं उत्तम प्रकाशतसे ।
मागाहुनचे वाढति, पहिले कथिले लयास जाति तसे ! ॥ ५ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे श्रीरामराज्यवर्णनं नाम नवमस्तरङ्गः ॥



## तरंग १० वा

भ्रात्यांसमेत विभु राघव एकवार । संगें अतिप्रिय सुभक्त मरुत्कुमार ॥
उद्यान रम्य अति, जाति पहावयाशी।जेथें तरूंसि नव पल्लव पुष्पराशि ॥१
तेथें बघून समया सनकादि येती । तेजोनिधानमुनि सद्गुणशीलमूर्ति ॥
जे ब्रह्मचिंतनिं निमग्न सदा प्रसन्न । जे बालसे दिसत, होत जरी पुराण २
ते चार भासति जणूं धृतमूर्ति वेद । निर्भेदमानस जयां समदृष्टि बोध ॥
आशाच ज्यां वसन, सद्व्यसनांत नित्य श्रीरामकीर्तन जिथें श्रवणार्थ जात ३
ज्ञानी अगस्ति मुनि राहति जेथ, होतेगेले उमे ! मुनिहि हे सनकादि तेथें
वर्णी कथा बहुपरीं मुनि राघवाची । ज्ञानाग्निनिर्मितसि जी अरणीच साची !
येतां मुनींसि बघुनी अति हर्षि राम । त्यांतें करीत विभु दंडवत प्रणाम ।
दे स्वागता पुसतसे सनकादिकांतें । त्यां बैसण्या पसरि पीतपट स्वहस्तें ! ५

बंधू तिनीहि हनुमंत समेत त्यांतें । वंदीति सादरमनें सुखमग्न चित्तें ॥
पाहोनि रामसुषमा, उपमा न जीस । तल्लीन होति मुनि नावरत प्रहर्ष ।॥
सुश्यामगात्र सरसीरुहनेत्र राम । सौंदर्यमंदिर भवार्तिहर प्रकाम ॥
एकाग्र त्या मुनि विलोकति निर्निमेषाबद्धांजलि प्रभु तयां नमवीत शीर्ष ।७
श्रीराम पाहुनि दशा तशि त्या मुनींची।होई प्रहृष्टतनु, लोचनिं अश्रु सिंची
हातीं धरूनि मुनिंना प्रभु बैसवीत । बोलेहि त्यां अति-मनोहर-वाग् विनीत
" ऐका ! मुनीश ! अजि मी अति धन्य होई।तुम्हांस पाहुनि लयाप्रति पाप जाई
भाग्यें अतीव मिळतो जगिं साधुसंग । जेणें प्रयासविण हो भवभीतिभंग ।॥९॥

सत्संग हो मोक्षसुखप्रदाता । ये कामिसंगें भवकारि पंथा ॥
हें सांगती वेद तशीं पुराणें । सद्ग्रंथ शास्त्री कवि वा शहाणे"॥१०॥
ऐकोनि वाक्य प्रभुचें मनोज्ञ । झाले मुनी चारिहि ते प्रसन्न ॥
स्तुती करीती प्रभुची सुरीतीं । रोमांचुनी हर्ष भरूनि चित्तीं—॥११॥

" जय भगवंता अनघ अनंता एक अनेका अनामया ।
जय करुणाकर जय गुणसागर जयजय निर्गुण सुखालया ॥
सौंदर्याकर अज शोभाकर जय धरणीधर रमावरा ।
अमान मानद अनादि निरुपम सुयश पावना मनोहरा ! ॥ १२ ॥
ज्ञाननिधाना विदित पुराणा श्रुतिविद्या जय निरंजना ।
अनेकनामा सर्व अनामा सर्वगता मुनिरंजना ॥
तज्ज्ञ कृतज्ञा मर्वहृदिस्था अज्ञानाच्या भंजना ।
द्वंद्वविपद्गय-भवपाशादिक-काम-मदादिकगंजना ! ॥ १३ ॥
हृदयीं नित्य राहोनी रक्ष आम्हास राघवा ! ॥
अनाथनाथा ! भक्ताचा तूच आश्रय आघवा ॥ १४ ॥

परमानन्द हे रामा ! पूर्णकामा कृपाघना ।
निरंतरा प्रेमभक्ति दे प्रभो ! आमुच्या मना ॥ १५ ॥
रघुनाथा तुझी भक्ती दे अम्हा सुखवर्षिणी ।
नाशिनी भवतापाची त्रितापपरिकर्षिणी ॥ १६ ॥
प्रणतांचे काम पूर्ण करिशी रघुनंदना ! ॥
यास्तशी सरधेनू वा कल्पवृक्षचि सन्मना ! ॥ १७ ॥

प्रसन्न होउनी द्यावा वर जो आम्हि याचिला ॥
त्वत्पाद–पंकज–प्रीती दे आम्हां नित्य निर्मला ॥ १८ ॥
भववारिधि शोषाया अगस्ति रघुनायक ॥
सुलभ्य सर्वदा दासा समस्त–सुख–दायक ॥ १९ ॥
मनाचीं आमुचीं दुःखें दारुणें कर दारण ॥
दीनबंधो ! अम्हां द्यावी समता दुःखवारण ॥ २० ॥
ईर्ष्या–त्रास–दुराशांचें करिशी तू निवारण ॥
विवेकविरती यातें विनयातेंहि पोषुन ॥ २१ ॥
धरणीमंडना रामा धरानाथ–शिरोमणे ! ॥
भवनौका तुझी भक्ती दे आम्हां हेंच मागणें ! ॥ २२ ॥
मुनि–वृन्दमानसींचा तूं हंस होसि निरंतर ॥
तुझिया पदपद्मातें वंदिती विधि शंकर ॥ २३ ॥
केतु जो रघुवंशाचा सेतु सच्छ्रुति–रक्षक ॥
काल–कर्म–स्वभावांचा गुणांचा पूर्ण–भक्षक ॥ २४ ॥
सर्व–दोष–हर–स्वामी तारकांचाहि तारण ॥
प्रभू तुलसिदासाचा त्रैलोक्यास विभूषण" ॥ २५ ॥

प्रेमें स्तुती करुनि उत्तम राघवाची । श्रीरामपादकमलीं नमनेंहि साची ॥
ते ब्रह्मलोकिं सनकादि मुनीश जाती । लाभोनि इष्टवर जो प्रभु दे सुचित्तीं २६

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकालिकलुषविध्वंसने उत्तरकाण्डे सनकादिस्तुतिर्नाम दशमस्तरङ्गः ॥

—:○:●:○:—

### तरंग ११ वा

गेल्यावरी ब्रह्मलोका सनकादि मुनीश्वर ॥
बंधू ते ठेविती माथा श्रीरामचरणांवर ॥ १ ॥
प्रभूलागीं पुसायातें सारे सकोचती मनीं ॥
बघती हनुमंतातें चित्तीं उत्कंठ होउनी ॥ २ ॥

तृष्णा त्यां ऐकण्या वाणी श्रीराममुखवासिनी ॥
श्रोत्रपेया सुधाधारा सकलभ्रमनाशिनी ॥ ३ ॥
अंतर्यामी प्रभू राम सकलान्तर जाणता ॥
सांगे "विचार जें वाटे विचारावें हनूमता !" ॥ ४ ॥
जोडोनि हस्त वदला तेधवां वायुनंदन ॥
"भगवन् ! करुणाशीला आयका मी निवेदिन ॥ ५ ॥
हे नाथ ! भरता वाटे पुसावें काहिं आपणां ॥
पुसावया प्रभूलागीं संकोच परि तन्मना" ॥ ६ ॥
बोले राम "तुला ठावा मत्स्वभाव मरुत्सुता ! ॥
भरता-माझियामध्यें नाहीं अंतर तत्त्वतां" ॥ ७ ॥
प्रभूक्ति ऐकुनी बोले रामा भरत वंदुनी- ॥
"प्रणतार्तिहरा नाथा ! ऐका सांगेन जें मनीं ॥ ८ ॥

शंका नयेचि मम नाथ ! मनांत काहीं । स्वप्नींहि शोक अथवा मज मोह नाहीं
ही होय केवळ कृपा तुमची प्रसन्ना । आनंद-दोह-निपुणा करुणानिधाना! ॥९॥
मी धाष्टर्य हें करुनि बोलतसें दयाळा । मी दास, सौख्यद तुम्ही सकलां जनांला॥
संतांस गात बहु वेदपुराणवाणी । त्याचे अनन्तगुण संस्तविले बुधानीं ॥१०॥
संतांवरी प्रभुहृदीं अधिकाचि भक्ति । गाता तुम्हीहि किति सज्जनसाधुकीर्ति ॥
ज्ञानी विचक्षण तुम्ही, तुमच्या मुखाब्जीं । वर्णून संत शुभलक्षण ऐकवा जी ! ११
सांगा विभेद मज संत-असंत यांत । जें कीं कळेल मज उत्तमरीति नाथ !" ॥
श्रीराम सांगति "सख्या ! परिसें वदेन । जीं लक्षणें दिसति संत जनांत पूर्ण ॥१२
गाईयली श्रुतिपुराणिं अनन्त गा ! तीं । आहेत सज्जनमनां अति सौख्यदातीं ॥
ऐशी असे करणि संतअसंत यांची । जैशी कुठार, तरु चंदन या द्वयाची॥१३॥
बंधो ! पहा मलयजास कुठार कापी । देई कुठारमुखिं गंधचि तें तथापि ॥
श्रीखंड यास्तव जगत्प्रिय होउनीया । देवाचियाहि चढतें शिरिं तें गुणें या ! ॥
लाभे कुठार परि दंडन अग्निदाह । त्याच्या मुखीं पडति घाव घणें पहा हें ! ॥
जे संत ते विषयलंपट नैव होती । सच्छीलसद्गुणमयी जणु मंदिरें तीं ! ॥१५॥
होतात दुःखित मनीं पर दुःखि होतां । होती सुखीहि परसौख्य तसें पहातां ॥
जे कीं अजातरिपु नित्य समस्वभाव । वैराग्यशील हृदिं ज्यां न मदास ठाव ॥

नोहे अमर्ष नच हर्ष न लोभ चित्तीं। दीनीं दयाळु अति कोमलचित्तवृत्ति ॥
त्यागी सदा अभय निष्कपटी मनाचे। जे कायवाङ्मनसिं भक्त मदीय साचे ॥
सर्वांसि मानद अमान परि स्वतां जे। प्राणांसमान भरता! प्रिय तेच माझे ॥
निष्काम ते मम परायण गोड नामीं। वैराग्य-शांति-विनयादिक चित्तधामीं ॥
चित्तीं प्रसन्न ऋजु शीतल मित्रवृत्ति। यत्प्रीति विप्रचरणांबुजि भव्यकर्ती ॥
जे धर्मपोष करिती जननीसमान। हीं लक्षणें वसति त्यांप्रति संत मान ॥१९॥
ज्यांचा अचंचलपणा नियमादिकांत। नीतीमधें शमदमादिगुणीं नितान्त ॥
ते संत संतत असें हृदिं तत्त्व आणीं। केव्हांहि जे परुष मुखरतीच वाणी ॥२०॥
निंदा स्तुती उभयही सम ज्यांस चित्तीं। माझ्या पदाब्जयुगलीं अनिवारभक्ति ॥
ते सौख्यराशि गुणमंदिर संत होती। प्राणांहुनीहि मजला प्रिय हर्षमूर्ति ॥२१॥

असतांचें तुला आता सांगतों ऐक लक्षण ॥
कधींही ना असावी रे! तयाची संगति क्षण! ॥ २२ ॥
खळांचा संग व्हायाचा सदा दुःखासि कारण ॥
उनाड गाइच्या संगें कपिले दुःख दारुण ॥ २३ ॥
खळाच्याच विशेषत्वें अतिताप मनीं वसे ॥
देखोनि परसंपत्ति-जळती खलमानसें ॥ २४ ॥
जर कोठें पडे कर्णी परनिंदा तयाच्चिया ॥
अति हर्षित ते होती जणों श्रीलाभ तो तया! ॥ २५ ॥
कामक्रोधमदीं लोभीं खलाचें मग्न तें मन ॥
कपटी कुटिलप्राय पापी निर्दय दुर्जन ॥ २६ ॥
वैरी अकारण तसे खल ते सकलांप्रत ॥
करिती अहिता त्याच्या ज्यानीं केलें असे हित ॥ २७ ॥
खाणें सर्व लबाडीचें चावणेंही लबाडि कीं ॥
खळांचें सर्वही खोटें देणें घेणें ठकाठकी! ॥ २८ ॥
बोलती मधुरा वाणी मयूरापरि दुर्जन ॥
महासर्पहि खाण्याचें काठिन्य हृदयीं पण ॥ २९ ॥
परद्रोही जार चोर परनिंदापरायण ॥
नीच पापी नर जरी मूर्त राक्षस ते म्हण! ॥ ३० ॥

लोभेंच सर्व दिसि जे परिवेष्टिलेले। ज्या लोभ तो शयन, लोभन वस्त्र त्याले॥
जे कामभोगपर नीच सुखांत मग्न। यांटेचि लाज नरकाशहि ज्यां बघून!॥
ऐके जर श्रवणिं अन्यनरप्रशंसा। ये कापरें भरुनि त्या ज्वरही नृशंसा!॥
पाहे जरी नयनिं तो विपदा कुणाची। होई सुखी जणुं जगन्नृपतित्व येचि!॥
स्वार्थांत जे रत सदा परिवारवैरी। जे कामलोभरत कोपविशेषबुद्धि॥
माता पिता गुरुजन द्विज मान्य ज्यां न। जाती बुडून, दुसन्यांसहि बुडवून!॥
मोहान्ध होउनि करीति दुज्यांशिं वैर। सत्संगती, हरिकथारति याचि दूर!॥
जे दुर्गुणाब्धि मतिमंद अतीव कामी। वेदांस दूषक लुबाडति अन्यलक्ष्मी॥
देवा-द्विजांवरि विशेषचि वैरवृत्ति। चित्तात दंभकपटादिक पूर्ण होती॥
बाहेरुनी धरति सर्व परी सुवेद। ऐसे जगा फसविती खल हे विशेष॥३५॥

कृतयुगिं खल हे नसती त्रेतायुगिंही नराधम असे ना॥
द्वापरिं थोडे तुरळक कलियुगिं रे! सकल भरलि खलसेना!॥३६॥

बंधो! परोपकृतितुल्य नसेचि धर्म। ना अन्यपीडनसमान अधर्मकर्म॥
सिद्धान्त हा सकलवेदपुराणसार। मीही कथीं बुधहि सांगति हा विचार॥
पावोनिही नरतनू करि अन्यपीडा। सोसावि लागति भवार्ति तया दुबाडा
पापें असंख्य नर मोहभरें करीत। स्वार्थान्ध त्यास परलोकहि नष्ट होत ३८
मी काळरूप भरता! सकला तयांसी। देई शुभाशुभफलें कृति होय जैशी॥
जाणोनि हें परम पंडित जे जगात। दुःखाप्रती चुकविती, मम कीर्ति गात॥
कर्में त्यजून शुभ वा अशुभें समग्र। मद्भक्त होति नर देव मुनी उदार॥
वर्णीयले तुजसि संतअसंत मीं हे। हे ठेविता मनिं, नरा भवताप नोहे॥४०॥
हे तात! ऐक गुणदोष अनेक होती। मायाच निर्मित तयांप्रति एकली ती॥
दोघा गुणां उभय ना बघणें विवेक। दोघा गुणास बघणें अविवेक, देख!”
श्रीमुखीं गाइल्या, ऐकिल्या बधुनीं। उक्ति तैं हर्ष हो थोर त्यांच्या मनीं॥
तो किती सस्तवी राघवा मारुती। चित्ति माथे न जो हर्ष झाला अती ४२
त्यावरी ये प्रभू आपुल्या मंदिरीं। नित्य त्याची अशी चालली माधुरी॥
(धन्य ते भक्त जे राघवासंगतीं। चित्त हें धावतें त्याचिया पगतीं)!॥४३॥

*वारंवार मुनीश्वर येत अयोध्येत नारद पुनीत॥*
रामचरित्रें गाउनि हर्षानन्दासि पूर आणीत॥ ४४॥

नारदमुनि अवलोकी नित्यनवें चरित रामरायाचें ॥
वर्णन करि आवडिनें येउनियां ब्रह्मलोकिं तें साचें ॥ ४५ ॥
ऐके विरिंचि आवडिं रामकथा अमित-तींत सुख मानी ।
सांगे " पुनःपुन्हां गा ! आम्हांतें रमिव रामगुणगानीं " ४६
सनकादिक मुनि तेव्हां नारदमुनिलें प्रशंसिति-किती तें ! ॥
ब्रह्मानन्दरसामधिं करिते जरि ते सदा रत मतीतें ॥ ४७ ॥
ऐकोन गाना मुनिच्या मनोरमा । समाधिसौख्या विसरीति उत्तमा ॥
अत्यादरें ऐकति रामसद्यशा । प्रतिक्षणीं जें नव देइ सौख्या ! ॥ ४८ ॥
ब्रह्मज्ञानी मुक्तही ऐकतीच । सोडोनीही ध्यानसौख्यास साच ॥
श्रीरामाच्या सत्कथा, गोड ज्यांन । पाषाणांचीं तन्मनें होत पूर्ण ! ॥४९॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे कलिकलुषविध्वंसने
उत्तरकाण्डे साध्वसाधुलक्षणवर्णनं नामैकादशस्तरङ्गः ॥



## तरंग १२ वा

एका दिनीं रघुवरें जन बोलवीले । सद्विप्र पौरगण तेविं वसिष्ठ आले ॥
आले समेत मुनि सज्जन बैसलेले।भक्तार्तिनाशन विभू वच त्या म्हणाले १
"ऐका समस्त जन हो ! वदणार तें मी।नाहींच यात ममता मम चित्तधामीं
नाहीं अनीति लवही नच थोरवी वा।ऐका, करा, जर तुम्हां रुचलें स्वभावा
तो होय सेवक मला प्रिय सर्व लोकीं।वर्तेल मानुनि निदेश मदीय जो कीं॥
सांगेन मी जर तुम्हां लवही अनीति।मातेंहि वर्ज्य समजा, गणुनी न भीति
सद्भाग्य थोर म्हणुनी नरजन्म पावे । देवांहि दुर्लभ असें मुनिवर्य गावें ॥
तो मोक्षमार्गकर साधनधाम ऐसा। पावोनि जो करित ना परलोकपोषा-४॥
तो दुःख पावत अतीव परत्र लोकीं।पस्तावुनी शिर सकंप सभीत हो कीं ॥
देई उगाच मग तो सकलांस दोष । कालास कर्मगतितें प्रभु ईश्वरास ॥५॥
हा देह नाहिं जन हो ! विषयोपभोगा। हो स्वर्गाही लघुच, ने मग दुःखसंगा
पावोनियां नरतनु जो विषयांत सक्त। टाकोनियां अमृत तो विष मूर्ख घेत॥

-टाकोनियां परिस जें करिं गुंज घेणें । त्याला मलें कवण हो म्हणणार नेणें !
चौऱ्यांशि लक्ष जगिं आकरिं चारि योनी। हा जीव त्यांत अविनाशि फिरे भ्रमोनी
-त्यातें असें भ्रमविते जगिं ईशमाया । काळ स्वभाव गुण कर्महि पेरितो या ॥
देई अहेतु करुणा करणार ईश । त्यातें असा मनुजदेह कृपाविशेष ॥८॥
नौकाच हो नरतनू भववारिधींत । माझा अनुग्रह दिला अनुकूल वात ॥
हो कर्णधार दृढ सद्गुरुराय नावें । हें सर्व दुर्लभ परी सहजींहि पावे !!!॥९॥
-साहित्य संच मिळुनीहि असा उदार । जाईल जो नच भवाब्धि तरून पार ॥
-तो आत्मघातकि कृतघ्न विमूढबुद्धि । त्यांच्याच तो गतिसि केवळ अंति साधी !

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकाण्डे श्रीरामगीतावर्णनं नाम द्वादशस्तरङ्गः ॥



## तरंग १३ वा

"देवेंहि अंतिंहि तुम्हां जर सौख्य व्हावें । ऐकोनि वाक्य दृढ तें हृदयीं धरावें
सोपी सुखावह अहो ! जगिं वाट हीच । भक्ती मदीय निगमागममान्य साच १
जो ज्ञानमार्ग बहुविघ्न अगम्य भारी । दुःसाध्य, आश्रय मना नच हो समोरी ॥
कष्टेंकरून कवणा जर कीं मिळाला । भक्तीविना मजसि तो प्रिय नैव झाला ! २
भक्ति स्वतंत्रचि अनंत सुखप्रदाती । सत्संगतीविण कुणा नच लाभते ती ॥
ना पुण्यराशिविण लाभति लोकिं संत। सत्संगती करित संसृतिलागिं अंत ! ॥ ३
हें एक पुण्य जगिं; होय असें न अन्य । वाक्कायचित्तिं भजणें द्विजपाद धन्य ॥
होतात देवमुनि त्यासचि सानुकूल । जो ब्राह्मणा अति विशुद्धमनें भजेल ॥४॥
आणीकही सकळिकां कर जोडुनीया । सांगेन या परमगुप्तमता मदीया ॥
गौरीश-सेवनविना शुचि भक्ति माझी । कोणा नरास कधिं लभ्य न व्हायची जी
बोला जि ! भक्तिपथिं कोण तरी प्रयास ? ॥ ना योग, याग, तप, मंत्रजपोपवास!
साधे ऋजू मन, नसे कुटिलत्व ज्यांत । सतोष संतत, मिळेल तयास शांत॥६॥
सांगेन दास मम, आस दुजा नराची । विश्वास योग्य मज यामधिं मात कैंची?
सांगूं कयास बहु वाढवुनी कथा ही । मी या शुभाचरणिं वश्य जनासि होई७

ना वैर विग्रह नसे भय वा न आस। साऱ्या दिशांसि सुखलामचि कीं तयास॥
संकल्पशून्य अनिकेत तसा अमानी। विज्ञानयुक्त अतिदक्ष असा गुणानीं ॥८॥
अक्रोध नित्यरत सज्जनसंगतींत। स्वर्गापवर्गहि तया तृणतुल्य होत ॥
जो भक्तिपक्ष धरि निश्चयिं अच्छलानें। दुस्तर्कशून्य, अघलेशहि ज्या न माने ९
माझ्या गुणानुवादीं ममतामदमोहशून्य जे रमती ॥
ठावें सुख त्याचें त्यां, परमानन्दा वदूं शके न मति।" ॥१०॥
ऐकोनि रामवच मूर्त सुधाच जैसें। सारे कृपानिधिपदीं नमवीति शीर्षें—
"मातापिता गुरुजि बंधु तुम्ही अम्हांला।प्राणांसमान दयित प्रभुवर्य!झालां
तुम्हीच सर्वपरिनीं प्रणतार्तिहारी। हे देह गेह धन रामचि भव्यकारी ॥
तुम्हांविना कवण हें शिकवील आम्हां।स्वार्थीच तात—जननी जगतांत रामा!
निःस्वार्थि दोनचि खरे सकलोपकर्ते।तुम्ही तसे भजक जे तुमचे विभो! ते
स्वार्थीच मित्र जगतामधिं हो सकाम। स्वप्नांमधेंहि परमार्थ नसेचि राम!"
तें प्रेमपूर्णवच ऐकुनियां जनांचें। हर्षें भरोनि जणुं राघवचित्त नाचे! ॥
जाती गृहासि मग रामनिदेशिं सारे।वाखाणित प्रभुवचें सकलप्रकारें ॥१४॥
उमे! अयोध्यापुरवासि होती। कृतार्थ नारीनर सर्वरीतीं ॥
कीं सच्चिदानन्दघनस्वरूप। श्रीराम जो ब्रह्म तदीय भूप॥ १५॥

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे श्रीरामगीताप्रजोपदेशवर्णनं नाम त्रयोदशस्तरङ्गः ॥



## तरंग १४ वा

एका प्रसंगिं मुनिवर्य वसिष्ठ येती। जेथें निवासि सुखसागर राममूर्ती ॥
अत्यादरें रघुवरें नमिलें मुनींतें। प्रक्षाळुनी चरण राघव सेवि तीर्थें ॥ १ ॥
"ऐकावि! राम!" वदले मुनि बद्धपाणि।"बोलेन कांहिं करुणाकर मी स्ववाणीं
जो जो वर्ष तुमचिया चरिता सुचित्रा। माझ्या हृदीं भरत मोह विभो! पवित्रा॥
वेदांसिही न कळतो महिमा अनन्त। मी तो कसा वदुं शकेन जि! विश्वनाथ!॥
मी तो पुरोहित करीं अतिमंद कर्म। जो कीं श्रुतिस्मृतिपुराणिं विनिंद्य धर्म॥३॥

मी तें अमान्य करि, तों विधि सांगि मातें। "होईल लाभ पुढतीं तुज याचि पंथें॥-
जें ब्रह्म तत्त्व परम प्रभु रामरूप। होणार राघवकुलीं अवतीर्ण भूप" ॥४॥
तेव्हां मदीय हृदयीं सुविचार ये कीं। ज्यासाठिं योग मख सद्व्रत दान लोकीं॥
होणार तोच जर लभ्य मला अशानें। ना धर्म अन्य मज होइल याप्रमाणें॥५॥
जीं वेदशास्त्रविहितें निजधर्मकर्में। नाना तपें नियम सद्व्रत—मंत्रमर्में॥
तें ज्ञान तीर्थजलमज्जन दान शील। तैसे दयादि गुण सज्जन ज्यांस लोल ॥६॥
ज्यासाठिं हीं कथित, ज्यास्तव वेद सेव्य। शास्त्रादि पावनपुराणकथादि भव्य॥
सर्वांस हेंच फल कीं, प्रभुभाक्ति व्हावी। त्वत्पादपंकजिं रती मतिची असावी।॥
जाईल काय मळ वस्त्र धुतां मळानें? पावेल काय घृत मंथियल्या जळानें?॥
सप्रेमभक्तिसलिलाविण रामराय!। अंतर्गता कलुषिता कधिंही न जाय॥८॥
सर्वज्ञ तो, तज्ज्ञहि तोच पंडित। तो ज्ञानराशी गुणवान् अखंडित॥
तो दक्ष, तो लक्षणपुण्यमंडित। ज्याची रती त्वत्पदपद्म धुंडित! ॥९॥
हे नाथ! एक वर मागतसें तुम्हांला। याची! कृपा करुनि तो मजला दयाळा!॥
व्हावें निमग्न तुमच्या पदपद्मिं हें मीं। न न्यून भाव कधिं हो लव जन्मिजन्मीं!"
सांगोनि हें मुनि वसिष्ठ गृहाधि येती। झाली रघूत्तममती अति सौख्यवृत्ति॥
घेऊनि संगिं हनुमान् भरतादि बंधू। श्रीराम तैं निघत सेवकसौख्यसिंधु॥११॥
येई कृपालु नगरांतुनि दूरमार्गीं। तेथेंच मागवि करी रथ अश्व वेगीं॥
पाहोनि त्यां सकृप वानित सर्व रातीं। त्यांना दिली उचित देणगि जी हवी ती॥
हो भ्रात राम सकलश्रम नाशणारे। ते आम्रराइमधि शीतल जाति सारे॥
देई तदा भरत त्यां बसण्या स्ववास। बैसे प्रभू, सकल सेविति ते तयास॥१३॥
श्रीमारुति व्यजनिं मारुत त्यांस घाली। रोमांचुनी तनु विलोचन अश्रुशाली॥
नोहेचि मारुतिसमान कुणीच धन्य। जो रामपादकमलीं रमला अनन्य!॥
प्रीती अतीव तयि थोर तदीय सेवा। श्रीरामहि स्तवित मानुनि त्या सुभावा॥
देवी असा नच दिसे हनुमत्समान। हे गौरि! ज्यास विभुसत्तम देत मान!॥
ये त्याच कालीं मुनिवर्यनारद। हातांत वीणा मधुरा सुखप्रद॥
गाई प्रभूची स्तुतिकीर्ति सुंदरी। बियेमधें नित्य नवीन माधुरी!! १६
"हे पंकजाक्ष! अवलोक मला कृपाळा! हे शोकमोचनविभो! करुणार्द्रशीला!
हे नीलतामरससुंदर मेघरंगा! श्रीयंमुद्दत्कमलचारुमरंदभृंगा!॥ १७ ॥

हे सर्व राक्षसगणांस विदारणार । तूं रंजवीशि मुनिसज्जनवृंद थोर ॥
सद्विप्रसस्य–नव–पोषक मेघ ऐसा । दीनावनक्षम ! अनाथजनाश्रयाशा ! १८
खंडीशि तूं भुजबळें खलवृंदभार ! तेजें विराध–खर–दूषण नाशणार ॥
तूं रावणारि अघनाशन सौख्यरूप । हे राम ! तूं दशरथोत्तमवंशदीप ! ॥१९॥
सत्कीर्तिधाम निगमागमगीतनाम । ज्या देव सज्जन मुनीश्वर संगकाम ॥
देवा पुराणविदिवा ! करुणांतरा रे ! । अज्ञान–गर्व निवटीशि भल्या प्रकारें ॥
तूं सद्गुणी कुशल कोशल–चारुभूषा । तूं नाशिशी कलिमला, ममताविनाशा ॥
हे राघवा ! प्रणतपालन सत्त्वभावा । रामा अहो ! तुलसिदासमनात पावा ! ''॥

सप्रेम नारदमुनी वर्णुनियां राम–सद्गुणग्राम ॥
सौंदर्य–सिंधु तो हृदि साठवुनी जाय, जेथ विधिधाम ॥२२॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे ' सुश्लोकमानसे ' कलिकलुषविध्वंसने उत्तरकाण्डे ससमाज–श्रीरामपरमधामगमनं नाम चतुर्दशस्तरङ्गः ॥



## तरंग १५ वा

वर्णीयली परिस गौरि ! तुला कथा ही । रम्या यथामति विशुद्धरसप्रवाही ॥
आहे अपार शतकोटि रमेशगाथा । ना शारदा श्रुतिहि गानिं जिच्या समर्था ॥
आहे अनन्तगुणराम अनन्तमूर्ति । तज्जन्मकर्महि अनन्त अनन्तकीर्ति ॥
होतील गण्य अवनीरज अब्धिबिंदू । श्रीरामचंद्रचरिताब्धि अपारसिंधू ॥२॥
ही सत्कथा हरिपदाप्तिस हेतु होय । देईल भक्ति हरिची जिस ना अपाय ॥
सांगीतली तुजसि ही अति पावनी म्यां । जी त्या कथीत गरुडास भुशुंडि रम्या
मीं वर्णिली लवचि राघवकीर्ति तूंतें । आतां भवानि ! वद काय तुला कथूं तें ”
ऐकोनि राघवकथा अति हृष्ट गौरी । बोले विनीत अति मंजुळ वाक्यसारीं–४
“मी धन्य धन्य अति धन्य विभो ! जहालें । श्रीरामसद्गुण भवापह ऐकियेले ॥
झाल्यें कृतार्थ ! मम सर्वविमोह जाय । केली कृपा मज कृपायतना ! अमेय॥५॥
आनन्दचिन्मय रघूत्तम जो तयाचा । जाणें प्रताप भगवन् ! अति रम्य साचा
देई मुखेन्दु तुमचा अमृतात्म धारा । म्यां सेविली श्रुतिपुटीं सुकथा उदारा ! ६

माधुर्यपूर्ण रघुवीर–चरित्रपान । संतृप्तता मम मना नच दे अजून !! ॥
संतृप्त रामचरिता परिसोनि होती । त्यांना विशेष रस ना कळलाच चित्तीं ! ७

जीवन्मुक्तहि मुनिवर करिति निरंतर यशःश्रवण हरिचें ॥
तृप्ति न होई त्यांना परिसुनि गुणगान तें परोपरिचें ! ॥ ८ ॥
वाटे जर कां चित्तीं भवाब्धितें या तरुनियां जावें ॥
वेगिं चढावें सुखमय सुदृढ श्रीरामचरित या नावें ! ॥ ९ ॥
विषयी नारीनर जे त्यांसहि हें श्रवणरम्य हरिगान ॥
अतिशय सुखवी हृदयीं अमृतहि गमतें उगेंच उपमान ! ॥ १० ॥

आहे असा श्रवणवन्त जगात कोण । संतोष ज्यास रघुनाथचरित्रिं हो न ! ॥
ज्यांना रघूत्तमकथा गमते असार । ते आत्मघाति जडजीव अभागि घोर ! ११

श्रीरामचरितमानस गाइयलें तुम्हि मला मधुरवाणी ॥
ऐकुनि तें मजसि गमे लाभलि मजला अनन्त सुखखाणी !!! ॥ १२
आपण मज सांगितलें— सुंदर ही रामचंद्रचरितकथा ॥
काकभुशुंडी गाउनि गरुडातें ऐकवीत पुण्यपथा ॥ १३ ॥

तें ज्ञानविज्ञान विरक्ति उत्तम । प्रेमा असा रामयशीं मनोरम ॥
भक्ती दृढा रामपदांबुजावरी । कैसा वरें वायसदेह त्या परी !! ॥ १४ ॥

ऐका विभो ! दशशतांमधि होय एक । धर्मव्रती मनुज ज्या रति धर्मि नीक ॥
ऐशाहि कोटि-धि एकच कोणि होई । ज्याला विरक्ति विषयांत अतीव राही १५
ऐशा विरक्तजनकोटिंत एक होय । ज्ञानें जया वरियलें सहजींच काय ! ! ॥
ज्ञान्याचिया बहुतकोटिंमधें विराजे । जो मुक्त याच जगतींत जिवंत गाजे ! १६
ऐशा सहस्रमिति, दुर्लभ सौख्यखाणी । जो ब्रह्मलीन मतिमान् सुविवेकि कोणी!
ज्ञानी विरक्त अति, आणिक धर्मलोल । जो ब्रह्मनिष्ठ शुचि जीवनमुक्तिशील १७
ऐसा सुदुर्मिळचि मानव देवराया ! । जो रामभक्तिरत, मोहि न ज्यास माया !
त्या वायसास अशि भक्ति कशी मिळाली।हें विश्वनाथ! कथणें तुम्हि भाग्यशाली
जो ज्ञानशीलगुणमंदिर बुद्धिशाली । श्रीरामभक्तिमधि यन्मति मग्न झाली ॥
त्याला कशास्तव जि ! वायसदेह आला।हें नाथ हो ! मज कथा करुनी दयेला १९
काग्यास त्या प्रभुचरित्र पवित्र ऐसें । कैसें वरें मिळत तें कथणें विशेषें ॥
कामनाशन ! तुम्हां तरि केविं लब्ध । सांगा जि ! कौतुक मनीं मज हें विशुद्ध

ज्ञानी महान् गरुड सद्‍गुणशीलराशि । श्रीविष्णुभक्त हरिपार्श्विं निवास त्यासी ॥
तो कां वरें विमल, वायससंगि जात । ऐकावया मुनिजनां बगळूनि, नाथ ! २१
संवाद तो शुभ वदा मजलागिं सांग । दोनीहि भक्त हरिचे खगराज, काग" ॥
गौरीगिरा परिसुनी सरला रसाळा । झाले प्रसन्न शिव बोलति ते प्रियेला ॥२२॥
"तूं धन्य धन्य गिरिजे ! मति पुण्य तूझी । श्रीरामपादकमलीं दृढभक्ति हे जी ॥
हा पुण्य चारु गिरिजे ! इतिहास ऐक।नाशीत जो परिसना भ्रम आणि शोक २३
विश्वास थोर उपजे प्रभुपादकंजीं । जाई तरूनि नर अश्रमिं संसती जी ! ॥
प्रश्नालि हीच गरुडें पुसियेलि कागा । जाऊनि त्याजवळ सादर पुण्यभागा २४

जें त्यानें कथिलें सारें गरुडाप्रति उत्तम ।
ऐक गे ! आदरें गौरि ! कथितों तें मनोरम ॥ २५ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने
. उत्तरकाडे भक्तिभूमिकावर्णनं नाम पञ्चदशस्तरङ्गः ॥



## तरंग १६ वा

"मीं जेविं ऐकिलि कथा भवमोचना ही ।तो मी प्रसंग कथितों तुज पुण्यवाही
हो दक्षगेहिं तव गे ! प्रथमावतार । तेव्हां 'सती' तुजसि नाम असे उदार १
जैं दक्षयज्ञिं अपमान तुझा जहाला।क्रोधें तुवा त्यजियलें निजजीविताला ॥
विध्वंसिलें अनुचरें मम तें मखातें।तूं जाणतेस गिरिजे ! सकला कथा ते ! २
झालों प्रिये ! तव वियोगिं अतीव आर्त । गेलें बुडोनि अतिशोकिं मदीय चित्त
मी कौतुकें बघत तैं फिरलों विरागा।रम्यें वनें गिरि नद्या सुभगे ! तडाग ॥३
आहे सुमेरुगिरिच्या बहु उत्तरेस । जो नीलपर्वत अनुत्तम कांतिपोष ॥
आहेत त्यास शिखरें अति रम्य चार । जीं पाहतां मम मना सुखवीति फार
एकेक वृक्ष वरिं साजत त्यां विशाल।अश्वत्थ, आम्र, वट, पाकळ पुण्यमूल॥
शैलावरी सर मनोहर एक साजे । सोपान ज्या सुमणि मोहवितो मना जे५
ज्यामाजिं शीत अतिनिर्मल गोड वारि । पद्में विराजति मनोहररंग सारीं ॥
हंसालि कूजन करीति मधुस्वरानें । गातीहि भृंगतति मंजुल तेथ गानें ! ॥६॥

त्या रम्य शैलि करि वास विहंग तोही।कल्पांतिही नच तयाप्रति नाश होई॥
मायाविनिर्मित जगीं गुणदोष कैक । जे मोहकाममय ज्यात नसे विवेक॥७॥
व्यापीति सर्व जगता जरि हे समस्त।ना ते गिरीजवळि त्या कधि काळि जात-
तो काक तेथ वसुनी भजतो हरीस । कैशाप्रकारि गिरिजे! परिसें विशेष ८
अश्वत्थवृक्षतळिं तो करि चिंतनास । त्या पाकरीतरुतळीं जपयज्ञपोष ॥
तो आम्रवृक्षतळिं मानसपूजनातें । ना त्यास ईशभजनाविण कार्य चित्तें ! ९
तो सागतो वटतळीं हरिसत्कथातें । येऊनि ऐकति किती खगवृंद तें ते ॥
श्रीराममुंदरचरित्र विचित्रशील । प्रेमें भरूनि करि गायन भावलोल ॥१०॥
तेथें मरालगण जे करिं राहतात । ते सर्व शुद्धमति ऐकति तें सदुक्त ॥
मीं जेधवां कुतुकिं जाउनि पाहिलें तें। झालें विशेष मज सौख्य न वर्णु येतें
मीही तदा धरुनि उत्तमहंसरूप । राहें तिथें प्रभुगुण श्रवण्या अमूप ॥
ऐकोनि सादरपणें रघुरायकीर्ति । कैलासि मी परत यें वरुनी मुवृत्ति! ॥१२
सांगेन गौरि! तुज तो सकलेतिहास।मी ज्या क्षणीं रिघत काकभुशुंडिपास॥
आधीं कथीन तुज ज्यास्तव तो खगेश । कागाचिया जवळ ये परिसावयास१३
जेव्हा करी रघुपती रणरंगलीला । पाहूनि तें चरित लाज रिघे मनाला ॥
जैं इंद्रजित्करवि घे विभु बाधुनीया । तैं प्रेरि नारदमुनी गरुडास साह्या ॥
छेदूनि बंध गरुडें प्रभु मुक्त केला । मोठा विषाद परि हो खगराजयाला॥
चिंती अनेकपरि तो अतुल्या मनाशीं । झालें कसें प्रभुनिबंधन नागपाशीं?
सद्ब्रह्म जें विरज वागविनाथ पूर्ण । मायाविमोह न जया, परमात्मवर्ण
तो येथ हो अवतरे जगि, येत कानीं । ना ये प्रभाव परि काहिंच कीं दिसूनी!
संसाराचा बंधही छिन्न होत । ज्याच्या नामा आठवीता मनांत ॥
त्या रामातें क्षुद्रशा राक्षसानें । कैसें केलें बद्ध पाशांत नेणें !! "॥१७॥
नानाप्रकारिं करि तो हृदयीं विचार। न ज्ञान हो प्रकट; हृद्भ्रम हो न दूर
खेदें विषण्ण मन, येति वितर्क चित्तीं। तो होय मोहवश गे! तुझियाच रीतीं!
देवर्षिपाशि अति आकुलचित्त आला। सांगे तयास हृदिं संशय जो उदेला
ऐकोनि नारदमनीं करुणा अती ये । " ऐकें खगा प्रबल या रघनाथमाये
ज्ञान्याचियाहि हृदयास लुबाडते ही। त्यांच्याहि मोहवि मनाप्रति होच पाहीं
मातें हिनेंचि कितिदा तरि नाचवीलें।ती ही छळी खगवरा! तुज पाहि वेळे!

\

मोठाच मोह तव होय हृदीं उदेला। जाईल ना मदुपदेशिं क्षणीं लयाला॥
तूं जाइं रे! खगपते! चतुराननाते। देईल तो तुज निदेश करीं सख्या! तें"॥
देवर्षि सांगुनि असें निघत स्वमार्गे। श्रीरामचंद्रगुणगान करी रसौघें॥
वर्णी मुनी परमसुज्ञ पुनःपुन्हा ती। माया अनन्तबल त्या हरिची हृदन्तीं॥
तेव्हा विरिंचिजवळीं गरुडें रिघूनी। सांगीतलें निजमनोगत नम्रवाणीं॥
ऐकोनि ते विधि नमीत रघूत्तमासी। रामप्रतापिं मन हो रतलें विशेषीं॥२३॥
चित्तामधें मग विचार करी विधाता। "मायेप्रती वश कवी बुध तेविं वेत्ता॥
माया अगम्य हरिची अमितप्रभावा। जी नाचवी ममहि कीं बहुवार जीवा॥
निर्मीत मी सकल सृष्टि चराचरा ही। ऐशा मलाहि ढकलीत असे विमोहीं॥
आश्चर्य यांत नच अल्पहि पक्षिराया। या पाडि मोहिं अशि ही अजि ईशमाया"॥
धाता वदे मग सुरम्य अशी स्ववाणी। "रामप्रभुत्व मनिं शंभु महेश जाणी॥
जा शंकराप्रतिच तूं तर वैनतेया! ना त्या अनम्रपणिं मात्र विचारिं राया!॥
जाईल तेथ तव संशय रे लयासी"। ऐकोनि ती विधिगिरा क्षणिं जाय पक्षी॥
सोत्कण्ठ तो खगपती मजपाशिं येत। होतों कुबेरसदना अलकेसि जात॥२७॥
कैलासिं तू स्वगृहिं पार्वति! राहिलीस। येऊनि तो मम पदीं नत हो खगेश॥
संदेह तो निजमनांतिल सर्व सांगे। मी तें विनीत वच मंजुल ऐकुनी घे॥२८॥
सप्रेम मीहि वदलों वच त्या भवानि!। जी वाटली मजसि योग्य अशीच वाणी॥
"मार्गात गा! खगवरा! मज भेटलास। सांगूं तुला समजवून कसें विशेष?॥
होईल रे! सकलसंशयभंग तेव्हां। सत्संगतींत बहुकाल रहासि जेव्हां॥
त्वा ऐकणें हरिकथा अतिरम्य तेथें। नानाप्रकारिं मुनि गाति सुभक्तिचित्तें॥
ज्यांमाजि आदि मधि शेवटिं वानिलासे। श्रीरामराय भगवान् प्रभु तो विशेषें!
ऐशा कथा सतत ज्या स्थलिं होति तेथ। मी पाठवीत तुज, जा परिसें समस्त॥
शंका तुझ्या सकळ जातिल ऐकताच। होईल भक्ति अति रामपदाब्जिं साच॥
सत्संगतीविण कथा हरिच्या न होती। त्या ऐकिल्याविण खरें नच मोह चित्तीं॥
झाल्याविना हृदयमोहनिवृत्ति पूर्ण। ना हो रघूत्तमपदीं दृढभक्ति जाण!॥
ना भक्तिवीण मिळणार कुणीहि रामा। होवोहि बोध-जप-योग-विरक्तिसीमा!॥
हो उत्तरेस गिरि सुंदर नील एक। राहे तिथें अति सुशील भुशुंडि काक॥
जो रामभक्तिपथिं हो परमप्रवीण। ज्ञानी गुणाढ्य वय ज्यास अनन्तमान॥

तो सांगतो सतत रामकथा सुभाकें । ऐकावया विविध उत्तमपक्षि येती ॥
जा ऐक सद्गुण तिथें हरिचे अनन्त । मोहांतिं होइल तुझी गरुडा ! विलुप्त"॥
जेव्हां तया सकल मी समजाविं गौरि ! । गेला खगेश मज वंदुनि हर्षपूरीं ॥
मी त्या स्वतां नच उमे! समजाविंयेलें । मातेंहि मर्म रघुरायकृपें मिळालें ! ॥३६॥
झाला असेल कसला हृदयाभिमान । छेदूं पहात विभु त्यास कृपानिधान ॥
मी टेविलें न मजपाशिं तयासि तेसे । जाणे विहंग विहगोक्तिस कीं विशेषें ! ॥

अमेया प्रभुची माया गे भवानि ! प्रभाविनी ॥
ज्ञानी तरि असा कोण ! ज्या हे घाली न मोहिनी ! " ॥३८॥

ज्ञानी सुभक्तमणि पावननाम साचा । जो वाहन त्रिभुवनाधिप ईश्वराचा ॥
ऐशाहि त्या खगपतीप्रति मोहि माया । का गर्व पामर मनुष्य धरीत वायां ! ॥
माया विमोहवि विरिंचि–शिवादिकाला । तें बापुडा कवण अन्य टिके तियेला !
जाणोनि हें हृदयिं सर्व मुनीश होती । मायापतीस भजुनी अतिधन्यमूर्ति ॥४०॥

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे गरुडंप्रति शिवोपदेशवर्णनं नाम षोडशस्तरङ्गः ॥

—: ० :—

## तरंग १७ वा

जाई खगेश मग, जेथ भुशुंडि होय । जो कीं अखंड हरिभक्त सुधी अमेय ॥
पाहोनि शैल अतितुष्ट खगेश झाला । मायाविमोहयुत शोक समग्र गेला ! ॥१॥
सेवी जला, करुनि मज्जन त्या तडागीं । जाई प्रसन्नमनिं त्या वटवृक्षभागीं ॥
ते वृद्ध वृद्ध खग त्या स्थलिं पातलेले । श्रीरामसचरितपानमती मिळाले ॥२॥
आरंभ जों करुं बघे कथनास काग । ये त्याच वेळिं खगराज कथानुराग ॥
येतां पहाति सगळे खगराजयाला । सान्या खगांसह भुशुंडि सुतुष्ट झाला ॥
अत्यादरा करुनिया खगसत्तमातें । त्या स्वागता पुसुनि आसनही दिलें तें ॥
केली अतीव अनुरागिं तदीय पूजा । त्यातें भुशुंडि मधुवाक्यिं वदे महौजा,
"झालों कृतार्थ तव दर्शनिं आज नाथा ! हे पक्षिराज गरुडा ! प्रभुवर्यभक्ता ॥
द्यावा निदेश मज तें झणिं आचरीन । केलेंत आगमन का ! प्रभुजी सुजाण !"

बोले खगेश्वर मृदूक्ति "तुम्ही कृतार्थ। आहांत संतत जयां स्तवि विश्वनाथ॥
स्वश्रीमुखांबुजिं महेश्वर आदरानें । सन्मानि सद्गुणगणां निजपुण्यगानें ॥६
हे तात! ऐक मज कारण काय याया।मत्काम सर्व पुरले बघुनी तुला या॥
देखें तुझ्या परमपावन आश्रमा रे। संमोह संशय मम भ्रम नष्ट सारे!!॥७॥
आतां कथा परमपावन राघवाची । जी सौख्यदा सतत लोपवि दुःखवीची॥
ती ऐकवीं मजसि सादर भक्तिपूर्ण । हे प्रार्थितों बहुतवार विभो! नमून"
ऐकोनि उक्ति विनता विनतात्मजाची । सुप्रेमयुक्त ऋजु सौख्यद पुण्यवाची
उत्साह उद्गत अतीव भुशुंडिचित्तीं । लागे कथूं त्रिभुवनोत्तम रामकीर्ति ॥
सांगे तदा प्रथम तो अनुरागपूरीं । वर्णोनि राघवचरित्रसरासि गौरि! ॥
सांगे अपार मग नारदमोह तो कीं । झाला पुढें वदत रावणजन्म.लोकीं १०
रामावतार मग उत्तम सांगुनीया । वर्णी पुढें शिशुचरित्रहि रंगुनीया॥
नाना प्रकारिं शुभ राघव बाललीला । उत्साहपूर्ण हृदयें कथि चारुशीला॥
सांगे पुढें ऋषिवरागमनप्रसंग । वर्णीत राघवविवाह सुखान्तरंग॥
रामाभिषेक कृतनिश्चय तो निवेदी । भूपालदत्तवर ते रसभंजनादि!!॥१२॥
रामाचिया विरहिं शोक समस्त पौरा । संवाद लक्ष्मणरघूत्तमजात सारा॥
हें सर्व वानुनि कथीत भुशुंडि काग । कैशापरी प्रभु धरी वनवासमार्ग १३
गाईयली गुहमनातिल रामभक्ति । येणें प्रयागिं उतरूनि सुरापगा ती॥
वाल्मीकि-राघव-समागम-चारुवृत्त । ते चित्रकूटिं भगवत कसे रहात॥१४॥
कैसा सुमंत नगरा परते कथोनी । भूपालमृत्यु कथिला करुणार्द्रवाणी।
येई कसा भरत तें कथुनी समस्त । तत्प्रेमभक्तिरस वायस सर्व गात!॥१५
भूपक्रिया करुनि पौरसमेत येत । कैशापरी भरत, राम जिथें रहात॥
श्रीरामराय भरता समजावि कसा । ये पादुकांसहित तो नगरा निवासा॥
राहे कसा भरत भक्तपरिवहीर । वर्णीयलें करि कसें सुरराजपुत्र॥
गाईयली रघुवराप्रति अत्रिभेट । केला विराधवध होहि निवेदि गोष्ट ॥१७
सांगीतलें तनु कशी शरभंग टाकी। झाली अगस्तिरिं कशी प्रभुभेट तो कीं॥
वर्णीलि दंडकवना कवि पुण्यता ये! तो गृध्रमैत्रिहि कृता प्रभु रामराये॥
येऊनि राम करि पंचवटीनिवासा। भीती विनष्ट करि तो मुनिचीं अशेषा॥
केला अमूर उपदेशहि लक्ष्मणासी । हें सर्व सांगत भुशुंडि सुरम्यभाषी १९

केली स्मरातें काशि शूर्पणखा कुरूप । मारी सखैन्य खर-दूषण रामभूप ॥
जेणें कळे सकल मर्म दशाननाला । मारीचसंगति दशाननवाक्यमाला २०
हें सर्व वर्णन करी मग साधु वक्ता । मायामयी हरियली काशि तीहि सीता ॥
श्रीरामराय विरहार्तिहि वर्णि कांहीं । गृध्रक्रिया कशि करी विभुवर्य तीहीं ! ॥
वर्णियलें मग कबंधवधाशि तेणें । सांगोनि भक्ति, मुगती शबरीशि देणें ॥
वर्णियला विरह उत्कट राघवाचा । पंपासरोवरतटीं प्रभु येत साचा ॥२२॥
संवाद नारदमुनि-प्रभुचा मनोज्ञ । रामाशि मारुति कसा मिळला सुजाण ॥
सुग्रीवमैत्रि कथिली मग वीर्यशाली । मारीयला प्रभुवरें कथि केविं वाली ॥
राज्याभिषेक सुगला कपिराजिंय केला । रामें प्रवर्षणगिरी मग वासियेला ॥
वर्षर्तु-शारदविभा प्रभु राम वर्णी । सुग्रीवचित्त भिरवी प्रभु रोषवाणी ! २४
कैशापरी कपिपती कपि पाठवीत । शोधावया जनकजे दशदिक् समस्त ॥
कैशाप्रकारिं शिरती विवरीं कपी ते । संपाति केविं मिळला मग वर्णिलें तें ॥२५॥
ऐकोनि सर्वहि कथा पवनात्मजानें । लंघीयला जलधि थोर अवर्ण्यमानें ॥
लंकेंत केविं शिरला कपि अप्रमेय । सीतेशि धीर दिधला कथि भक्तराय ॥२६
विध्वंसुनी वन दशानन बोधियेला । लंकेसि जाळुनि पयोनिधि लंघियेला ॥
आले कपी सकळ रामनिवास जेथें । वैदेहिचें कुशल त्यास निवेदिलें तें ॥ २७
सेनेसमेत रघुनाथ जसा निघाला । लंकेचिया जलधितीरिं निवास केला ॥
आला कसा मग बिभीषण भेटण्यास । हें सांगुनी कथि पयोनिधि—निमहास ॥
बांधोनि सेतु कपिसैनिक अब्धिपार । येती कसे कथियलें रमणीय सार ॥
शिष्टाइ वीरवर वालिकुमार कैसा । लंकेंत जाउनि करी कथिलें विशेषा ॥२९ ,
संग्राम वानर निशाचर यामधील । वर्णियला विविधरीतिं रसानुकूल ॥
त्या कुंभकर्ण—घननाद—पराक्रमातें । वर्णून शक्तिबल तद्वधही कथी ते ॥३०॥
संहार राक्षसगणा विविधप्रकारीं । श्रीरामरावणरणीय कथाहि सारी ॥
वर्णियला समरमृत्यु दशाननाचा । मंदोदरीकृत विलापहि वर्णि साचा ॥३१॥
लंकाधिराजिंय अभिषेक बिभीषणाला । त्रैलोक्यि देवगण सर्व अशोक झाला ॥
सीता-रघूत्तम-मनोहरसंगमातें । वर्णीयलें अमृतसार भुशुंडिनें तें ॥ ३२ ॥
ते साञ्जलि स्तुति करीति समस्त देव । तैं पुष्पकीं कपिगणांसह रूढ सर्व ॥
साकेतिं येत रघुनाथ कृपानिकेत । त्या सर्व उत्तमकथेसि भुशुंडि गात ॥३३॥

रामाभिषेकहि तयें मग वर्णियेला । वर्णीयली रघुवरोत्तमनीतिमाला ॥
सारी कथा जशि तुला कथिं मी भवानि ! । तैशीच भक्तवर काकभुशुंडि वानी
ऐकोनि राघवकथा खगनाथ बोले । अत्यंत हर्षितमना वचनें रसाळें ॥
"संदेह सर्व मनिंचा मम नष्ट झाला । ऐकोनियां परमसुंदर रामलीला ! ॥३५॥
हे वायसोत्तम ! गमे तुझिया प्रसादीं । श्रीरामचंद्रपदभक्ति मिळे निराधि ॥
संग्रामि पाहुनि तशा प्रभुबंधनातें । होता अतीव मज मोह सख्या ! मनातें ॥
आनंदसागर असा प्रभु रामराय । सच्चित्स्वरूप कधिं होइल दुःखि काय ? ॥
लीला नरानुकृतिच्या प्रभुच्या बघोनी । गेलें भरूनि मन हें मम संशयानीं ३७
ती भ्रांति मद्धृदयिंची हितकारि झाली । केला अनुग्रह कृपानिधिनें मुकाली ।
अत्यातपें विकल जो हृदयांत होय । छाया तया सुखद हो तरुची अमेय ॥३८

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकाण्डे गरुडभुशुंडिसमागम-रामचरितश्रवण-संदेहनिवृत्तिवर्णनं नाम सप्तदशस्तरङ्गः ॥



## तरंग १८ वा

होता न हा अति महा मज मोह ऐसा । हा लाभता मजसि दर्शनयोग कैसा ?
ऐकावया मिळति ही कशि रामकीर्ति । अत्यंत चित्र सुकथा तुम्हि गाइली ती ॥१
आहे पुराणनिगमागमसन्मती हें । गातात सिद्धमुनि, संशय यांत नोहे–॥
त्यांतेंचि भेटति जगांत विशुद्ध संत । श्रीराम ज्यां निजकृपें अवलोकतात ॥२॥
पाहें तुम्हांस तरि रामकृपेंचि मी हें । निःशंकचित्त तुमच्या सुकृपेंचि लाहें"॥
ऐशी विहंगपतिची परिसोनि वाणी । जीच्यांत भक्ति विनयादिक ये दिसूनी ॥
झाला प्रहृष्ट अति वायस तो हृदन्तीं । रोमांचकाय, नयनीं जलबिंदुराजि ! ॥
श्रोता कथारसिक साधु सुधी सुशील । श्रद्धालु भक्त हरिचा जर का असल ॥४॥
त्यांतें उमे ! प्रकटती अति गोप्यही कीं । । सत्तत्त्वरत्न जगिं सज्जन जे विलोकीं ॥
बोले भुशुंडि मग वायस पक्षिराया । प्रेमें करुनि अतिसुंदर शब्दिं की या–॥

"तूं पूज्य होसि गरुडा! मज सर्वरीतीं। हो रामदृष्टि सकृपा तुझिवावरी ती।।
नोहेच संशय तुला, नच मोहमाया। आलास नाथ! मजलागिं दया कराया!।।
घाडोनि तूंचि मज मोहमिषें खगेश!। देई महत्त्व रघुराय मला विशेष।।
सांगीतलास मज मोह तुला अशेष!। आश्चर्य यात नच नाथ! असेचि लेश!।।
जे कीं विरिंचि, भव, सन्मुनि नारदादि। विख्यात होउ सनकादिक आत्मवादी।।
कोणास अंधपण यांत दिलें न मोहें?। कोणास काम जगिं नाचविता जिं नोहे?।।
तृष्णा करी न कवणाप्रति मूढवृत्ति?। क्रोधें जळून हृदयें कवणें न जाती?।।
ज्ञानी तपस्वि कवि पंडित शूरवृत्ति। या सद्गुणायतन हो जगिं चारुमूर्ति।।९।।
कोणास यामधिं न हास्य करीत लोभ?। संसारिं सर्व वश त्या, जर नाहिं दंभ।।
संपत्तिगर्व करि वक्र कुणां न लोकीं?।कोणास ना प्रभुपणा बधिरत्व दे कीं?।।१०।।
कोणा कटाक्षि नच मोहविते मृगाक्षी?। कोणास नेत्रशर ते छळिती न वक्षीं?।।
कोणास ना त्रिगुण पीडिति सान्निपातीं?।कोणास मान-मद सोडिति का कधीं ते?।।
आक्रान्त कोण नच यौवनतापिं झाला?। कोणा ममत्वमतिनें न कलंक आला?।।
कोणास ना करिति कंपितगात्र शोक?।कोणास मत्सर न लावितसे कलंक?।।१२।।
ती सर्पिणी ग्रसत ना कवणास 'चिंता'?। माया करीत नच अंकित कोण चित्ता?
हे लागले नच मनोरथकीट ज्याला। ऐसें बलिष्ठ तनुकाष्ठ असे कुणाला?।।१३।।
त्या लोक-वित्त सुत या त्रितयैषणांनीं। केली न धी मलिन कोणति दीनवाणी?
मायाच निर्मित असा परिवार सारा। अत्यंत ही प्रबल; अंत हिच्या न पारा।।

होती ब्रह्मशिवादींही भीतसेच जियेप्रति।।
तें अन्यजीव कुठले टिकायाचे तिथें किती?।।१५।।
व्यापुनियां ससारा मायाकटक प्रचंड हें राहे।।
कामादिक सेनापति, भट जणु पाखंड कपट दंभचि हे!।।१६।।
माया असे ही रघुवीरदासी। मिथ्या जरी ती असलीहि ऐशी।।
कृपेविना ती नच राघवाच्या। सुटे, वदें निश्चयपूर्ण वाचा।।१७।।

।। इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसनें उत्तरकांडे गरुडोपदेशवर्णनं नामाष्टादशस्तरङ्गः ।।



## तरंग १९ वा

जी नर्तवीत सकला जगतास माया। लीला जिच्या उकलती न कुणा अमेया ॥
माया अशी प्रभुचिया भ्रुकुटीविलासीं। नाचे खगेश! परिवारसमेत जैसी ॥१॥
तो सच्चिदानन्दघनस्वरूप। श्रीराम विज्ञानबलीं अमूप ॥
जो व्यापक व्याप्य अनन्त सर्व। अखंड सर्वप्रभु नित्यभाव ॥२॥
अमोघशक्ती अज सर्वदर्शी। अगम्य जो वाङ्मनसेन्द्रियासी ॥
जो निर्गुण ब्रह्म अजित्य ऐसा। अनिंद्य निर्मोह न जाय नाशा ॥३॥
सर्वांचिया हृद्गति नित्यवासी। निरीह, ना ज्या रज, निर्मलाशी ॥
आनंदसंदोह अवर्णनीय। सुष्टीहुनी तो पर रामराय ॥ ४॥

भगवंत रघूत्तंस निराकार निरंजन ॥
अगम्य चरितीं ज्याच्या रमले सर्व सज्जन ॥ ५ ॥
नाहींच मोह व्हायाला येथें लवहि कारण ॥
सूर्यापुढतिं का जाई तम जें दृष्टिवारण ? ॥ ६ ॥

भक्तकाम पुरवी प्रभुराम। भूपदेह धरुनी सुखधाम ॥
आचरी परम रम्य चरित्रें। जों नरानुकृति विश्वपवित्रें! ॥७॥
घेत वेष बहुधा नट कोणी। नृत्य दावि बहुभाव नटोनी ॥
राहतो परि अलिप्त तयांसी। राम त्यापरि पहा सुखराशि ॥८॥
हे खगेश! जगिं राघवलीला। मोहवीति दनुजां सकलाला ॥
शोभदायि रसिकां हृदयांला। नागबंधन रणीं विभु ल्याला! ॥९॥
पापचित्त विषया वश कामी। दोष लाविति रघूत्तम रामीं ॥
अज्ञता हृदयिंची अपुली ते। लादितो रघुपतीवरि निचें ॥१०॥
नेत्रदोष कवणा जर झाला। पीतवर्ण शशि भासत त्याला ॥
ज्यास दिग्भ्रम असे भुलवीत। पश्चिमे उदित त्या दिननाथ! ॥११
बैसल्या चतुरि जो कुणि नौके। चालते जग, असे जनु देखे ॥
वाटते मनि तयाप्रति मोठें। आपण स्थिर परोतर आहे! ॥१२॥

बालकें गिरिगिरी भ्रमणारीं । मानिती फिरति त्यांसह सारीं ! ॥
तीं गृहादि दिसती फिरतीं त्यां । 'सांगता' म्हणति 'कविं असत्या !'
नसे स्वप्नांतही जाला । अज्ञानस्पर्श तो कधीं ॥
हरीविषयिं त्या व्हावा मोह का हृदयामधीं ? ॥ १४ ॥
मतिमंद अभागी जे मायाविवश जाहले ॥
अज्ञानाच्या जवनिकायोगें यचित्त झाकलें ! ॥ १५ ॥
हट्टानें धरिती ऐसें ते महामूढ संशय ॥
अज्ञता आपुली रामीं लाविती मत्त निर्भय ॥ १६ ॥
कामें क्रोधें मदें लोभें व्याप्त गेहादिकीं रत ॥
तमोगर्तांत पतिता कळे कां राम त्याप्रत ? ॥ १७ ॥
निर्गुणरूप प्रभुचें सुलभ गमे सगुण ते कळे न कुणा ॥
सुगम अगम नानाविध विभुचरितें भ्रमविती बुधांहि मुनिंना ॥
रामप्रभुत्व तुज मी ऐक खगवरा ! मलें निवेदीन ॥
सांगेन तुज यथामति गोष्ट मनोहर रसें भरलि पूर्ण ॥ १९ ॥
झाला मलाहि होता मोह प्रभुजी ! जसा प्रकारांनीं ।
तें सर्वचि कथितों मी रामकृपापात्र नूंच सुज्ञानी ॥ २० ॥
हरिगुणगानप्रीती तव हृदयींची मला सुखवि भारी ॥
राहें नच वदतां मी परम–रहस्या कथा मनोहारी ॥ २१ ॥
ऐक; असे रामाचा हितकर सहजस्वभाव हा ऐसा ॥
कीं तो दासहृदब्जीं अभिमानाच्या कदा नुरवि लेशा ॥ २२ ॥
संसृतिचा मूलच्चि जो, शूलप्रद जो अनेकरीतींनीं ॥
निर्मित शोको सकला, ऐसा 'अभिमान'सा नसे कोणी ! ॥२३॥
म्हणुनीच दूर करितो ' अभिमाना ' ला कृपाळु भगवंत ॥
भगवद्हृदयीं नांदे ममता निजसेवकावरि अनंत ! ॥ २४ ॥
शिशुतनुतें व्रण होतां कठोरहृदयें चिरीतसे जननी ॥
परि कोणा वाटे का–शिशुविषयीं अदय होय ती स्वमनीं ? २५
यद्यपि दुःखा पावुनि रडतें बालक अधीर होवोनी ॥
व्याधीचा नाश घडे, यास्तव जननी मनीं न तें मानी ॥२६॥

तैसेचि हे रघुपती जपती स्वदासा । ताचित्तिच्या करुनियां अभिमाननाशा
त्यागोनियां सकलही भ्रम आणि शंका। ऐसा प्रभू तुलसिदास! न सेविशी कां?

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे गरुडभुशुण्डिसंवादे श्रीरामस्वरूपपरात्परवर्णनं नामैकोनविंशतितमस्तरङ्गः ॥



## तरंग २० वा

कृपालुता राघवाची माझी घी मंदगामिनी ॥ '
सांगतों ऐक गरुडा ! लक्ष लावून घे मनीं ॥ १ ॥
जेव्हा जेव्हां रामचंद्र मनुजत्व धरी असें ॥
भक्तकल्याणहेतूनें लीला बहु करीतसे-॥ २ ॥
तेव्हां तेव्हा अयोध्येंत जाउनी मीहि पाहतों ॥
चरित्र बालरामाचें पाहुनी सुख पावतों ॥ ३ ॥
जातों देखावया जेव्हा प्रभुजन्ममहोत्सवा ॥
पांच वर्षे तिथें राहें लोभुनी हर्षवैभवा ॥ ४ ॥
बाल श्रीराम तो माझा देव अत्यंत लाडका ॥
शोभा त्याची किती वानू कोटिकामशताधिका! ॥ ५ ॥
प्रभूच्या मुखपद्मातें माझ्या पाहुनि पाहुनी ॥
नेत्रसाफल्य मी घेई गरुडा ! कोण तें गणी ? ॥ ६ ॥
हरींचा संग मी पावें होउनी बाल वायस ॥
प्रभूच्या बाललीलांचा चाखें मी बहु सौरस ॥ ७ ॥
जिकडे जिकडे राम जातसे रम्य शैशवीं ॥
तिकडे तिकडे मीही जावें उडत वैभवीं ॥ ८ ॥
उच्छिष्ट बालरामाचें पडे जें तेथ अंगणीं ॥
अत्यंत आवडीनीयां खावें मीं तेंच वेचुनी ॥ ९ ॥
एकवार चरित्रांत दावी मजसि राघव ॥
चमत्कारकृतीचें त्या वानूं मी केवि लाघव ?। " ॥१०॥

स्मरतां रामचंद्राची लीला ती अति पावनी ॥
भक्तिभावें खरोमांच भुशुंडी होय तत्क्षणीं ! ॥११॥

बोले पुढें "परिस रे ! खगनाथ चित्र । भक्तांस सौख्यद रघूत्तमसच्चरित्र ॥
प्रासाद तो नृपतिचा अतिरम्यरूप । रत्नादिकांचनमणी रचिले अमूप ॥१२॥
तीं अंगणें रुचिर, वर्णिनि शक्त कोण ! । चारीहि बंधुगण जाति जिथें रमून ॥
श्रीराम आचरित बालविनोदलीला । त्या अंगणीं सुतवितीं अति माउलींला १३
ती इंद्रनीलसम सुंदर अंगकांति । प्रत्यंगभा मनसिजासहि लाजवीती ॥
रक्तोत्पलासम नव्या चरणच्छवी ती । ज्यांची नखद्युति शशिद्युतिहारिदीप्ति ॥
वज्रांकुशध्वजसरोरुह चार चिह्नें । माधुर्यपूर्णरव निर्मित नूपुरनें ॥
सौंदर्यपूर्ण मणिकांचनिं गुंफिलेली । ती किंकिणी कटिसि कोमलनादशाली १५
रेखात्रयी उदरिं सुंदर शोभणारी । गंभीर नाभि रुचिरा मन मोहणारी ॥
वीरास त्या उर विशाल विराजताहे । नाना विभूषणविभा किति साजताहे ! ॥
आरक्तपाणियुग, रम्य नखें जयास । बाहू विशाल बहुभूषणकांतिशेष ॥
ते स्कंध सिंहशिशुसे, दररम्यकंठ । अत्यंत रम्य हनु, आननभा अलोट !१७
अस्पष्ट रम्यवच आाठ सुरक्तरंग । ते दोन दोन वर खालतिं दंत चांग ॥
नासा मनोहर, कपोलहि रम्यकांति । सर्वांतरा सुखद हास्यशशांकदीप्ति ॥१८
नीलांबुजासम विलोचन शोभते जें । सशारदु खगण मोचनकारि तेजें ॥
गोरोचनी तिलक भालिं विराजताहे । वक्रभ्रु रम्य, समकर्णमनोज्ञता हे॥ १९
ते कृष्णवर्ण कुरळे कचशीर्षभूषा । पीतांबरी झगुलिं वर्तुल बालवेषा ॥
माझ्याकडे बघत सुंदर दृष्टिपातें । लावीत वेड चि जणों मजलागिं चित्तें । २०
तो रम्य भूपसदनांगणि खेळणारा । जो सावली अपुलि पाहुनि नाचणारा ॥
क्रीडा करी मजसवें विविधप्रकारीं । ज्या वर्णितां मजसि लाजचि वाटणारी !
तो ओरडूनि मजला धरु पाहि राम । धावोनि येत जव तो हृदयाभिराम ॥
तों जातसें पळुन मी चुकवून त्यासी । दावूनि वर्फि भुलवी मज तो प्रहर्षी !२२

मी येतां जवळीं हासे बालराम रघूत्तम ॥
जातां मी पळुनी दूर रडे विभु मनोरम ! ॥ २३ ॥
जवळीं जाउनी मीहीं पाहें धरु पदाप्रत ॥
तों तों राम पळे दूर मार्गे पाहत पाहत ! ॥ २४ ॥

प्राकृतशिशुसमलीला पाहुनि ऐशा मलाहि मोह भरी ॥
आनन्दसच्चिदमल प्रभु असलें चरित दावि काय तरी ! २५ ॥

ऐसा विचार जंव मी करिं पक्षिराया ! । प्रेरीयली रघुवरें मज वेदि माया ! ॥
माया न ती मजसि दुःखद तेविं झाली । ना अन्य जीवसम संसृतिमाजिं घाली
नाथा ! असे किमपि कारण व्हावया हें ' नूं सावधान हरियान ! विचारिं पाहें ॥
तो ज्ञानपूर्ण रघुनाथ अखंड होय । मायेसि वश्य सचराचर हें अमेय॥२७॥
ज्ञानैकसद्रसमयें जर होति सर्व । जीवेश्वरात नसताच विभेदभाव ॥
मायेसि अंकित अहंकृतिशालिजीव । माया प्रभूसि वश सर्वगुणप्रभाव ॥२८
आहे स्वतंत्र भगवान्, परतंत्र जीव जीव प्रभूत, परमेश्वर एक सर्व ॥
अज्ञानजात जरि भेद अनेक होती । कोटी उपायिंहि हरीविण ते न जाती !
श्रीरामचंद्रभजनाविण जो स्वतांसी । कांक्षीत मोक्षपद निश्चल सौख्यवर्षी ॥
तो ज्ञानवन्तहि मनुष्य पशू गणीन । ज्या न्यून केवळाचि पुच्छ तसें विषाण!
सोळा कलांसहित हो नभिं पौर्णिमेन्दु।तारासमूह जरि हो द्युतिबिन्दुसिन्धू ॥
केले गिरीहि सगळे दवदीप्तिपूर्ण । जाईल ना रविविना रजनी सरून ! !
ऐशा प्रकारिं गरुडा ! हरिभक्तिवीण । संसारताप नच होइल नष्ट जाण ॥
ना सेवकास हरिच्या छळिते अविद्या । सप्रेरिली विभुवरें धरि त्यास विद्या
विद्या न नाश करिते हरिच्या सुभक्ता । ती भेदभक्ति करि वार्धित दासचित्ता
पाहे मला रघुवर भ्रमयुक्त ऐशा । होई सहास, परि ऐक पुढें विशेषा ३३
तें मर्म नैव कळलें अपरासि कोणा । जाणे न तें अनुज, आइ वडीलही ना !
तो जानुपाणि शिशु रांगत येत मातें । सुश्यामगात्र अरुणप्रभ पादहस्तें ॥
मी जाइं रे ! पळुनियां गरुडा ! दुरीं तों।श्रीराम हात पसरी धरण्या मला तो !
आकाशिं मी जसजसा बहु दूर जात । श्रीरामपाणि मम पाठिशिं येत तेथ!
मी ब्रह्मलोकवरिं पाहत पाठि पाठीं । गेलों उडून जरि ही सगळीच सृष्टि ॥
माझ्यामधें प्रभुकरामधि मात्र होतें । कीं दोन अंगुलिच अंतर सर्वदा तें !

भेदूनि सप्तावरणेंहि सारीं । गेलों जरी मी उडुनी भरारी ॥
दिसे मला तो प्रभुहस्त मागें । भिऊनि मी व्याकुल होउं लागें३७
मी त्रस्त होऊनि मिटें विलोचन । पाहें पुन्हां त्यां उघडूनि किंचन ॥
तों मी अयोध्येमधि पातलों दिसे । श्रीराम पाहूनि मला बहू हंसे !

तो हांसतां राघव, तन्मुखांबुजीं । प्रविष्ट मी हीं नवलाइ थोर जी ! ॥
प्रवेशलों मी उदरांत त्याचिया । ब्रह्मांडराशी दिसली स्थली तया। ३९
विचित्र मी लोक पर्थे तिथें किती । एकाहुनी एक विशेष भासती ! ॥
कोटी विधाते, गिरिजा-महेश्वर । अनंत तारे रजनीश भास्कर ॥ ४०॥
अनन्त ते काल दिशाधिनायक। यमादि ते सर्वहि लोकपालक ॥
असंख्य पृथ्वी गिरिही विशाल ते । सरित्वरें अब्धि जलें सुविस्तृतें ॥४१
विस्तार नानाविध सृष्टिचा तथा । अनन्त तो वर्णनशक्य कायसा ? ॥
मुनी मनुष्यें सुर सिद्धकिन्नर । नागादि खाणी चतुरा चराचर ॥४२॥
जें पाहिलें ना कधिंही न ऐकिलें। जें ना कुणीही कधिंही न कल्पिलें ॥
तें सर्व अत्यद्भुत मीं विलोकिलें । वर्णावया शक्त न कोणि देखिलें ॥४३

एकेक ब्रह्मांडीं वसलो मी एक एक वर्षशत ॥
यापरि पहात फिरलों ब्रह्मांडें मी तिथें अनन्तामित ! ॥ ४४ ॥
लोकीं लोकीं तेथें भिन्न विधाते, विभिन्न विष्णु शिव ॥
भिन्न मनू, दिक्पालक, भिन्ननरादिक अनन्त सर्व नव !॥४५॥
गंधर्व भूत किन्नर राक्षस पशु विहग नाग भिन्नचि ते ॥
सुरगण दानव गण ते भिन्न अनन्त प्रकारचे होते ॥ ४६ ॥
तिथले समग्र दिसले अन्य तऱ्हाचेच जीव ते मजला ॥
सरिता, सागर, सर, गिरि नानाविध अवनि सृष्टि ती विपुला ४७
सारा प्रपंच तिथला नयना अन्य प्रकारचा भासे ॥
प्रत्येक ब्रह्मांडीं ती ती वस्तू अमूप रम्य असे ॥ ४८ ॥
प्रति भुवनीं मी पाहें भिन्न अयोध्यापुरी, शरयु भिन्न ॥
नरनारी भिन्नपरी सर्वांचि तेथील भिन्न भिन्नपण ! ॥ ४९ ॥
दशरथ—कौशल्याही तेथिल त्या भुवनिं भिन्न भिन्न अशा ॥
भ्राते भरतादिक ते भिन्नचि मूर्ती तुला वदूं कितिशा ? ॥ ५० ॥
प्रत्येक ब्रह्मांडीं मी पाहें राघवीय अवतार ॥
लीलाचरित्र त्याचें बाल्याचें परमपावन उदार ! ॥ ५१ ॥

मीं भिन्न भिन्न सगळी नवलाइ वेथें । देखीयली भ्रमुनियां हरिवाहना ! ते ॥
विश्वें अनन्त जरि मी फिरलों पहात । श्रीराम एकचि परी नच अन्य होत ! ॥

तें तेंच बालपण ! तीच सुरम्य शोभा। तो तोच राघव कृपाल विनिर्मि लोभा ॥
सर्वत्र सर्व भुवनीं बघिं मी तयासी।दे प्रेरणा मजसि मोहसमीर ऐसी !॥५३॥
ब्रह्मांडकोटिंत असें भ्रमता दुरन्त । भासे व्यतीत जणु कल्पशत भ्रमात ॥
आलों पुढें फिरत मी मम आश्रमांत । तेथें कितीक दिन काल मदीय जात ॥
ऐकें पुढें प्रभुरघूत्तमजन्म होय । साकेतिं धांवतचि येइं मुदें अमेय ! ॥
जन्मोत्सवा बघत भक्तिभरें रमून । म्या गाइलें प्रथम ज्यापरि तेविं पूर्ण ॥५५॥
रामोदरीं बघितलीं भुवनें अनन्त । मीं देखिलीं परि न वानुं शकें समस्त ॥
तेथें बघें पुनरपी भगवंत रामा । मायापती सुमति भक्तकृपाभिरामा ॥५६॥
केला विचार हृदयीं, फिरुनी फिरूनी । मोहें मती भरलि होति अतिप्रमाणीं ॥
त्यां देखिलें जरिहि दोन घडींत सारें । मी श्रांत होय मनिं मोहविशेषभारें ॥
त्रस्ता मला बघुन सर्वचि रीति ऐसें । कारुण्यपूर्ण हृदयें रघुवीर हासे ॥
तो हासतां उघडल्या वदनातुनी मी । बाहेर येइं विहगेश ! कृपाल–धामीं ! ॥
तो तोच बालशरणा मजसंगिं राम । होते करीत फिरुनी शिशुसौख्यधाम ॥
कोटि प्रकारिं मम मी समजाविं चित्ता। शांती न लाभलि मला तरि पक्षिनाथा!॥
पाहोनि तें प्रभुचरित्र विचित्रभाव । मद्देहमान हरपे विसरोनि सर्व ॥
मी खालतीं पडत; शब्द मुखीं वदून । 'हे रक्ष रक्ष भगवन् ! मज हो प्रसन्न'॥
प्रेमाकुला बघुनिया मजलागिं रान । मायेसि आवरत पूरितभक्तकाम ॥
माझ्या शिरीं करसरोज धरी कृपाळ । दीनावनव्यसनि हारवि दुःखजाळ ! ! ॥
माझा विमोह सगळा प्रभु घालवीत । जो सेवका सुखद नित्य कृपानिकेत ॥
रामप्रभुत्व हृदिं मी बहुधा विचारीं । होई प्रहृष्ट मनिं मी अतिहर्षपूरीं ॥६२॥
वात्सल्य भक्तजनिं पाहुनिया प्रभूचें । प्रेमें भरून मम मानस जाय साचें ॥
बद्धांजली पुलकितांग सवारिनेत्र, । तो मी स्तवीं बहुविधा प्रभु सच्चरित्र ॥६३॥
प्रेमार्द्र ऐकुनि अशी मम आर्त वाणी । पाहूनि दास अपुला अति दीनवाणी ॥
बोले रमापति मनोहर मंजुशोक्ति । जी जाहली मम मनाप्रति सौख्यमूर्ति ॥६४॥

" भुशुंडिकागा ! वर माग मातें । प्रसन्न मी होय अतीव चित्तें ॥
समृद्धि सिद्धी अणिमादिका घे । सत्सौख्यखाणी वर मोक्ष मागें ! ॥६५
घे ज्ञान वैराग्य विवेकबुद्धि । विज्ञान षाड्गुण्यमयी समृद्धि ॥
देईन तूंतें सुरदुर्लभाही ! घे अन्य वा काहिं मनास येई" ॥ ६६ ॥

प्रभुवाक्य ऐकुनी मी अधिकचि अनुरक्त रामपदिं होईं ॥
परि मम विचार येती मानसिं, मी चिंतिं हेंचि मद्हृदयीं-॥६७॥
" करुणायतन विभु म्हणे 'देइन तुज इच्छिलीं सुखें सारीं' ॥
'देइन तुज मम भक्ती' ऐसें का म्हणत नाहिं उपकारी? ॥६८॥
भक्तीविण सर्वहि गुण वाटत मज अरस वा अरुचिकारी ॥
लवणाविण कीं नदण्या रायतिं अळणींच सर्व गमणारीं ॥६९॥
भजनाविण सर्व सुखें घेउनि तरि काय गा! करायाचीं?" ॥
वादुनि ऐसें हृदयीं प्रभुरामाला विनम्र मी याचीं ॥ ७० ॥

"देणार हो प्रभुवरा! वर सुप्रसन्न। स्नेहार्द्र चित्तिं करुणा जर कां करून ॥
मी मागतों मजसि ईप्सित जें स्वचित्तीं। सर्वांतरीं वसतसां जि! उदारमूर्ति!॥

करुनिहि सदुद्यमा गमत योगियां दुर्गमा।
सखी प्रभुकृपेसमा तरिच लभ्य जी संगमा ॥
हिता अमृतविभ्रमा नुरवि जी मनीं संभ्रमा।
अशी अति मनोरमा मजसि भक्ति द्या निर्ममा! ॥ ७३ ॥
विशुद्ध अति उत्तमा प्रणतकामकल्पद्रुमा!
कृपाजलनिधे प्रभो! रघुकुलोत्तमा सत्तमा! ॥
सुभावहृदयंगमा! निरुपमा तुम्हीं आपली।
दया करुनि द्यावि हो! मज अखंड भक्ती भली!" ७४

तेव्हां 'तथाऽस्तु!' म्हणुनी रघुराय डोले। अत्यंत सौख्यकर भाषण रम्य बोले—
"हे वायसा! सहजसन्मति तूं शहाणा। का मागशील वरदान मला असें ना?
तूं सर्व सौख्यखनि भक्तिच याचिलीस, ना भाग्यवंत तुजसा जगतीं अशेष॥
जी कोटियत्निहि न लाभतसे मुनीं योगें जपें अनलिं दाहुनिही तनूंना
चातुर्य पाहुनि तुझें अति हृष्टलों मी। मागीतलीस मज भक्तिच सौख्यगामी
आतां प्रसाद विहगा! मम हाच ऐक। होईल मानस गुणाढ्य तुझें सुरेख!

जें ज्ञान विज्ञान विरक्ति भक्ति। मदीय लीलादिरहस्य युक्ती ॥
योगादि तूं भेदहि जाणशील। माझ्या कृपेनें सगळें सलील ॥ ७८ ॥
आतां तुला मोहिल नैव माया। व्यापील ना भ्रांति मना त्वदीया ॥
मी निर्गुण ब्रह्म गुणी अनादि। अजन्म जाणेल तुझी सुबुद्धि ॥७९॥

जे मक्त माझे प्रिय ते सदा मला । मती अशी तूं धरिं नित्य निश्चला ॥
रे! कायवाङ्मानसिं माझिया पदीं । असो तुझी ही अनुरागयुक्त धी ॥८०॥
माझी अतीव विमला अजिं ऐक वाणी।सत्या सुगम्य निगमादिक जीव वानी
सिद्धान्त एक तुज सांगत ऐक माझा। सारें त्यजून मज रे मज भक्तराजा !
मायेमुळेंच मम हा परिवार सारा । सृष्टी चराचर अशी विविधप्रकारा ॥
माझी प्रजा म्हणुनि मत्प्रिय होय सारी।त्यांतूनि मानव मला प्रिय होय भारी

त्यांतून द्विज मजला, द्विजांमधें वेदविद् मला प्रिय गा ! ॥
त्यांच्यांतहि मत्प्रिय ते वैदिकधर्मानुसारि जे कागा ! ॥८३॥
त्यांतहि विरक्त मत्प्रिय त्यांतहि मत्प्रिय अतीव जे ज्ञानी ॥
विज्ञानी अनुभवि जे मत्प्रिय ते त्यांतही असें मानीं ॥ ८४ ॥
त्यांतूनिहि माझा जो दास असे तोचि आवडे मजला ॥
आशा त्यजुनी दुसरी अनन्यगतिनें मलाच जो भजला ॥ ८५ ॥
सांगतसें मी तुजला पुनःपुन्हा सत्य हें भलें पाहें ॥
माझ्या दासाऐसा प्रिय मजला कोणि ना दुजा आहे ! ॥ ८६ ॥
मद्भक्तिहीन ऐसा हो कां तो ब्रह्मदेवही साच ।
इतर जसे जीव मला प्रिय होती, होय तो मज तसाच ! ॥ ८७ ॥
अतिशय नीचहि कोणी प्राणी जर भक्तिवंत तो असला ॥
होतो प्राणप्रिय मज, वाणा मम वायसा ! असें असला ॥ ८८ ॥
जो शुचि सुशील सेवक सुमति, प्रिय तो कुणा न गमणारा ?
सिद्धान्त हाच कागा ! वेदपुराणाहि मान्य होणारा ॥ ८९ ॥

तूं सावधान परिसें मत घे स्वचित्तीं । एका पित्यास कुणि सुनु अनेक होती
त्यांचे पृथक् गुण विचार कृतीहि शीला।ज्ञाता कुणी, कुणि तपी सुमती असेल
कोणी धनी कुणि उदार कुणी सुवीर। सर्वज्ञ कोणि, कुणि धर्मरती कुमार॥
प्रीती समानचि तयां सकलांवरी सी। नांदे सदैव पितयाहृदिं सत्यरीतीं ९१
कोणी तयांत सुत, कायवचोमनांनीं । होई स्वतांच पितृभक्त नितांतमानीं॥
स्वप्नींहि ज्या न दुसरा निजधर्म होत। तो अत्यही निजपित्या प्रिय, जीव मूर्त
ऐशापरी जगिं चराचर सृष्ट जीवीं । साऱ्या सुरासुरनरीं सहजस्वभावीं ॥
मी निर्मिलें सकल विश्व म्हणून साचा।आहे मदीय सकलांवरतीं दयाच।९३

मायामद त्यजुन जो परि त्यांत मावें । सेवीत भक्तिभरिं वाक्तनुयुक्त चित्तें ॥
तो पुं नपुंसक असो अथवादि नारी । सान्या चराचरिं मम प्रिय तोच भारी ।
मी सांगतों प्रियखगा ! तुज सत्य हें कीं । तो प्राणहा प्रिय मला शुचि दास लोकीं
चिंतूनि हें मजचि केवळ तूं भजावें । आशादि टाकुनि समग्र अनन्य भावें ।९५

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने
उत्तरकांडे काकभुशुंडिगरुडसंवादे बाललीलाकाकभुशुंडिवर्णनं
नाम विंशतिस्तरङ्गः ॥



## तरंग २१ वा

माझें स्वरूप जर संतत चिंतशील । त्यातूं शकेल न कधीं तुजलागिं काळ !"॥
ना तृप्ति हो प्रभुवचोऽमृत तें पिऊनी । चित्तग्रहिं तनु ये पुलकीं भरूनी ॥१॥
त्या सौख्य सानुभव मानस आणि कान । सांगू शकेल रसना कधिंही तया न ॥
श्रीरामचंद्रमुपमामुख नेत्र जाणें । वाणी तयास नचि वास्तव वर्णु नेणे ! ॥२॥
नानाप्रकारिं उपदेशुनि सौख्य देत । तो बाल्य आचरण कौतुकिं दाखवीत ॥
डोळ्यांत अश्रु भरुनी मुख दीन होत । मातेकडे बघि भुकेजुनि रामराय ॥३॥
माता तया बघुनि आतुर ऊठलीन । घेवोनि गोड मृदु घे उरिं त्यासि साच ।
घेवोनि अंकिं, पय त्याप्रति पाजवी तो । श्रीरामरम्यचरितें म्हणते सुगीतीं !! ४
जो सौख्यलाभ शिव घे अनुमेंहि वेंप । जो कीं स्वयें सुखद भव्य करी विशेषें॥
साकेतवासि जनता नर आणि नारी । सौख्यांत त्या सतत जात बुडोनि सारी ।
तो सौख्यलेशलवही मिळला जयाला । स्वप्नांमधेंहि अनुभूतिस एकवेळा ॥
न ब्रह्मसौख्यहि तसे गणनीच चित्तीं । ते सुज्ञ सज्जन खरोखर पुण्यमूर्ति ! ॥६॥
साकेति कांहिं दिन मी पुढतींहि राहीं । श्रीरामशैशवचरित्र रसाळ पाहीं ॥
त्यामोनि भक्तिवर रामकृपासहायें । वदोनि रामपदिं मी मम आश्रमा यें ॥७॥
तेथूनियां मतिस या नच मोहि माया । जेथून राम मज घे धरि आपुलीया ॥
मीं सर्व गुतचरिता मम गाइलें या । कीं जेंवि बाचवि मला प्रभुराममाया ॥
आतां खगेश ! वदतों अनुभूति माझी । ना रामभक्तिविण जाय भवार्ति कींबी
रामप्रसादविण जाण खगेश्वरा ! हें । रामप्रभुत्व न कळेचि कुणाहि पाहें ॥९॥

रामप्रभुत्व कळल्याविण न प्रतीति। प्रीति प्रतीतिविण होइल ना कधीं ती ॥
स्नेहाविना नच कदा दृढ भक्ति होते। स्नेहाविना सलिलही चिकटेचि ना तें।
हो ज्ञानलाभ कधि कां गुरुवाचुनीया?। न ज्ञान लाभत विरक्तिविनाहि वायां॥
वैसेंच गाति जगिं सर्व पुराण–वेद। ना ईशभक्तिविण शब्दहि सौख्य लब्ध!
विश्रांति कोठुनि मना मिळणार तात!। संतोष जोंवरि वरी नच आत्मचित्त?॥
चालेल काय कधिं नाव जलाविना ती?। कोटीहि यत्न जरि आचरिले समस्तीं
नाशेल काय कधिं कामविना मुतोष?। ना कामनाशविन सौख्य मिळेल लेश!
ना रामभक्तिविण होइल कामनाश। भूमीविना तरु कदापि रुजे न लेश!॥
विज्ञान तेविं नसतां समता कधीं का। आकाशवाचुनि कधीं अवकाश हो का?
श्रद्धेविना कधिहि धर्म असेल का गा। पृथ्वीविना कधिहि गंध असेल? कागा!
कैशी तपाविण वरें द्युति लाभणार?। तो कोण वारिविण गा! रस निर्मिणार?॥
सत्संगतीविण कसें मिळणार शील?। तेजाविना कधिहि रूप न तें दिसेल! १५
का आत्मसौख्यविन सुस्थिर चित्त होय?। स्पर्शप्रभाव पवनाविण शक्य काय?
विश्वास नाहिं तर सिद्धि कशी मिळावी?।ना भक्तिवीण हरिच्या भवभीति जावी
विश्वास नाहिं तर भक्ति असेल कैशी। भक्तीविना द्रव कसा हृदिं राघवासी?॥
स्वर्मीहि कां शुभकृपेविण राघवाच्या। जातील आर्ति कधि काय वरें जिवाच्या?
ऐसा विचारिं मति निश्चल ही करून। टाकून संशय कुतर्कसमूह पूर्ण॥
श्रीरामचंद्र रघुवीर सदैव सेव। कारुण्यमंदिर सुखप्रद रम्य देव॥ १८ ॥

॥ इति श्रीरामचरितमानससानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे काकभुशुंडिगरुडसंवादे श्रीरामप्रतापभक्ति–अनन्यशरणागतवर्णनं नामैकविंशतितमस्तरंगः॥



## तरंग २२ वा

मासी जशी मति तशा तुज गाइला मीं। रामप्रतापमहिमा सुकृतानुगामी॥
ना वर्णिले तुजसि युक्ति करून काहीं। हें सर्व जें वदित मी निजलोचनाहीं!॥१॥
श्रीरामनाममहिमा गुणकीर्ति रूप। यांतें अनंत अमित प्रभुचें अमूप॥
आपापल्या मतिं मुनी हरिकीर्ति गाती! ना पार शेष,शिव, वेदहि पावताती!॥

ऐकें खगेश ! तुम्हि ते मशकान्त पक्षी।ना अन्त पावत असां कधि अंतरिक्षीं!॥
तैसा अगाध महिमा रघुनायकाचा । त्याचा कुणा गवसला तळ काय साचा !॥
श्रीराम कामशतकोटि-सुरम्य-रूप । दुर्गाब्जकोटिसम वैरि वधी अमूप ! ॥
तो इंद्रकोटिशततुल्य असा विलासी । आकाशकोटिसम जो अमितावकाशी ॥
जो वायुकोटिशततुल्य विशालशक्ति । आदित्यकोटिशततुल्य अनन्तदीप्ति ॥
जो चंद्रकोटिशत–शीतल तापहारी । संसारताप शमवी अतुलप्रकारीं ॥५॥
जो कालकोटिशतसाच दुरन्त होय । जो अग्निकोटिसम नित्य अधर्षणीय ॥
पातालकोटिसम जो प्रभु हो अगाध । जो कीं कराल यमकोटिसमानबाध ॥६॥
जो तीर्थकोटिसम पावनरम्य राम । यन्नाम सर्व अघकोटिंसि हो विराम ॥
श्रीराम सुस्थिर हिमालयकोटिसाच । गंभीर सिंधुशतकोटिसमान तोच ॥ ७ ॥
तो सर्व काम पुरवी भगवान् रमेश । कीं कामधेनुशतकोटिसमत्व त्यास ॥
चातुर्य ज्यांत शतकोटि सरस्वतींचें । ज्या धातृकोटिसम निर्मितिभाग्य साचें ॥
जो विष्णु–कोटिशत पालन–कार्यदक्ष । जो रुद्रकोटिसम संहरि पंकजाक्ष ॥
श्रीमंत जो धनदकोटिशतासमान । मायोपमान शतकोटिंहि योग्य ज्या न !॥९॥
जो भारधारि शतकोटि अहीश पेसा । ऐसा सुयोग्य उपमा तरि काय ईशा!॥
[आहे अगाध रघुराय, तयास साची । योग्या मनोज्ञ उपमा प्रभुमानसाची ॥]

निगम म्हणति कीं निरुपम रामा उपमा रामाविण कैंची ! ।
कोटि काजव्यांसम रवि म्हणणें लघुता दाविंत अति त्याची ! ॥
असें अमुनिही निजनिजमतिच्या विलासिं हरिला गाति मुनी ॥
भावग्राहक कृपाळु विभु तो प्रेमें परिसुनि सुख मानी ! ॥११॥

श्रीराम होय अमितांबुधि कीं गुणांचा । पावेल पार तरि कोण तदीय साचा !॥
संतांचियाकडुनि जें मजला कळालें । सांगावया तुजसि तें रसिका मिळालें ! ॥
तो भाववश्य भगवान् सुखराशि राम । कारुण्यमंदिर मनोहर जो निकाम॥
त्यजूनि मान ममता मद मानसींचे । सीतापतीस भजणें तनुचित्तवाचें १३

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे काकभुशुंडिगरुडसंवादे श्रीप्रतापप्रचण्डातिन्यूनाधिक्य-रूपकालंकारवर्णनंनाम द्वात्रिंशतितमस्तरङ्गः ॥



## तरंग २३ वा

ऐकोनि ती बहु मनोज्ञ सुशुंडि-वाणी । हर्षानि पंख खगराट् फुलवीत दोनी
अत्यंत हर्षुनि मनीं जल नेत्रिं येत । श्रीरामसुंदरचरित्र भरे मनांत ! ॥ १ ॥

पश्चात्ताप तया होय स्मरुनी मोह मागला— ॥
' अनादि ब्रह्म जो राम तो म्या मनुज मानिला ! ' ॥२॥
पुनःपुन्हां कागपायीं ठेवी शीर्ष आदरें ।
रामतुल्यचि त्या मानी अंतरीं प्रेमनिर्भरें ! ॥ ३ ॥
गुरुवाचुनियां कोण तरेल भवसागर ॥
असो कीं नर तो जैसा ब्रह्मा वा देव शंकर ॥ ४ ॥
होतों ग्रसित मी ताता ! सर्वथा संशयोरगें ॥
कुतर्कलहरीसर्धीं दुःखें प्राण निघू बघे ! ॥ ५ ॥
मिळे तत्र स्वरूपीं हा गारुडी रघुनायक ॥
मजला जीववी जो कीं त्रैलोक्यसुखदायक ॥ ६ ॥
तुझिया सत्प्रसादानें मोह माझा विनाशला ॥
रहस्यभाव रामाचा जाणला, ज्या नसे तुला ! ॥ ७ ॥

त्याला प्रशंधि बहुरीति जुडोनि पाणी । वंदीतसे गरुड तच्चरणीं लवोनी ॥
सप्रेम मंजुल विनम्र विनीतभाव । तो बोलला पुढति निर्मल कीं अपूर्व ॥८॥
'अज्ञानचि सिं मम वास्तव मी विचारीं।स्वामिन् !तुम्हास;कथणें मज सत्प्रकारीं
कारुण्यसागर विभो ! मजला वदावें । जाणोनि दासचि मला अपुला सुभावें ९

सर्वज्ञ, तत्त्वज्ञ, तुम्ही विशुद्ध । तमोगुणातीत ऋजू सुबुद्ध ॥
विनिर्मलाचार रमेशभक्त । ज्ञानी सुविज्ञाननिधान संत ॥१०॥

हा देह वायस तुम्हांप्रति केविं येत ? । सांगा समस्त मज कारण जें यथार्थ ॥
श्रीरामचंद्रचरितोत्तमानसाची । ही प्राप्ति जाहलि तुम्हा कथि तें वदानि ।
हे नाथ शंकरमुखें कळलें मला कीं । नोहे तुम्हा प्रलयिंही कधि नाश लोकीं ॥
नोहे मृषा कधिंच वाक्य उमापतीचें । मच्चित्त हें म्हणुन संशयलोल साचें ॥१२
त्रैलोक्य जीव नर नाग चराचराच । हें सर्व कालवदनामधि होत ग्रास ॥
ब्रह्माण्डकोटि अमिता लय जो करीत । तो काल नित्यदुरतिक्रमणीय, नाथ !

व्यापीत ना अति करालहि काल तुम्हां। याचें वदा जि! मज कारण पुण्यसीमा!
ज्ञानप्रभाव अथवा निजयोगशक्ति। तें सांगणें जि! मजल्यागिं कृपालुमूर्ति १४
मी पातलों तुमचिया जंव आश्रमाशीं। झाली विनष्ट तंव मद्भ्रममोहराशि॥
याचेंहि कारण मला प्रियनाथ! सांगा। मांडवरी करुनियां करुणानुरागा" १६

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे गरुडवार्ताविनयप्रश्नवर्णनं नाम त्रयोदशस्तरङ्गः ॥

---

## तरंग २४ वा

हे गौरि! ती गरुडवाक् परिसूनि काग। आनंदुनी वदत त्या अति सानुराग॥
"रे धन्य धन्य तव मानस, पक्षिराया!। त्वत्प्रश्न हे रुचति फारचि मन्मना या
त्वत्प्रश्न भक्तियुत सुंदर आयकोनी। गेलों भरून बहुजन्मभवस्मृतींनीं॥
गाऊन उर्व निजवृत्त तुला कथीन! तूं ऐक सादर सख्या! मनिं सावधान॥२
विज्ञान योग दम दान शमव्रतादि। वैराग्य यज्ञ, तप, मंत्र विवेकबुद्धि॥
सर्वांस सत्फल रघूत्तमपादभक्ति। कोणासही तिजविना नच हो सुखाप्ति॥३॥
श्रीरामभक्ति मज या तनुमाजि होय। यासाठिं हीच तनु मत्प्रिय गा! अमेय॥
हो स्वार्थसाधन जयें करुनी कसेंही। त्याचेवरीच ममता हृदयीं वसे ही!॥४
ही नीति होय गरुडा! जगतीतलांत। जी वेदमान्य तशि सज्जनमान्यरीत॥
दे आपणां परम जें हित साधुनीच। प्रीती कराविच तयीं जरि ते सुनीच॥५॥
कीटामुळें रेशिम ते जहालें। ज्यापासुनी निर्मियलीं दुकूलें॥
अपावना त्या कृमिना अतीव। प्राणांपरी रक्षिति लोक सर्व!॥६॥
हा स्वार्थ एकचि खरा जगिं जीवनाचा। कीं रामपायिं रति हो मनिं देहिं वाचा
तो देह पुण्य, अतिसुंदर तीच काया। जी पावुनी मन जडे प्रभुरामराया!७
लाभोनिहीं विधिसमा तनु, रामवैरी। ना त्या प्रशंसिति कवी बुध सद्विचारी
श्रीरामभक्ति रुजली मम या तनूंत। याकारणें परम मत्प्रिय तीच नाथ!॥८
इच्छामृती असुनिही तनु मी न टाकीं। देहाविना भजन नाहिं, वदे श्रुती कीं॥
मी आधिं मोहसलिलीं बहु आर्त झालों। रामासि मी विमुख होंपि सुखें न गेलों

झाले असंख्य मम जन्म, अनेककर्मी । ते योग यागतप दानजपां करीं मी ॥
मी जन्मलों नच जियें अशि कोण योनि!। केली भ्रमन्ति बहु मी फिरनी फिरूनी
मीं पाहिली करुनि कर्मततो अनेक । आनापरीं कधि सुखी नच होइं देख !॥
शुद्धी असे मज असंख्याचि जन्मिंची हे । शंभुप्रसादिं नच मन्मति ढिम मोहें
त्यागेन मी प्रथमजन्मचरित्र माझें । ऐकें विहंगमपते ! श्रवणीय हें जें ॥
ऐकोनियां प्रभुपदाबुजभक्ति जन्मे । होऊनि नष्ट सगळी हृदयार्तिमर्मे ! ॥ १२

पूर्वी एका कल्पीं झालें कलियुग अतीव मलमूल ॥
नरनारी सर्व जधीं वेदविरोधी, अधर्मि अनुकूल ! ॥ १३ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे महाकाव्ये
कलिकलुषविध्वंसने उत्तरकाडे गरुडं प्रति भुशुंडिनिज-
दशावर्णनं नाम चतुर्विंशतितमस्तरङ्गः ॥



## तरंग २५ वा

मी त्या कलियुगीं येईं अयोध्येमधिं जन्मुनी ॥
होतों शूद्र, करीं भक्ति शिवाची तनुवाङ्मनीं ! ॥ १ ॥
अन्य देवांसि मी निन्दीं ! अभिमानमदोद्धत ॥
अतिवादी धनोन्मत्त उग्रधी दंभपूरित ॥ २ ॥
राघवाची राजधानी वसती जरि ती मम ॥
तरी न महिमा तीचा जाणिला म्या मनोरम ॥ ३ ॥
अयोध्येच्या प्रभावातें आतां जाणत उत्तम ॥
गातीही बहुधारीतीं पुराणें निगमागम ॥ ४ ॥
कुठेंही जन्मता कोणी अयोध्यावसती कृता ॥
श्रीरामपदभक्तींत होते तन्मति सद्रता ॥ ५ ॥
अयोध्येच्या प्रभावातें जीव जाणत तेधवां ॥
जिथंना वास हो चित्तीं श्रीरामा जानकीधवा ॥ ६ ॥
उरगारे ! अती उग्र होता तो कलिकाल गा ! ॥
नरनारी जियें सान्या पापाच्या होत आपगा ॥ ७ ॥

कलिपापीं लुप्त धर्म गुप्त सद्ग्रंथ जाहले ॥
खलबुद्धी दांभिकांनी नाना पंथ विनिर्मिले ! ॥ ८ ॥
मोहग्रस्त मनें झालीं लोभग्रसित सत्कृति ॥
कलिधर्म वदें काहीं गरुडा ! ऐक सन्मति ॥ ९ ॥

ना वर्ण धर्म नच आश्रम होति चारी । वेदां विरोध करिती नर आणि नारी ॥
विप्र श्रुतींस विकिते, नृप लोकभक्षी । कोणीच मानि नच वेदहि विश्वसाक्षी ॥
जो ज्यास आवडत तो पथ तो धरीत । तो होय पंडित, करीत यथेष्ट उक्त॥
मिथ्यातपी करित दांभिकरीति सारी । त्यांचीच संत म्हणुनी झळके तुतारी ! ॥
तो ब्राह्मणा, हरित जो परसंपदेसी । आचारवान् म्हणति जो जन दंभराशि ॥
जो आचरीत सगळींच लबाडि युक्ति । त्यालाच या कलियुगीं गुणवंत उक्ति ॥
आचारहीन सुटला पथ ज्या श्रुतींचा । ज्ञानी विरागि गणला कलिकालि साचा ॥
ज्याची विशाल नखपंक्ति तशा जटाही । तो खरात तापस असा कलिमाजि होई॥
ज्यां वेषभूषण अमंगल सर्वरीतीं । खाणें अभक्ष्य करतेहि, तुटेचि नीति ॥
ते योगि, तेच नर सिद्ध कलींत होत । त्यानाच पूज्यपण लाभतसे समस्त ! ॥
आचार ज्यांस दुसऱ्या अपकारकारी । त्यानाच गौरव कलीमधि मान भारी॥
देहें वचें मनिंहि जे अगदींच खोटे । वक्ते तयास म्हणती कलिचे चखोटे ! ॥
स्वामिन् समस्त नर लंपट कीं स्त्रियांचीं । ते नाचतीच नटमर्कट कामपाशीं ॥
ज्ञानोपदेश करि शूद्रहि कीं द्विजास,घेती कुदान, उरि जानवि विप्रवेष ॥१६॥
क्रोधी समस्त नर कामुक लोभबुद्धि । जे वेद-विप्र-गुरु-साधुजना विरोधी ॥
त्यागूनि आत्मपति सद्गुणि सुदरांगी । अन्यासवें रमति की युवती अभागी ॥
सौभाग्यिनी दिसति भूषणहीन दीन । शृंगार लेति विधवा ललना नवीन ॥
ते शिष्य आणखि गुरू बधिरांध दोनी । ऐके न एक, दुसरा बघतो न कोणी ॥
द्रव्या हरी, परि हरी नच शिष्यशोका । ऐसे गुरू पडति कीं नरकींच देखा!॥
माता पिता निजशिशूंप्रति बोलवूनी । देती धडे उदरपूरण धर्मवाणी ॥१९॥

ब्रह्मज्ञानाविण नारीनर करिति न दुसरी भाषाही ।
कवडीच्याही धनलोभानें करिती द्विजगुरुनाशाही ॥
शूद्र भांडती विप्रजनाशीं म्हणत ' न आम्ही उणे तुम्हां ।
ब्रह्म जाणतो तोच ब्राह्मण ' म्हणुनि दटाविति ' रे! अधमा!' ॥२०

परस्त्रियांशीं लंपट कामी कपटाचरणी चतुर नर ।
मोहमत्सरीं लोटलेले लोभें भरले आत वर ॥
अद्वैतांच्या सिद्धांताचे वक्ते म्हणुनी त्या ख्याती ।
पाहत आलों, विहंगमवरा! कलियुगकालीं हे रीती! ॥ २१ ॥
नाशा जाती स्वताहि नेती दुसऱ्यालाही जे नाशा ।
सन्मार्गांचें पालनकर्त्या सरल भाविका कुणा अशा ॥
दुष्टतर्कें रचुनी निंदिति पूज्य पावना श्रुतिमातें ।
कल्प-कल्पभरि नरकीं पडणें न चुके ऐशा अधमातें! ॥ २२ ॥
नीच वर्णिचे किरात कोळी कलार तेली कुंभार ।
श्वपच असे जन, बाइल मरतां मोडिति अपुला संसार ॥
मुंडुनि मुंडा फिरतीं चहुं दिशि होउनि बाहिर संन्यासी ।
नमविति पाया द्विजां अपुलिया नाशिति इहपर-पुण्यासी ॥ २३ ॥
विप्र निरक्षर कामुक लोलुप वृषलीपति शठ दुश्चरित ।
शूद्र करी जपदानव्रततप कथित पुराणें रसभरित ॥
मनास वाटे तसे कल्पुनी करिती सारे आचार ।
अनीति ऐशी किति वर्णावी? दिसत न मजला तीरें पार! ॥२४॥

हो वर्णसंकर कलीमधि सर्वरीतीं । सद्धर्मसेतु नर भंग करें करीती ॥
भोगीति तत्फल अनन्तपरी परी ते । रे! दुःखशोकभयरोगवियोग यातें! ॥
सोडोनिया श्रुतिमता हरिभक्ति पंथा । वैराग्य-नीति-शमशांति-विवेकयुक्ता ॥
ते चालती कुमति मानव दुष्ट पंथें।कल्पोनि काहिंतरि तें कलिमूढचित्तें २६

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकाडे कलिधर्मवर्णनं नाम पंचविंशतितमस्तरङ्गः ॥

—:०:—

## तरंग २६ वा

मिळवुनि दामा सजविति धामा विषयीं रत यति ना विरति ॥
गृही दरिद्री, तपी धनाढ्यहि; कौतुक कलिचें वर्णु किती! ॥

कुलीन टाकी सती स्त्रियांना आणुनि ठेविति गृहिं अ-सती ।
निर्भयचित्तीं असे वागती डावलुनीयां सुभगगती ॥ १ ॥
सुत वडिलांतें मानिति तोंवरि जोंवरि अबला कर न धरी ।
सासुरवाडी प्रिय झाल्यावरि कुटुंबजन त्या शत्रुपरी ! ॥
अधर्मरति नृप पापपरायण प्रजा पिडाविति दंडानीं ।
मलिनहि धनिका कुलीन गणना, द्विजत्व जानवें, तप नग्नीं ! ॥२॥
वेदपुराणां मान देइना तो हरिभक्तचि संत खरा ।
वृंद कवींचे असुनि न वाणी उदार लाभे श्रुतिमधुरा ॥
गुणास ठेविति दोषचि सगळे गुणी न येई आदळुनी ।
दुष्काळांचा सुकाळ कलिमधिं, भुकी मरति जन कळकळुनी ! ॥ ३ ॥
ऐक खगेशा ! द्वेषकपट हठ दंभ मोहमद काम तसे ।
ब्रह्मांडासहि पाखंडादिक नान व्यापिति सर्व कसे ! ॥
धर्मीहि होतिल तामस सारे जपतप, यज्ञव्रतदान ॥
वर्षतील ना देवहि धरणीं, धान्यहि नुगवे पेरून ! ॥ ४ ॥
अबला होतिल अलकाधिभूषण अतिक्षुधाळू धनहीन ॥
दुःखी अतिशय ममत्वपूर्णा, कांक्षिति सुख परि मूर्खरण ॥
धर्मावरती रती न लवही अल्पबुद्धिच्या निष्करुण ॥
कोमलता नच हृदयामध्यें; कलिमधिं ऐसे अधमगुण ! ॥ ५ ॥
रोगक्लेशीं नर पिडलेले, भोग शक्य नच सेवाया ।
अभिमानी अति विरोध करिती सकल अकारण ते वायां ॥
जीवन लघु अति पंचदशावधि–वर्षकाल तें मात्र जरी ।
तरी मत्तता इतुकी हृदयीं, नाश न जणुं कीं कल्पवरीं ! ॥ ६ ॥
कलि हाल करी अशा परीनें । अनुजा वा तनुजा न कोणि मानी ! ॥
नच तोष मनीं विचार शांति । लघु मोठे सगळेच भीक घेती ! ॥७॥
अति मत्सर रोषशब्द लोभ । अग्नि सर्वत्र; मिळे न साम्यलाभ ! ॥
जन सर्व वियोगि शोकि झाले । शुभवर्णाश्रमधर्म ते निमाले ! ॥८॥
न दया, नच दान, ना दमादि । नच सुज्ञानपणा वरीत बुद्धि ॥
जडता परवंचनादि वृत्ति । कलिमाजीं सकलांवरीं रहाती ! ॥ ९ ॥

सारेचि नरनारी ते कलिपोषक जाहले ॥
परनिंदा करोनीयां मरती जगतीतलें ! ॥ १० ॥

हें एक ऐक गरुडा ! कलि हा कराल । आहे मलायतन दुर्गुणराशि काल॥
आहेत सद्‌गुणहि ते बहु या युगांत । कीं अप्रयासिंच तिथें सुटकाहि होत !

कृतामधें तारक होय पूजा । त्रेतायुगीं यज्ञ, न मार्ग दूजा ॥
द्वापारिं यज्ञें गति जी मिळे कीं, । नामें हरीच्या युगि या, विलोकीं॥

विज्ञानी योगि सारे कृतयुगिं तरती या भवा ध्यानरीतीं ।
त्रेतामध्यें करूनी बहु मख हरितें अर्पुनी होय मुक्ति ॥
द्वापारीं रामपूजा करुनिच्च तरणें, मार्ग नाहींच दूजा ।
गात्रोनी मात्र रामा नर तरति भवा या युगीं, पक्षिराजा ! ॥१३॥

कलियुगिं साध्य न होई कवणाही योग यज्ञ वा ज्ञान ॥
एकचि आधार असे, कीं, गाणें रामचंद्रगुणगान ॥१४॥
टाकुनि अन्य भरंवसा, जे भजती सौख्यधाम रामातें ॥
तद्‌गुणसमूह गाती प्रेमानें आळवूनी नामातें ॥ १५ ॥
ते नर तरतिल भव हा संशय यामाजिं स्वहि नाहींच ॥
नामप्रताप दिसतो कलियुगिं तरि नित्य आगळा साच ! ॥१६॥
कलिचाही एक असे विशेष पावन महा प्रताप असा ।
पुण्य मिळे मानसही, कलिमध्यें पापमात्र ना मनसा ॥१७॥

कलियुगासम तें युग अन्य न । दृढ असा अनुभाव धरो मन ॥
विमल रामगुणाप्रति गाउनी । भव विनाश्रम जाय उतारुनी ॥१८॥
[युग असें दुसरें न कलीविना । भरंवसा दृढ हा धरि रे मना ! ॥
विमल राघवसद्‌गुणगायनें । भव सरे युगिं या श्रमल्याविणें ! ॥१८॥]
प्रकट धर्मपद जरि चारिही* । कलिमधें परिमुख्य दयान ही ॥
कवणही विधिनें दिधलें तरी । उचित 'दान' हितोत्तम हीं करी ! ॥१९॥
श्रीराममाया हृदयास निर्मी । युगीं युगीं अन्यचि वृत्तिभूमी ॥
विज्ञान सत्त्वाश्रित साम्यभाव । कृतीं म्हणूनी मन तुष्ट सर्व ॥२०॥

---

*टीप:—सत्य, दया, तप व दान.

त्रेतायुगांत रज अल्प, अनल्प सत्त्व। याचाटि कर्मि रति, सर्व सुखप्रमुख ॥
हो द्वापरीं रज बहू, लघुसत्त्व तेथें। किंचित् तमस्त्व म्हणुनी सुखदुःख वर्षे ॥
आहे कलींत गुण तामस मात्र फार। थोडा रजोगुण म्हणोनि विरोध थोर ॥
जाणोनि सर्व युगधर्म असे मनात। त्यागी अधर्म बुध, धर्मि रती वहात ॥२३॥
हे कालधर्म नच बाधति त्याजलाच। ज्याची रती रघुपतीवरतीच साच ! ॥
जें कीं करी कपट तो नट युक्तिशाली। ती व्यापिते न नटसेवकचित्ति भूली ! ॥

हरिमाया निर्मित ते हरिभजनाविण न जाति गुणदोष ॥
सर्वांहि काम त्यजुनी, भजणें श्रीराम चित्तसंतोष ! ॥ २४ ॥
गरुडा ! त्या कलिकालीं बहु वर्षे राहिं मी अयोध्येंत ॥
पडतां दुष्काळ परी, तेथुनि मी अन्य देशि गा ! येत ॥ २५ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे कलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे कलिकालमहाघोरकर्मवर्णनं नाम षड्विंशतितमस्तरङ्गः॥



## तरंग २२ वा

ऐक रे ! गरुडा ! आलों तेव्हां उज्जयिनींत मी ॥
अत्यंत दीन मलिन दुःखाच्या व्यापिलों तमीं ॥ १ ॥
गेल्यावरी काल ऐसा मिळवीं कांहिं संपदा ॥
फिरूनी तेथ मी अर्ची भक्तीनें शंभुच्या पदा ॥ २ ॥
होता विप्र तिथें एक शिवपूजक वैदिक ॥
शिवपूजा करीं नित्य न त्या कार्यहि आणिक ॥ ३ ॥
हृदयीं अति साधुत्व जाणता परमार्थिचा ॥
उपासी शंकरा प्रेमें न द्वेष्टा परमेष्ठिचा ॥ ४ ॥
ऐशा त्या ब्राह्मणा सेवीं मी मनें कपटें परी ॥
दयाळू अति तो विप्र नीतिमंदिर तो जरी ॥ ५ ॥
बाह्यता नम्रता माझी देखोनी, विहगेश्वरा ! ।
विप्र तो पढवी मातें मी कीं पुत्रचि दूसरा ! ॥ ६ ॥

शंभुमंत्र मला देई विमल द्विजसत्तम ॥
उपदेशहि दे नाना निवाराया मनस्तम ॥ ७ ॥
मी तो मंत्र जपें नित्य शिवमंदिरिं जाउनी ॥
धूर्द्विगत परी होत दंभ गर्वहि मन्मनीं ! ॥ ८ ॥

मी नीचजाती खल पाप दुर्मति । उन्मत्ततेनें हृदयीं भरें अति ॥
मी विष्णुभक्त द्विज पाहांतां जळें । द्रोही हरीचा महिमा न आकळे ॥ ९

गुरु नित्य प्रबोधीत माझिया हृदयाप्रति ॥
पाहूनि मम आचार गुरु दुःखित हो अति ॥ १० ॥
एकदा गुरुरायानें मजलागिं निमंत्रुनी ॥
बोधिली मजला नीती बोलून बहुरीतिनीं ॥ ११ ॥

" हें जाण ताता ! शिवभक्तिचें फल । कीं रामभक्ती मिळणें सुनिर्मल ॥
ब्रह्मा तसे शंकर, भक्त राघवा । त्याच्या पुढें थोरवि केवि मानवा ॥१२॥
ज्याचे पदाब्जरजि सद्रत शंभुधाते।त्या द्रोहिं दैवहतका! शुभ कांक्षिसी तें?"
वैं कीं म्हणे गुरु 'असे शिव विष्णुभक्त'।ऐकोनि तें खगवरा ! जणुं दग्ध चित्त!
विद्या मिळालि मज जात्यधमास ज्यातें।सर्पास दुग्ध जणुं पाजविलें तसें तें॥
मानी कुजाति, कुटिलात्म कुमार्गि तो मी।झालों गुरूस रजनीदिन वैरगामी!
माझे गुरू अतिदयालु; मुळीं न कोपी। देती सुबोधचि मला बहु ते तथापि॥
घेयून नीचहि कुणी मिळवी महत्त्व।इष्टचि त्यास करि नाश, दिसेचि तत्त्व!
वा! धूम्र हा असत अग्निमुळेंचि झाला।अग्नीस तो विझवि पावुनि मेघतेला
मार्गावरी पडलि धूळ, न मान तीतें।पादप्रहार सकलांकडुनी सहाते ॥ १६!
वारा तिला उडवि तें पडतेच आधीं।राजाचिया मुकुटिं, लोचनिंही अबाधीं
पाहोनि हे खगपते ! जगतीं प्रसंग । ना शहाणे करिति कीं अधमाशिं संग!
गाताति पंडित कवी अशि हे सुनीति । दुष्टासवें कलह योग्य न वाऽनुरक्ति
व्हावें खलासह सदैवचि वा ! उदासी।श्वानां तसा परिहरो जन कीं खलाशी!

माझें सुदुष्ट हृदय कपटी कुटिलात्म तें ॥
सांगती गुरु कल्याण परी तें कटु मन्मतें ॥ १९ ॥
शिवालयीं एकदां मी होतों जपत शंभुतें ॥
आले गुरु तरी गर्वे नुठें, ना वंदिं त्यांसि तें ! ॥ २० ॥

न तें दयाळू गुरु बोलल्ही । रोषा न त्यांच्या ह्रदिं ठाव कांहीं ॥
अशी परी गुर्वपमानपाप । साहू शकेनाच शिवप्रकोप ! ॥ २१ ॥
येई नभोवाग् तइं मंदिरांतुनी— । " मूढा अभाग्या ! अति गर्व ज्या मनीं
संक्रुद्ध झाले जरि ना तुझे गुरू । सुज्ञानि चित्तीं करुणामहातरू ॥ २२ ॥
तरी तुला देइन शाप मी शठा ! । साहेन ना नीतिविरोध उद्धया ! ॥
करीन तूंतें जर मी न शासन । जाईल रे ! सच्छ्रुतिमार्ग भंगुन ॥ २३ ॥
ईर्ष्या करीत जन जो गुरुशींच साच । तो रौरवीं नरकिं कोटियुगें पडेच ! ॥
त्रैलोक्यि तो सकल योनित जन्म घेत । दुःखें सहे अयुतजन्मभरीं नितान्त ! ॥
राहाशि तूं अजगरासम भैसुनीच । पाप्या खळा ! अहिच हो कुमती सुनीच ॥
मूढा ! महाविटरकोटरिं राहशील । पावोनियां अविमला गति पावशील" ॥२५॥

हाहाःकार गुरुमुखीं आला शिवशाप उग्र ऐकोन ॥
मज कंपिता बघोनी गेलें तद्हृदय दुःखभरिं भरुन ॥ २६ ॥
सप्रेम द्विज घाली दंडवत प्रभुसमोर बद्धकर ॥
प्रार्थी सगद्गदगिरा जाणुनि मम भव्य घोर गतिनिकर ! ॥ २७ ॥

"नमो ईश ईशान सौख्यस्वरूपा ! । विभो ! व्यापका ब्रह्मवेदा अमूपा ॥
स्वयं निर्गुणा निर्विकल्पा निरीहा । चिदाकाश आकाशवासा अनीहा ॥२८॥
निराकार ॐकारबीजा तुरीया । नमो इंद्रियातीत देवाधिराया ! ॥
कराला महाकालकाला कृपाला ! । गुणाब्ध्या भवाभोधिपारा दयाळा ! ॥२९॥
तुषाराद्रिगौरा मनोज्ञा गभीरा । नमू कोटिकामाहुनी रम्यसारा ॥
जया शीर्षभागा मनोहारिगंगा । नमो भालबालेन्दुभूषाप्रसंगा ॥ ३० ॥
चलत्कुंडला शुभ्रनेत्रा विशाळा । प्रसन्नानना नीलकंठा दयाळा ॥
धरी सिंहचर्मांबरा मुण्डमाला । नमूं शंकरा नाशितान्तःमाला ॥ ३१ ॥
प्रचंडा प्रकृष्टा प्रगल्भा परेशा । अखंडा अजा कोटिसूर्यप्रकाशा ॥
मनःशूलनिर्मूलना शूलहस्ता । भवानीपते ! नाशि दुःखा समस्ता ॥ ३२ ॥
नमू सर्वकल्याणकारी अनन्ता । सदा सज्जनानन्ददा हे पुरान्ता ॥
शिवा सच्चिदानन्ददोहा विमोहा । स्मरान्ता ! नको विस्मरू भक्त कीं हा ॥
तुला भावगम्या उमानाथ ! लोक । न वंदीति तों केविं व्हावे अशोक ! ॥
प्रभो ! सर्वभूताधिवासा गिरीशा । सदा दे सुतोषा विनाशीं दुराशा ॥३४॥

स्तुतीही तुझी केविं यावी यथार्थ ? । न योगीं जपीं पूजनीं मी समर्थ ॥
जराजन्मदुःखार्त जीवास ईशा । प्रभो ! रक्ष रे ! वंदितों आशुतोषा !" ॥३५॥
रुद्राष्टका म्हणत विप्र सभक्ति ऐशा । जें होय तत्क्षणिंच शंकरचित्ततोषा ॥
गातील जे नर हरस्तुति ही सुभावीं । त्याना प्रसन्न गिरिजावर हो न केवीं ?
ऐकूनि ती स्तुति बघूनिहि विप्रभक्ति । सर्वज्ञ शंकर अनीवचि तुष्ट चित्तीं ॥
ये मंदिरांतुनि नभोमच यापरकारें-।"आतां मला द्विजवरा ! वर माग कीं रे!"
सांगे द्विज "प्रभुवरा ! जर तूं प्रसन्न । माझ्यावरी असशि दीनदयाळ पूर्ण ॥
थावी मला निजपदाम्बुजभक्ति एका ! द्यावा जि ! अन्यवर एक असाहि ऐका-
मायेमुळें दुमनिया, जडजीव लोकीं । राहे सदा फिरत मूढपणीं विलोकीं ॥
न कोध त्यावरि करा भगवन् महेश !। कारुण्यसागर उमावर आशुतोष३९
हे दीनवत्सल विभो ! करणें कृपा या । दीनावरी, धरित मी प्रभुवर्य पायां ॥
व्हावा जि ! शंकर अनुग्रहरूप शाप । थोड्याच कालिं अशि हो करुणा अपाप॥
कल्याण याप्रति अनंतपरीं जयानें । ऐसा प्रसाद करणे करुणानिधानें ! ॥
ऐकोन विप्रवच तें उपकारपूर्ण । वाणी 'तथाऽस्तु!' अशि होय नभामधून ॥
"केलें अंस जरि तयें अति घोरपाप । कोपूनि मी जरि दिलाचि तयास शाप ॥
साधुत्व पाहुनि तुझें परि हें नितान्त । याचेवरी करिन मी स्वकृपा अनन्त
जे कीं क्षमाच करिती, उपकारि जे जे । ते हे द्विजा! प्रिय मला जणुं राम माझे! ॥
जाईल नैव मम शाप कधींच वाया । लागेल यास जगिं जन्मसहस्र याया ४३
हो जन्ममृत्युसनयीं जरि दुःख थोर । याला न अल्पहि तसें परि बाटणार! ॥
या ज्ञानलोप नच होय कुण्याहि जन्मीं । हे शूद्र! ऐक मम वाक्य वदेन जें मी
श्रीरामचंद्रनगरीं तव जन्म झाला । मत्सेवनांत करिशी रत मानसाला ॥
माझ्या कृपें नगरिंच्याहि तसें प्रभावें । श्रीरामभक्ति हृदयीं तुझिया ठसावें ४५
हें तात ! ऐक मम वाक्य सदैव सत्य । दे विप्रपूजन हरिप्रति तोष नित्य ॥
विप्रापमान कधिं तूं करणें न आता । मानीं अनंतसम संतत साधुसंतां ! ४६
जें इंद्रवज्र अथवा ममहि त्रिशूल । कीं कालदंड हरिचक्रहि वा कराल ॥
यांच्या प्रहारिंहि न जो मरणार कोण । तो विप्रमत्सरदवीं जळणार नूनं ॥४७
ऐसा विवेक धरिं तूं निज मानसांत । ना या जगीं तुजशि दुर्लभ कांहि होत ॥
मी आणखीहि तुज देत अशीच आशी । निर्बाध राहिल तुझी गति सर्व देशीं "

ऐकोनि शंभुवच तें गुरु हर्षें 'एवमस्तु' हें वदले ॥
बोधुनि मज ते गेले स्वगृहा शिवपद धरूनि हृदयीं भले ॥४९॥
कालें प्रेरियला मी विंध्यगिरीमाजि जाहलों व्याल ॥
आयासाविण तीही तनु मीं टाकीयली यथाकाल ॥५०॥
जी जी तनु मी घेई ती ती टाकींहि मी अनायासें ॥
परिहावें नव वसना परिहरुनी वसन तें जुनें जैसें ! ॥५१॥
रक्षीयले श्रुतिपथा शिवशंकरानें । मद्‌गुरूदाही सकल तो सहजीं तथा ने ॥
ऐसा प्रकारिं विविधा तनु घेतल्या मीं । न ज्ञानलोप मम हो कुठल्याहि जन्मीं ॥
॥ इति श्रीसुश्लोकमानसे कलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे शिवशापानुग्रह-गुरुकृपावर्णनं नाम सप्तविंशतिस्तरङ्गः ॥



## तरंग २८ वा

तिर्यक् तनू, सुरतनू, नरदेह वा मी। जों जों धरीं अखत मी रत तेथ रामीं ॥
मी ना कधीं विसरलों परि एक शूल। कीं सद्‌गुरू किति दयार्द्र सुभावशील ॥
माते लभे पुढतीं ब्राह्मणजनु धर्मदेह, भाग्यानें ॥
देवासहि दुर्लभ जो गाइयला श्रुतिपुराणिं बहुमानें ॥ २ ॥
मी तेथ खेळें जमवून मेळे। जे बालकांचे गमले रसाळे ॥
करीत मी राघव-रम्य-लीला। ज्या पाहवीतों क्षणिं हृन्मळीला ॥३॥
मी प्रौढ होत मज तों शिकवीत तात। ऐकोन जाणत परी रुचि ना मनांत ॥
गेल्या मनातुनि समस्तहि वासनाच। हो रामपादकमलीं रति मात्र साच !४
तूं सांग कोण विहगेश ! असा कुदैवी। जो कामधेनु दवडूनि खगेस सेवी !
मी प्रेममग्न मज काहिंच ना रुचे तें। सांगून सांगुन मला त्यजिलेंचि तातें !
होताच कालवश ते मम तात माता। गेलों वनीं भजत विश्वपिता अनन्ता ॥
जेथें जिथें विपिनिं लाभत ते मुनीशा। जाऊनि आश्रमिं तया नमवीं स्वशीर्ष
मी त्यां विचारित रघूत्तमकीर्तिगाथा। तें सांगती मुदित मी परिसें समस्तां ॥
श्रीरामकीर्ति अघि ऐकत मी फिरें हा। शंभुप्रसादें मम ना गतिरोध केव्हां ॥
गाढेपणा त्रिविधही सुटल्या मदीय । हे लालसा हृदयिं वृद्धिमतीच होय ॥
श्रीरामपादकमलें जंव मी बघीन । तव्हांच जन्म मम धन्य गणीन पूर्ण ॥८

ज्या ज्या पुसें मुनिसि मी, कथि तो असें कीं।'हो सर्वभूतमय ईश्वर हें विलोकीं'
ना तो रुची मजसि निर्गुणवर्णनाची। जें ब्रह्म हो सगुण तें मज आवडेचि।
मातें स्मरोनि गुरुवाक्य, मनीं मदीय। होई रघूत्तमि रती जगतीं अमेय॥
मी गात गात रघुनाथयशा फिरावें। मातें प्रतिक्षण रघूत्तम आवडावें १०

मेरुशृंगीं वटच्छाये वसल्या मुनि लोमशा॥
पाहूनि वंदुनी पायीं वचा बोलत दीनशा॥ ११ ॥

ऐकोनि माझी मृदु लीन वाणी। मुनी कृपाळू मजला वधोनी॥
विचारि तो,सादर चित्त मातें। "आलास कां गा द्विजवर्य ! येथें ?"१२
तेव्हां म्हणालों "तुम्हि सर्व जाणते। आहा कृपासागर गुज्ञ मन्मतें।
ब्रह्मास कैसें सगुणा उपासणें ?। सांगा मला जी! भगवन् कृपागुणें"॥१३॥
तेव्हां मुनींद्रें रघुनाथ-सद्यशें। गाईयली सादर कांहि सद्रसें॥
विज्ञानि सद्ब्रह्मरत प्रबुद्ध ते। मलाहि मोठा अधिकारि मानते॥१४॥
ब्रह्मोपदेश मजला करिनी मुनीश। "अद्वैत निर्गुण अनादि न रूर ज्यास॥
जें कीं अगम्य अविनाशि सुखात्मराशि। जें निर्विकार कळतें नच इंद्रियांसी
जें वागतीत नच नाम, अनीह तैसें। जें कीं अखंड उपमा नच ज्या विलासे॥
ज्यातें नसे अवधि, निर्मल जें विशुद्ध। जें गम्य हो अनुभवाप्रति साधुसिद्ध॥
तें ब्रह्म तूंच, तुज-त्यांत नसेचि भेद। कीं वारि आणि लहरी कथितात वेद"
चाली मुनीश बहु हे समजूत माझी। चित्ता मदीय परि निर्गुण ना कळे जी।
मी तैं फिरूनि वदलों नमुनी पदास। मातें वदा जि! सगुणार्चन तें मुनीश!
श्रीरामभक्तिसलिलीं मन मीन व्हावें। त्यातून हें विलग केविं वरें रहावें ? १८
तेव्हां दया करुन तो उपदेश द्याच। जेणें बघेन निजलोचनिं राम साच !॥
डोळे भरून रघुराय बघेन जेव्हां। ऐकेन निर्गुण सुवागुपदेश तेव्हां।"॥
सांगे पुन्हां हरिकथा मुनि तैं अमूप। खंडोनिया सगुण, निर्गुण मांडि रूप॥
तें मीहि निर्गुण मताप्रति दूर लोटीं। मांडीत मी सगुणरूपाचि फार हटीं।
प्रत्युत्तरें करित मी बहु उत्तरातें। संक्रुद्ध होत मुनि लोमश तैं स्वचित्तें॥
ऐकें प्रभो! जर विशेष घडे अवज्ञा। ज्ञान्यांचियाहि उपजे हृदिं रोष सुज्ञा!
अतिमात्रचि कीं केलें संघर्षण कुणी जर॥
प्रकटीलचि अग्नीतें शीतही चंदनांतर!!॥ २२ ॥

वारंवार सकोप होउनि मुनी सांगे मला ज्ञानिं ।
मी माझ्याच बसोनि आसनिं मनीं नानानुमानें रचीं ॥
क्रोध द्वैतमतीविना कुठुनि ये ? अज्ञानज द्वैतधी ।
मायावश्यचि होय जीव जड, ये ईशत्व जीवा कधीं ? ॥ ॥२३॥

जो सर्वसौख्यद तयाप्रति दुःख केवीं ? । ज्याला असे परिस तो न दरिद्रि तेवीं ॥
द्रोही दुज्यास, कधि निर्भय काय राही ? । कामी कलंकविण राहिल केंवि तोही ॥
विप्रापमान करतां कधि वंश राहे ? । ज्ञानें टिकेल नच कर्महि तेवि पाहें ॥
राहील केविं सुमती खलसंग होता । पावेल केविं सुगती परदारकर्ता ? ॥२५॥
केवीं पडेल भवि जो परमार्थवेदी । होईल केविं सुखि जो दुसऱ्यास निन्दी ? ॥
राहेल राज्य कधि काय विना सुनीति । का पाप राहि भजतां हरिसद्यशें तीं ?
पुण्याविना सुयश पावन लभ्य काय ? । पापाविना कधि तरी अपकीर्ति होय ? ॥
आहे न लाभ हरिभक्तिसमान अन्य । जी मानिली सुजनिं वेदपुराणिं धन्य
पावोनिही नरतनू भजणें न रामा । ऐसी न हानि गरुडा ! जगतीं असीमा ! ॥
दुष्टत्व-तामसगुणांसम पाप नाहीं । नाहीं दयेसरिस उत्तमधर्म पाहीं !" ॥२८॥
ऐशापरीं अमितयुक्ति मनीं विचारीं । ना आदरें मुनिसदुक्तिस मानिं मारीं ॥
मी घेइं जो सगुणपक्ष पुनःपुन्हाही । तो बोलला मुनि सकोप अशा वचाहीं ॥२९
"मूढा ! तुला शिकवि उत्तम; मानिसी न । तूं उत्तरा करिसि उत्तर ऊलटून ! ॥
विश्वास ना करिशी सत्यवचीं मदीय । सर्वांसि भीतियुत वायसवाच काय ?
दुष्टा ! स्वपक्षचि तुझ्या हृदयीं विशाल। चांडाळ पक्षि झणिं हो; नच यास वेळ।"
मीं घेतला स्वशिरिं तो नमुनीच शाप । वाटे न भीति, नच दीनपणा, न ताप ॥
झालोंच मी त्वरित काग, न त्यास वेळ ! । वंदीत मी मुनिपदांबुज भक्तिशील
चिंतूनि राम रघुवंशमणी मनात । हर्षेचि मी उडुनि जात नभोंऽगणांत ॥३२॥
जे होति गौरि ! रघुनाथपदाब्जभक्त । न क्रोध–काम–मद ज्यांप्रति मानसांत ॥
जे पाहती प्रभुमयूत्तमपूर्ण विश्वा । त्यांचा असल तरि काय कुणाशि दावा ? ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकाण्डे द्विजलोमशसंवादे परस्परोत्कर्षमतवर्णनं नाना-शापिंशतिवृत्तस्तरङ्गः ॥

## तरंग २९ वा

ऐकें खगेश ! नच हा ऋषिदोष कांहीं। सर्वांसि चालक हृदंतरिं राम राही॥
तो मूलबीज मुनिधीस दयांबुराशि। मद्भक्तिचें करि परीक्षण चित्तवासी॥१
जाणोनि वाक्तनुमनीं मज आत्मदास। रामें पुन्हां फिरविलें मुनिच्या मनास
पाहोनियां सहनशीलपणा मदीय। विश्वास रामपदपद्मिं तसा अमेय ॥ २ ॥
तो विस्मयें मुनि मनीं अति दुःखि होत। बोलावुनी मजसि सादरचित्त घेत॥
नानापरीं मजसि तोषवि सांत्वनांनीं। दे राममंत्र मज अंतरिं तोषपूर्णी॥३॥
तो ध्यान वर्णि मज बालकरूपराम। विद्वान् दयानिधि मुनी करुणाभिराम॥
आधींच मीं तुजसि वर्णियलें असें तें। जें आवडे मजसि संतत भक्तिचित्तें॥४॥
ठेवूनि घेइ मुनि तो मज काळ कांहीं। वर्णीत रामचरितोत्तम–मानसाही॥
सप्रेम ऐकवि मला सगळी कथा ती। बोलेहि तो मुनि मला अति मंजुलोक्तीं॥५॥
"हें गुप्त मानसचरित्र रघूत्तमाचें। वत्सा ! मिळे मजसि शंभुकृपेचि साचें !॥
जाणोनि तूं दयित भक्तचि राघवाचा। त्या गाइलें तुजसि पावन हें स्ववाचा॥
ज्याच्या हृदीं नच असे मुळिं रामभक्ति।ताता! नकोचि वदुं त्याप्रति हे सदुक्ति
नानाप्रकारिं मुनिवर्य मला कथीत। मी आदरें मुनिपदांबुजि नम्र होत॥७॥
स्पर्शोनि मस्तकिं मला निजपाणिपद्म। आशीर्वचें मजसि दे मुनि हर्षसद्म॥
श्रीरामभक्ति अति गाढ तुझ्या हृदब्जीं।माझ्या प्रसादिं नित राहिल सौख्यदा जी
होशील तूं प्रिय सदैवचि रामचंद्रा। वैराग्य-बोध-गुणमंदिर धी-समुद्रा !॥
निर्मान, काममरणी, निजकामरूप। होई प्रभाव तव सर्वपरीं अमूप ! ॥९॥
तूं आश्रमीं ज्या वसशील भक्ता !। चिंतीत रामा प्रभुला अनन्ता॥
व्यापी अविद्या लवही न त्यातें। सभोंवतीं योजनिंही कदा ते ॥१०॥
हे काल कर्म गुणदोष तसा स्वभाव। यांचें न दुःख तव चित्ति करील ठाव॥
नानाविधा ललित राम-रहस्यजातें। जीं कीं पुराणिं इतिहासिं निधानभूतें॥
तीं गुप्त वा प्रकट होतिल बुद्धिगामी। भक्ती जडोनि तव नित्य नवीन रामीं॥
इच्छा असेल हृदयामधिं जी त्वदीय। ती सर्व पूर्ण करणारचि रामराय॥१२॥
आशीर्वचें परिसुनी गदद्रा ! सुधीरा। ब्रह्मोक्ति होय गगनांतुनि कीं गभीरा॥
"होवो असेंचि, वदला मुनिसन्मती जे।हा काय वाङ्मनसिं भक्त मदीय साजे।"॥

ती ऐकुनी गगनवाग् मज हर्ष होय । येई भरून उर, संशय दूर जाय ॥
मी प्रार्थुनी मुनिवरासि निरोप घेई । तद्‌गादपाशिं कितिदा लववोनि डोई ! ॥
हर्षेंचि येइं मग मी मग आश्रमा या । श्रीशप्रसादिं वर दुर्लभ पावुनीयां ॥
येथें वसोनि मजला, खगराज! ऐक । गेलेचि कल्प विस आणिक सात देख ! ॥
मी नित्य आचरिं रघूत्तमकीर्तिगान । हे आदरें परिसतात विहंग सुज्ञ ॥
साकेतिं राम रघुवीर यदा यदा तो । भक्तार्थ मानवतनू अवतार घेतो ॥१६॥
त्या त्या सुधन्य समयीं प्रभुच्या पुरीला।जाऊनि सौख्य बघिं राघव-बाल-लीला
हृत्पद्मिं राखुनि शिशूत्तमराममूर्ति । मी येइं आश्रमिं मदीय सुखात्मचित्तीं ॥
केलें निवेदन तुला सगळेंचि वृत्त । ज्याकारणें मजसि वायस देह आत ॥
मी प्रश्न सर्वहि तुझे कथिले तुला गा ! । श्रीरामभक्ति किति थोर तया प्रसंगा ॥
हा देह वास्तवचि मत्प्रिय फार होय । कीं रामरायपदिं भक्ति जडे अमेय ॥
लाभे मला सुखहि मत्प्रभुदर्शनाचें । जावोनि सर्व मम संशय चित्त नाचे ! ॥
मी भक्तिचा धरित पक्ष असा हठानें होऊनि शतहि तसा मुनिच्या मुखानें ॥
मी मेळवीं वर सुदुर्लभही मुनींना । भक्तिप्रताप कवणासहि वर्ण्य हो ना ! ॥२०

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे काकभुशुंडि-गरुडप्रश्नोत्तरवर्णनं नामैकोनत्रिंशतितमस्तरङ्गः ॥



## तरंग ३० वा

जाणोनि भक्ति अशि ही त्यजुनी तियेला । ज्ञानार्थ केवळ परिश्रमि जो जहाला॥
तो कामधेनु गृहिं पातलि मंद टाकी । शोधीत अर्क फिरतो पय मेळवूं की ॥१॥
ऐकें खगेश ! हरिभक्तिस जे त्यजोनी । पाहाति सौख्य मिळवूं भलत्या प्रयत्नीं ॥
ते मूर्ख, सागर महान् , तरणीविनाच । पाहाति हातिं तरण्या परपार सान !"॥
हे गौरि ! ऐकुनि भुशुंडिवचा सुधारा । बोले प्रहर्षुनि खगेश गिरा विनम्रा ॥
"नाहीं प्रभो! मम उरीं तुमच्या प्रसादें । शोका भ्रमा स्थल, न संशयमोह नादे॥
मीं ऐकिलें तव कृपें तुजियाकडून । श्रीरामसद्‌गुणगणां हृदिं शांतिपूर्ण ॥
मी एक आणखि विभो ! पुसतों विनीत । तें सांगणें समजवून दयार्द्रचित्त ॥४॥
गातात तत्त्व मुनिवेदपुराणसंत । ज्ञानासमान नच दुर्लभ काहिं होत ॥
तें ज्ञान सांगत तुम्हां मुनिवर्य, नाथा! । का भक्तिसे तरिहि न तें वरिलें स्वचित्तीं

हो ज्ञानभक्ति मधि अंतर केतुकें तें ? । तें सांगणें मजसि सर्व कृपानिकेतें !" ॥
ऐकोनियां गरुडवाक्य सहर्ष काग । अत्यादरें वदत सुज्ञ मनोज्ञभाग ॥ ६ ॥
"ज्ञानांत भक्तित नसे लवमात्र भेद । दोनीहि नाशितिच संसृतिजन्य खेद ॥
नाथा ! कथीति मुनि भेदहि त्यांत कांहीं । तूं लक्ष्य देउनि खगेश्वर त्यांसि पाहीं
विज्ञान वा ज्ञान विराग योग । सारेचि होती पुरुषात्मवर्ग ॥
हो पौरुषाचा प्रबल प्रताप । स्त्रिया स्वभावें दुबळ्यात्त खूप ॥८॥
जे कीं ज्ञान विराग योगहि तसे विज्ञान सारेजण ।
होती हे हरिवाहना ! पुरुषचि प्रख्यात त्यांचे गुण ॥
सर्वांरीतिं असे बलिष्ठ पुरुष त्यांलिप्रतापगळा ।
माला त्या अबलाचि दुर्बल जडा, तद्धर्म हो वेगळा ! ॥ ९ ॥
नारीप्रती, पुरुष जो मतिधीर कोण । त्यागूं शके, जर असेल विरक्तिपूर्ण ॥
ऐसें करूं नच शके विषयात्मकामी । जो अंतरीं विमुख रामपदाब्जमर्मी ॥१०॥
तो ज्ञानराशिहि मुनी मृगलोचनेचें । पाहोनिया विधुमुखा हृदयात नाचे ॥
होतोच तो विकल पंचशरप्रहारें । मायास्वरूप जगतीं युवतीच कीं रे ! ॥११॥
ना पक्षपात करतों, कथितों यथार्थ । जें सांगती स्वमत वेदपुराणसंत ॥
मोहूं शके न युवती युवतिस्वरूपीं ! हें जाणशीच गरुडा ! कथिं मी तथापि ! ॥
माया तशीच हरिभक्ति तुम्हास ठावी । नारीसवर्ग उभया सहजस्वभावी ॥
त्यातूनि आवडति भक्ति रघूत्तमातें । माया खरोखरचि बापुडि नर्तकी ते !
पाहूनि भक्तिसि सदा अनुकूल रामा।माया असे मनिं भिऊनि तिला निकाम
श्रीरामभक्ति अतुला निरुपाधि ऐसी । नांदे जयाहृदयिं सतत निर्विनाशी
त्याला बघून मनिं संकुचतेच माया।दावी न त्या निज बलाढ्यपणासि वाया।
विज्ञानिंही मुनि अशाच विचारिं सत्या।प्रार्थीति भक्ति विमला सुखखाणि नित्य!
हें सत्यसार सुरहस्य न जाणनाती । कोणीहि सत्वर जगत्रितयीं समस्तीं ॥
जाणेल जो परि रघूत्तमसत्प्रसादें । स्वप्नांतही नच तयाप्रति मोह बाधे ! १६
तूं ज्ञानभक्तींमधला विभेद रे ! । आणीक्ही ऐक खगेश्वरा ! बरें ॥
ऐकोनि तो, रामपदाबुजी रतो । राहे अविच्छिन्न सदा विराजती १७
॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकाण्डे ज्ञानभक्तिसवाध्यावाध्यभेदवर्णनं नाम त्रिंशतितमस्तरङ्गः ॥



## तरंग ३१ वा

ही ऐक तात ! जरि गोष्ट न सांगण्याची।जाणायची अनुभवें, वदवे न साची।
हो ईश्वरांश अविनाशि असाचि जीव।चैतन्ययुक्त सुविशुद्ध सुखात्मभाव १

तो होय मायावश हे खगोत्तम ।। हो बद्ध की तो शुकमर्कटोपम ।।
ही गाठ बद्धा जड-चेतनांमधें । मृषा, परी ना उकलावया बधे।।२।।
हा जीव संसारि तिथून जाहला । ग्रंथी सुटेना, सुखही न त्याजला ।।
पुराणवेदीं कथिले उपायही । हदाचि होई अधिका, सुटे न ही । ।।३।।

जीवाचिया हृदयिं मोहतम प्रगाढ । ग्रंथी सुटे कशाचि ! ना दिसतेहि द्वाढ !
*आणील ईश्वर असा जर गोड योग । तेव्हांच ती सुटलि तो सुटणार सांग !*
श्रद्धा सुसात्त्विक अशो सुरभी सवत्सा।आली जर प्रभुकृपें हृदयाधिवासा ।।
जे कीं अनेक नियमव्रत मंत्र योग । सांगीतले श्रुतिगणीं करणीय चांग।।५।।
ते मानुनी जर हरित्तृण ती चरेल।श्रद्धावत्स शिशु पाहुनि पान्हवेल ।।
बांधोनि पाय दृढ रज्जुनिवृत्तियोगें । केलें जर स्थिर तिला सद्भावरंगें ।।६।।
विश्वासपात्रि मग निर्मल निर्विकल्प । काढील धारमन हा हरिभक्त गोप ।।
लाभेल दुग्ध परमोत्तमधर्मराशि । निष्कामवह्नि जर तापवि कीं तयासी ७
घाली क्षमा निववितो जर तोयवात।त्यांतें जरी विरजवील धृती सुघात ।।
आनंदवृत्ति जर माठ, विचार मंथा।केलें तसें घुसळलांब दमाख्य पंथा ।।
घेऊनि रज्जु ऋजु सत्य सुरम्य वाणी।काढीयलें मथुनियां नवनीत लोणी ।।
वैराग्यरूप अतिपावन जें विराजे । अत्यंत निर्मल मनोहर पुण्य तेजें ।।९।।

योगाग्नि प्रकट करुनि जाळुनि कर्म शुभाशुभ समस्तें ।।
ममता मल जाळोनी ज्ञानघृता बुद्धि शुद्ध निववीतें ।। १० ।।
विज्ञानरूपिणी धी निर्मल घृत भरिल चित्त-समईंत ।।
ठेवुनि दृढ समतेची दिवटी तेथेंच चारु बनवीत ।। ११ ।।
त्रिगुणात्मक कापुस जो तीन अवस्थांसें घन्नि करीं ।।
सूत्र तुरीयावस्थारूप करुनि वात गाढ जाड करी ।।१२।।
ऐशारीतीं लाविल जर का विज्ञानदीप तेजाचा ।
जाताच उशाशीं यहि जळत मदादिक समूह शलभांचा । ।। १३।।

जी सोऽहमस्मीति अखंडवृत्ति । शिखा प्रचंडा जणुं त्या दिव्या ती ॥
सुखात्मभूतिप्रद सुप्रकाशें । संसारभेदभ्रम सर्व नाश ! ॥ १४ ॥
जो कीं अविद्यापरिवार थोर । मोहात्म अंधार निमेचि शीघ्र ॥
बुद्धीस तेव्हां मिळुनी सुदीप्ति । ग्रंथीस त्या सोडवि ती द्दन्वीं ! ॥१५

ग्रंथी सुटेल जर कां सगळी कशीही । होईल जीव कृतकृत्य म्हणींच पाहीं ॥
ग्रंथी असे सुटत हें कळतांच माया । आणीत विघ्नतति ती बघ पक्षिराया!॥
प्रेरीत ती बहुपरीं मग ऋद्धिसिद्धी । ज्या लोभवूनि बहु मोहवितात बुद्धि॥
लालूच-शक्ति-कपटीं जवळीं रिघूनी।त्या दीप मालविति अंचलवारियांनीं!!
होईल बुद्धि जर कां परमप्रवीण । ढुंकूनही बघि न त्या अघ ओळखून ॥
निर्विघ्न त्यांतुनि सुटे जर बुद्धि ऐशी।आणीति विघ्नतति देव किती तियेसी!!
नाना गवाक्षसम भासति इंद्रियें हीं । त्या दारिं दारिं बसल्या नित देवताही
जैं पाहती विषयवात तयांत येत । द्वारें सताड उघडूनिच त्यास देत ! ! ॥
येतांच तो हृदयमंदिरिं थोर वारा । विज्ञानदीप हृदिंचा विझणार सारा!॥
ग्रंथी न ती सुटलि! दीप्तिहि लुप्त झाली।तैं बुद्धिही विषयवार्ति सुदीन केली
न ज्ञान आवडत इंद्रियदेवताना । भोगांत त्यास रुचि वैषयिकांत नाना ॥
बुद्धिप्रती विषयवात करीत दीन । तेव्हा फिरूनि उजळील दिव्यास कोण ?
हा संसृतींत अति पीडित होत जीव । नानापरीं भ्रमुनि पावत ना उपाव॥
ही दुस्तराच अति भासत ईशमाया । कैशीं तरावि कठिनात्मचि पक्षिराया!

ज्ञान कठिण सांगाया, समजाया कठिण कठिण साधाया ॥
त्यांत घुणाक्षररीतीं लाभे तारे संकटें अमित गा या ॥ २३ ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषाविध्वंसने उत्तरकांडे नीरसज्ञानदीपकवर्णनं नामैकत्रिंशत्तितमस्तरङ्गः ॥

—:०:—

## तरंग ३२ वा

हा ज्ञानमार्ग जणुं काय कृपाणधार । तीच्यावरून पडण्या नलगे उशीर !
निर्विघ्नरीतिं जर हा पथ कोणि लंघी । कैवल्यलाभ न तया चुकणार वेगीं १

कैवल्यसंपद सुदुर्लभ नित्य होत । हें सांगती निगमशास्त्र पुराण संत ॥
श्रीरामरायनजनीं रत जो नितान्त।मुक्ती अनीप्सितचि निश्चयिं त्या वरीत!
जैसें स्थलाविन न राहिच वारि कोठें।केले उपाय शतकोटिहि कोणि मोठे ॥
तैसेंचि मोक्षसुखही विहगाधिनाथ! । भक्ती त्यजून हरिनी,कधिं ना रहात!
ऐशाविचारिं हरिभक्त विवेकवंत । मुक्तीस सोडुनिच भक्तिसि लुब्ध होत ॥
भक्ती करीतअसतां सुख सर्वरीतीं । श्रीरामचिंतनिं सुनिर्मल चित्तवृत्ति ४

यत्नप्रयासविण भक्तिमणीं । नाशे अविद्या भवमूल वेगीं ॥
तें जेवणें भोजनतृप्तिसाठीं । विपाककारी जठराग्नि पोटीं ! ॥५॥

ऐसी सुगम्य सुखदा हरिभक्ति होतां,तो कोण मूढ,नच ज्या रचते मनांत?
ऐकें खगेश! भव हा तरणें असेल । त्या सेव्यसेवकपणा उपकारशील ! ॥६
सिद्धान्त हा हृदयिं बाणवुनी सदैव । श्रीरामपादकमला भजणें सुभाव ॥
जो चेतना जड करी, जड चेतनातें।रामास त्या भजति सन्मति धन्य की तें

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकाण्डे ज्ञानदीपक-नीरसमुक्तिभेदवर्णनं नाम द्वात्रिंशतितमस्तरङ्गः ॥



## तरंग ३३ वा

म्यां ज्ञानतत्त्व तुजला समजाविलें । आता वदेन बल भक्तिमणींत ठेलें !॥
चिंतामणीच अतिसुंदर रामभक्तिःज्याच्या हृदी निवसली गरुडा! शुभा ती
दिव्यप्रकाश दिनरात तया हृदन्तीं । ना दीप मागत घृता अथवा न वाती
दारिद्र्य मोह जवळींहि न त्यास येती।ना लोभ वात विझवील तदीय दीप्ति॥
गाढांधकार तम राहिल ना अविद्या । तो हारवीनचि सदा शलभा मदाद्या॥
कामादि दुष्ट निकटींहि न त्यासि येती।ज्याच्या असे हृदयमंदिरिं रामभक्ति
होई अरीहि हितसा, विषही सुधेसें । ना त्या मणीविण कुणासहि सौख्य वसे
त्या व्यापिती न लव, मानस रोग दुष्ट।ज्यांनिमुळें सतत भोगित जीव कष्ट!
हा रामभक्तिमणि यद्हृदिं वासकारी । स्वप्नींहि दुःखलवलेश तया सुदूरीं ॥
जे या मणीस्तव करीति सुयत्न भारी । विख्यात ते चतुरशिरोमणी शरीरीं !१

आहे मणी प्रकट तो जरिही जगांत । रामप्रसादविण लभ्य कुणा न होत !
तत्प्रातिचा सुगम होय उपाय लोकीं।आथाडिती परि तया हतभागि जे कीं !
ते पुण्यपर्वतचि वेदपुराण मूर्त । खाणीच राघवकथा रुचिरा तयांत ॥
ते संत तज्ज्ञ, कुदळी सुमती खणाया।ते ज्ञान आणखि विराग सुनेत्र साह्या
सद्भावयुक्त हृदयें नर शोधि कोणी।त्यालाच भक्तिमणि लाभत सौख्यखणी!
विश्वास हाच हृदयीं मम हो खगेश !।रामाहुनीहि बहु थोरचि रामदास !
श्रीराम सिंधु, तर सज्जन मेघ धीर। श्रीराम चंदनचि, सज्जन हे समीर॥
हो सर्व साधनफलोत्तम रामभक्ति । संताविणा नच कुणासहि लभ्य होती !

ऐशा विचारि धरती नर जे साधुसंगति ।
त्यांनाच सुलभा जाण विहंगा ! रामभक्ति ती ! ॥ १० ॥

क्षीराब्धि तें ब्रह्म गमे मनाला । जें ज्ञान तो मंदर मंथनाला ॥
येती जणों देवचि संत कीं ते । कथासुधा भक्तिमधू मथीते ।॥११॥

वैराग्य ढाल, खड्ग ज्ञान, तवें लोभमोह रिपु वधुन ॥
विजयी होणे हीच श्रीहरिभक्ती खगेश्वरा ! जाण !" ॥१२॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे भक्तिचिन्तामणिवर्णनं नाम त्रयस्त्रिंशत्तितमस्तरङ्गः ॥



## तरंग ३४ वा

सप्रेम बोलत पुन्हा खगनाथ देवें । " माझेवरी जर कृपा तुमची विशेषें ।
जाणोनिया मज विभो! निजदास एक। हे प्रश्न सप्त मम, त्या विवरा जि नीक॥
सांगा विभो ! प्रथम हेंचि तुम्ही सुजाण । सर्वांत दुर्लभ तनू जगतात कोण ! ॥
अत्यंत दुःख जगिं, सौख्यहि कोणतें तें। संक्षेपिं उत्तम कथा सुविचार मातें ॥
जाणीतसां सकल संत-असंत-मर्म । त्यांचा स्वभाव कथणें मज साधुकाम ॥
तें पुण्य कोण कथिलें श्रुतिनीं विशाल ? । तैसेंचि घोर अघ कोण वदा कृपाळ॥
सांगा जि ! नीट मज मानसरोग कोण ? ।सर्वज्ञ तुम्हि अधिकारि कृपानिधान"॥
"बा! ऐक सादर मनें अति आवडीनें । संक्षेपिं तत्त्व कथितों पुरुत्याप्रमाणें ॥४॥

नाहींच मानवतनूसम कोणतीही । इच्छीत जीव सचराचर सर्वदा ही ॥
ही स्वर्ग-मोक्ष-नरकांस शिडीच मान । दे ज्ञान भक्ति विरती सुख मेळवून ॥
ऐशी तनू मिळुनि ना भजती हरीशी । होतात जे विषयमग्न कुबुद्धिराशि ॥
हातून फेकुनि दुरीं परिसास साच । मंदांत मंदमति ते उचलीति काच ! ॥६॥
दारिद्र्यतुल्य नच दुःख जगांत अन्य । ना साधुसंगतिसमानहि सौख्य धन्य ॥
वाकायमानसिं परोपकृती करीती । स्वाभाविकीच अशि सज्जनसाधुरीति ॥
अन्यार्थ दुःख सहती जगतात संत । ते अन्यदुःखद असंत अभाग्यवंत ॥
होती कृपाल जणुं भूर्जतरूच संत । अन्योपकारिं विपदा महती सहात ॥८॥
तागासमान खल ते परबंधनार्थ । काढून साल, निज हाल, मृतीहि घेत ! ॥
स्वार्थाविनाहि करिती खल अन्यहानि।जे सर्प-मूषकपरीं, गरुडा! कसोनी ॥९॥
नाशीति आत्महतिनें परसंपदेतें । सस्यास नाशुनिच गार लयास जाते ! ॥
दुष्टोदय प्रकट हो जगदार्तिहेतु । जैसा प्रसिद्ध अधम ग्रह होत केतु ! ॥१०॥
ते संत संतत जगत्सुखहेतु येती । विश्वास सौख्यद जशा शशि-सूर्य-मूर्ति ! ॥
वो श्रेष्ठधर्म निगमस्तुत हो अहिंसा । निन्देसमान नच पापगिरीहि तैसा ॥११॥
घे जन्म विष्णुगुरुनिन्दक बेडकाचे । ऐसे सहस्रमित योनित त्याच साचें ॥
जातात ते नरकिं निंदक जे द्विजांसी । घेतात जन्म मग वायसदेहवासी ॥१२॥
जे मत्त निंदिति जगीं श्रुतिंना सुराना । ते प्राणि रौरविं सहातिच आर्ति नाना ॥
संतांसि निंदिति, उलूकजनूंसि घेती।ज्ञानार्कि त्यां अरुचि आवडि मोहरातीं ! ॥
जे मंद निंदितिच कीं सकला जनांला । त्याना जगांत वटवाघुळजन्म आला ! ॥
आतां विभो ! कथिन मानसरोग ऐका।दुःखार्त होति जगिं ज्यास्तव सर्व लोक ॥
व्याधींस सर्व जगतीतलिं मोह मूळ । ज्यानें अनंतपरिं उद्भवतीच शूल ! ॥
हो काम वात, कफ, लोभ अपार दाटे । हो क्रोधपित्त, उर ज्यात जळेचि वाटे ॥
प्रीती करीति जर का गरुडा ! तिनीही।तो सन्निपात म्हणोणे अति दुःखदायी॥
जे कामनाविषय दुर्धर तेच नाना । आहेत शूल कळणेंहि न नाम कोणां ॥१६॥

ममत्व वाटे गजकर्ण मोठें । ईर्ष्या गमे कंडुच अंगि दाटे ! ॥
जीं हर्ष-दुःखें उपदंशशी तीं । न अन्यसौख्यें सहणें क्षयार्ति ॥१७॥
दुष्टत्व चित्तांतिल शाख्य कुष्ठ । अहंकृती हाच दवा अनिष्ट ॥
जे दंभ गर्वोन्मदमान नारू । तृष्णा अती ती उदरार्ति भारू ! ॥१८॥

ज्या एषणा तीन गमे तिजारें । शीतोष्ण तापद्वय त्या प्रकारें ॥
होतीच कीं मत्सर दुर्विवेक । कुरोग सांगू तरि का अनेक ? ॥१९॥
हो एकरोगींहि समर्थ नरा वधाया । व्याधी असाध्य बहु हे, वद पक्षिराया ॥
जीवास पीडित सदोदित, तेथ कैचें ? । लाभेल आत्मसुख त्या क्षणही कशाचें ? ॥
त्यां नेम धर्म तप वा आचार ज्ञान यज्ञ जप दान ॥
भेषज-कोटि असोनिहि रोग न हटतीच कांहिंही मान ! ॥२१॥
ऐशापरीं सकलही जडजीव रोगी । प्रीति-प्रहर्ष-भय-शोक-वियोगभागी ॥
म्यां गाइले न बहु मानसरोग येथें । सर्वांतरीं वसति त्या विरलाच वेत्ते २२
होतां उपाय लव ते जरि जाति मागें । ना होति नष्ट परितापद होति संगें ॥
होतां कुपथ्य, विषयोद्भव अंकुरोनी । व्यापीति सन्मुनिसिही, नर कोण मानी ?
रामप्रसाद निवटी सकलांहि रोगां । संयोग येइ जुळुनी जर यापरीं गा ! ॥
हो सद्गुरुप्रथम उत्तम वैद्यराय । विश्वास तद्वचनिं हो हृदिं अद्वितीय २४
आसक्ति सर्वविषयीं क्षणिं संयमावी । संजीवनीमुळि रघूत्तमभक्ति घ्यावी ॥
श्रद्धावती शुभमती अनुपान पूर्ण । यावा असा अमृतयोग सदा जुळून २५
होईल सर्वहि कुरोगविनाश येणें । ना यत्नकोटिहि दुज्या उपयोगिं येणें ! ॥
जाणा तदाच निजमानस रोगमुक्त । जेव्हां विरक्तिबल हो हृदिं वृद्धिमंत २६
सद्बुद्धि भूक नित होइल वाढणारी । दौर्बल्य जाइल रती विषयानुसारी ॥
सुज्ञानशुद्धजलिं जैं मन नाहणार । श्रीरामभक्ति हृदयांबुजि राहणार ! ॥२७॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे मुक्श्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वसने
उत्तरकाडे मानसरोगवर्णनं नाम चतुस्त्रिंशतितमस्तरङ्गः ॥



## तरंग ३५ वा

ब्रह्मा महेश सनकादिक सन्मुनींनीं । ब्रह्मज्ञ नारद शुकादि विशारदांनीं ॥
सर्वांहि सार कथिलें रघुनाथ ! हें हो । श्रीरामपादकमलीं रति नित्य राहो ! ॥१॥
ग्रंथ वेदपुराणादि सर्वही हेंचि सांगती ॥
श्रीरामभक्तिवांचोनी न कोठें सौख्यसंगति ! ॥२॥

वादेल केसहि कधीतरि कूर्मपृष्ठीं । वंध्यासुताकरविं हो हत कोणि काष्ठीं ॥
आकाशहीं सुजिल पुष्पवितान नाना । ना सौख्यलाभ कधिही हरिवैरियाना !
तृष्णा शमो जल पितां मृगतृष्णिकेचें । वाढोहि शृंग कधि वा शशशीर्षि साचें !
नासील वीं तिमिर वा कधि तें शशांका । ना रामचंद्रविमुखा सुखलेश-रेखा
तैसा होईल अग्नीही निर्मियेला हिमें कधीं ।
कोणाही रामविमुखा न सुखाप्ति जगामधीं ॥५॥
होईल वारिमथनें घृतही कधीं तें । लाभेल तैल सिकतामधुनीहि येथें ॥
ना रामभक्तिविण हा भव होय तीर्ण । सिद्धान्त हा निरपवाद असाच जाण ! ॥
मशका विधिता दे प्रभु मशकाहुनि हीन या करि विधाता ॥
ऐशाविचारिं संशय टाकुनि बुध भजति राघवपदा त्या ॥७॥
*मार्जें तरी निश्चित जाण हें मत । खोटें न मासें कधि होय भाषित ॥*
जें भक्तिनें श्रीहरितेंचि सेविती । ते दुस्तरातें तरतीच सन्मति ॥ ८ ॥
म्यां वर्णिलें निरुपमा चरिता हरीच्या । संक्षेपविस्तर यथामति गोड वाचा ॥
सिद्धान्त हा श्रुतिमतीं खगराय! ऐक । सान्यासि विस्मरुनि रामचि सेव एक !
जे राम मत्समशठीं ममता करीती । त्यातें त्यजूनि भजणें कवणा सुरीतीं ? ॥
विज्ञानरूप विभु तूं तुज मोह नोहे । केली कृपा मज अती गरुडा ! तुवां हे
श्रीरामसुंदरकथा पुसलीस मातें । जी पुण्यपावन अतीवचि उत्तमा ते ॥
जी आवडे शिवविरिंचिशुकादिकांना । ब्रह्मर्षिनारदमना सनकादिसुज्ञा ॥
संसारिं दुर्लभचि केवळ साधुसंग । एकाहि वेळिं, घडिही, पळही अभंग ! ॥
हें तूं पहा ! गरुड ! चित्ति विचारुनीया । मी रामरायभजना अधिकारि कीं या ?
मी हा अपावन खगाधम सर्वरीतीं । त्या तो मला प्रभु करी जगिं पुण्यकीर्ति !
मी आज धन्य ! अति धन्य ! जरीहि हीन । सत्संग राम मज दे अपुला गणून -
नाथा! यथामति कथा कथिली तुला ही । ना ठेविलेंचि हृदिं राखुनि गुप्त कांहीं
श्रीरामचंद्रचरितामृतसागराचा । *लागेल काय कवणा तरि ठाव साचा ! १४*
श्रीरामसद्गुणगणा विविधां स्मरून । तो हो प्रहृष्ट बहुवार भुशुंडि सुज्ञ ॥
ज्याचें प्रभुत्व बल निस्तुल सत्प्रताप। ज्या 'नेति' वेद म्हणती महिमा अमूप !
*तो राम, शंभु-विधि पूजिति ज्यास ज्याला माझ्यावरी मृदुलचित्त कृपालु झाला !*
म्यां देखिलाहि न कुठें असला स्वभावाना ऐकिलाहि कधि यापरि अन्य ठाव !

कोणासवें रघुपती मग तो तुलावा ? । श्रीरामरायसम कोण वरें मिळावा ?॥
जे सिद्धसाधक विमुक्त तसे उदासी।संन्यासि पंडित कृतज्ञ कवी महर्षि ॥१७॥
ज्ञानी तपी समरशूर सुधर्मि योगी। विज्ञानि सर्व जगतीतलिंचे सुभागी ॥
माझ्या प्रभूसि भजल्याविण तीर्ण कोण?।मी रामरायपदिं लीन, नमीं, नमीन!
जातां जया शरण मत्सम पापराशि । होती विशुद्ध नमिं मी प्रभु तो अनाशी ॥
[कारुण्यसागर मनोहर रामराय! । भक्तासि तारक सदैव तुझेच पाय] ॥१९॥

यन्नामरूपी भवभेषजानें । शमींच तापत्रयशूल जाणें ॥
सदानुकूल प्रभु तो कृपाळू। मला स्वभक्ता तुजलाहि पाळू! "॥२०॥

ऐकोनियां उक्ति भुशुंडिची ती । पुण्या रघूत्तंसिं बघोनि भक्ति ॥
सप्रेम बोले खगनाथ वाणी । संदेह जातां सगळे निघोनी ॥ २१ ॥
" झालों कृतार्थ तव ही परिसोनि वाणी । श्रीरामचंद्रपदभक्तिरसैकखाणी ॥
भक्ती नवीन मम जाहलि रामपायीं । मायोद्भवा सकल आर्ति मदीय जाई !
झालास तूं मजसि मोहजलाब्धिनौका।नाथा ! दिल्यास सुखराशि मला अनेका
व्हावें तुझें गुरुवरा ! उतराइ कैसें । त्वत्पाद,मी नमितसें बहुवार शीर्षे ! २३
तूं पूर्णकाम विभुसत्तम रामभक्त । कोणीच ना तुजसमान सुभाग्यवंत ॥
ते संत वृक्ष सरिता गिरि तेविं भूमी । सर्वोपकारकरणी सगळ्यांत नामी !॥
आहेत साधु हृदयं नवनीतऐशी । ऐसें कवी वदति तें नकळे तयांसी !॥
तापें द्रवे अपुलिच्या नवनीत सत्य । अन्यार्ति त्या द्रवविते सुजनासि नित्य!
साफल्य लाभे मम जन्मजीवना । तुझ्या कृपें संशयही नुरे मना ॥
तूं मान मातें निजदास सर्वदा " । खगेश सांगे किति दा नमी पदा ! २६
ऐसा सुधीरमति पक्षिपती विनीत । वदी भुशुंडिचरणीं गिरिजे ! पुनीत ॥
वैकुंठिं जाय निघुनी निजपुण्यधामा। राखोनि आत्महृदयीं प्रभुवर्य रामा॥
सत्संगसा न दुसरा जगतांत लाभ। तो लाभतो जर कृपा करि कंजनाभ ॥
गातात हें जगतिं वेदपुराणराशि । हें सत्य ठेविं गिरिजे ! निज अंतराशीं ॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकाण्डे सर्वोपरिभक्तिवर्णनं नाम पंचत्रिंशतितमस्तरङ्गः ॥

~~~o~~~
~~~

## तरंग ३६ वा

सांगीतली तुजसि गौरि ! कथा पुनीता।जी ऐकताच रिधतो भवपाश अन्ता॥
श्रीराम जो प्रणतकामदवृक्ष साच । त्याच्या पदांबुजि रती अति वाढतेच ॥
जे हे कथा परिसती श्रवणें सुचित्तें । वाक्कायचित्तज अघें तुटतींच त्यांतें ॥
तीर्थाटनें सकल साधनराशि योग । वैराग्य बोधनिपुणत्व सुधर्मसंग ॥ २ ॥
नानाव्रतें सुकृति संयम यज्ञसेवा । भूतीं दया जपतपोदम वेदठेवा ॥
विप्रादिपूजन विवेक तशा स्तुतीही । सांगीतलीं श्रुतिमुखीं शुभसाधनें हीं ३
सर्वांस एकचि असे फल उक्त गौरि।। कीं साधणें हितकरी हरिभक्ति सारी॥
ती रामभक्ति, कथिती श्रुति विश्ववंद्या । रामप्रसादि कवणा तरि होय साध्या ?॥
ती श्रेष्ठ भक्ति हरिची अतिदुर्लभाही । संपादिती नर सलील विनाश्रमांही ॥
जे ही कथा परम पावन ऐकतील। विश्वासयुक्त हृदयें अति साधुशील॥५॥
सर्वज्ञ तोच जगतांत गुणज्ञ धन्य । तो भूमिमंडन सुमंडित तो वदान्य ॥
तो धर्मशीलहि कुलोद्धृतिकारि तोच।ज्याचे मनीं रघुपदांबुजि भक्ति साच !
नीतिज्ञ तोच चतुराग्रणिही तसाच । वेदान्तविज्ञ अति उत्तम होय तोच ॥
तो सुज्ञ पंडित कवी रणधीर तोच। जो राघवा भजत निष्कपटें सदाच ! ॥७॥
तो धन्य देश अतिपावन जेथ गंगा । नारी सुधन्य अशि जी पतिचित्तसंगा ॥
तो भूप धन्य परिपाळित जो सुनीति । तो विप्र धन्य नच जो च्युत धर्मरीतीं॥
तें द्रव्य धन्य, गति ज्याप्रति धर्मदानीं। ती शुद्धबुद्धि रत जी अतिपुण्यमानीं॥
ती धन्य होय घडि जीमधि साधुसंग। तो धन्य जन्म भजणें द्विज जें अभंग॥

तें कुल धन्य उमे गे ! सर्वजगद्वंद्य पुण्यतमकीर्ति ॥
श्रीरघुवीरपरायण उपजे जेथें सुभक्त नरमूर्ति ! ॥ १० ॥

वर्णीयली तुज यथामति सत्कथा मीं । होती जरी प्रथम गुप्तचि चित्तधामीं॥
प्रीती तुझी बघुनि थोर मनामधील । सांगें रघूत्तमकथा तुज पुण्यशील॥११॥
सांगों नये कधि शठाप्रति हट्टशीला । जो नायके सुहृदयें हरिच्या कथेला ॥
सांगों नये कुपित-लुब्ध-सकाम-चित्ता । जो ना भजेचि सचराचरविश्वनाथा ॥
द्वेष्टा द्विजा नच अशाप्रति ही वदावी । हो इंद्रतुल्यहि जरी नृप त्या न दावी॥
ते होत राघवकथे अधिकारि गौरि!। सत्संगती हृदयिं ज्या प्रिय होय भारी!॥

ज्यांची रती गुरुपदीं, प्रिय ज्यास नीति। जे विप्रसेवक, हिला अधिकारि होती॥
त्यांना अतीवचि कथा सुखदायिनी हे। ज्या प्राणतुल्याचि मनीं प्रिय राम आहे॥

रामपदाब्जप्रीती ज्यास हवी मोक्षपदहि हो ज्यास ॥
त्यानें भावें प्यावें श्रवणपुटाहीं हिच्याच सुरसास ॥ १५ ॥

म्यां गौरि! राघवकथा तुज वर्णियेली। जी नाशिते कलिमनोमल पुण्यशाली॥
संजीवनी जणुं सुली भवरोगनाशी। गाती कवि श्रुति रघूत्तमकीर्ति ऐशी॥१६॥
सोपान सप्त अति दिव्यरुची हिच्यांत। जे रामभक्ति सुगतिप्रति होति पंथ॥
ज्यांच्यावरी हरिकृपा परमोच होय। या मार्गि ठेवितिल सज्जन तेच पाय॥१७॥
इच्छामना सकलसिद्धि तयास लाभे। गाई कथा सुरस ही नर जो अदंभें॥
जे वाचिती परिसती अनुमोदितीही। ते गोष्पदासम भवा तरतात पाहीं" ॥
ऐकोनि ती शुभकथा हृदि तुष्ट भारी। बोले मनोहर गिरा गिरिजाकुमारी॥
"नाथप्रसादिं मम संशय सर्व गेला। प्रेमा रघूत्तमपदीं नव निर्मियेला॥१९॥
झालें कृतार्थ अजि मी तुमच्या प्रसादें। विश्वेश्वरा! मन भरें अमित प्रमोदें॥
चित्तीं दृढा उपजली मम रामभक्ति। गेली समग्र विलयाप्रति दुःखपंक्ति!" ॥
संवाद हा शुभद शंकरपार्वतींचा। सौख्यें समर्पि उखील विषाद कैंचा?॥
संसारभंजन करी जनरंजनासी। संदेह गंजन करी, प्रिय सज्जनासी॥२१॥
जे रामभक्त जगतीतलिं होत त्यातें। नाहींच यासम दुजें प्रिय काहिंही तें॥
म्यां गाइलें प्रभुकुंरें चरिता पवित्रा। रामायणा रसिकभक्तमनोज्ञचित्रा ॥२२॥
नाहींच साधन दुजें कलिकालिं ऐशा। योगार्चन-व्रत-तपोजप-पूजनाशा॥
राम स्मरून नित रामयशासि गातें। श्रीरामसद्गुणगणा श्रुतिपात्रिं प्यावें!॥
ज्याचा असे पतितपावन थोर बाणा। जो गेय सज्जन-कवि-श्रुतिंना पुराणा॥
त्यालाच रे! भज मना! कपट त्यजूनी। कोणास सद्गति चुके प्रभुला भजोनी!॥

कोण न मिळवी गति रे भजुनी पतितोद्धरणा श्रीरामा।
व्याध-गृध्र-गज गणिकाजामिल स्खलगण तारिति रघूत्तमा!॥
यवन किरात श्वपच खसादिक अति अघकर्ते, तव नामा।
एकवारही घेउनि, पावन होती त्या तुज नमुं रामा! ॥ २५ ॥
जो नर याची ऐके गाई रघुकुलभूपमचरिता या।
कलिमलदुर्मल जाउनि अभ्रमि जाई रामाच्या निलया॥

पंचशतांधि चौपायांतें जाणुनि सुंदर धरित उरीं ।
त्यास अविद्यापंचक दारुण विकृती नुरविल राम हरी ॥ २६ ॥

सुजाण सुंदर कृपाब्धि करि जो प्रीती दीनावरि अमित ।
अकाम देई मोक्षसुखा प्रभु रामासम त्या कुणि नसत ॥
कृपालेश लव लाभुनि ज्याचा, मंदहि तुलसीदास अहो !
परमशांतितें पावे, प्रभु त्या रामासम हो ! कुठें न हो ! ॥ २७ ॥

न दीन माझ्यासम रामराया ! । तुम्हां असा दीनदयाळही न
रघूत्तमा ! जाणुनि हें हरावी । संसारिंची दारुण भीति पूर्ण ! ॥

कामी नरातें प्रिय जेविं नारी । लोभ्यास जैसा प्रिय होय दाम
तैसाच तूंही प्रिय हो मला वा ! । निरंतर प्राणसमान राम ! २९

पूर्वी जें सत्कवि श्रीशिव मनिं विरची राघवाचें चरित्र ।
श्रीसीताराम–पादांबुजरति मिळण्या दुर्लभ प्रीतिमंत्र ॥
जाणोनी रामकीर्ती विपुल तयिं, तिथें नाशण्या हृत्तमास ।
भाषेमध्यें करी तो रसमय तुलसीदास या 'मानसा'स ॥३०॥

जें कीं पावन पापहारि शुभ दे विज्ञान–भक्तींसि दे ।
माया–मोह–मलासि नाशि अमल प्रेमार्द्र ऐसें सुदें ॥
श्रीमद्रामचरित्रमानसिं अशा जे भक्तिनें डुंबती ।
ते या संसृति–सूर्य–घोर–किरणीं ना तापती सन्मति ! ॥३१॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे सकलकलिकलुषविध्वंसने उत्तरकांडे योगवैराग्यज्ञान–परमतत्त्व–भक्तिनिरूपण–सर्वशास्त्रसिद्धान्तवर्णनं नाम षट्त्रिंशतितमस्तरङ्गः ॥



ऐसें या मानसाचें अविरत घडलें स्नान माझ्या मनाला ।
तेणें हृत्तीवतार प्रद्युम्नि अमितानन्द चित्तास झाला ॥
श्रीसीतारामचंद्र प्रभु मजकरवीं ही रची श्लोकमाला ! ।
तीच्या सद्ग्रथमोदें रघुवरकृपया 'राम' हा धन्य झाला ! ॥३२॥

श्रीरामा सत्सुखारामा ! माझिया 'मानसां'त ये ॥
रामनामीं बहु प्रेमा मानसीं वाढु दे वयें ! ॥३३॥

सीतारामपदांभोजीं "राम' 'सुश्लोकमानस' ॥
अर्पी प्रेमाश्रुपूरानें सगद्गदितमानस ॥३४॥

नमितों भक्तिभावानें भवानी-कमलेश्वरां ॥
त्यांनीं मन्मानसाचा हा हेतु केला भला पुरा ! ! ॥३५॥

॥ इति श्रीरामचरितमानसानुवादे सुश्लोकमानसे महाकाव्ये सकलकलि-कलुषविध्वंसने ' अविरलहरिभक्तिसंपादनो 'नाम सप्तमः सोपानः ॥

॥ इति श्रीसुश्लोकमानसे उत्तरकांडः

श्रीसीतारामचंद्रकृपया समाप्तः ॥

॥ श्रीसुश्लोकमानसं संपूर्णम् ॥

॥ शुभं भवतु ॥

— ॥ श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तु ॥ —



## श्रीतुलसीदासांची आरति



जयदेव जयदेव जय तुलसीदासा । श्रीतुलसीदासा ।
वंदन करितां देसी हृदयीं उल्हासा ॥ जयदेव जयदेव ॥

अतिशय मंजुलशब्दीं रसमय रामकथा ।
मधुरा रचिलिस साधो ! अतुलितभक्तियुता ॥
जीतें गातां प्रेमें अगणित सुख चित्ता ।
होई राघवरायीं अति रति सद्भक्ता ॥१॥ जयदेव

'रामकथा–मानस' तव मानस हृष्ट करी ।
राघवचरितामृति या मज्जन हो लहरी ! ॥
भवतापें भीताला आश्रय याच सरीं ।
रघुवरभक्तिप्राप्तिस वाट नसे दुसरी ! ॥२॥ ज॰

गातां गातां 'मानस' मानसिं सौख्य भरे ।
भक्तीचे लोटति हृदिं संतत रम्य झरे ! ॥
श्रीशिवगौरीकृपया चिंता सर्व हरे ।
सीतारामपदांबुजिं 'राम' सदा विहरे ! ॥३॥

जयदेव जयदेव जय तुलसीदासा । श्रीतुलसीदासा ।
वंदन करतां देसी हृदयीं उल्हासा ॥ जयदेव जयदेव ॥

—: श्रीरस्तु :—

यशवंत

# महत्त्वाचें शुद्धिपत्र.

| पृष्ठ | श्लोक | चरण | शुद्ध |
|---|---|---|---|
| (३१) | ओळ ६ | - | मानसा'च्या दिशेनें • |
| (३१) | ओळ १९ | | इशान् देशान् विचर जलद • |
| ७ | २४ | ३ | रात्रौं न अग्नि मृदुले। मिळणार येथ" |
| ९ | २७ | ४ | आशीर्वचें तव • |
| १० | १ | २ | • राक्षसगणो • |
| ११ | २२ | ३ | वालीसवेंहि • |
| १५ | १३ | २ | • शेषहि शक्त हो जी।" |
| १६ | २० | ४ | आणणें तें " |
| १६ | २२ | ४ | आणणेंचि " |
| १७ | ३५ उत्तरार्ध | | तों राम...सुकंठा। 'व्हावें • |
| १७ | ३६ | २ | • प्रवीर' |
| २४ | १९ | १ | बोले "चराचरविभो रघुराय! ऐका। |
| २८ | ३ | ४ | • कार्मुकि उग्रभाव |
| ३२ | २२ | १ | • भजेल त्यामति। |
| ३४ | १३ | २ | • शरण वाघहि • |
| ३४ | २९ | १ | • नाथ! कैशी। |
| ३६ | ५ | २ | • राहि बैसुन |
| ४९ | २४ | १ | • तसाच भेद। |
| ४९ | २५ | २ | • जो जायचा |
| ६३ | १० | | ह्या श्लोकानंतर पुढील श्लोक वाचणें |

त्यांतीचि विरळी रांग करीच्या कोटि कोटिही।
मिळवी धूळितें कोटी कपींना पाडुनी मही॥ १० अ॥

| | | | |
|---|---|---|---|
| ६९ | ४ | ४ | • चितहि वाजति • |

| पृष्ठ | श्लोक | चरण. | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७० | ७ | २ | ० जया विरोध ॥ |
| ८५ | ३० | १ | ० वर्णन तुलसिदास हा मंदमति । |
| ८५ | ३० | २ | ० मार्ने बघत उडाया गगनपथीं ।।। |
| ९२ | ३२ | २ | ध्यावीतहि जे ० |
| १०० | १४ | ४ | ० त्या वुडतया ० |
| १०९ | ८ | ३ | ऽम्बुजभंगसाच । |
| ११२ | ३३ | १ | थोडे तरी ० |
| ११३ | ४ | ३ | ज्ञानी गुणज्ञ० |
| ११६ | १३ | २ | द्विजसाधु ० |
| ११६ | १७ | १ | सौख्यराशि । |
| ११७ | ३० | २ | रमानिवास ० |
| ११९ तरंग१० | ४ | ४ | ज्ञानाभिनिर्मितिसि ० |
| १३२ | १० | २ | ० खगवृंद ० |
| १४६ | | | श्लोकांक ७३ ते ९५ हे ७२ ते ९४ समजावेत. |
| १४८ | ८ | २ | घरिं ऐवजीं हृदिं वाचावें |
| १५१ | ११ | ३ | श्रीरामचंद्रचरितोत्तममानसाची । |
| १५२ | | | १६ श्लोकाक १५ समजावा. |
| १५८ | | | तरंग २२ अंक २७ समजावा. |
| १६० | २१ | १ | ० गुरु बोलतेही । |
| १६१ | ४१ | २ | ० निधानें !" |
| १६२ | ५ | ४ | सांगून संगुन ० |
| १६७ | ९ | ३ | ० क्रांतिप्रतापागळा । |
| १७१ | ८ | २ | ० सौख्यखाणी । |
| १७४ | १४ | ४ | ० ठाव साचा ।।" |
| १७४ | १५ | ३ | " ज्याचें प्रभुत्व ० |

# डॉ. रा. चिं. श्रीखंडेकृत ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| ★ वाङ्मय-श्री-खण्ड | [श्रीखंडे बंधुभगिनी व कवि काशीशास्त्री यांची सुरस रचना गद्य व पद्य; संस्कृत कवितासह] | किं. ६ रु. |
| ★ सुश्लोक-गोविंद | गीतगोविंदाचा सुरस श्लोकानुवाद सचित्र. विवेचक प्रस्तावना व मूळ गीतगोविंद यासह. [२री आवृत्ति] | ४ रु. |
| ★ सुश्लोक-कुमार | 'कुमारसंभव' महाकाव्याचा सुरस श्लोकानुवाद सचित्र. विवेचक प्रस्तावना व मूळ कुमारसंभव यासह | ४ रु. |
| ★ कुंदमाला | दिङ्नागकृत संस्कृत कुंदमाला नाटकाचें मराठी भाषांतर. कै. रघुशास्त्री व डॉ. रा. चिं. श्रीखंडेकृत | १। रु |
| ★ सुश्लोक-मेघ | सुरस श्लोकमय मेघदूतानुवाद मूळ मेघदूत व विस्तृत विवेचक प्रस्तावना यासह | ४ रु |
| ★ सुश्लोक-मानस भाग १ ला | श्रीतुलसीरामायणाचा सुरस मराठी प्रथम रचनेचा श्लोकानुवाद, बाल-कांड. सचित्र | ५ रु |
| भाग २ रा | अयोध्या, अरण्य व किष्किंधाकांड सचित्र | ५ रु |
| भाग ३ रा | सुंदर, लंका व उत्तरकांड सचित्र (आगामी) | ८ रु |

पुस्तकें मिळण्याचा पत्ता —डॉ. रा. चिं. श्रीखंडे,
एम्. बी. बी. एस्.
श्रीतुलसीमंजरी, वेलभाग, कोल्हापूर.